## मीनाक्षी कोल्हटकर

स्वतः शिक्षिका व सोशल वर्कर. माँटेसरी डिप्लोमा व टाटा स्कूल ऑफ सोशल सायन्सेस या संस्थेचा 'डिप्लोमा इन सोशल सायन्सेस अँड ॲडमिनिस्ट्रेशन' मिळविल्यानंतर मीनाक्षीबाईंनी या दोन्ही क्षेत्रात प्रत्यक्ष कार्य केले. त्यांनी माँटेसरी शिक्षक म्हणून, क्रेश ऑर्गनायझर म्हणून, प्रोबेशन ऑफिसर म्हणून काम केले आहे. रिमांड होमस, सर्टीफाईड स्कूल व ज्यूवेनाईल सर्व्हिस ब्यूरो या संस्थांत १३ वर्षे काम करून 'उन्मार्गी' मुलांचे जीवन सुधारण्याचे काम केले. इतरही सामाजिक कार्य व समाज-संशोधन कार्य केले आहे म्हणूनच त्यांनी इतक्या सहजपणे एका समर्थ लेखकाची विलक्षण बोलकी कादंबरी मराठी वाचकांसाठी अनुवादित केली आहे.

# गॉर्की कॉलनी

(भाग २ व ३)

लेखक : आन्तोन मकारेंको

अनुवाद : मीनाक्षी कोल्हटकर




लोकवाङ्मय गृह प्रा. लि., मुंबई ४०० ००४

# अनुक्रम /

## भाग / २ रा



## भाग ३ रा

# १

# दुधाची चरवी

आम्ही उन्हाळयातल्या एका उबदार दिवशी नव्या कॉलनीत–ट्रेपकेवाडीत–प्रवेश केला. झाडावरच्या पानांचा रंग अजूनही पालटला नव्हता. जणू काही तारुण्यातल्या दुसऱ्या टप्प्यात प्रवेश केल्याप्रमाणे गवतानेसुद्धा आपला हिरवेपणा न सोडता, हिवाळयाच्या सुरुवातीच्या दिवसांत ते जसं दिसत असतं तितकेच ते अजूनही तरतरीत आणि टवटवीत दिसत होतं. नवी कॉलनी तीस वर्षे वयाच्या तरुणीसारखी आकर्षक परंतु शांत, आनंदी व उत्साही दिसत होती व पहाणाऱ्यालाही उत्तेजित करत होती. कोलोमॅक नदीने सर्व बाजूंनी कॉलनीला वेढाच घातलेला होता व गोन्चारोव्का गावाला जोडणारा एक लहानसा रस्ता मोकळा होता. आमच्या बगीचातल्या झाडांच्या समृद्ध शेंडयांनी कोलोमॅक नदीवर जणू काही सावलीचं आवरणंच घातलं होतं. कोलोमॅकच्या किनाऱ्यावर सावलीचे पुष्कळ कोपरे होते. अशा कोपऱ्या–कोपऱ्यांतून मस्तपैकी पोहायला, परिराज्यात जायला, मासे मारायला किंवा विशेष हितगुज करण्यासाठी भेटायला या जागा फारच उत्तम होत्या. आमच्या मुख्य इमारती या कोलोमॅक नदीच्या कडयासारख्या किनाऱ्यावर ओळीने बांधलेल्या होत्या. आमच्या काही अवखळ व नादान मुलांना या इमारतींच्या खिडक्यांतून आपल्या अंगांवरचे आधीच अपुरे असलेले कपडे खिडकीवर काढून ठेवून तिथून पोहण्यासाठी सूर मारणं सोपं झालं असतं.

नदीच्या उतारावर आमचा बगीचा दोनतीन भागात पसरलेला होता व

सर्वांत खालचा भाग शेरेसाहेबांनी सुरुवातीपासून त्यांच्यासाठी राखून ठेवलेला होता. इथं नेहमी सूर्यप्रकाश व हवा होतीच. कोलोमॅक नदीवर या ठिकाणी मासेमारी किंवा काव्य यांची वाढ होत नसली तरी कोलोमॅकचा प्रवाह अगदी संथ होता व पात्रही खूपच रुंद होतं. काव्य जरी नसलं तरी इथं कोबी व कंद भरपूर वाढत असत. कॉलनीतली मुलं ह्या भागाला अगदी वास्तववादी भूमिकेतून वरचेवर, फावडी व खुरपी घेऊन भेट देत असत. कधीकधी यापुढेही जाऊन फाल्कन किंवा बँडिट यांना नांगराला जुंपून हे कंदमुळं उकरण्याचं काम करत. इथंच कोलोमॅक नदीच्या पाण्यात घातलेली जट्टी होती. ही जट्टी तीन फळ्या टाकून साधारणपणे तीन मीटर लांबीची अशी बनविलेली होती.

याच्यापुढे कोलोमॅक नदीने पूर्वेकडे वळण घेतलेले असून आमच्या कॉलनीच्या पायथ्याशी लांबवर झुडुपे आणि लहान झाडे असलेला हिरवागार जमिनीचा पट्टा पसरलेला होता आमच्या नव्या बगीचातून आम्ही त्या गवताळ भागात जाऊ शकत होतो व कधीकधी आम्हाला मोकळ्या वेळात त्या हिरव्यागार उतारावर पॉपलर झाडांच्या सावलीत बसण्याचा मोह होई. कारण तिथून तो हिरवा पट्टा, ती झाडे, ते आकाश आणि गोन्चारोव्का गावाचं टोक लांबवर क्षितिजाजवळ दिसे. कालिनासाहेबांना ही जागा फारच आवडत असे आणि कधीकधी रविवारी दुपारच्या वेळी ते मला त्या जागी जाऊन बसण्याचा आग्रह करत.

मला कालिनासाहेबांच्या बरोबर शेतकऱ्यांच्या आयुष्यातल्या घडामोडी, आमचा भविष्यकाळ आणि आमच्या कॉलनीची दुरुस्ती याबद्दल गप्पा मारायला आवडत असे. आमच्या पुढं सारा हिरवागार परिसर पसरलेला असे आणि त्या परिस्थितीमुळे कालिनासाहेबांचं लक्ष त्यांच्या नेहमीच्या तात्विक विषयावरून बाजूस सरत असे.

'खरं सांगू का महाशय, आयुष्य हे एकाद्या स्त्रीप्रमाणे आहे. कसं म्हणाल तर दोघांकडूनही आपल्याला कधीच न्याय मिळत नाही. एखाद्या चांगल्या भरदार मिशीवाल्या माणसाला वाटाणे काय, चीज, केक किंवा आणखी काही खाद्यपदार्थ मिळू शकतात. पण दुसरा एखादा येतो ज्याची दाढीच काय पण मिशासुद्धा वाढत नाहीत. त्याला असल्या बायांकडून साधं पाणीसुद्धा मिळायची मारामार पडते. मी जेव्हा घोडदळात होतो...ए कारट्या, तुझं डोकं कुठे आहे ? जेवायच्या वेळेस चुकून डोकं तर नाहो ना खाल्लंस ? घरी तर नाही ना विसरून आलास ? घोडा कुठं घालतोयस त्यावर लक्ष आहे का ? तिथं कोबी लावलेली आहे हे विसरलास ?'

कालिनासाहेब अशा तऱ्हेने बडबडत उठून तोंडातला पाईप फुंकत तरातरा एकदम लांब निघून जात. सुमारे ३०० मीटर लांबवर नारिंगी रंगाचं काहीतरी त्या झुडपामधून डोकावे, परंतु कोणीही कारटं कधी तिथं दिसलं नाही. हे बोलणं कोणाला उद्देशून असे हे कालिनासाहेबांना माहीत होते. ती सारी हिरवळ म्हणजे ब्रातचिन्कोचीच होती. तो तिथे वावरत असे, परंतु दिसत मात्र नसे. आणि खरोखर

हे सारं बोलणं ऐकणाऱ्याला ही काही जादू वगैरे तर नाहीना असं वाटे. जणू काही ते जादूई वातावरण कायम राखण्यासाठी ब्रातचिन्को एकाएकी उपस्थित होत असे, परंतु तो घोड्याच्या मागे न दिसता बगीचातून उतरून आमच्यामागे उभा असलेला दिसे.

'कालिनासाहेब कोबी कुठे आणि घोडा कुठे ? तुम्ही का उगाच आरडा-ओरडा करता ? '

अशा वेळी वस्तुस्थितीला धरून पाहिलं असता काहीही कारण नसताना हे लक्षात येई की कालिनासाहेबांचे विचार जुनाट झाले आहेत व त्यांना कॉलनीच्या नैसर्गिक ठेवणीचा किंवा कोबी लावण्यासाठी कोणती जागा राखून ठेवली आहे त्याचा विसर पडला असावा.

मुलांनी कालिनासाहेबांच्या वयाची बूज ठेवली होती. शेतीचं सारं काही काम संपूर्णपणे शेरेसाहेबांच्या हातात केव्हाच दिलेले होतं व कालिनासाहेब मधूनमधून टीका करण्याच्या उद्देशानं शेतीच्या कामामध्ये आपलं नाक खुपसायचा प्रयत्न करत. परंतु शेरेसाहेब अतिशय शांतपणानं, नम्रपणे कालिनांच्या नाकाला हळूच चिमटा काढत व कालिनाही आपला पराभव कबूल करत.

आमच्या सर्वसाधारण अर्थव्यवस्थेत कालिनासाहेबांची जागा सर्वात उच्च होती. ते जणू काही एखाद्या हाती सत्ता नसलेल्या नामधारी राजाप्रमाणे होते. आम्ही सर्वजण त्यांच्या या सत्तेला अगदी मनापासून मान देत असलो तरी आम्हाला योग्य वाटेल तेच आम्ही करत असू. कालिनासाहेब हे तसे भावनाप्रधान नसल्याने ते ही गोष्ट मनाला लावून घेत नसत. आणि खरोखर पाहिलं तर त्यांना त्यांच्या तत्त्वज्ञानाचीच जास्त काळजी होती असं दिसून येई.

अनेक दिवसांच्या चालत आलेल्या रितीप्रमाणे कालिनासाहेब शहरात जात असत. त्यांच्या या जाण्याचा जणू काही एक मोठा समारंभच असायचा. कालिना-साहेबांना जुन्या पद्धतीच्या छानछोकीची आवड होती व मुलांना याची चांगली कल्पनाही होती. ते म्हणत, ' बडे लोक आपली गाडी उत्तम ठेवतील परंतु घोड्याला मात्र उपाशी ठेवतील. तसेच स्वतः उपाशीपोटी राहतील पण बाहेर भपकेबाज देखावा करतील. परंतु खरे चांगले लोक आपली रहाणी साधी ठेवतील म्हणजेच आपली गाडी चांगली ठेवतील परंतु घोड्याला पोटभर खायला घालतील. '

आमची मुलं आमच्या शववाहिनीसारख्या असलेल्या गाडीत अगदी मऊ-मऊ गवत पसरून त्यावर स्वच्छ चादर घालत. त्यानंतर कॉलनीतले चांगल्यापैकी घोडे त्या गाडीला जुंपून रूबाबात ती गाडी कालिनासाहेबांच्या दारापुढे उभी करत. आमची आर्थिक बाजू सांभाळणारे आमचे अधिकारी आपापलं काम करत. म्हणजेच आमचा दुय्यम पुरवठा अधिकारी डेनिस कुडल्टी याच्या खिशात आपापल्या चिठ्ठ्या घालत. या चिठ्ठ्यांमध्ये शहरातून आणावयाच्या वस्तूंची यादी असे. आल्योशा वोल्कोव, आमचा भांडारनायक, निरनिराळी खोकी, भांडी व हे सर्व

बांधण्यासाठी लागणारी सुतळी गाडीमध्ये नेऊन ठेऊन देई. कालिनासाहेब गाडी येऊन उभी राहिल्यानंतर दोनतीन मिनिटांनी दारात प्रवेश करत. ते चांगल्यापैकी कोट घालून व आधीच तयार करून ठेवलेली चिलीम (पाईप) काडीने पेटवत पेटवत, इकडेतिकडे बघत व तोंडाने काहीतरी पुटपुटत बाहेर येत... 'किती वेळा रे, तुम्हाला सांगितलं की शहरात जाताना असल्या मळक्या टोप्या घालू नका! अगदीच गबाळी कार्टी आहेत झालं.'

बिचारा डेनिस आपली टोपी काढून आपल्या एखाद्या मित्राची टोपी पटकन डोक्यावर चढवत असे. कालिनासाहेब आपल्या जागेवर आरामात बसत आणि 'हं, चला निघू या', असा इशारा देत.

शहरामध्ये गेल्यावर कालिनासाहेब आपला बराचसा वेळ धान्यपुरवठा खात्याच्या ऑफिसात एखाद्या बड्या अधिकाऱ्याशी चर्चा करण्यात घालवत. अशावेळी ते गॉर्की कॉलनीमधली आपली जागा कशी महत्त्वाची आहे ते दाखविल्याशिवाय अगदी रहात नसत. त्यांचं बोलणं नेहमी राजकीयदृष्ट्या महत्वाचे असल्याचं दाखवत.

ते अशावेळी म्हणत, 'अहो, काय सांगायचं? या मध्यमवर्गीयांना सतत सगळं काही मिळालं पाहिजे अशी वस्तुस्थिती आहे.'

'डेनिस कुडल्टी एकीकडे उसनी आणलेली टोपी घालून खालच्या मजल्यावरून जणू काही निरनिराळ्या खात्यांतून चकरा लावत असे. कोणा मॅनेजरशी किंवा क्लार्कशी भांडण करत एकीकडे आपल्या मागण्या पुऱ्या करत, आपल्या पेट्या, पिशव्या सामानाने भरून घेऊन गाडीत चढवत असे. हे करत असताना कालिनासाहेबांना बसण्यासाठी व्यवस्थित जागा ठेवायला तो विसरत नसे. हे झाल्यावर तीन वाजता, घोड्याला चारापाणी करून तो कालिनासाहेबांना ते बसलेल्या ठिकाणी जाण्याची आठवण करून देई. अशा वेळी बिचारा कुडल्टी पिठाने व कोंड्याने डोक्यापासून पायापर्यंत माखलेला दिसे.

कालिनासाहेब स्मितहास्य करत अधिकाऱ्यांशी हस्तांदोलन करून तोंडावर शक्यतो गंभीरपणाचा आव आणून कुडल्टीला एखाद्या धंदेवाईक माणसाप्रमाणे विचारत,

'अरे, आपलं सारं सामान घेऊन नीटपणे भरलंस ना?'

कॉलनीत परत आल्यानंतर दमले भागलेले कालिनासाहेब विश्रांती घ्यायला जात. बिचारा डेनिस कुठेतरी आपलं जेवण कसंबसं संपवून कॉलनीच्या आर्थिक घडामोडींच्या प्रवाहात इकडून तिकडे एखाद्या वयस्क बाईप्रमाणे वावरत राही.

कुडल्टीच्या स्वभावाला कुठचीही गोष्ट फुकट जाणं सहन होत नसे. गवत इकडेतिकडे पसरलेलं असलं तर त्याला वाईट वाटे. कुणाचं टाळं हरवलं तरी तो चुटपुटे. गोठ्याचा दरवाजा अर्धवटच लागत असला तर त्याचा जीव हळहळे. असे

असले तरी तो चिडलेला दिसत नसे. याउलट अगदी चेहऱ्यावर स्मितहास्य ठेऊनं कोणत्याही तऱ्हेनं भुणभुण न करता तो कोणी काही फुकट घालवत असला तर त्याला चांगल्या भाषेत समजावून सांगे. टोकणाऱ्याला त्याच्या आवाजात हुकूम न वाटता विनंती वाटे. अवखळ व निष्काळजी छोटचा मुलांशी कसं वागावं हे त्याला चांगलं माहीत होतं. त्याच्या दृष्टीने झाडावर चढणं म्हणजे त्यांच्या अंगातल्या ताकदीचा भरपूर उपयोग केल्यासारखा वाटे. परंतु आमचा कुडल्टी नुसत्या डोळयांच्या इशाऱ्याने त्यांना खाली उतरायला लावी. तो त्यांना विचारी, ' विचार करताना तुम्ही डोकं वापरता ना ? लवकरच तुमचं एखाद वेळेस लग्नसुद्धा होईल आणि इथं तुम्ही नवी विजार घालून खुशाल झाडावर चढता. माझ्या बरोबर चला पाहू. मी तुम्हाला दुसरी विचार देतो.'

ती मुलं उलट सवाल करत, ' कसली विजार देणार आहेस रे ?'

यावर कुडल्टी सांगे, ' अरे झाडावर चढायला योग्य असे कपडे मी तुम्हाला देतो. नवी विचार घालून कोणी झाडावर चढते का ?

डेनिस या आर्थिक काटकसरीच्या विचारानं भारावून गेलेला होता व तो मानवी भावनांशी चटकन समरस होत नसे. लहान मुले नवे कपडे घालून झाडावर चढली तर त्या कृतीचा मानसशास्त्राच्या दृष्टीने काय अर्थ लावायचा हे डेनिसला आवडत नव्हते. नवे कपडे घालण्याच्या आनंदामुळेच झाडावर चढून बसावंसं वाटतं. यामध्ये नवे कपडे व झाड हे सहजपणाने एकत्र आले. परंतु डेनिसच्या दृष्टीनं नवी विजार घालून झाडावर चढणं असंभवनीयच.

आमच्या गरजेपोटीच कुडल्टीच्या साधेपणाचं तत्त्व आलं होतं. आमची गरीबी आम्हाला कडक आर्थिक धोरण शिकवत होती. या कारणास्तवच कुडल्टीला कॉलनीचा दुय्यम अधिकारी म्हणून कमांडर कौन्सिलनं नियुक्त केलं होतं व कुडल्टीही आपली ती भूमिका कुणाला फारसं न दुखवता दक्षतेने पार पाडत असे. काराबानोव, बेलुखिन, वेर्शनेव, बुरून व इतर जुने सहाध्यायी कुडल्टीच्या या वागण्याचा अर्थ बरोबर समजून घेत व कुडल्टीने काढलेलं फरमान कधीही कुरकुर न करता अंमलात आणत. उन्हाळ्यात आपण अनवाणी फिरू शकतो. एकदा उन्हाळातल्या एका साधारण सभेमध्ये कुडल्टीनं, ' नवे बूट, भांडारघरात परत करावे ' अशी मागणी केली असता सर्वांनी ती एकमुखाने मान्य केली.

१९२३ च्या ऑक्टोबरमध्ये डेनिसनं खूप परिश्रम घेतले. नाहीतर कॉलनीच्या दहा तुकडचा त्या इमारतींमधून व्यवस्थितपणे ठेवताच आल्या नसत्या. मोठी जुनी इमारत, आम्ही त्याला व्हाईट हाऊस म्हणत असू, तिथे डॉरमिटरीत आणि शाळेचे वर्ग व व्हरांड्यासारख्या असलेल्या एका मोठ्या सभागृहात आमचा सुतारकामाचा वर्ग होता. जेवणाची खोली दुसऱ्या घरातल्या तळमजल्यावर केली होती व बाकीच्या खोल्यांतून शिक्षकवर्गाची रहाण्याची सोय केली होती.

तिथे एकावेळी तीस माणसे बसू शकत; म्हणून जेवणाच्या तीन पाळ्या कराव्या लागत. मोचीकामाचा वर्ग, चाक बनवायचा वर्ग व शिवणाचा वर्ग हे एकाच मोठ्या दालनात तीन कोपऱ्यात कोंबले होते. त्यामुळे त्याला धंदे-शिक्षणाचं स्वरूप राहिलं नव्हतं. अशा तऱ्हेने मुलांना काय किंवा शिक्षकांना काय रहायला नीटशी भरपूर जागा नव्हती. दोन माळ्यांची राजवाड्यांच्या धर्तीची इमारत पाहून आमच्या भविष्यकाळात येणाऱ्या सुखवस्तू जीवनाची वारंवार आठवण येई. तिथे त्या इमारतीत मोठमोठी दालनं, नक्षीकाम केलेली पटई व फळबगीचाची शोभा दाखवणारे व्हरांडे वगैरे वगैरेची भरपूर रेलचेल होती. त्या इमारतीत आम्हाला खिडक्या, दारे, जिने, शेकोट्या व जमिनी दुरुस्त केल्या की सव्वाशे लोकांना रहायला भरपूर दालने मिळाली असती व बाकीच्या इमारती इतर कामासाठी उपयोगात आणता आल्या असत्या. हे सारे करण्यासाठी ६००० रूबल्सची जरूरी होती. आमचे इतर खर्च बाजूला ठेवून आम्ही ६००० रूबल्स त्या इमारतीच्या दुरुस्तीवर खर्च केले असते तर आमचं दारिद्र्य अधिकच भयानक झालं असतं. मग आम्हाला परत जुनीपुराणी जाकीटं, मळक्या टोप्या, कुरकुरणाऱ्या खाटा, ठिगळांच्या गोधड्या व पायाला कापडाच्या चिंध्या गुंडाळाव्या लागल्या असत्या. आमचा न्हावी कॉलनीला महिन्यातून दोन वेळाच भेट देई. तो आमचे केस कापायला अत्यंत कमी दर लावत असे. वरवरचे केस दहा कोपेक व व्यवस्थित केस कापायचे वीस कोपेक घेत असे. त्यामुळे आम्ही निरनिराळ्या प्रकारच्या केशरचना करून घेत असू. आमचं फर्निचर अजूनही रंग दिलेलं नव्हतं. अजूनही आम्ही जेवणासाठी लाकडी चमचे वापरत होतो. तसेच आमचे आतले कपडे ठिगळ वगैरे लावलेलेच असत. याचं कारण म्हणजे आमच्या मिळकतीचा फार मोठा हिस्सा निरनिराळी अवजारं व बारीकसारीक हत्यारं विकत घेण्यात खर्ची पडत असे.

आमच्याकडे ६००० रूबल्स नव्हते व ते सहजासहजी मिळण्याची शक्यताही नव्हती. असे असतानासुद्धा ह्या रकमेचा उल्लेख आमच्या सर्वसाधारण सभांतून, तसेच कमांडर्स कौन्सिलमधून, कोम्सोमोलच्या भाषणांतून येई. आमच्या मोठ्या मुलांच्या तोंडून, किंबहुना आमच्या लहान मुलांकडूनही यावर कायम चर्चा होई. असे असूनही ही रक्कम कशी मिळवावी याबद्दल आम्हाला काहीही कल्पना करता येत नसे.

त्याकाळी आमची गॉर्की कॉलनी ही शिक्षणखात्याच्या अधिपत्याखाली होती व आम्हाला त्यांच्याकडून छोट्याछोट्या देणग्या मिळत असत. या देणग्यांची रक्कम साधारणपणे एका मुलामागे वर्षाला २८ रूबल्स अशी पडत असे व त्यामध्ये प्रत्येक मुलामागे वर्षाला लागणारा कपड्यांचा खर्च भागवावा अशी अपेक्षा होती. कालिनासाहेब कधीकधी चिडून म्हणत, 'कोण्या शहाण्यानं ही रक्कम ठरवून दिली?

मला जर कधीकाळी त्या माणसाचा चेहरा कसा आहे हे बघायला मिळालं तर बरं होईल. माझ्या वयाला ६० वर्षे झाली आणि अजून असली विक्षिप्त वल्ली माझ्या पहाण्यात आलेली नाही. मूर्ख लेकाचे.'

मी आजपर्यंत अनेकदा शिक्षणखात्याच्या कचेरीत गेलेलो आहे. परंतु असली माणसं मलाही कधी बघायला मिळाली नाहीत. प्रत्येक मुलामागे ठरवून दिलेली ही रक्कम त्यांनी परिस्थिती नीट न बघताच ठरलेली होती. सबंध देशात असलेली अनाथ व भटकी मुलं यांची गणती करून त्या संख्येनं ठराविक रकमेला भाग देऊन एका मुलावर किती खर्च येईल ते चक्क त्रैराशिक मांडून ठरविले होते.

म्हणून या देणगीच्या अभावी ती राजवाड्यासारखी मोठी इमारत –जिला आम्ही लालघर म्हणत असू–बॉलडॉन्स करण्यासाठी राखून ठेवली होती. परंतु तो समारंभ सतत पुढे ढकलला जात होता. तिथे प्रथम नृत्य करण्याचा मान असलेल्या सुतारांनासुद्धा आम्ही संधी देऊ शकत नव्हतो.

असं असले तरी आमची मुलं कुठच्याही तऱ्हेनं हिरमुसली झाली नव्हती. आमचा कारावानोव या परिस्थितीला उद्देशून नेहमी म्हणे,

'कोणीतरी पिशाच्च आपल्याला मदत करील. तसे आपण नशिबवान आहोत. आपली सारी पोरंही गोड आहेत. एखादे पिशाच्च जरी नाही तरी एकदी चेटकीण तरी आपल्या मदतीला धावेल. हे सुंदर घर न वापरता कायम असंच राहील असं मला वाटत नाही.'

आणि बोलाफुलाला गाठ म्हणावी तसं आम्हाला एके दिवशी एक बिनतारी संदेश आला : 'ऑक्टोबरच्या ६ तारखेला युक्रेनियन चिल्ड्रेन्स एडच्या बोकोवा नावाच्या इन्स्पेक्टरबाई आमच्या कॉलनीला भेट द्यायला येतील व आम्ही त्यांना आणण्यासाठी खार्कोव स्टेशनवर हजर रहावे.' ही बातमी फार महत्वाची म्हणून आमच्या कॉलनीत चर्चा झाली व ते लालघर दुरुस्त करून घेण्यासाठी आपण त्या बाईंना जरूर अर्ज द्यावा अशा सूचना बऱ्याच जणांकडून आल्या.

'ही म्हातारी काय आपल्याला ६००० रूबल्स आणून देणार,' कोणीतरी म्हणालं.

'अहो, पण ती म्हातारीच आहे हे कशावरून ?'

'अहो, असल्या मुलांसाठी काम करणाऱ्या बाया नेहमी म्हाताऱ्याच असतात.'

कालिनासाहेबांना मात्र त्यातून काही निष्पन्न होईल असं वाटत नव्हतं.

ते म्हणत, 'या असल्या बायांकडून तुम्हाला काहीही मिळणार नाही. माझे शब्द तुम्ही लक्षात ठेवा. याउलट, तुम्ही आणखी ती तीन मुलं घेता का असं ती तुम्हाला विचारील. समान हक्कांच्या कितीही गप्पा मारल्या तरी शेवटी बायका त्या बायकाच.'

५ तारखेला आमच्या स्वागतचिन्हांची धांदल सुरू झाली. त्याची दोन घोड्यांची

गाडी त्यानं धुऊन पुसून स्वच्छ केली. रेड व मेरीच्या आयाळी चांगल्या विंचरून काढल्या. शहरातून आमच्या कॉलनीत येणारे पाहुणे म्हणजे एक मोठी पर्वणीच मानली जाई. विशेषत: ब्रातचिन्कोला तो एक मोठा सन्मान वाटे. ६ तारखेला सकाळी मी व ब्रातचिन्को आमची ती गाडी घेऊन खार्कोव स्टेशनवर गेलो. ब्रातचिन्को रूबाबात सईसाच्या जागी बसला होता.

मी व ब्रातचिन्को स्टेशनच्या आवारात आमच्या गाडीत बसून रेल्वेगाडीतून उतरलेल्या प्रत्येक म्हाताऱ्या बाईचा चेहरा न्याहाळून पहात होतो. परंतु आम्हाला हवा तसा एकही चेहरा दिसला नाही. समाजशिक्षण खात्यात काम करणाऱ्या व्यक्तीचा चेहरा काही वाटला नाही. एकाएकी अगदीच निराळी दिसणारी अशी एक व्यक्ती आमची चौकशी करत असलेली आम्हाला आढळली.

'ही गाडी कुठून आली आहे ?'

'आम्ही आमच्या कामासाठी येथे आलो आहोत. तुम्हाला कुठं जायचं असेल तिथे जा. दुसरी पुष्कळ वहानं आहेत,' असं ब्रातचिन्कोनं अलिप्तपणे उत्तर दिलं.

'तुम्ही गॉर्की कॉलनीतूच आला आहात का ?' असा दुसरा प्रश्न आला.

यावर ब्रातचिन्को आपल्या जागेवरून खडबडून उठून त्यानं स्वत:भोवती एक फेरी मारली व मीही त्या आवाजाकडे उत्सुकतेनं नजर टाकली.

आमच्यासमोर एक आश्चर्यकारक व्यक्ती उभी होती. करड्या रंगाचा चौकटयांचा कोट व रेशमी पायमोजे घातलेली व्यक्ती आमच्यासमोर उभी होती. चेहरा तुळतुळित व गुलाबी होता. तसंच गालाला खळयाही पडत होत्या. डोळ्यात चमक असून भिवया चांगल्याच कोरलेल्या होत्या. डोक्यावर घेतलेल्या मफलरातून केसांच्या बटा डोकावत होत्या. तिच्या पाठीमागे मदतनीस एक छोटीशी पेटी व चामड्याची बॅग घेऊन उभा होता.

'तुम्ही कॉ. बोकोवा का ?' मी विचारलं.

'पाहिलंत ? तुम्हाला पाहिल्याबरोबर तुम्ही गॉर्की कॉलनीतलेच असावेत हा माझा तर्क बरोबर ठरला.'

ब्रातचिन्को भानावर आला. त्यानं गंभीरपणाने मान हलवली व घोड्यांचा लगाम पकडला. बोकोवाबाई पटकन् चढून गाडीत बसल्याबरोबर काहीतरी मंद-मधूर सुवास दरवळला आणि गाडीचा व स्टेशनचा येणारा दर्प कुठल्या कुठे पळाला.

साऱ्या वाटभर बोकोवाबाई निरनिराळ्या विषयांवर बोलत होत्या. गॉर्की कॉलनीबद्दल त्यांनी खूपसं ऐकलं होतं आणि ती पहाण्याची त्यांना अतिशय उत्सुकता होती.

'अँटनसाहेब या मुलांबरोबर वागताना आम्हाला किती त्रास झाला आणि किती अडचणी आल्या त्याला सीमाच नाही. पण खरोखर मला या मुलांबद्दल फारफार वाटतं हं, आणि त्यांच्यासाठी आपण काहीतरी केलंच पाहिजे. हा जो मुलगा

बसला आहे तो तुमच्या कॉलनीतलाच का ? किती गोड आहे नाही ? तुम्हाला कंटाळा येत नाही का हो ? खरं सांगू का, या मुलांच्या संस्थांमधून रहाणं अतिशय कंटाळवाणं वाटतं. आणि तुमच्याबद्दल इतकं काही ऐकलंय ! असंही ऐकलंय की आम्ही लोक तुम्हाला आवडत नाही.'

'कोण आवडत नाही म्हणालात ? '

'आम्ही हो, समाजशिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या स्त्रिया.'

'मला समजलं नाही हं! ' मी म्हटलं.

'असं लोक म्हणतात की, तुम्ही आम्हाला स्त्रियांचं समाजशिक्षण म्हणता.'

'हे मी नवीनच ऐकतोय,' मी म्हटलं.

मी कधीही असं कुणाजवळही म्हटलं नाही. पण खरं सांगू, त्याच्यात काही चूक नाही. '

मी अगदी खळखळून हसलो व या नव्या किताबामुळे बोकोवाबाई पण खुषीत आल्या.

'त्याचं असं आहे. त्याच्यात थोडंसं तथ्य आहेच. या समाजशिक्षण खात्यात खूपशा बायका आहेत. मीही त्यातलीच एक आहे. माझ्याकडून नवीन ऐकण्या-सारखं किंवा शिकण्यासारखं काहीही नाही. आता तुम्हाला बरं वाटलं की नाही. '

ब्रातचिन्को मधूनमधून मागे वळून पहात होता. या विचित्र पाहुणीकडे तो सारखा गंभीरपणाने टक लावत होता.

बोकोवाबाई हसत म्हणाल्या, 'हा सारखा मागं बघतोय. हा असा काय बघतोय माझ्याकडं ? '

ब्रातचिन्को एकदम लाजला आणि लवकर लवकर घोड्यांना पुढं पिटाळत राहिला.

आम्ही कॉलनीत पोचल्याबरोबर कालिनासाहेबांसकट सारी मुलं अगदी उत्सुकतेनं पुढं आली. काराबानोवनं डोकं खाजवलं. जणू काही त्याच्या डोक्यात काही तरी गोंधळ झाला होता. झादारोवनं एक डोळा बारीक करून मिश्किल हास्य केलं.

मी बोकोवाबाईंची साऱ्या मुलांशी ओळख करून दिली व ती बाईंना घेऊन कॉलनी दाखवायला गेली. कालिनासाहेबांनी माझा शर्ट ओढला व मला विचारलं, 'अरे, या बाईला आपण खायला काय घालायचं ?'

त्यांच्याच सारखा आवाज काढून मी त्यांना उत्तर दिलं, 'त्यांना काय खायला देतात ते मला माहिती नाही हं !'

'मला वाटतं, तिला आपण खूपसं दूध प्यायला देऊ या. तुला काय वाटतं ? '

मी म्हटलं, 'नाही कालिनासाहेब, तिला काहीतरी भरगच्च खायला द्या.'

'काय द्यायचं तिला खायला? एखादं डुक्कर का कापायचं तिच्यासाठी? एडवर्ड निकोलायविच आपल्याला परवानगी देणार नाही.'

असे म्हणून कालिना त्या सन्मान्य पाहुण्यांच्या खाण्याची व्यवस्था करण्यासाठी निघून गेले. मी बोकोवाबाईंच्या मागे गेलो. पाहिलं तर बाई आणि आमची मुले यांची चांगलीच गट्टी जमलेली दिसली. 'मला मारिया कोन्ड्रँयेवना म्हणा,' असं बाई मुलांना सांगत असताना मी ऐकलं.

'मारिया कोन्ड्रँयेवना. छान नाव आहे! हे बघा मारियाबाई, हे आमचं उष्माघर. आम्हीच स्वतः बांधलंय. जमीन खोदायचं काम मीच केलंय बरं का? ह्हा माझे हात कसं भेगाळलेले आहेत ते,' असे म्हणून काराबानोवने आपले दोन्ही हात फावड्याप्रमाणे मारियाबाईंच्या समोर धरले.

'त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवू नका हं! बोट वल्हवल्यामुळे त्याचे हात तसे झालेले आहेत,' कोणीतरी मारियाबाईंना सांगितलं.

मारियाबाईंनी डोक्यावरचा मफलर काढून ठेवला होता आणि बोलणाऱ्या मुलांचे चेहरे बघताना त्यांची मान सारखी इकडून तिकडे फिरत होती. अशा वेळी त्यांच्या केसांची फार मजेदार हालचाल होत होती. त्यांच्या चेहऱ्यावरून आमचं उष्माघर किंवा इतर अनेक गोष्टीत त्यांना फारसा रस नसावा.

त्यांना आमचं लालघरसुद्धा दाखवण्यात आलं.

'हे तुम्ही दुरूस्त कसं करत नाही?' त्यांनी विचारलं.

'६००० रूबल्स पाहिजेत,' झादारोव म्हणाला.

'तुमच्याकडे काहीच पैसे नाहीत का? अरेरे!' बोकोवाबाई म्हणाल्या.

'तुमच्याकडे आहेत काय?' काराबानोवनं घुश्श्यातच विचारलं, 'मग कशाला विचारता? थांबा! आम्ही तुम्हाला सर्व काही सांगतो. या इथं हिरवळीवर बसा.'

मारियाबाई त्या लालघरासमोर तोंड करून खाली बसल्या. मुलांनी त्यांचा दैनंदिन भरगच्च कार्यक्रम रसभरत वर्णन करून त्यांना सांगितला. लालघर दुरूस्त झालं तर भविष्यकाळात त्यानंतर कितीतरी सुखकारक गोष्टी उपलब्ध होतील त्याचंही मोठं सुंदर चित्र मारियाबाईंसमोर उभं केलं.

'आम्ही आता ८० जण आहोत. आणखी काही दिवसांनी आम्ही १२० जण होऊ. समजलं?' असं कोणीतरी म्हटलं.

कालिना बगीचातून मारियाबाईंकडे येत होते. ओल्या भलीमोठी दुधाची चरवी, दोन मातीचे पेले व ब्रेड घेऊन त्यांच्या मागोमाग येत होती. ते पाहून मारियाबाई आनंदाने बोलल्या,

'वा! किती छान? तुमच्याकडे सारंच काही छान आहे हं! आणि हे गृहस्थ

कोण आहेत ? तुमच्या मधमाशा पाळणारे आहेत का ? ' असं कालिनांकडे बघून मारियाबाई म्हणाल्या.

'मी काही मधमाशा पाळणारा नाही,' असं कालिना म्हणाले, ' आणि मी हे काम कधीही केलं नाही. पण एवढं मात्र सांगतो की हे दूध मधापेक्षाही गोड आहे. हे काही एखाद्या बाईचं कर्तृत्व नाही तर याचं श्रेय गॉर्की कॉलनीला आहे. असलं दूध तुम्ही कधीही चाखले नसेल. जितकं थंड तितकंच मधूर ! '

मारियानं दोन्ही हातांनी टाळया वाजवून, खाली वाकून कप हातात घेतला. कालिनानं एखादं धर्मकृत्य करत असल्याचा आव आणून त्यात दूध ओतलं. झादारोवनं या संधीचा जास्तीत जास्त फायदा घ्यायचं ठरवलं. तो म्हणाला,

' तुमच्याकडे ६००० रूबल्स नुसते पडून आहेत आणि आम्हाला मात्र आमचं लालघर दुरूस्त करता येत नाही. काही बरोबर दिसत नाही हे !

मारिया कोन्ड्रॅयेवना दूध पिता पिता म्हणाली, ' वा ! वा ! काय दूध आहे ! असे दूध मी जन्मात चाखलं नाही.

झादारोवनं आसन ठोकून मारियाबाईकडे बघत विचारलं, ' ते सारं ठीक आहे हो. पण त्या ६००० रूबल्सचं काय ?'

' काय व्यवहारी मुलगा आहे हो !' मारियाबाई म्हणाल्या, ' बरं समजा तुम्हाला मी ६००० रूब्ल्स दिले तर त्याच्या बदल्यात मला काय मिळेल हो ?'

झादारोवनं केविलवाणे इकडेतिकडे पाहिलं व आपले दोन्ही हात पसरून जणू काही आपली सारी संपत्ती ६००० रूबल्सच्या बदल्यात देण्यास तयार असल्याचं दर्शविले. परंतु काराबानोवनं ती संधी दवडली नाही.

तो म्हणाला, ' आम्ही ना, ६००० रूबल्सच्या बदल्यात ते तसलं समाधान तुम्हाला जरूर देऊ. '

' समाधान ! कसलं समाधान ? ' मारियाबाईंनी आश्चर्यचकित होऊन विचारलं.

' ते हो, ते थंड दूध ! '

ते ऐकून मारियाबाई अगदी मनापासून हसल्या. हसता हसता त्यांच्या डोळयांतून पाणी आलं.

' वा ! वा ! तुम्ही मला बनवायचा प्रयत्न करता काय ? मी तुम्हाला ६००० रूबल्स अवश्य देईन. परंतु माझी ४० मुलं तुम्ही घ्यायचं कबूल केलं पाहिजे. खरोखर गोड आहेत ती पोरं. कोणीही त्यांच्याकडे बघायला नसल्यामुळे बिचारी कशीतरी वाढत आहेत. '

आमची मुलं एकदम गप्प झाली. ओल्या व्हेरोनोव्हा दुधाची चरवी इकडून तिकडे फिरवत मारियाबाईंच्या डोळयात बघत त्यांना म्हणाली,

' घेऊ की. न घ्यायला काय झालं ? आम्ही तुमची ४० मुलं जरूर घेऊ '.

मारियाबाईनी सांगितलं, ‘मला हातपाय, तोंड धुवू दे. मग कुठे जाऊन सही करायची ते तुम्ही मला सांगा.’

‘अहो बाई, पण तुम्ही अजून आमची शेतं कुठे पाहिली आहेत?

‘हे पहा, शेतं बघायला आपण उद्या जाऊ.’

मारियाबाई तीन दिवस आमच्याकडे राहिल्या. पहिल्या दिवसाच्या संध्याकाळपर्यंत मारियानं आमच्याकडल्या बऱ्याचशा मुलांची नावे मुखोद्गत केली. आमच्या जुन्या फळबागेत रात्री उशीरापर्यंत ती मुलांबरोबर गप्पा मारत बसे. मुलांनी तिला बोटीतून फिरवून आणलं. शिवाय आमच्या कॉलनीच्या भोवतालीही खूप फिरवून आणलं. तसेच आमच्या झोपाळ्यांवर पण तिनं झोके घेतले. परंतु आमची शेती बघायला तिला कधीच वेळ मिळाला नाही. तसेच करारनाम्यावर सही करायला तिला कसाबसा वेळ मिळाला. या करारनाम्याप्रमाणे युक्रेनियन चिल्ड्रेन्स एडनं आम्हाला ६००० रूबल्स लालघर दुरूस्त करायला द्यायचे ठरले व या बदल्यात दुरुस्ती पूर्ण झाल्यावर युक्रेनियन चिल्ड्रेन्स एडकडून ४० अनाथ मुलांना आम्ही आमच्या कॉलनीत प्रवेश द्यायचा असं ठरलं.

मारियाबाईंना आमच्या कॉलनीच्या वातावरणामुळे भलताच उत्साह आला होता. त्या म्हणाल्या,

‘हे खरोखर नंदनवन आहे. तुमच्याकडे अतिशय गुणी मुलं म्हणजे दैवी देणगीच आहेत.’

‘आम्ही काही दैवी वगैरे नाही हं. आम्ही चालती बोलती माणसं आहोत.’

मारियाला पोचवायला मी गेलो नाही. ब्रातचिन्कोनं यावेळी घोड्याची किंवा गाडीची विशेष खबरदारी घेतली नाही व गाडी चालवायचं कामही केलं नाही. ते काम त्यानं उदारपणाने काराबानोववर सोपवलं. त्याचे काळेभोर डोळे चमकले व त्याच्या गोडशा हसण्यात दोन्ही अर्थ व्यक्त होत होते. इतरांनी पण त्याला साथ दिली.

निघण्यापूर्वी त्यानं मला हळूच विचारलं, ‘अँन्टन, या बाईनं करारनाम्यावर सही केली का?’

मी त्याला ‘होय’ असं उत्तर दिलं.

‘ठीक आहे. या सुंदर बाईला मी व्यवस्थित घेऊन जातो.’

झादारोवनं मारियाबरोबर हळूच हस्तांदोलन केलं व तो तिला म्हणाला, ‘तुम्ही उन्हाळ्यात यायचं कबूल केलंत हां! विसरू नका.’

‘होय तर, मी येणारच आहे. मी इथं एक छोटंसं घरच घेणार आहे.’

‘अहो, वेगळं घर कशाला घेता? तुम्ही आमच्याकडेच राहू शकता.’

‘मारियाबाईला पोचवून परत आल्यावर काराबानोव हलक्या आवाजात काही तरी सांगत होता. मी त्याच्याजवळ गेलो. झादारोव म्हणाला,

'मी सांगितलं नव्हतं का की कोणी चेटकीण येईल म्हणून. आणि ते खरं झालं की नाही?'

'अरे, पण मारियाबाई काही चेटकीण नाही.'

'तुला काय वाटलं, सगळ्या चेटकीणी काय झाडांवर बसतात, आणि त्यांची नाके मोठी असतात? अरे, खऱ्या चेटकीणी तर फार सुंदर असतात.'

□

# २

## "ऑटचेनाश"

बोकोवाबाईंनी आपला शब्द खरा केला. त्या गेल्यापासून एक आठवड्याच्या आतच आम्हाला ६००० रूबलसची मनिऑर्डर आली व कालिनासाहेबांची इमारत दुरूस्त करण्याची भुणभुण सुरू झाली. तारानेटच्या हाताखाली काम करणाऱ्या चौथ्या तुकडीकडे कच्च्या लाकडांच्या खिडक्या, खिडक्यांच्या चौकटी व दारं बनवायची एकच गडबड सुरू झाली होती. कालिना कुठल्या तरी अतित्वात नसलेल्या माणसाला उद्देशून बडबडत की कोण साफ सांगणारा आहे, त्याचीच शवपेटी कच्च्या लाकडाची बनवावी.

आमची गेल्या चार वर्षातली ट्रेपकेवाडी दुरूस्त करण्यासाठी चाललेली धडपड संपत आली होती. कालिनांपासून शुर्का झेवेलीपर्यंत आम्ही सारेजण लालघर दुरूस्त करण्याच्या विचारांनी अगदी भारावून गेलो होतो. इतके दिवस सतत घोळवत असलेली स्वप्ने साकार करण्यासाठी आम्ही रात्रंदिवस वेळ न दवडता श्रम करत होतो. चुन्याच्या घाण्या, इकडेतिकडे वाढलेल्या रानवेली, फळबागेत असलेल्या वेड्यावाकड्या पाऊलवाटा, विटा, आणि बांधकामाच्या सामानाचा सबंध परिसरात पसरलेला ढीग यामुळे आम्ही अगदी वैतागून गेलो होतो. आम्ही तर फक्त ८० जणच होतो. म्हणून एका रविवारच्या कमांडर कौन्सिलच्या सभेमध्ये, हे सर्व काम झटकन पुरे करण्यासाठी शेरेकडून २–३ संमिश्र तुकड्या मिळवाव्या असा आम्ही विचार केला. आमची मुलं शेरेवर कधीकधी नाखूष होत असत. ते काहीजण म्हणाले,

'त्याचा काहीएक उपयोग होणार नाही. त्याचं ते सारं अगदी ठरून गेलेलं आहे आणि त्याच्यात आपल्याला कुणालाही तिळमात्र बदल करण्याचा अधिकार नाही.'

शेरेनं सावकाशपणे आपल्या खिशातली टिपणवही काढली व सांगितलं की, आपलं पुष्कळसं काम खरं तर अपुरं राहिलंय. त्यानं असंही ठासून सांगितले की 'या दोन तुकड्या मी तुम्हाला देतो आहे याचं कारण इमारतीचं कामही लवकरात लवकर पूर्ण होण्याची आवश्यकता आहे हे मी समजतो. नाहीतर या दोन तुकड्याही मी देऊ शकलो नसतो. उलट त्यांना मळणीचं काम किंवा आणखी काही दुरुस्तीचं काम दिलं असतं.'

कमांडर्सनी यावर असमाधान व्यक्त केलं. त्यांच्या मनात दोन विचारांचा संघर्ष चालू होता व ते असमाधानी झाले होते. एकीकडे शेरेनं घेतलेल्या पक्क्या भूमिकेबद्दल आदर व त्याचबरोबर त्याच्या म्हणजे शेरेच्या जमवून न घेण्याच्या स्वभावाबद्दल राग.

यावेळेला शेरेनं नुकतीच आळीपाळीने सहा पिके काढण्याची एक नवीन योजना सुरू केली होती. आमची शेतीविषयक प्रगती किती तरी झाली आहे याची जाणीव एकाएकी बऱ्याच जणांना झाली. आमची बरीचशी मुलं भविष्यकाळाचा फारसा विचार न करता शेतीकामात खूपच रस घेऊ लागली. विशेषतः ओल्या व्हेरोनोव्हा, काराबानोव, व्होल्कोव, बुरुन, असादची यांना जमिनीचं स्वाभाविक आकर्षक होतं. काराबानोवला शेतीकामाचा प्रथमपासूनच उत्साह होता. व्होल्कोव, बुरुन व असादची यांना अभिरूची होती. यामध्ये आपला काही वैयक्तिक फायदा आहे का याचा विचार न करता, मागे वळून न बघता, भविष्यकाळाचा विचार न करता किंवा दुसऱ्याही काही आवडीनिवडी लक्षात न घेता त्यांनी जणू काही एखाद्याच्या प्रेमात पडल्यासारखं शेतीकामात स्वतःला वाहून घेतलं होतं. ते जगत होते व आयुष्याचा आनंद लुटत होते. येणारा प्रत्येक दिवस खूप मेहनतीत घालवत होते. भविष्यकाळात केव्हातरी आपल्याला विश्रांती मिळेल याची वाट पहात होते. हे सगळे कष्टाचे दिवस पुढं केव्हातरी आपल्याला खूप मोठं यश मिळवून देणार याबद्दल त्यांना पक्का विश्वास होता. परंतु हे यश कसलं आहे तो विचार करण्याचा त्यांनी कधी त्रास घेतला नाही. ते सर्वजण एकीकडे रॅबफॅक्ट परीक्षेची तयारी करत होते, परंतु त्यातही फार मोठं काही मिळवायचंय याची निश्चित कल्पना त्यांच्यासमोर नव्हती. त्यामुळे रॅबफॅक्टच्या कुठल्या परीक्षेला बसावं याची त्यांना फारशी कल्पना नव्हती.

कॉलनीमधल्या काही इतर मुलांनाही शेतीची आवड होती, परंतु त्यांचा दृष्टिकोन व्यावहारिक होता. विशेषतः ऑप्रिश्को, फ्रेडरेन्को यांना शाळेत शिकण्याची आवड नव्हती, आयुष्यात फार मोठ्या अपेक्षा नव्हत्या. परंतु शेती करावी, छोटंसं

घर असावं, आपलं कुटुंब असावं, एखादा घोडा वगैरे दाराशी असावा, उन्हाळ्यात पहिल्या मोसमात सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत खूप मेहनत करावी आणि दुसऱ्या मोसमात चांगली बचत करून, तिसऱ्या मोसमासाठी राखून ठेवावी. मग आरामशीर बसून चीजकेक, पणीर, लोणी, वगैरेंसारख्या पदार्थांवर ताव मारावा. महिन्यातून एक दोन लग्नसमारंभांना, कोणाचा तरी वाढदिवस किंवा साखरपुडा अशा समारंभांना उपस्थित रहावे, आपले सणवार साजरे करावे अशा एकंदर मस्त आयुष्याची त्यांची व्यावहारिक कल्पना होती.

ओल्या व्हेरोनोव्हाची गोष्ट निराळीच होती. तिची आमच्या शेजाऱ्यांच्या शेतीकडे पहाण्याची दृष्टी वेगळीच होती. कोम्सोमोल होती व त्या दृष्टिकोनातून ह्या साऱ्या काही अडचणी आणि काही गडबड गोंधळ यांचा विचार ती करत असे.

आमची साठ एकर जमीन कसण्यात शेरे आणि त्याच्या विद्यार्थ्यांनी खूप श्रम घेतले होते आणि मोठ्या प्रमाणावर ट्रॅक्टरने शेती करायच्या १·१ किलोमीटर लांबीच्या गॅली तयार करण्याच्या त्यांच्या स्वप्नाचा भंग कोणीही करू शकत नव्हतं. शेतीकामाच्या विषयात आमच्या मुलांच्यात जास्तीत जास्त आवड कशी निर्माण करावी हे शेरे चांगले जाणत होता. त्याचे विचार तन्मयतेने ऐकणारा असा एक गट तयार झाला होता. आमची मुलंच नव्हेत तर पावेल पावलोविच आणि स्पिरिडॉन हे गोन्चारोवका गावच्या कोम्सोमोल संघटनेचे चिटणीस हेही शेरेच्या गटामध्ये सामील होते.

पावेल पावलोविच निकोलयेन्को जरी २६ वर्षांचा असला तरी त्यानं अजून लग्न केलं नव्हतं व गावच्या हिशोबाप्रमाणे तो म्हातारा ब्रह्मचारी होता. पावेलचा बाप म्हणजे म्हातारा निकोलयेन्को बघता बघता आमच्यासमोर श्रीमंत शेतकरी झाला होता. भटक्या पोरांना कामावर ठेवण्याच्या नावाखाली तो त्यांना चांगलंच पिळून घेत असे व आपण गरीब शेतकरी आहोत असं भासवत असे.

या कारणासाठीच पावेल पावलोविचला आपल्या बापाच्या घरात रहाणं आवडत नसावं. तो बराचसा वेळ कॉलनीत घालवत असे. शेरेनं त्याला तसं जबाबदारीचं काम दिलं होतं व आमची मुलं त्याला शेतीविषयक माहिती सांगणारा म्हणून मान देत. पावेल तसा शिकला सवरलेला होता. शेरे जे जे काही सांगे ते तो मनापासून ऐकत असे व समजून घेई.

पावेल आणि स्पिरिडॉन यांचा बोलण्याचा विषय बहुधा शेतकरी व त्यांचे प्रश्न याबद्दलच असे. लहान लहान शेतांपेक्षा मोठ्या प्रमाणावर शेती करावी अशी त्यांची कल्पना होती. ओल्या व्हेरोनोव्हाही त्यांचं संभाषण मन लावून ऐकत असे. पावेलकडे बघताना तिच्या पिंगट डोळ्यात वेगळीच चमक दिसे.

पावेल म्हणे, 'मी पहातोय की लोक खूप कष्ट करत असतात पण त्या कष्ट करण्याला योग्य वळण नसतं. त्यांनी चांगलं काम करावं म्हणून त्यांना शिकवलं

पाहिजे. पण त्यांना शिकवणार कोण हो ? हे श्रीमंत शेतकरी ? ते स्वत: कधी शिकणार नाहीत व दुसऱ्याला शिकू देणार नाहीत. शेरेनं या सर्वाचा नीट अभ्यास केला आहे आणि काय करायचं ते सांगितलं आले. ते अगदी बरोबर आहे आणि काम तसंच शिस्तीत झालं पाहिजे. पण हे साले काही त्याप्रमाणे काम करणार नाहीत उलट आपल्याच मनाने काम करत रहातील.'

यावर स्पिरिडॉन म्हणे, ' पण कॉलनीतली मुलं काम करतातच.'

पावेल हसून म्हणे, 'तुला माहीत आहे का ? कॉलनीतली मुलं काम करतात ते निराळं आहे रे !'

ओल्यानं हसून आपल्या दोन्ही हातांची बोटं अडकित्त्यासारखी एकमेकांत अडकवली व एक मिश्किल हास्य केलं. ती खाली वाकली त्यावेळी तिच्या सोनेरी केसांच्या वेण्या खांद्यावरून खाली आल्या. पावेलनं गंभीरपणाने तिच्याकडे पाहिले.

' कॉलनीतली मुलं शेतीकाम करण्याच्या उद्देशानं ते करत नाहीत. ते एक काम आहे म्हणून करतात. परंतु शेतकरी मात्र आपलं सारं आयुष्य शेतीकामात घालवतात. त्यांना मुलंबाळं असतात, संसार असतो. म्हणूनच,' ओल्या म्हणाली.

यावर स्पिरिडॉननं तिला विचारलं, ' तुला काय म्हणायचंच ते आम्ही समजलो नाही.'

'तुम्हाला समजलं नाही ? अहो, शेतकऱ्यांनी सामुदायिकांत जास्त चांगलं काम नको का करायला ?' ओल्यानं आश्चर्यानं विचारलं.

' तुला असं का वाटतं ?' पावेलनं तिला संदिग्ध स्वरात विचारलं.

ओल्यानं पावेलच्या डोळ्यात रोखून पाहिलं. एक क्षणभर पावेल तिच्या सुंदर वेण्या विसरला व तिच्या त्या विचित्र नजरेकडे आश्चर्याने पहातच राहिला.

' त्यांनी केलंच पाहिजे, ' ओल्या ठासून म्हणाली, ' केलंच पाहिजे याचा अर्थ तुम्हाला समजत नाही ? २+२ म्हणजे ४ याचा अर्थ जितका स्पष्ट आहे, तितकाच केलंच पाहिजे याचाही अर्थ स्पष्ट आहे. '

काराबानोव व बुरून हेही तिथे संभाषण ऐकत होते. त्यांना तसा याच्यात काहीही रस नव्हता. श्रीमंत शेतकऱ्यावरच्या कोणत्याही चर्चेबद्दल त्यांना रस नव्हता. पण संभाषणातल्या त्या क्षणिक तणावामुळे काराबानोवला मौज वाटली व त्या शाब्दिक हाणामारीत भाग घेतल्याशिवाय त्याला रहावलं नाही.

तो म्हणाला , ' ओल्याचं म्हणणं अगदी बरोबर आहे. केलंच पाहिजे म्हणजे त्यांना हाताशी धरून त्यांच्यावर जबरदस्ती केलीच पाहिजे. '

' तुम्ही ही जबरदस्ती कशी करणार ? पावेलने विचारले.

संभाषणाला गती देत काराबानोव म्हणाला, ' जबरदस्ती कशीही करू. लोकांवर जबरदस्ती कशी करतात ? ताकदीच्या बळावर. तुम्ही ते सगळे शेतकरी माझ्या हातात द्या आणि एका आठवड्याच्या आत ते कसे कोकरासारखे सरळ

काम करायला लागतात ते मी दाखवतो. दुसऱ्या आठवड्यात तेच मला धन्यवाद देतील.'

पावेलनं डोळे बारीक करून रोखून पहात विचारलं, 'तुमची ताकद म्हणजे त्यांच्या थोबाडीत मारून दाखविणार असंच ना ?'

काराबानोव हसत हसत शेजारच्या बाकावर बसला. बुरूननं आपला राग आवरत सांगितलं,

'अहं! नुसती थोबाडीत मारून नव्हे तर खरी ताकद म्हणणे बंदूक घेऊन.'

ओल्यानं सावकाशपणे आपली दृष्टी बुरूनकडे वळवली व शांतपणे समजावणीच्या सुरात म्हणाली,

'तुम्हाला काहीच समजत नाही असं म्हटलं पाहिजे. लोकांनी एखादी गोष्ट केलीच पाहिजे याचा अर्थ कुठच्याही तऱ्हेचा धाक न दाखवता ती झाली पाहिजे. म्हणजे लोक आपखुषीने करायला तयार होतील. तुम्हाला फक्त त्यांना नीट समजावून सांगता आलं पाहिजे.'

काराबानोवनं बाकावर बसल्या बसल्या आपलं डोकं हळूहळू वर केलं व त्याचे डोळे आश्चर्याने चमकले. तो म्हणाला,

'ए बये, तुला धड काहीच समजलेलं नाही. तुला समजावून काय सांगणार? बुरून, तुला तर चांगलंच माहीत आहे की एखाद्या माणसानं कुलक व्हायचं ठरवलं तर त्याला समजावून सांगून तो ऐकणार आहे का ?'

'इथे कुणाला कुलक व्हायचं आहे ?' असं ओल्यानं डोळे विस्फारत रागानं विचारलं.

'त्या सगळ्यांना कुलक व्हायचंय. पावेल, स्पिरिडॉन या सगळ्यांना कुलक व्हायचंय.'

या अनपेक्षित हल्ल्यामुळे स्पिरिडॉन चकितच झाला. पावेलनं नुसतं हास्य केलं. दोघांनाही चटकन बोलायला सुचलं नाही. 'आश्चर्य आहे,' एवढेच उद्‌गार त्यांच्या तोंडून निघाले.

'आश्चर्य काय ? त्याच्याजवळ जमीन नाही म्हणून तो कोम्सोमोल आहे. त्याला तुम्ही वीस बीघे जमीन द्या. गाय, मेंढ्या, घोडा द्या आणि काय फरक होतो तो बघा. दुसऱ्याच क्षणी तो तुला उडवून लावेल बरं का ओल्या ?' काराबानोव म्हणाला.

बुरुन अगदी मनापासून हसला आणि मोठेपणाचा आव आणून म्हणाला,

'अरे, स्पिरिडॉनचे काय ? पण हा पावलूसुद्धा तेच करील.'

स्पिरिडॉन चिडला, रागाने लाल झाला. मुठी वळवून तो म्हणाला, 'खड्ड्यात जा तुम्ही हलकटांनो'.

काराबानोव धीमेधीमे पावले टाकत बगीचातल्या बाकाभोवती नाचत

आपला आनंद व्यक्त करत होता. त्याला खराखुरा आनंद झाला होता की त्या खेडवळांना चिडवायचं होतं हे समजणं कठीण होतं.

बाकासमोर हिरवळीवर सिलँटी सेमियानोविच ऑटचेनाश बसला होता. त्याचं डोकं पिंपाच्या आकाराचं होतं. चेहरा लालसर असून मिशा कापलेल्या व रंगहीन होत्या. त्याच्या डोक्यावर संपूर्ण टक्कल होतं. आजकाल असले लोक क्वचित भेटत असत. स्वत: व्होडकाचा स्वाद घेणारे आणि तरीही तत्वज्ञानी, मानवतावादी म्हणवणारे असे हे लोक एकेकाळी सबंध रशियाभर फिरताना दिसत असत.

'काराबानोव म्हणतोय ते बरोबर आहे. या श्रीमंत शेतकऱ्यांना देवाण-घेवाण माहीत नसते. त्याच्याजवळ एक घोडा असला तर तो घोडीच्या शोधात फिरेल. कारण त्यायोगे त्याला घोड्यांची आणखी निपज करता येईल. ते असंच आहे. समजलं का ? '

ऑटचेनाशनं आपले डोळे किलकिले केले आणि स्पिरिडॉन व पावेलकडे अंगठा दाखवून खूण केली.

'घोड्यामुळे ताकद ओळखली जाते असा अर्थ होतो का ?' स्पिरिडॉननं रागानं विचारलं.

'बरोबर, बरोबर ! घोड्यामुळेच ताकद येते व सत्ता गाजवता येते. घोडे आणि गाई असल्या की तो बलवान समजला जातो. या दोहोंपैकी जर काहीच नसेल तर त्या भुक्कड माणसाला कलिंगडाच्या शेताची राखण करण्याशिवाय दुसरं काहीही करता येत नाही असंच आहे बरं ते ! ' ऑटचेनाशनं सांगितलं.

आमच्या कम्यूनमध्ये ऑटचेनॉश सर्वांचा फार आवडता होता. विशेषत: ओल्या व्हेरोनोव्हाला तो फारच आवडत असे. सूर्याकडे तोंड फिरवावं तसं त्यानं आपला हसतमुख चेहरा ओल्याकडे वळवला व तिनं वाकून त्याच्या डोळ्यात बघितलं.

'काय म्हणतेस, माझ्या कोकरा ?'

'सिलँटी, तू अगदीच जुन्या विचारांचा झालास. तुझ्याभोवती सारंच नवीन नवीन होत आहे,' ओल्या म्हणाली.

सिलँटी सेमियानोविच ऑटचेनाश कुठून व कसा आला ते आम्हा कुणालाही माहीत नव्हतं. जणू काही तो एकाएकी आभाळातून पडल्यासारखा आमच्या पुढ्यात येऊन ठाकला. त्याला कोठच्याही तऱ्हेची स्थावर जंगम मालमत्ता किंवा रितीभाती नव्हत्या. तो अगदी साध्या कपड्यात, एक जुनीशी पाटलोण वजाडा-भरडा अंगरखा घालून आला होता. या मुक्त माणसाबद्दल आमच्या मुलांना एकाएकी आकर्षण वाटलं व ते त्याला घेऊन माझ्या ऑफिसात आले.

'ॲन्टनसाहेब, आपल्याकडे कोण आलंय बघितलंत का ?'

सिलँटीनं माझ्याकडे आपुलकीनं पाहिलं व तितक्याच आपुलकीनं एखाद्या जुन्या मित्राप्रमाणे मुलांकडे दृष्टी वळवली.

'हेच तुमचे प्रमुख आहेत का?' त्यानं विचारलं.

मलाही त्याच्याबद्दल एकदम कुतूहल वाटलं. 'तुम्ही काही कामासाठी आला आहात का?' असं मी त्याला विचारलं. सिलँटीनं आपल्या चेहऱ्यावरचे भाव एकदम बदलले. खरोखरच आपण काही जरूरीच्या कामासाठी आलो आहोत असा आव आणून मोठ्या विश्वासानं सांगितलं,

'हे पहा, मी एक कामगार आहे. तुमच्याकडे काम आहे आणि आपण एकमेकांना मदत करू शकतो.'

'तुम्हाला कसलं काम करता येतं?' मी विचारलं,

'असं म्हणतात की ज्याच्याजवळ काही पैसा नसतो तो माणूस कसलंही काम शिकायला व करायला तयार होतो.'

एवढं बोलून तो अगदी मोकळेपणानं मोठ्यांदा हसला. त्याच्या हसण्यात मुलांनी भाग घेतला. मीही त्या हसण्यात सामील झालो. एकूण त्यावेळी तरी मनापासून हसायचं एवढं साऱ्यांना स्पष्ट झालं.

'तुम्ही कसलंही काम करू शकता का?' मी विचारलं.

'हो, कसलंही काम करू शकतो,' सिलँटी विश्वासानं म्हणाला.

'पण नक्की कसलं काम करू शकता?'

'मी जमीन नांगरू शकतो. कुळवणी करू शकतो.'

सिलँटीनं त्याला येत असलेल्या निरनिराळ्या कामांची यादी सांगितली. अगदी बोटं मोडून सांगत तो पुढे म्हणाला,

'मी घोड्यांनाही राखू शकतो. कुठल्याही तऱ्हेच्या धान्याची राखण करू शकतो. झालंच तर आणखी कसलीही कामे, उदा. सुतारकाम, लोहारकाम, गवंडी-काम करू शकतो. मला रंगाऱ्याचंही काम येतं. शिवाय मोचीकामाचीही मला माहिती आहे. तुम्हाला जर झोपडी बांधायची असेल तर तेही मी तुम्हाला करून दाखवीन. किंवा खाटकाचेही काम मी करू शकतो. फक्त गॉडफादर व्हायचं मला जमत नाही. ते काम करण्यासाठी मला कधी कोणी आग्रह पण केला नाही.' असं बोलून तो म्हातारा हसत हसत उठला.

'खरंच का तुम्हाला हे काम आत्तापर्यंत कोणी सांगितलं नाही?'

'मला कोणीही आत्तापर्यंत ते काम सांगितलं नाही.'

पुन्हा एकदा सगळी मुलं मनापासून हसली. त्यावेळेस टोस्का अगदी हळूच सिलँटीच्या जवळ गेला. सिलँटी एकदम गंभीर होऊन त्याला विचारू लागला, 'खरंच का तुला कधी गॉडफादर व्हायला कोणी बोलावलं नाही? का बोलावलं नाही?'

सिलँटी जरा गंभीर झाला आणि एखाद्या शिक्षकाने मुलांना समजाऊन द्यावं तशा सुरात टोस्काला समजावू लागला,

"त्याचं असं आहे. कुणाचंही नाव ठेवायचं असलं की ते प्रथम मला विचारत आणि मग कोणीतरी एखादा गलेलठ्ठ श्रीमंत मधेच उपटे. मी मनाशी विचार करतो की, 'हे असंच आहे.' "

'तुमच्याकडे काही कागदपत्रं आहेत का ?' मी त्याला विचारलं.

'हो, माझ्याकडे कागदपत्रं आहेत. काय म्हणालात? कागदपत्रंच ना? माझ्याकडे होती. पण त्याचं असं पहा, मला काही खिसा नाही आणि त्यामुळे ती कुठेतरी हरवून गेली असतील. मी एवढा उंचापुरा, भलामोठा तुमच्यासमोर जिवंत उभा असताना कागदपत्रांची काय आवश्यकता ?'

'यापूर्वी तुम्ही कुठं काम केलं आहे ?' असं मी त्याला विचारलं.

'अहो, कुठे म्हणून काय विचारता ? सगळ्या ठिकाणी काम केलंय आणि सगळ्या प्रकारचं काम केलंय. चांगल्या लोकांसाठीही आणि वाईट लोकांसाठीही काम केलंय. लपवून ठेवण्यासारखं माझ्याकडे काहीही नाही. अहो, खरंच मी सगळ्या प्रकारच्या लोकांसाठी काम केलेलं आहे,' तो म्हणाला.

'पण आता खरं सांगा हं! चोरी केल्यामुळे तुम्ही कधी तुरुंगात गेला आहात काय ?'

'मी तुम्हाला अगदी स्पष्ट सांगतो, चोरी केल्यामुळे मी कधीही तुरुंगात गेलो नाही. मी अगदी सत्य बोलतो आहे हे लक्षात ठेवा,' सिलँटी म्हणाला.

सिलँटीनं माझ्याकडे गोंधळून पाहिलं. त्याच्या दृष्टीनं कदाचित मी त्याच्याकडून वेगळ्याच उत्तराची अपेक्षा केली असावी.

सिलँटी आमच्याकडे काम करण्यासाठी राहिला. आम्ही त्याला शेत राखण्यासाठी शेरेबरोबर काम करायला सांगितलं. परंतु त्याच्याकडून ते करून घेणं जमलंच नाही. सिलँटीला कुठल्याही क्षेत्रात, कुठल्याही प्रकारची बंधने नको होती हे त्यानं कबूल केलं. उदा. अमुकच एक काम त्यानं करावं व अमुक एक काम करू नये किंवा दुसऱ्या प्रकारानं करावं, असं का ? हे त्याला पटत नव्हतं. त्यामुळे आमच्याबरोबर काम करताना तो खुशाल आपल्या मनाप्रमाणे, मनात येईल तेव्हा काम करत असे. कुठच्याही अधिकारवाणीला तो खुशाल हसून उत्तर देई. तसंच कुठलाही हुकूम धाब्यावर बसवी. परकी भाषा न समजणारा माणूस जसा वागेल तसा तो वागत असे. दिवसाच्या कोठल्याही वेळी तो तबेल्यात काम करी किंवा शेतात, डुकरांच्या खुराड्यात, लोहारखात्यात काम करी. कधीकधी मुलांच्या अभ्यासात नाक खुपशी. केव्हा कमांडर कौन्सिलमध्ये येऊन बसे. त्याला जणू सहाव्या इंद्रियाचा वरदहस्त असावा असं वाटे. कारण कॉलनीचं एखादं कुठलंही महत्वाचं काम चालत असेल तिथे हा अचानक येऊन एखाद्या जबाबदार व्यक्तीप्रमाणे वावरू लागे. त्यामुळे त्याच्या झालेल्या चुकीबद्दल किंवा त्याने केलेल्या किंवा न केलेल्या कामाबद्दल तो कुठच्याही खात्याच्या प्रमुखाला काहीही उत्तर

देऊन वेळ मारून नेत असे. अशावेळी तो आपलं डोकं खाजवी व हात पसरून त्याचं नेहमीचं ठराविक उत्तर 'त्याचं असं झालं' असं म्हणून सुरुवात करी. 'आम्ही सगळा गोंधळ करून टाकलाय हो.' असं सांगून शेवट करी.

सिलँटी सेमियानोविच ऑटचेनाश याने आमच्या कोम्सोमोल संघटनेत कॉलनीत आल्यादिवसापासून आमच्या बरोबरीनं भाग घेतला. एकही सर्वसाधारण सभा किंवा कार्यकारी मंडळाची सभा तो चुकवत नसे. एके दिवशी माझ्याकडे येऊन संयुक्तिक रागाने म्हणाला, 'हे पहा, मी त्यांच्याकडे गेलो होतो,' असं म्हणून त्यानं आपलं बोट दरवाजाकडे दाखवलं.

'त्यांच्याकडे म्हणजे कोणाकडे?' मी विचारलं.

तो म्हणाला, 'अहो, ते कोम्सोमोल माहीत आहेत ना तुम्हाला? त्यांच्याकडेच, ते मला आत येऊ देईनात. त्यांची कसलीतरी गुप्त खलबतं चालली होती. मी त्यांना चांगुलपणाने सांगायला गेलो की, 'मित्रांनो तुम्ही जर मला आत येऊ दिलं नाही तर परिणाम फार वाईट होईल.' पण त्यांना समजतंय कुठे? लेकाचे मूर्ख म्हणून जन्माला आले आणि मरणारही मूर्ख म्हणूनच.'

'पुढं काय झालं?' असं मी त्याला विचारलं.

'त्याचं असं आहे,' अशी त्याने नेहमीप्रमाणे सुरुवात केली, 'त्यांना एकतर समजत तरी नसलं पाहिजे किंवा एकतर ते प्याले तरी असले पाहिजेत. पण ते प्यालेले नसावेत हं.' तो पुढं सांगू लागला, 'मला तुम्ही बाहेर का म्हणून ठेवता रे आणि आम्हाला वगळून गुप्त खलबतं कसली करता? ल्यूका, सोफ्रोन किंवा मौसी यांना तुम्ही बाहेर ठेवलंत तर मी समजू शकतो. कदाचित त्यांनी मला ओळखलंही नसेल. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे किंवा त्यांच्या डोळचात काही बिघाड तरी झाला असला पाहिजे. त्याचं असं झालं की ते ऐकून पण घेईनात. उलट लहान मुलांसारखे हसतच सुटले. तुम्ही त्यांच्याकडे गंभीरपणे काही बोलायला जा आणि ते आपले त्याची थट्टाच उडवतात. असंच चालतं नेहमी.'

आमच्या शिक्षणाच्या कामातही सिलँटी लुडबूड करत असे. आमच्या कोम्सोमोल संघटनेचं पहिलं मुख्य कर्तव्य म्हणजे आमच्या शाळेचा पाया भक्कम करून देणं. आत्तापर्यंत आमच्या मुलांचे शालेय शिक्षण कसंबसं चाललं होतं व आमच्या मुलांमधे शालेय शिक्षणाबद्दल अजूनही फारशी गोडी निर्माण झालेली नव्हती.

त्याचं मुख्य कारण म्हणजे असं की आमच्या मुलांनी गॉर्की कॉलनीत प्रवेश करण्यापूर्वी भटकं आयुष्य घालवलं होतं. तसल्या आयुष्यात आपण मोचीकाम, सुतारकाम अशासारखं काहीतरी करून आपलं जीवन कंठायचं, एवढचाच महत्वाकांक्षेचं स्वप्न ते पहात होते. त्यामुळे शिक्षणाची गोडी निर्माण व्हायला साहजिकच वेळ लागला.

कोलोमॅक नदीच्या काठी ट्रेपकेवाडीत आमच्या सामुदायिकाची प्रगती झपाट्याने होत होती. हे प्रत्यक्ष पाहून मोची होणं किंवा सुतार होणं या पलिकडे आमच्या मुलांची नजर खरोखरच पोचली होती.

## रॅबफॅक्ट

त्याकाळी रॅबफॅक्ट याला आतापेक्षा एक वेगळाच अर्थ होता. माध्यमिक शिक्षण पूर्ण केल्याचं शिफारसपत्र मिळत असे. ही योजना मुख्यतः अज्ञानरुपी अंधारात वावरत ठेवलेल्या कामगारवर्गाच्या तरुण मुलांसाठी होती व प्रत्येक माणसाला शिक्षण घेण्याचा अधिकार आहे ही जाणीव करून देण्यासाठी याचा उपयोग होता. आम्ही सर्वजण त्यावेळी रॅबफॅक्ट परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांना अतिशय हळुवारपणाने वागवत असू.

प्रत्यक्षात खरोखर अशा तऱ्हेने गोष्टी घडून आल्या: १९२३ च्या ग्रीष्म ऋतूत आमच्या सर्वच मुलांच्या डोक्यात रॅबफॅक्ट परीक्षेला जाण्याची इच्छा हळूहळू निर्माण होऊ लागली होती. खरं तर ही इच्छा १९२१ साली त्यांच्या मनात शिरली होती. कारण त्यावेळी आमच्या शिक्षिकांनी रायसा नावाच्या मुलीला रॅबफॅक्टला बसण्यासाठी तयार केली होती. परंतु तिच्या बाबतीतला तो प्रयत्न दुर्दैवाने फसला. त्यानंतर इंजिन वर्कशॉपमधील काही तरुण कामगार आमच्या कॉलनीत मुलांना भेटायला येत. त्यांच्या रॅबफॅक्ट परीक्षा देण्याच्या हिंमतीच्या गोष्टी आमची मुलं अगदी मनापासून कान टवकारून ऐकत असताना त्यांचा हेवा करत. या हेव्यातूनच आमच्या रॅबफॅक्ट परीक्षा देण्याच्या प्रसाराला मदत झाली. आम्ही आमच्या मुलांना रॅबफॅक्ट परीक्षा देणं म्हणजे पुढील आयुष्याला उत्तम वळण लागणं अशा तऱ्हेनं शालेय शिक्षण घेण्याला त्यांना उद्युक्त केलं होतं. रॅबफॅक्ट परीक्षेला जाणं म्हणजे फार मोठ्या दिव्याला तोंड देणं अशी आमच्या मुलांची कल्पना होती व काहीतरी चमत्कार होऊनच यातून पार पडता येईल, अशी त्यांची समजूत झाली होती. मोठ्या मिनतवारीनं आम्ही आमच्या मुलांना हे रॅबफॅक्टचं शिक्षण आपल्या कॉलनीतल्या शाळेतही पूर्ण करता येईल अशी खात्री करून देण्याची खटपट करत होतो. आतापर्यंत आमच्यापैकी अनेक मुलांची रॅबफॅक्टची परीक्षा होऊनही गेली असती. परंतु त्यांना परीक्षा पास होण्याची खात्री नसल्याने त्यांनी एक वर्ष कॉलनीतच काढायचं व पक्की तयारी झाल्यावरच परीक्षा द्यायची असं ठरविलं. बुरुन, काराबानोव, व्हेर्शनेव व झादारोव यांची अशी परिस्थिती होती. विशेषतः बुरुनची शिक्षणाची आवड पाहून कौतुक वाटत असे. त्याला प्रोत्साहन देण्याची गरज आम्हाला कधी पडली नाही. त्यानं अगदी शांतपणानं रॅबफॅक्टची तयारी चालवली होती व अंकगणित आणि व्याकरण या दोन कठीण विषयांशी तो धीमेपणाने झुंजत होता. कधीकधी व्याकरणाचे नियम किंवा गणितातली प्रमेये सोडविताना तो

अगदी घामाघूम होऊन जाई. पण तो कधी चिडला नाही. शिक्षण घेणं किंवा ज्ञान मिळवणं – ते कितीही मोठं असलं तरी–हे अतिशय कठीण आणि मेंदूला ताण देणारं आहे व ते अतिशय कष्ट केल्यानंच मिळतं याबद्दल त्याची खात्री होती. उदा. झादारोव. याने शाळेच्या तासाच्या व्यतिरिक्त कधीही जास्त अभ्यास केला नाही. इतकंच काय, पण काराबानोवसारखा मुलगा वर्गात धडा चालू असताना कॉलनी-तल्या बारीकसारीक गोष्टींचाच विचार करत असे. असं असूनही त्याच्यावर येणाऱ्या अडचणींवर तो मात करू शकत असे या गोष्टीचं रहस्य काय असावं असा शेरा बुरुननं मारला. अखेरीस बुरुननं अभ्यासात बरीच प्रगती केली. असं असूनही बुरुननं आपल्या दोस्तांवर मात केली. बुरुन आपल्या सहाध्यायांच्यापेक्षा अभ्यासात पुढे गेला. त्याच्या सहाध्यायांचं ज्ञान त्याच्यापुढे फिक्कं पडलं. मारुत्स्या लेवचेन्को ही बुरुनच्या स्वभावाच्या अगदी विरूद्ध स्वभावाची होती. तिनं येताना आपल्या-बरोबर, दुसऱ्यांना त्रासदायक होणारा भांडखोर स्वभाव, आरडाओरडा करण्याची पद्धत आणि संशयखोरपणा, तसंच कांगावखोरपणा, या गोष्टी आणल्या. आम्हाला तिच्यामुळे बराच त्रास झाला. ती जणू एखाद्या प्यालेल्या किंवा सोडलेल्या, व विचित्र स्वभावाची होती आणि एका क्षणातच अत्यंत मौल्यवान अशी दोस्ती तोडून टाकत असे. एखादा चांगलासा दिवस, छानसी संध्याकाळ, अशा वातावरणाची इच्छासुद्धा ती आपल्या वर्तनाने मोडून काढत असे. अशा अनेक घटना झाल्या की त्यावेळी या मुलीशी चर्चा न करता तिच्या डोक्यावर थंड पाण्याच्या बादल्या ओतल्या पाहिजेत म्हणजेच तिला सतत येणारे मूर्खपणाचे झटके थंड होतील असं वाटत असे.

कॉलनीचा–म्हणजेच आमचा–मारुत्स्याच्या या विक्षिप्त स्वभावाला आळा घालण्याचा संथ पण निश्चित प्रयत्न असे. परंतु अशा वेळी ती अधिकच खुनशीपणे स्वतःलाच छळत असे. तिची सुरतही अतिशय चांगली होती. ती दिसायला सुंदर व हुशारही होती. तिच्या गुलाबी गालांवर एक प्रकारची वेगळीच झाक होती. तिचे टपोरे व काळेभोर डोळे फार बुद्धिमान व शांत असलेल्या कल्पनातून जणू काही अंगारच ओकत आहेत असं वाटत असे आणि ते पहाणाऱ्याला आश्चर्याने एकदम हतबल करत. परंतु मारुत्स्याला आपण भयानक व हिडीस आहोत हे चांगलं माहीत होतं आणि आपल्याला काहीही कळत नाही, काही कळणार पण नाही अशी तिने समजूत करून घेतली होती. कुठलंही साधं काम मी प्रथमपासूनच धिक्कारत असे.

'माझ्या हातून काहीही होणार नाही. मला तुम्ही सतत अभ्यास कर म्हणून सांगता. तुमच्या बुरुन वगैरेंना तुम्ही शिकवा. मी इथून बाहेर पडल्यावर खुशाल मोलकरणीचं काम करीन. मला जर काहीच येत नाही तर तुम्ही मला का छळता?' असे ती निक्षून उद्‌गार काढत असे.

नाताल्या मार्कोविना ओसीपोव्हना ही अतिशय भावनाप्रधान होती. मारुत्स्या-

बरोबर काम करताना, अत्यंत हळव्या स्वभावानुरूप तिच्या भावुक डोळ्यातून पाणी तरळू लागे, ती अगदी विरघळून जाऊन म्हणे,

'ती मारुस्त्या मला आवडते आणि तिला खूप चांगलं वागायला शिकवावं असं मला नेहमी वाटतं. पण ती मात्र 'मी तिला उगीचच त्रास देते' असा कांगावा करते. त्यामुळे मला काही समजतच नाही. मी मारुस्त्याची बदली एकातेरिना बाईंच्या गटात केली. याचे परिणाम काय होतील याबद्दल मी साशंक होतेच.'

एकातेरिनाबाई त्यांच्या गटातल्या लोकांकडून साध्या व सरळ वागणुकीची अपेक्षा करत.

प्रथम सत्रात हा बदल केल्यानंतर तीन दिवसांनी एकातेरिनाबाई माझ्याकडे मारुस्त्याला घेऊन आल्या. खोलीचा दरवाजा त्यांनी बंद केला व रागाने थरथरणाऱ्या मारुस्त्याला एका खुर्चीवर बसवून, त्या स्वतः माझ्याशेजारी बसल्या व म्हणाल्या,

'अँन्टन, ही घ्या तुमची मारुस्त्या. हिचं काय करायचं ते तुम्हीच ठरवा. मिलरला एका नोकराणीची जरूरी आहे व आपल्या हातून नोकर होण्याशिवाय दुसरं काही होणार नाही असं मारुस्त्याला वाटतं. तिला मिलरकडेच जाऊ दे त्याला दुसरा पर्याय आहे. ग्रीष्म ऋतूत हाणाऱ्या माध्यमिक परीक्षेला मी तिची तयारी करून घेईन अशी मला खात्री आहे. कारण ती तशी करू शकते हे तिलाही माहीत आहे.'

'रॅबफॅक्टला ती बसलीच पाहिजे असं माझंही स्पष्ट मत आहे,' मी सांगितलं.

मारुस्त्या खुर्चीत बसली होती व एकातेरिनाबाईंच्या शांत चेहऱ्याकडे जळजळित नजरेनं बघत होती.

परंतु एकातेरिना पुढे म्हणाल्या, 'माझ्या वर्गात बसून धडा चालू असताना तिनं माझा अपमान केलेला मला खपणार नाही. मी स्वतः एक कष्टकरी आहे. म्हणून माझा अपमान होता कामा नये. तिनं यापुढे मला चेटकीण किंवा मूर्ख म्हटलं तर मी तिला माझ्या गटात काम करायला घेणार नाही. एकातेरिनाबाईंची ही तक्रार रास्त होती. पण मारुस्त्याच्या बाबतीत कुठलीही गोष्ट यशस्वी होत नव्हती. माझं मन शिक्षणतंत्रातील एखादी नवीन कल्पना शोधून काढायला तयार नव्हतं. मी मारुस्त्याकडे थकलेल्या नजरेनं व अगदी परकेपणानं पहात म्हटलं, 'हिच्या बाबतीत काहीही होणं शक्य नाही. ती तिची भूतं, गाढवं आणि मूर्ख यांना सोडणार नाही. तिला दुसऱ्याबद्दल आदर नाही, व हा तिचा स्वभाव सहजासहजी जाणंही कठीण आहे.'

'मला दुसऱ्याबद्दल आदर आहे,' मारुस्त्या उसळून म्हणाली.

'नाही मारुस्त्या, तुला दुसऱ्याबद्दल काहीही वाटत नाही,' असं मी म्हटलं,

'पण त्याला आता काही उपाय नाही. ती सध्या आपल्या ताब्यात आहे आणि म्हणून मला वाटतं की एकातेरिनाबाई, तुम्ही मोठ्या आहात, शहाण्या व अनुभवी आहात. मारुस्त्या ही लहान आहे आणि तापट आहे. तेव्हा आपण तिच्यावर रागावू नये. तिला वाटते तसं वागू दे. तिने तुम्हाला मूर्ख म्हणू दे, झालंच काय तर पशूदेखील म्हणू दे. आणि तसं तिनं म्हटलं आहे. होच की नाही ? तुम्ही तिच्याकडे बिलकूल लक्ष देऊ नका. ते आपोआप जाईल. तुम्हाला पटलं का माझं म्हणणं ? '

एकातेरिनांनी हसून मारुस्त्याकडे पाहिलं आणि म्हटलं, 'ठीक आहे. तुम्ही म्हणता तसं होऊ दे. मी त्याच्याशी सहमत आहे.'

ती माझ्याकडे एकटक बघत होती. मारुस्त्याचे काळे डोळे पाण्याने भरून आले. एकाएकी तिने आपलं तोंड झाकलं व रडत ती खोलीतून बाहेर पडली.

एक आठवड्यानंतर एकातेरिनाबाईंना मी मारुस्त्या कशी आहे ते विचारलं.

'ती आता ठीक आहे. तिनं आपल्या तोंडाला बराच आळा घातला आहे. पण तुमच्यावर मात्र ती फार चिडलेली आहे,' असं एकातेरिनाबाई म्हणाल्या.

दुसऱ्या दिवशी रात्री बऱ्याच उशीरा सिलँटी मारुत्स्याला घेऊन माझ्या खोलीत आला व म्हणाला,

'अँन्टन सेमियानोविच, मारुत्स्याला तुमचं बोलणं फार लागलंय. मी तिला आता कशीबशी तुमच्याकडे घेऊन आलोय. तुम्ही तिची समजूत काढावी असं मला वाटतंय.'

एवढं बोलून सिलँटी बाजूला उभा राहिला. मारुत्स्या खाली मान घालून माझ्यासमोर उभी होती.

ती म्हणाली, 'मला तुमच्याजवळ विशेष काही बोलायचं नाही. मी वेडी आहे असं जर सर्वांना वाटत असेल तर त्यांना खुशाल वाटू दे.'

'पण तू माझ्यावर का रागावली आहेस ?' मी तिला विचारलं.

'तुम्ही मला वेडी म्हणू नये एवढीच माझी इच्छा आहे.'

'तू वेडी आहेस असं मला मुळीच वाटत नाही.'

'मग तुम्ही एकातेरिनाबाईंना मी वेडी आहे असं का म्हणालात ?'

'बरं बुवा, माझं चुकलं. मला वाटतं की तू त्यांना नेहमी शिव्या देत रहाशील.'

मारुत्स्या हसली व म्हणाली, 'मी आता त्यांना काहीही म्हणत नाही.'

'बरं बुवा, याचा अर्थ माझं सपशेल चुकलं. पण तू शिव्या देशील असं मात्र मला वाटत होतं.'

मारुत्स्याच्या गोंडस चेहऱ्यावर मिश्किल हास्य उमटलं.

'अँन्टन, तुम्ही नेहमीच माणसांना शब्दात पकडता.'

सिलँटी पुढे झाला आणि बोट दर्शवत म्हणाला,

'हे बघ, असं म्हणू नकोस. त्यात काय झालं? त्यांनी थोडीशी चूक केली म्हणून तुला एवढं रागवायला काय झालं?'

मारुत्स्यानं चटकन हसऱ्या चेहऱ्यानं सिलँटीकडे पाहिलं व म्हणाली,

'सिलँटी, तुम्ही जरी वयाने माझ्यापेक्षा खूप मोठे असलात तरी देखील माझ्यापेक्षा तुम्हाला तसं फार समजत नाही हं,' एवढं बोलून ती ऑफिसमधून बाहेर पळाली.

सिलँटीनं आपली टोपी उडवली व म्हटलं,

'काय गंमत आहे पहा,' आपली टोपी जोरजोरानं पायावर आपटत व मोठ्याने हसत तो म्हणाला, 'जाऊ द्या हो. हे असंच असतं.'

□

# ३

## ‘दादालोक’

सुतारलोकांनी त्या लालघराच्या खिडक्यांची दारं बसवायचं काम संपवलं असेल नसेल तोच हिवाळी मोसम सुरू झाला. त्यावर्षी हिवाळयानं जरा आमच्यावर कृपाच केली. हिवाळा तसा नेहमीपेक्षा किंचित सौम्य असून प्रकृतीला अपायकारक असे भयानक वारे वहात नव्हते. आमचा कुटल्टी कॉलनीतल्या सगळया मुलांना, हिवाळयापासून रक्षण करण्यासाठी कपडे वाटत होता. आमच्या डुकरांच्या घरात काम करणाऱ्या व घोडयांच्या तबेल्यात काम करणाऱ्या मुलांना त्यानं उंच टाचांचे बूट दिले. इतरांना जे बूट दिले ते काही तसे दिसण्यात, तसंच आकारानंही नवे नव्हतेच. पण त्या बुटांचे अनेक गुण होते. ते चांगले भक्कम असून भरपूर मोठे होते. आमच्या मुलांना २–२, ३–३ कापडाच्या पट्टया आत घालून ते बूट घालावे लागत. आमच्या मुलांना कोट ही चीजच माहीत नव्हती. त्याऐवजी ती मुलं रजईच्या कापडाची जाकिटं वापरत. ही परंपरा आमच्याकडे पहिल्या जागतिक महायुद्धामुळे आली होती. आमच्या काही मुलांच्या डोक्यावर झारच्या सैनिकांकडून मिळालेल्या उरल्यासुरल्या टोप्याही होत्या, पण बऱ्याचशा मुलांना या हिवाळयातही कापडाच्या टोप्यांवरच भागवावं लागलं. त्यावेळेला आमच्या मुलांना थंडीपासून अंगात ऊब आणण्यासाठी एक अभिनव पद्धतच अंमलात आणावी लागली होती. ग्रीष्म ऋतूत आणि उन्हाळयात आमची मुलं सुती कापडाच्या चड्ड्या आणि शर्ट वापरत असत. त्यामुळे मुलांच्या एकंदर हालचालीत एक प्रकारचा

हलकेफुलकेपणा आलेला होता व ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी इतक्या वेगानं जात की जणू काही बंदुकीतून गोळी सुटावी. ही त्यांची सवय अगदी दाट धुक्यातसुद्धा ते वापरत असत.

हिवाळी ऋतूतल्या सांजवेळा फार मजेशीर असत. मुलांचं काम संध्याकाळी ५ वाजता संपत असे व रात्रीच्या जेवणाला ३ तास अवकाश असे. सगळीकडे तेलाचे दिवे लावलेले असत. जिवंतपणा व आराम सगळीकडे पसरलेला दिसे. प्रत्येक डॉरमिटरीत व वर्गातून शेगड्या पेटलेल्या दिसत. प्रत्येक शेगडीच्या भोवताली दोन वर्तुळे दिसत. एक पेटायला लावलेल्या ओंडक्याचं व दुसरं त्याच्याभोवती बसलेल्या मुलांचं. या दोन्हीही वर्तुळांचं उद्दिष्ट खरं तर ऊब आणण्यापेक्षा गप्पागोष्टी करण्यासाठीच जमलेलं दिसे. कोण्या एखाद्या मुलाचा हात त्या ओंडक्याला लागून तो शेगडीत पडे. मग ओंडके स्वतःच्या चमत्कारिक आयुष्याबद्दल आपापसात जणू बोलायला लागत. आणि मनापासून हसत. त्यांचे आवाज अगदी स्पष्ट ऐकू येत. हकीकत सांगणारे (ओंडके) एकमेकांना एकसारखे अडवत व ऐकणाऱ्यांना त्या बडबडीतून काहीच निष्कर्ष काढता येत नसे. परंतु त्या सर्वांचा अर्थ मात्र एकच होता. आणि तो मुलांच्या मनात अगदी खोलवर रूजला होता. आयुष्य हे जसं आनंदाचं आहे तसंच ते चमत्कृतीपूर्ण पण आहे. ओंडक्याच्या जळण्याचा आवाज कमी होत जाई व कथा सांगणारे पण जरा आरामशीर बसत. मग मोठमोठ्यानं आवाज करून दमलेली त्यांची तोंडं नुसतीच कुजबुजत रहात. मग मुलामुलींच्या गप्पा सुरू होत.

अशाच एखाद्या गटामध्ये व्हेटकोव्हस्की बसलेला असे. तो साऱ्या कॉलनी-मध्ये गोष्टी सांगण्यात अत्यंत पटाईत म्हणून प्रसिद्ध होता व त्याच्या गोष्टी ऐकायला खूप मोठा समुदाय जमलेला असे. एकदा तो सांगत होता :

'या जगामध्ये अनेक चमत्कारिक गोष्टी आहेत. आपण इथेच रहातो. बाहेर जाऊ शकत नाही आणि म्हणून आपण काही पाहूही शकत नाही; पण असे अनेक लोक आहेत की ते जगातली कोणतीही गोष्ट बघायची सोडत नाहीत. मला एक-जण नुकताच भेटला होता. तो कॅस्पियन समुद्र पाहून आलेला आहे व कॉकेशस पर्वतावरही जाऊन आला. तिथे एका बाजूला एक खोल घळ आहे आणि दुसऱ्या बाजूला पर्वताचं उंच शिखर आहे. त्या जागेला 'परमेश्वरा, मला पलिकडे ने,' असं म्हणतात. तिकडे जायला दुसरा मार्ग नाही. हा एकच मार्ग आहे. काही लोक तिथपर्यंत जातात व काही लोक जाऊ शकत नाहीत. कारण तिथून सारखे दगड खाली येत असतात. सुखरुपपणे जर पोचलं तर ठीकच आहे, नाहीतर पाय घसरून पडलात की तुम्ही रसातळाला जाता आणि तुम्हाला कोणीही शोधून काढू शकत नाही.'

बाजूला झादारोव उभा राहून ही गोष्ट शांतपणे व मन लावून ऐकत होता. तितक्याच शांतपणाने तो व्हेटकोव्हस्कीच्या डोळ्यातही बघत होता. तो एकदम

म्हणाला, ' कोस्टचा, तू स्वत:च जाऊन ते पार करायचा प्रयत्न का करत नाहीस ? परमेश्वर तुला मदत करील. '

मुलांनी आपली डोकी एकदम झादारोवच्या दिशेने वळवली. या मध्येच बोलण्याचा कोस्टचाला राग आलेला दिसला. तो झादारोवला म्हणाला, ' तुला काही समजत नाही. खरोखरच निरनिराळी ठिकाणं पहाण्यात किती मौज असते ? हा मी सांगितलेला माणूस सध्या तिथेच आहे. '

झादारोव त्याचं नेहमीचं धीमं, उपरोधित हास्य करून म्हणाला, ' अरे, मी जर असतो, तर त्याला काहीतरी दुसरंच सांगितलं असतं, ' असं म्हणून तो मुलांना म्हणाला, ' चिमणी बंद करायची वेळ झालेली आहे. '

यावर कोस्टचानं, ' तू काय केलं असतंस ? ' असं गंभीरपणाने विचारलं.

खिडकीचं तावदान लावून घेणाऱ्या मुलाकडे लक्षपूर्वक पहात झादारोवनं सांगितलं, ' मी ना. मी त्याला उजळणीचं पुस्तक आणायला सांगितलं असतं. तो माणूस मूर्ख आहे. साऱ्या जगभर हिंडून त्याला काय मिळणार आहे ? कदाचित त्याला लिहितावाचताही येत नसेल. म्हणून ' मला पलिकडे न्या,' असं तो म्हणत असेल. अशासारख्या बथ्थड लोकांची डोकी खड्ड्यातच गेली पाहिजेत आणि तो उंच कडा खरोखर तेवढ्याचसाठी तेथे तयार झालेला असेल.'

सारी मुलं एकदम हसली व त्यातला एकजण कोस्टचाजवळ जाऊन म्हणाला, ' कोस्टचा, तू आपला इथेच रहा. कारण तू काही बथ्थड नाहीस.'

दुसऱ्या एका शेकोटीभोवती सिलँटी जमिनीवर बसला होता. तो हाताने धागा काढत होता. त्याच्या हातात एकदम लांब धागा होता.

' आम्हाला वाटलं होतं सगळं काही व्यवस्थित असेल. तो रडत होता आणि आम्हाला कुरवाळत होता. पण कसा लुच्चा आहे पहा हं ! तो आपल्या ऑफिसात गेल्याबरोबर त्यानं एक लुच्चेगिरी केली. त्यानं आपले बैल एकदम साऱ्या शहरभर सोडले. आणि दुसऱ्याच दिवशी आम्हाला काय दिसलं माहीत आहे का? घोडेस्वार. सगळेजण बोलत की घोडेस्वार सर्वांना चाबकाने बडवून काढणार आहेत. परंतु मी आणि माझ्या भावानं मात्र ही शिक्षा भोगायचं नाकारलं. त्यांची शिक्षा म्हणजे विजारी खाली करून शेपटीनं फटके मारायचे. माझ्या मैत्रिणीबद्दल मात्र मला फार वाईट वाटतं हं ! कदाचित ते मुलींना हात लावत नसतील.'

सिलँटीच्या मागे कालिना इव्हानोविच उभा होता आणि त्याच्या पाईपमधून निघालेला धूर एका मुलाच्या डोक्याभोवती वर्तुळ करून शेगडीकडे जात होता. माझ्याकडे डोळे मिचकावून पहात कालिनानं सिलँटीला विचारलं,

' काय रे सिलँटी, खरं सांग हं. ते घोडेस्वार जिथे तुझे पाय आखडलेले आहेत तिथं फटका मारत होते का ?' सिलँटीनं आपलं डोकं जोरानं हलवलं व जमिनीवर पडून तो मोठमोठ्यानं हसू लागला.

'कालिनासाहेब, ते लोक खरोखरच तुम्ही म्हणालात त्या जागीच मारंत आणि हे सारं एखाद्या तरूण मुलीसाठी बरं का?'

अशाच तऱ्हेने बाकीच्या शेकोटयांच्या भोवती गप्पागोष्टी चालत असत. तशाच त्या त्यांच्या खोल्यांतून आणि वर्गांमधूनही चालत. अशावेळी काराबानोव आणि व्हेर्शनेव हमखास लिडोच्काच्या खोलीत सापडत. लिडोच्का त्यांना चहा आणि काहीतरी खायला देत असे. चहा पिऊनसुद्धा व्हेर्शनेव काराबानोववर रागवायला कमी करत नसे.

व्हेर्शनेव काराबानोवला चाचरत म्हणे, 'तू सारा दिवस अन् रात्र नुसती मजा करतोस. तू विचार करायला कधी लागणार आहेस?'

यावर काराबानोव म्हणे, 'अरे, पण कशाबद्दल विचार करायचा? आपली काय बायको आहे की बैल आहेत की भरलेली कोठारं आहेत? त्याच्यासाठी विचार करायचा. पण सध्या आपण नुसतं मजेत रहायचं, बस्स!'

'नाही नाही. प्रत्येकानं आपल्या आयुष्याबद्दल विचार केलाच पाहिजे. तू अगदी विक्षिप्त आहेस.'

काराबानोव चिडून म्हणे, 'तूच अगदी महामूर्ख आहेस. तुझ्या म्हणण्याप्रमाणे विचार करायचा म्हणजे एखाद्या आरामखुर्चीत बसायचं आणि आपल्यासमोर कुठेही एकटक बघायचं. ज्यांना खरोखरच डोकं आहे ते योग्य वेळी विचार करतात. पण तुझ्यासारख्या मूर्खांना मात्र आधी काहीतरी डोक्यात भरावं लागतं. म्हणजे मग ते विचार करायला लागतं.

लिडोच्का मध्येच म्हणे, 'अरे, तू कोस्टचाला कशाला त्रास देतोस? त्याला आवडत असेल तर त्याला विचार करू दे. कदाचित काहीतरी सापडेलही त्याला.'

'कोण, कोल्या? कधीच नाही. कोस्टचा म्हणजे काय हे तुला माहीत नाही. तो आहे येशू ख्रिस्त आणि सत्यशोधक. त्याच्यासारखा मूर्ख तू अजून कुठे पाहिला नसशील. त्याला सत्य हवंय आणि तो आपले बूट सत्याने माखून ठेवणार आहे.'

काराबानोव आणि कोस्टचा लिडोच्काच्या खोलीतून बाहेर पडत. ते तसे अगदी जानी दोस्त. काराबानोव मोठमोठ्यानं गाणं म्हणत आणि कोस्टचा प्रेमळपणाने त्याच्या कमरेला विळखा घालून त्याला आपलं म्हणणं पटवायचा प्रयत्न करत होता. 'आता क्रांती होऊन गेली ना की मग सगळं काही व्यवस्थित व्हायलाच पाहिजे,' कोल्या चाचरत म्हणे.

माझ्याही छोटयाशा घरी पुष्कळ पाहुणे येत. आई माझ्याजवळ रहात होती. ती बरीच वयस्कर असून आयुष्याचे शेवटचे दिवस शांतपणे घालवत होती. पोरं तिला आजी म्हणत. शुर्का, झेल्वी, मिट्का—झेल्वीचा धाकटा भाऊ—वरचेवर आमच्याकडे येई. त्याचं नाक फार तिखट होतं. तो कॉलनीत बरेच दिवस होता. पण अजून काही तो वाढत नव्हता. त्याच्या शरीराचे काही भाग अर्थातच जरुरी-

पेक्षा जास्त वाढले होते. विशेषत: त्याचं नाक, त्याचे दोन्ही कान, हनुवटी नजरसुद्धा फारच चलाख होती.

शुर्काचे काही विचित्र उद्योगधंदे चालत. कुठल्यातरी एखाद्या बगीचातल्या झुडुपामागे छोटीशी जागा राखून ठेवली होती. तिथे एक सशाचं जोडपं होतं आणि तळघरात त्यानं एक छोटासा पक्षी ठेवला होता. एकदा एका सर्वसाधारण सभेत कोम्सोमोलनी शुर्कावर याबद्दल आरोप केला की, शुर्का आपला स्वत:चा एक धंदा चालवतो. पण शुर्कानं त्याला जोरदार विरोध केला.

' मी त्या धंद्याचा माझ्या स्वत:साठी फायदा करून घेतलाय का ?' असं शुर्कानं ठणकावून साऱ्यांना विचारलं.

' मग तुझ्याकडे पैसे कुठून येतात ? '

' कसले पैसे ? '

' काल तुझ्याकडे खाऊ आणण्यासाठी पैसे कुठून आले ?'

' किती पैसे होते असे ? मला आजीनं फक्त दहा कोपेक दिले होते. '

यावर सर्वजण निरूत्तर झाले. कोणीही शुर्काच्या विरुद्ध बोलू शकला नाही· पुष्कळदा अशी छोटीछोटी मुलं माझ्या व आजीच्या भोवती असत. कारण ती त्यांना गोन्चारोवका गावातून काहीतरी आणायला सांगे. असं जरी असलं तरी बाहेर जाताना ही मुलं माझी नजर चुकवून बाहेर पडण्याची खबरदारी घेत. मी जेव्हा अतिशय कामात असे किंवा बाहेरून यायला मला उशीर होई अशी वेळ पाहून दोन तीन पोरं आजीच्या जवळ येत. त्यांना कधीकधी चहा किंवा फळं असा मलिदा मिळत असे. ते पुष्कळदा माझ्यासाठी ठेवलेलं असे व मला खायला वेळही मिळत नसे. आजीला वयोमानामुळे फारशी आठवण रहात नसे. त्यामुळे मुलांची नावंही तिच्या लक्षात रहात नसत. या सगळ्यात शुर्का वेगळाच उठून दिसे, शिवाय तो फार चलाख आणि बडबड्याही होता.

शुर्का आज काही कामासाठी आजीकडे आला होता. त्यानं आजीला अभिवादन केलं. आजीनं ते परत केलं. 'शुर्का, तू इतके दिवस कुठे होतास ? आजारी वगैरे नव्हतास ना ?

शुर्का एका खुर्चीवर बसला आणि एकेकाळी पांढऱ्या असलेल्या टोपीच्या टोकानं गुडघ्यावर रेघोट्या काढू लागला. त्याचे केसही बरेच वाढलेले होते आणि ते कापण्याची जरूरी होती. नाक वरती करून आढ्याकडे पहात तो म्हणाला, 'मी आजारी नव्हतो पण माझा ससा आजारी होता.'

आजी पण त्याच्या शेजारी खाटेवर बसली. तिनं आपली पेटी उघडली. त्याच्यात अनेक वस्तू भरलेल्या होत्या. सुताचे गुंडे, लोकरीचे गुंडे, कापडाचे तुकडे. ती आजीची सारी दौलत होती.

'तुझा ससा आजारी होता ? बिचारा ! तुला खूप वाईट वाटत असेल नाही ?'

'करायचं काय ?' शुर्का गंभीरपणे म्हणाला. त्याला त्याच्या सशाबद्दल वाटणारी काळजी त्याच्या डोळ्यात उमटली होती.

'पण तू त्याला बरं करण्यासाठी काही प्रयत्न केलेस का ?' असं आजीनं विचारलं, 'तुला काही औषधपाणी पाहिजे का ?'

'हो. औषध मिळालं तर जरूर पाहिजे. मला मिलेट पाहिजे. अर्धा ग्लास मिळालं तरी पुरे.'

'शुर्का, तू थोडा चहा घेणार का ? किटली शेगडीवर आहे आणि पेलेही तिथंच आहेत. तुला थोडासा घे आणि थोडा मला पण दे.'

शुर्का खुर्चीवरून उठला आणि शेगडीजवळ गेला. त्यानं चहा ओतला. त्याच वेळी आजीनं उठून फळीवरून एक गुलाबी रंगाची पिशवी काढली. त्याच्यात ती आपलं मिलेट ठेवत असे.

चाक दुरूस्त करायच्या शेडमध्ये कोझीर रहात असे. त्या ठिकाणी काही मुलं जमत असत. कोझीर जिथे काम करी तिथेच झोपे. एका कोपऱ्यात त्यानं स्वतःच बनवलेल्या शेगडीवर एक किटली असायची आणि दुसऱ्या कोपऱ्यात त्याचा घडीचा पलंग. त्या पलंगावर एक जोडाची गोधडी असे. कोझीर आपला पलंगावर बसे व त्याचे पाहुणे लाकडी ओंडक्यावर किंवा तारांच्या जुडग्यावर अशा सापडेल त्या जागी बसत. ते सारेजण मिळून कोझीरच्या आयुष्यात त्यानं पाहिलेल्या निरनिराळ्या अंधश्रद्धेच्या गोष्टी त्याच्याकडून ऐकण्यासाठी व त्याची टिंगलटवाळी करण्यासाठी येत.

कोझीर त्यांच्या टवाळीकडे लक्ष न देता म्हणे, 'बाबांनो, परमेश्वर चांगला आहे. तो आपल्याला क्षमा करील. पण टवाळी केलीत तर तोही रागावेल.'

पण तो परमेश्वर रागावून अवतरण्याऐवजी कालिनाच रागावून कुठून तरी अंधारातून दरवाजात येऊन उभे रहात. एका हाताने पाईप झडकत ते मुलांना दम देत.

'म्हाताऱ्या माणसाची तुम्ही काय थट्टा उडवता रे कार्ट्यांनो ! तुम्हाला जीझस ख्राईसशी काय करायचं आहे ? थांबा पोरांनो, मी तुम्हाला दाखवतोच की ज्यायोगे जीझस ख्राईस काय पण सेंट निकोलसची पण तुम्ही प्रार्थना करू लागाल.'

'कालिना, तुम्ही अगदी वेळेवर या म्हाताऱ्याच्या पाठीशी उभे राहिलात. देव तुमचं भलं करो.'

'हे पहा कोझीर, पुन्हा जर या मुलांनी असं काही केलं तर तू ताबडतोब मला येऊन सांग. या कार्ट्यांना तू आवरू शकत नाहीस हे खरं. पण त्याचबरोबर लक्षात ठेव, तुझ्या त्या जीझस ख्राईसबद्दल मला तिळमात्रही प्रेम नाही.'

पोरांनी आपण घाबरलो आहोत असं कालिनासाहेबांना दाखवलं व चाकं दुरूस्त करायच्या त्या खोलीतून पोबारा केला. ती कॉलनीतल्या निरनिराळ्या कोपऱ्यांत कधीच जाऊन बसली.

आमच्याकडे अजूनही मोठीमोठी अशी दालनं नव्हती. मुलं ६ ते ८ जणांचा गट

करून एकेका खोलीत रहात होती. या व्यवस्थेचा एक फायदा असा झाला की प्रत्येक गटातील मुलं आपापसात अगदी मिसळून गेली. आणि त्यांचं स्वभाववैशिष्टय जास्त चांगल्या तऱ्हेने समजू लागलं. त्यामुळे त्यांच्याबरोबर काम करणं जास्त सोपं झालं. ११ वी तुकडी अशाच तऱ्हेने तयार झाली. या तुकडीमध्ये सगळी छोटी मुलं एकत्र आली. ही तुकडी बनण्याचं बरचसं श्रेय जॉर्जिव्हस्कीला द्यावं लागेल. पूर्वीप्रमाणेच तो त्यांच्याकडे खूप लक्ष देई. त्यांना आंघोळी घालणं, त्यांच्याबरोबर खेळणं, त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था बघणं, जरूर पडेल तेव्हा त्यांच्यावर रागावणं. एखादी आई घेईल तशी तो त्या मुलांची काळजी घेई. हे पाहून आमच्या काही बेरड मुलांना त्याचा शांतपणा व त्याची ताकद याबद्दल कौतुक वाटे. या त्याच्या वर्तणुकीमुळे जॉर्जिव्हस्की हा इर्कुट्सच्या गव्हर्नरचा मुलगा आहे अशी जी आमच्या काही मुलांची समजूत झाली होती ती दूर होण्यास मदत झाली.

नवीन शिक्षकांची कॉलनीत भरती झाली. मी नेहमीच खऱ्याखुऱ्या माणसांना शोधायचा प्रयत्न करत असे. कारण शिक्षणक्षेत्रात तज्ञमंडळींचा तसा अभावच होता.

पावेल इव्हानोविच झुबिन हा माणूस अचानकपणे मला भेटला. तो शिक्षकांच्या ट्रेड युनियनमध्ये दारवानाचं काम करत होता. तो तसा चांगला सुशिक्षित, शिस्तप्रिय, अतिशय निःसंग व निस्पृह असा खराखुरा सज्जन मनुष्य होता. त्याच्यामध्ये एक विशेष गुण असा होता की, चिकित्सक पद्धतीने मनुष्यस्वभावाची छाननी करण्यात तो आनंद मानत असे. हा त्याचा गुण मला फार आवडे. तो एखाद्या माणसाच्या मानसशास्त्राच्या पैलूंवर किंवा त्याच्या व्यक्तिमत्वातले फेरफार अजमावून त्या माणसाच्या कर्तृत्वातील सौंदर्य शोधून काढून, त्याच्या प्रवृत्तीतला उथळपणा समजून घेऊन त्यावर एखाद्या कसलेल्या जमादाराप्रमाणे (कलेक्टर) भाष्य करत असे. जेव्हा जेव्हा सामुदायिकाचे कायदे झाले त्या त्या वेळी माणसांच्या ज्या प्रतिक्रिया झाल्या त्यांचे बारकाईने निरीक्षण करून त्यानं यावर विचार केला होता. मला हे पक्कं माहीत होतं की त्याच्या या अपरिपक्व उत्साहामुळे त्यातून काहीही निष्पन्न होणार नाही. तरीसुद्धा मला त्याचा प्रामाणिक स्वभाव आवडत असे.

दुसरी एक व्यक्ती म्हणजे इव्होनोविच बुत्साई. हा साधारण १७ वर्षांचा असून नुकताच आपला शिक्षणक्रम संपवून ग्रॅज्युएट होऊन बाहेर पडला होता. कलातंत्रज्ञ म्हणून शिफारस करून त्याला आमच्याकडे पाठवला होता. कारण आम्हाला एका कलावंताची आमच्या नाटयकलेसाठी व इतर कोम्सोमोल **कार्यक्रमांसाठी** जरूरी होतीच व अनायासे हा आम्हाला मिळाला.

झिनोव्हाय इव्हानोविच यानं त्याच्या निरनिराळ्या स्वभावगुणांतील अतिरेकीपणाने आमच्यावर छाप पाडली होती. तो कमालीचा बारीक, वर्णाने

काळा असून अतिशय किरटचा आवाजात बोलत असे. त्याच्याशी जास्त वेळ संभाषण करणं अशक्य असे, कारण बोलताना जणूकाही तो अल्ट्रा व्हायोलेट आवाजच तोंडावाटे काढतोय की काय असा भास होई. त्याच्या कमालीच्या शांत व अविचलित स्वभावामुळे तो एकदम वेगळाच दिसे. तो आमच्याकडे नोव्हेंबरच्या अखेरीस आला व त्याच्यातले कलागुण पहाण्याची आम्हाला उत्सुकता लागली होती. परंतु झिनोव्हायनं हातात पेन्सिल धरण्यापूर्वीच त्याच्यातल्या दुसऱ्याच एका कलागुणानं आम्ही आम्ही आश्चर्यचकित झालो.

तो आल्यानंतर काही दिवसांनीच मुलांकडून मला कळलं की हे गृहस्थ सकाळी लवकर उठतात व कोलोमॅक नदीवर जाऊन संपूर्ण नग्नावस्थेत आंघोळ करतात. नाही म्हणायला एक कोट फक्त त्यांच्या खांद्यांवर असतो. नोव्हेंबरच्या अखेरीस कोलोमॅक नदीतलं पाणी गोठायला लागलं व मुलं तिथे स्केटिंग करू लागली. झिनोव्हायनं ऑटचेनाशच्या मदतीनं एके ठिकाणी बर्फावर एक खड्डा करून त्या थंडगार पाण्याने आंघोळ करायचा आपला विक्षिप्त उपक्रम चालूच ठेवला. लवकरच हे साहेब फ्लूरसीनं आजारी पडले व १५ दिवस त्यांनी बिछाना सोडला नाही. बरे वाटता क्षणीच त्यांनी परत आपला तो उद्योग सुरू केला. डिसेंबरमध्ये त्यांना जबरदस्त सर्दीखोकल्यानं झपाटलं. त्यांच्या या आजारामुळे आमचं सगळं वेळापत्रक बिघडून गेलं. मला माझा शांतपणा सोडून त्याला असला मूर्खपणा बंद करायची विनंती करावी लागली.

यावर झिनोव्हायनं त्याच्या त्या चमत्कारिक आवाजात उलट मलाच सुनावलं, ' हे बघा महाशय, जेव्हा जेव्हा वाटेल त्या त्या वेळी आंघोळ करायचा मला हक्क आहे. कामगार कायद्यात याच्यावर बंदी नाही. तसंच आजारी पडण्याचाही मला हक्क आहे व कोणीही माझ्यावर याबद्दल कारवाई करू शकत नाही. '

' झिनोव्हायसाहेब, मी आपल्यावर कुठच्याही तऱ्हेने कारवाई करत नसून मी आपल्याला विनंती करत आहे की हा त्रास आपण कशासाठी करून घेता ? हे मी आपल्याला अगदी माणुसकीच्या धर्मानुसार विचारत आहे. '

' मग ऐका तर, माझी प्रकृती मूळचीच खराब आहे व माझ्या शरीराची घडण अगदी विचित्र आहे. आणि अशी तोळामासा प्रकृती घेऊन जगायचं म्हणजे मला वीट येतो. म्हणून मी तिच्यावर मात तरी करेन म्हणजे उरलेलं आयुष्य मी शांततेने व सुखाने जगू शकेन. किंवा काय व्हायचं असेल ते होईल. गेल्या वर्षी मला फ्लूरसीनं चार वेळा पछाडलं आणि या वर्षी आता डिसेंबर महिना चालू आहे व मला एकच वेळा आतापर्यंत बिछान्यावर पडावं लागलं. जास्तीत जास्त दोन वेळा पडावं लागेल असं मला वाटतं. तुमच्याजवळ इथं नदी असल्यामुळेच मी इथं यायचं ठरवलं. '

मी सिलँटीला बोलावून त्याच्यावर जवळजवळ खेकसलोच, ' काय रे, हा

काय मूर्खपणा आहे ? हा एक माणूस माथेफिरूपणा करतो आणि तू नदीच्या गोठलेल्या पाण्यात भोकं पाडून देतोस, काय ही तुझी अक्कल ? '

सिलँटीनं आपले हात वर करून क्षमायाचना केली. तो म्हणाला, ' अँटन, माझ्यावर रागावू नका हो. माझा अगदी नाईलाज झाला. माझी गाठ पूर्वी एकदा याच्यापेक्षाही एका विक्षिप्त माणसाबरोबर पडली होती. त्याला तर जीवच द्यायचा होता समजलं ? आणि त्यासाठी त्यानं पाण्यात बुडायचा निश्चय केला होता जराही तुम्ही त्याच्याकडे दुर्लक्ष केलंत की तो पाण्यात डुबायचा. जंगली होता लेकाचा. त्याला वरचेवर पाण्यातून बाहेर काढून काढून मी अगदी थकून गेलो. होतो आणि अखेरीस त्या महामूर्खानं स्वतःला गळफास लावून घेतला. तो असं काही करेल अशी मला कधीही कल्पना नव्हती. आता आलं का तुमच्या लक्षात ? म्हणूनच या मूर्ख माणसाच्या तरी मी आड येणार नाही. त्याला काय हवं ते करू दे. '

झिनोव्हाय इव्हानोविच तशाच प्रकारे बर्फाला पाडलेल्या भोकात शिरून मे महिन्यापर्यंत आंघोळ करत राहिला. प्रथमप्रथम मुलं या पोरकटपणाला हसत होती. तो सर्दी खोकल्याने किंवा फ्लूरसीने आजारी पडला तर मुलं अगदी शांत-चित्ताने त्याची सेवा करत.

जेव्हा जेव्हा झिनोव्हाय शरीर मजबूत करण्याच्या मागे न लागता चांगला खडखडीत बरा असे, तेव्हा तेव्हा त्याच्यातला खराखुरा कलावंत जागा होई. लव-करच एक कलापथक आमच्या कॉलनीत तयार झालं व एक छोटीशी खोली त्यांनी स्टुडिओसारखी सजवली.

हिवाळ्यातल्या सुंदर संध्याकाळी कधीकधी झिनोव्हायच्या या स्टुडिओत काम चालत असे व सारी खोली हास्याने दणाणून जाई. ते कलानैपुण्य बघण्यासाठी काही प्रेक्षकसुद्धा भाग घेत.

अनेकजण एखाद्या मोठ्या दिव्याशेजारी बसून भलं मोठं चित्र काढण्यात दंग झालेले दिसत व त्यामधूनच झिनोव्हायचं डोकं डोकावताना दिसे. अशा वेळी झिनोव्हाय जणू एखाद्या देवळातल्या धर्मपठण करणाऱ्यांच्या म्होरक्यासारखा दिसत असे.

' थोडासा गडद तपकिरी रंग फेडरेन्कोला फासा. तो अगदी हाडाचा मझिक आहे. आणि तुम्ही त्याला उगीचच एखाद्या व्यापाऱ्याच्या बायकोसारखं रंगवता-हात. तुम्ही तर लाल रंगावर बसला आहात पण त्याची खरोखरी जरुरी आहे का ?'

अशा वेळी आमच्या तोंडावर खूपशा सुरकुत्या असलेला व चिपट्या नाकाचा व्हनका लापोट झिनोव्हायसारखा किरटा आवाज काढून उत्तर देई, 'अरे, मी तर सर्व गडद रंग लेशीवर फासून टाकला.' अशा तऱ्हेने थट्टा मस्करी चालत असे.

माझ्या ऑफिसमध्येही संध्याकाळी खूप गजबजाट होई. नुकत्याच माझ्याकडे खार्कोवहून दोन विद्यार्थीनी आलेल्या होत्या. त्यांनी आपल्याबरोबर खालील ओळखपत्र आणलं होतं.

'खार्कोव पेडॉगॉगिकल इन्स्टिटयूट', के. व्हास्कॉया व आर. लॅन्डसबर्ग या दोन मुलींना मॅक्झिम गॉर्की कॉलनीतल्या शिक्षणतंत्राची खरीखुरी व व्यवहार्य गोष्टींची ओळख करून घेण्यासाठी पाठविण्यात आले आहे.'

या तरुण पिढीतल्या दोन शिक्षणतज्ज्ञ प्रतिनिधींचं मी जरा औत्सुक्यानंच स्वागत केलं. या दोघी पोरी तरण्याबांड व वयानं विशीच्या जवळपासच्या असाव्यात. के. ही किंचित स्थूल, ठेंगणी व तरतरीत असून दिसायला चांगली होती. ती अगदी जराशीच लाजत असे. त्यामुळे एखाद्या साध्या रंगीत चित्राशी तिची तुलना करता आली असली. ती आपल्या विरळ असलेल्या भिवया वरचेवर आकुंचित करून ओठांवर येणारं हसू प्रयत्नपूवक लपविण्याची शिकस्त करत असे. या पोरीनं मला धडाधड प्रश्न करायला सुरुवात केली.

'तुमच्याकडे शिक्षणतज्ज्ञाची खास जागा आहे का ?'

'असलं काहीही आमच्याकडे नाही,' मी उत्तर दिलं.

तिनं प्रश्न केला, 'मग तुम्ही मुलांच्या व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास कसा हो करता ?'

'म्हणजे मुलांचं व्यक्तिमत्त्व असं तुम्ही म्हणता ?' मी गंभीरपणाने विचारलं.

'अहो, मी म्हणते की, तुमच्या विद्यार्थ्यांचं व्यक्तिमत्व. त्याची चाचणी कशी घेता ?'

'अहो, पण त्याचा अभ्यास कशासाठी करायचा ?' मी विचारलं.

'कमाल आहे. तुम्ही नाहीतर काम कसं करणार ? तुमच्यासमोर असलेल्या वस्तुमात्राची जर तुम्हाला संपूर्ण माहिती नसेल तर त्याचा काय उपयोग ?'

असं 'के.'नं अगदी मनापासून अत्यंत उत्साहानं आपल्या मैत्रिणीकडे, म्हणजेच 'आर.'कडे बघून म्हटलं. आर. ही सावळी असून तिचे केस काळेभोर होते. ती नजर खाली वळवून आपला स्वाभाविक उपहास दाबण्याचा प्रयत्न करत असे.

'के.'ने जरा कडक शब्दात परत विचारलं,' तुमच्याकडे तुमच्या मुलांच्यात जास्तीत जास्त दादागिरी करणाऱ्यांबद्दल बोलण्यात काय अर्थ आहे ?'

'अगदी खरं आहे हे' असं मी गंभीरपणाने म्हटलं, 'आणि मी तुम्हाला खरं सांगू का ? दादागिरी करणाऱ्यांबद्दल मी जरूर काही सांगू शकतो. आता या क्षणाला तुम्ही जसं माझ्याशी रूबाबात बोलता आहात ना अगदी तशीच आमच्याकडील दादाकंपनी वागते.'

के. व्हास्कीया जरा घुश्श्यातच म्हणाली, 'तुम्हाला कसं कळलं आम्ही कशा आहोत ते ?'

'तुम्ही आता माझ्यासमोर बसून बोलत आहात की नाही ?'

'म्हणून काय झालं ?'

'हे बघा, मी अगदी तुम्हाला आरपार बघू शकतो. कसं म्हणाल तर जणू काही तुम्ही काचेच्या बनविलेल्या आहात आणि आता तुमच्या मनात काय घोळतंय ते मला सगळं समजतंय.'

यावर के. जराशी गोंधळली. इतक्यात काराबानोव, व्हेर्शनेव आणि झादारोव व इतर काही मुलं एकदम माझ्या ऑफिसात घुसली. त्यांनी विचारलं, 'आम्ही आत येऊ शकतो का की तुमचं काही खाजगी बोलणं चाललंय ?'

'तुम्ही बेशक येऊ शकता. मी तुमची पाहुण्यांशी ओळख करून देतो. या खार्कोवच्या दोन विद्यार्थीनी आहेत.'

'पाहुण्या काय ? वा ! छान ! काय तुमची नावं ?' असं सर्वांनी एकदम विचारलं.

क्शेनिया रोजानोवा व्हास्कीया व राखील सेम्योनोव्हना लँडसबर्ग अशी त्यांनी नावं सांगितली. आपला हात गालावर घासत काराबानोव खोटया गांभीर्यानं म्हणाला, 'काय हो हे लांबलचक नाव ? आम्ही आपलं तुम्हाला ओक्साना म्हणू. चालेल ना ?'

'चालेल. चालेल हो,' असं व्हास्कीया म्हणाली.

'आणि तुला बाई आम्ही राखील म्हणू. आवडेल की नाही ?

'आवडेल बरं !' लँडसबर्ग हळूच म्हणाली.

'ठीक आहे. तुम्ही विद्यार्थी आहात, नाही का ? तुम्हाला आता आम्ही काहीतरी खायला आणून देतो. तुम्ही खाल ना ?'

'अहो, तुम्हाला भूक लागलीय, हे तुम्ही आधी का नाही बोलतात ? आमचे झादारोव व व्हेर्शनेव असते तर त्यांनी आपल्याला कुत्र्यासारखी भूक लागलीय असं म्हटलं असतं. पण मी असं म्हणतो की निदान तुम्हाला मांजराच्या पिलासारखी भूक लागली असेल.'

ओक्साना हसून म्हणाली, 'आम्हाला खरोखरच भूक लागली आहे. इथे कुठे आमची हात धुवायची सोय होईल का ?'

'का नाही होणार ? चला, चला. आम्ही तुम्हाला आमच्या मुलींच्या स्वाधीन करतो. त्या तुमची सर्व व्यवस्था करतील.'

अशा तऱ्हेने आमची पहिली ओळख झाली. त्यानंतर दररोज संध्याकाळी त्या फारच थोडा वेळ माझ्याकडे येत. परंतु त्यांनी व्यक्तिमत्वाच्या चाचणीच्या अभ्यासाचा विषय परत कधीही काढला नाही. ओक्साना आणि राखील या दोघींनाही

त्या विषयावर बोलायला वेळ नव्हता. आमच्या मुलांनी आमच्या कॉलनीच्या अनंत घडामोडी–करमणुकी, भांडणे इत्यादी निरनिराळ्या मूलभूत प्रश्नांची त्यांना ओळख करून दिली होती. कुठच्याही सामुदायिकात उत्पन्न होणाऱ्या बारीकसारीक दैनं. दिन गोष्टी टाळून सामुदायिकात काम करणं अशक्य असतं. कधीतरी थबकून मागे वळून पहाण्याचा म्हणजे सिंहावलोकन करण्याचा प्रयत्न केला तरी फारसं यश न येता त्याला त्या दैनंदिन गोष्टींच्या भोवऱ्यातच बुडून जायला होतं. कधीकधी एखादा प्रवाह चुकूनमाकून जणू काही माझ्या ऑफिसच्या दारावर धडकत असे.

एके दिवशी संध्याकाळी फार मजेदार प्रसंग घडला. ओक्साना, राखील, सिलँटी व ब्रातचिन्को हे माझ्या ऑफिसात येऊन धडकले.

ओक्सानाने सिलँटीच्या सदऱ्याची बाही पकडली होती व त्याला खेचून आणत होती. हसत हसत ती त्याला म्हणाली, ‘चल लवकर, मागं कशाला रेंगाळतोस ?’

सिलँटी खरोखरच रेंगाळत होता. ओक्साना माझ्याकडे बघून म्हणाली,

‘अँन्टनसाहेब, हा सद्‌गृहस्थ कॉलनीत अवसानघातकीपणा फैलावतो आहे आणि हे तुमच्या कधीही लक्षात कसं आलं नाही ?’

‘सिलँटी, काय झालं ?’ मी विचारलं.

सिलँटीनं यावर रागानं आपला हात काढून घेतला व आपल्या टकलावर हळूहळू हात फिरवू लागला.

‘अँन्टनसाहेब, त्याचं असं झालं. आपली ती बर्फावरची गाडी आपल्या मैदानात उभी होती. सेमियॉन वगैरेंच्या डोक्यात एक वेगळीच शक्कल आली. ‘थांबा, हा सेमियॉन स्वतःच आलाय. तो तुम्हाला सर्व काही सांगेल. सांग रे बाबा, सांग.’

ब्रातचिन्कोनं सांगायला सुरुवात केली: ‘अँटनसाहेब, हे मलाच बर्फाच्या गाडीला जुंपायचा प्रयत्न करायला लागले व ढकलायला लागले. म्हणून मी सेमियॉनला त्या दात्यानं एक फटका मारला. पण हे दोघे काही केल्या ऐकेनात. त्या गाडीला ते ढकलतच राहिले. मी काय करणार ? त्यांना जर मी दात्यानं मारलं असतं तर ते रडायला लागले असते. त्यावेळी हा सिलँटी एकदम काहीतरी बोलला.’

त्यावर ओक्साना एकदम तडकून बोलली, ‘सिलँटीलाच सांगू दे, तो काय म्हणाला ते.’

‘त्याचा एवढा गवगवा करायचं कारण काय आहे ?’ सिलँटी म्हणाला.

‘मी सांगतो. मी काय म्हणालो, तुम्हाला लग्न करायचंय आणि म्हणून तुम्ही त्या बर्फाच्या गाडीबरोबर खेळ करताहात. एवढंच. त्यात काय मोठंसं ?’

‘एवढंच नाही हं’ ओक्साना म्हणाली.

ओक्साना रागावून म्हणाली, ‘हा ब्रातचिन्कोला म्हणाला, हिला त्या गाडीला

जुंप आणि तू गाडीत बस. ती तुला गोन्चारोवका गावाला घेऊन जाईल. थोड्याच वेळात ती वठणीवर येईल. असंच म्हणालास ना तू ?'

'एवढंच काय ? पुनः पण मी तसंच म्हणेन. अहो, या चांगल्या खाऊन-पिऊन तगड्या आहेत आणि यांना कामही काही नाही. शिवाय आपल्याकडे घोडे पण कमी आहेत. मग काय हरकत आहे ? माझं काय चुकलं ?'

'असं काय ?' ओक्साना म्हणाली व तिनं त्याला रागानं ऑफिसच्या बाहेर घालवून दिलं.

सिलँटी हसत हसतच ब्रातचिन्कोसह ऑफिसातून निघून गेला. ओक्सानानं तिथंच कोचावर बसकण मारली. त्याच कोचावर राखील डुलक्या घेत पडली होती.

मी म्हटलं, 'सिलँटी हा खरोखरच एक वल्ली आहे वल्ली. तू त्याचा जरूर अभ्यास करायला घे.' ओक्साना एकदम उठली व ऑफिसच्या बाहेर पडता-पडता हसून म्हणाली, 'हो, मी आता त्याला खरोखरच चांगली बघू शकते कारण तो काचेचाच बनविलेला आहे.'

असं म्हणून ओक्साना बाहेर पडून मुलांच्या घोळक्यात मिसळली. मी तिचा आवाज आमच्या नेहमीच्या मुलांच्या गोंगाटातूनही ऐकू शकत होतो.

मी राखीलकडे वळून म्हटलं, 'जा, तू जाऊन झोप.'

'मला काही झोप नाही आलीय. तुम्हाला झोप आलीय का ?' तिनं विचारलं.

'हो, मला झोप आलीय.'

'ठीक आहे. मग मला गेलंच पाहिजे,' असं म्हणून डाव्या हाताने लहान मुला-सारखे ती आपले डोळे चोळू लागली. तिने माझा हात दाबला व ती ऑफिसबाहेर सटकली. तिचा खांदा जाताजाता दाराच्या चौकटीवर आपटला.

□

४

# आमची नाट्यकला

याच्यापूर्वीच्या प्रकरणामध्ये जे काही सांगितले ती म्हणजे आमच्या हिंवाळयातल्या संध्याकाळच्या व्यवसायाची थोडीशी चुणूक होती. मागच्या आठवणींचा कबुलीजबाब देताना मला जरा शरमल्यासारखं वाटतं, परंतु आमचा फुरसतीचा सगळा वेळ आम्ही नाटयकलेच्या अभ्यासाला देत होतो.

नव्या कॉलनीत आम्हाला एक खरंखुरं नाटयगृह मिळालं होतं. हे नाटयगृह दुसरं तिसरं काही नसून खरं तर ती गिरणीची छपरीच होती.

आमच्या नाटयगृहात जवळजवळ ६०० प्रेक्षक बसू शकत होते. यात बहुतांशी आजूबाजूच्या खेडयातून येणाऱ्या लोकांचाच भरणा होता. आमच्या नाटयपथकाचं महत्व वाढत चाललं व त्याचबरोबर त्याची जरूरीही वाटायला लागली.

खरं तर आमच्या या नाटयगृहात कितीतरी अडचणी होत्या व यामुळे कालिनासाहेबांनी या नाटयगृहाचे तबेल्यात रूपांतर करण्याची सूचना अनेकदा केली.

ते म्हणत, ' तुम्ही जर या छपरीत गाडी ठेवलीत तर तिला थंडी वाजणार नाही व तिच्यासाठी शेकोटीही पेटवावी लागणार नाही. पण तुम्ही इथं प्रेक्षकांना बसवता व म्हणून तुम्हाला शेकोटीची जरूरी भासते. '

मी म्हटलं, ' ठीक आहे, तुमच्या म्हणण्याप्रमाणे इथे शेकोटया ठेवू. '

यावर कालिनासाहेब म्हणाले, 'वा वा ! म्हणजे एखाद्या भिकाऱ्याशी हस्तां-

दोलन करण्यासारखं ते हास्यास्पद आहे. तुम्हीच पहा, याचं छत निव्वळ लोखंडी पत्र्यांचं बनवलेलं आहे. आणि तुम्ही शेकोटी ठेवलीत तर जणू काही स्वर्गातल्या यक्षकिन्नरांची चंगळच होईल, पण प्रेक्षकांची मात्र नाही. तेव्हा तुम्ही कशा प्रकारची शेकोटी ठेवता बरं ? तुम्हाला एखाद्या मोठ्या लोखंडी शेगडीची जरूरी आहे. परंतु अशी शेगडी तुम्हाला कोण ठेवू देणार हो ? कारण अशी शेगडी ठेवणं म्हणजे आगीला आमंत्रण देण्यासारखं आहे. प्रत्येकवेळी नाटक सुरू झालं की त्याचबरोबर तुम्हाला आगीच्या बंबाची व्यवस्था करायला हवी. '

परंतु आम्ही कालिनांच्या विचारांशी सहमत झालो नाही. आमचा सिलँटी म्हणाला,

' त्याचं असं आहे की आपला नाट्यप्रयोग आपण फुकट दाखवणार आहोत आणि समजा आग लागलीच तर आपल्याला कोणी दोषी ठरवणार नाही.'

आम्ही अनेक शेकोट्या जागोजागी ठेवायची व्यवस्था केली व प्रयोग सुरू व्हायच्या वेळेलाच आम्ही त्या चालू करत असू. असं असलं तरी त्यामुळे खरोखरीची ऊब कोणालाही मिळाली नाही. कारण सगळी गरम हवा उघड्या छपरातून निघून जात असे. त्या शेकोट्या अगदी धडाडून पेटवल्या तरीही आमच्या प्रेक्षकांना गरम कपडे घालून बसावे लागे व आगीची झळ कपड्यांना लागणार नाही याची त्यांना काळजी घ्यावी लागे.

एकदा मात्र आमच्या नाट्यगृहात आग लागण्याचा प्रसंग ओढावला. परंतु तो या शेकोट्यांमुळे नव्हे तर रंगमंचावरील दिवा खाली पडल्यामुळे भडका झाला. त्यावेळी प्रेक्षकांची खूपच घावपळ झाली. परंतु काही लोक आपल्या जागेवर अगदी बसून राहिले व आमची काही मुलं रंगमंचावर चढून मजेत उभी राहिली. काराबानोव मात्र आवेगाने ओरडला,

' काय मूर्ख आहात रे ? तुम्ही कधी आग लागलेली पाहिली नाहीत काय? '

आम्ही आमचा रंगमंच अगदी व्यवस्थित, ऐसपैस, योग्य उंचीचा करून व जरूर त्या विंगा ठेवून त्यात प्रॉम्प्टरसाठी जागा केलेली होती. रंगमंचाच्या मागे बरीच मोकळी जागा होती. परंतु आम्ही त्याचा योग्य तो उपयोग करून घेऊ शकलो नाही. आमच्या नटांना थंडीपासून बचाव करण्यासाठी म्हणून आम्ही या मोकळ्या जागेत एक लहानशी खोली तयार केली. त्यामध्येच एका लहानशा शेकोटीचीही व्यवस्था केली. यामुळे आमच्या नटनटींना कपडे बदलण्यासाठी वेगवेगळ्या जागांची सोय झाली, शिवाय पुढील प्रवेशाची तयारीपण करता येऊ लागली. बाकीच्या मोकळ्या जागेत मात्र कमालीची थंडी वाजत असे.

प्रेक्षागारात जवळजवळ डझनभर बाकांच्या ओळी टाकलेल्या होत्या. त्यामुळे बसायच्या जागेची अगदी भरपूर रेलचेल होती. आणि असे आमचं कलानैपुण्य या ठिकाणी रूजलं व फोफावलं.

आमची नाटचकला या नव्या कॉलनीत आल्यावर झपाट्याने वाढीला लागली आणि तीन हिवाळे मिळून तिची प्रगती जराही खंड न पडता वाढतच गेली. ती सर्व दिशांनी वाढीला लागली. आज हे लिहिताना एवढं सगळं कसं झालं यावर माझा विश्वासच बसत नाही.

हिवाळ्याच्या दिवसांत आम्ही एकूण ४० नाटचकृती बसवल्या. परंतु ही सगळी नाटके संपूर्ण वेळेची व चांगली अभिरूची असलेली चारपाच अंकी असत. या सर्व नाटचकृती मोठ्या शहरातून दाखवल्या जाणाऱ्या होत्या. आम्ही कुठच्याही प्रकारे मंडळातून दाखविले जाणारे छोटे कार्यक्रम करत नव्हतो. अर्थात आमच्या या नाटचकृतींची फार मोठ्या व्यावसायिकांशी तुलना करता येणं शक्य नव्हतं. परंतु ती टाकाऊ नव्हती हेही तितकंच खरं !

आमच्या तिसऱ्या प्रयोगानंतर आमच्या नाटकांची प्रसिद्धी गोन्चारोवका गावाच्या पलिकडे पसरली. आमच्याकडे पिरगोवका, ग्राबीलोवका, बाबीचेल्का, गॉन्ट्सी, वॉट्सी, स्टेरोत्झेवोए इत्यादी ठिकाणचे रहिवाशी तसंच व्होलोवी, चुमार्स्की, ओझेर्की वगैरे गावठाणाचे रहिवाशी, शिवाय रेल्वे वर्कशॉपचे कामगार, इंजिनशॉपचे कामगार व हळूहळू जवळच्या शहरातील रहिवासी – त्यामध्ये शिक्षक, शिक्षण-खात्यातले लोक, सैन्यातले लोक, सोविएत सरकारचे नोकर, सहकारी भांडाराचे व पुरवठा खात्याचे नोकरवर्ग, अनेक तरुण मुलं व मुली, आमच्या मुलांच्या मित्र व मैत्रिणी--इत्यादी लोक आमची नाटके बघायला येऊ लागले. पहिल्या हिवाळ्याच्या अखेरीस दर शनिवारी अनेक लोक आपल्या कुटुंबियांसह रात्रीच्या जेवणाआधीच आमच्या नाटचगृहाभोवती जमू लागत. हिवाळ्याचे जाडजूड कोट अंगावर चढवून, दाढीमिशा वाढवलेले कित्येक लोक संध्याकाळपासून तिथे येत व आपले घोडे सोडून पाण्याच्या सुरया घेऊन इकडून तिकडे धावपळ करत फिरत. त्यांची बायकामंडळी अगदी डोक्यापर्यंत सगळं अंग झाकून घेऊन आमच्या नाटचगृहात असलेल्या शेकोटचांजवळ येऊन पाय शेकत किंवा कधीकधी आमच्या मुलींच्या खोल्यांमधे जाऊन त्यांच्याशी दोस्ती वाढवायचा प्रयत्न करत. काहीजणी कधीकधी त्यांच्या पिशव्या किंवा पुरचुंड्या सोडून त्यातील केक, वड्या, चीज, सॉसेजेस वगैरे पदार्थ काढून खायला सुरुवात करत. बरेच वेळा हे पदार्थ आमच्या कॉलनीतल्या मुलींना देण्यासाठी आणलेले असत. काही वेळा चक्क डॉरमिटरीतून मेजवान्या झडत. अखेरीस कोम्सोमोल मंडळानं या वस्तू घ्यायचं अजिबात बंद केलं.

शनिवारच्या दिवशी आमच्या नाटचगृहातील शेकोटचा आम्ही दुपारी दोन वाजता पेटवत असू. त्यायोगे आमच्या प्रेक्षकांना चांगली ऊब मिळणं शक्य होत असे. जसजशा आमच्या ओळखी वाढू लागल्या तसतसे आमचे प्रेक्षक हळूहळू आमच्या कॉलनीच्या आवारात खुशाल येऊन बसू लागले. कधीकधी तर काही

पाहुणे मंडळी, विशेषतः आमच्या मॉनिटर लोकांची खास मर्जीतली मित्रमंडळी, आमच्या जेवणघराच्या टेबलापर्यंत जाऊन पोचली होती.

या सर्व नाट्यकलेचा खर्च भलताच वाढला. निरनिराळे अंगरखे, टोप्या व इतर साहित्य याला प्रत्येक प्रयोगाचे ३० ते ४० रूबल्स खर्च होऊ लागले. एकंदरीत या ना त्या रूपाने दर महिन्याला २०० रूबल्स खर्च येऊ लागला. असं असूनही आम्ही आमच्या प्रेक्षकांकडून एक नवा पैसाही तिकीटाच्या रुपात घेण्याचा क्षुद्रपणा दाखवला नाही. कारण आमचा उद्देश युवक–युवतींना संधी मिळावी हा होता. आणि खेड्यातल्या तरुण मुलांकडे, विशेषतः मुलींकडे हातखर्चाला पैसे नसतच.

प्रथम प्रथम आम्हाला आमच्या नाटकांना तिकीटं लावायची जरूर भासली नव्हती. परंतु एवढी प्रचंड गर्दी व्हायला लागली की त्यामुळे त्या गर्दीला हटविण्यासाठी आम्हाला तिकीटं लावणं भागच पडलं. आम्ही ही तिकीटं कोम्सोमोल संस्थेतर्फे प्रत्येक 'व्हिलेज सोविएत'ला (ग्रामपंचायत) वाटत असू. तसेच आमचे जे स्थानिक प्रतिनिधी असत त्यांनाही काही प्रमाणात तिकीटे वाटत असू.

आमच्या खेड्यातल्या लोकांची एक आश्चर्याची गोष्ट म्हणजे आमची नाटके बघण्यात त्यांनी फार मोठा उत्साह दाखवला. तिकीटे मिळविण्याचा अहमिकेवरून गावागावातून व व्यक्तीव्यक्तीमध्येसुद्धा गैरसमज फैलावले गेले. आमच्या कोम्सोमोल संस्थेचे चिटणीस कधीकधी वैतागून कडक भाषा वापरू लागले.

पुष्कळदा खालीलप्रमाणे संवाद ऐकावयास मिळत:

'काय हो, या वेळी उद्याच्या कार्यक्रमासाठी आम्हाला फक्त तीसच तिकीटे मिळाली.'

आमचा तिकीट विक्रेता झोर्का व्होटकोव उपहासाने जोरात मान हलवून त्या चिटणीसाच्या तोंडावर पुढील शब्द फेकायचा–

'अहो महाशय, तुम्हाला मिळाली आहेत एवढी पुष्कळच आहेत समजलात!'

त्यावर ऐकणारा प्रत्युत्तर करत असे, 'जास्त आहेत काय? महाशय, तुम्ही येथे बसा आणि आम्हाला शहाणपण शिकवा की दिली तेवढी खूप झाली म्हणून.'

'होय हो, आम्ही इथे बसून पालकांच्या पोरी तिकीटाशिवाय कशा येतात ते पहातो.'

'पालकांच्या पोरी म्हणजे काय म्हणायचे आहे तुम्हाला?'

'होय हो. पालकांच्याच पोरी. लाल लाल केसांची झुल्फ असलेल्या.'

पालकाच्या पोरीचं ते वर्णन ऐकून तो चिटणीस आपला आवाज बदलत असे. परंतु तो आपला मुद्दा सोडत नसे.

'बरं, ठीक आहे. ती झाली पालकांच्या दोन पोरींचीच गोष्ट. परंतु तुम्ही

आमची २० तिकीटं का कापलीत बरं ? पूर्वी तुम्ही आम्हाला ५० तिकीटं देत होता. आता फक्त तुम्ही ३० तिकीटं देता.'

झोर्का चिडून उत्तर देई, 'आमचा तुमच्यावर विश्वास नाही समजलं ? दोन पालकांच्या मुलीच नव्हेत तर त्या पालकांच्या बायका, कित्येक दुकानदार, त्यांच्या बायका, यांना कसे घुसवत होता बरं ? तुमच्यामध्ये हा बनवाबनवीचा प्रकार कुठपर्यंत गेला आहे हे शोधून काढायची आम्हाला काही जरुरी नाही.'

'कोण्या बदमाषानं ही माहिती तुम्हाला सांगितली ते तर सांगा पाहू.'

'हे बघा, आम्हाला कुठल्याही बदमाषानं माहिती देण्याची जरुरी नाही व वेळही नाही. तुम्हाला ३० तिकीटं दिली आहेत त्यावर तुम्ही गप्प बसा.'

मग तो सेक्रेटरी हे सर्व शोधून काढण्यासाठी ताबडतोब आपल्या मुक्कामाला निघून जात असे. परंतु त्याच्या जागी दुसरा एखादा असंतुष्ट माणूस तीच तक्रार करण्यासाठी पुढे येई.

'अहो कॉमरेड, याचा अर्थ काय हो ? आमचे ५२ कोम्सोमोल आहेत आणि तुम्ही आम्हाला फक्त १५ तिकीटं पाठविता ?'

'हे बघा, ते आम्हाला काही माहीत नाही. आमच्या ६ पी या तुकडीनं आम्हाला असं सांगितलं की, मागच्या वेळी फक्त १५ कोम्सोमोल शुद्धीवर होते. त्यापैकी ४ तर म्हाताऱ्या बायाच होत्या. बाकीचे आलेले सर्व पिऊन तर्रर्र झालेले होते.'

'अहो, भलतंच काहीतरी काय बोलता ? ते प्यालेले होते असे जे कोणी म्हणतात ते साफ खोटं आहे. आमचे कित्येक लोक दारू गाळण्याच्या कारखान्यांत काम करतात त्यांच्या अंगाला कपडयांना वास येणं स्वाभाविक आहे.'

'आम्ही व्यवस्थित तपासणी करूनच बोलतो आहोत. त्यांच्या कपडयांनाच नव्हे तर त्यांच्या खुद्द तोंडालाच दारूचा वास येत होता. दारूच्या कारखान्यामुळे असं झालं हे सांगण्यात काही अर्थ नाही. थांबा, मी त्यांना तुमच्याकडे घेऊनच येतो. तुम्ही स्वत: पहा आणि ठरवा. अहो, त्यांच्या तोंडाला नेहमीच दारूची घाण येते. तुम्ही उगाचच काहीतरी बोलताहात. आम्हाला उगाचच कोणाचीही खोड काढायची इच्छा नाही व वेळही नाही. आता यावर तुम्हाला काय म्हणायचंय सांगा पाहू ?'

'ते काही नाही. ते प्यालेले केव्हा असतात व दारू गाळायच्या कारखान्यांत काम करण्यामुळे अंगाला कधी घाण येते हे आम्ही बरोबर जाणतो.'

'बरं ते जाऊ द्या. निदान आणखी ५ तिकीटं तरी द्याल ? तुम्हाला काही वाटायला तरी पाहिजे. वाटेल त्या शहरातल्या मुलींना व मित्रांना तुम्ही तिकीटं देता व आमच्या कोम्सोमोलचा नंबर मात्र सर्वात शेवटी लावता हे तुम्हाला शोभतं का ?'

आम्हाला हे पक्कं कळून चुकलं की आमचे नाटकाचे प्रयोग म्हणजे नुसतंच करमणुकीचं किंवा मनोरंजनाचं साधन नव्हतं, तर आम्ही एक प्रकारचं समाजाचं ऋण फेडत होतो किंवा कर देत होतो व ते टाळणं आम्हाला शक्य नव्हतं.

आमच्या कोम्सोमोल समितीनं याचा खूप विचार केला होता. आमच्या नाटकमंडळींच्या खांद्यावरच फक्त हे ओझं पेलण्यासारखं नव्हतं. एकही शनिवार प्रयोगाशिवाय दवडणं आम्हाला अशक्य होऊन बसलं होतं व प्रत्येक आठवड्याला आम्ही नवीन व वेगळा वेगळा प्रयोग सादर करत होतो. तोच तोच प्रयोग दाखवणं म्हणजे आम्हाला कमीपणाचं होतं. शिवाय आमच्या शेजाऱ्यांच्या वेळेचा अपव्यय करण्यासारखं होतं. अशा तऱ्हेने खूपशी गुंतागुंत आमच्या या नाटकमंडळींमुळे उत्पन्न झाली.

आमचा काराबानोव कंटाळून तक्रार करू लागला,

'अरे, मी आहे कोण शेवटी? मागच्या आठवड्यात तुम्ही मला सर्वांत मोठा पालक बनवलंत. या आठवड्यात मला तुम्ही सेनापती बनवलंत. आता मला तुम्ही गनिमीयोद्धा बनायला सांगता? मी काय लोखंडाचा बनलेला आहे काय? रोज रात्री १ वाजेपर्यंत तालमी करायच्या आणि शनिवारी प्रवेश बदलण्यासाठी खुर्च्याटेबलंही हलवायची. छान आहे धंदा!'

यावर आमचा कोवोल टेबलावर मुठी आपटत म्हणाला, 'वा! वा! अहाहा! तर काय तुला एखाद्या झाडाखाली खाट टाकून त्याच्यावर आराम करायला पाहिजे होय? ते काही नाही. दिलेलं काम हे केलंच पाहिजे.'

'अरे, काम केलं पाहिजे हे खरं! पण त्यात चांगली सुसूत्रता आणाल की नाही? प्रत्येकाने काम केलं पाहिजे. मी एकट्याने काय म्हणून?'

'बरं! एवढंच ना. ते आम्ही करतो.'

'मग करा बघू ताबडतोब सर्व संघटित. कमांडर्स कौन्सिलची ताबडतोब सभा बोलवा.'

लगेचच कमांडर्स कौन्सिलची सभा घेण्यात आली व त्यांनी खालील ठराव पास केला.

नाटकमंडळी न रहाता प्रत्येक मुलानं आणि मुलीनंसुद्धा यात भाग घेतला पाहिजे. खालीलप्रमाणे ठरावाचा मसुदा त्यांनी तयार केला:

'कमांडर कौन्सिलची ही सभा असं म्हणते की, नाटकाचा प्रयोग यशस्वी होण्यासाठी नाटकामध्ये कॉलनीच्या सर्वांनी भाग घेणे हे सक्तीचे आहे. म्हणून ही सभा आमच्या संमिश्र तुकड्यांची या कामी योजना झाली पाहिजे असे जाहीर करते व यापुढे होणाऱ्या एका नाट्यकृतीचे काम करण्यास त्यांना भाग पाडत आहे.'

यानंतर संमिश्र तुकड्यांची यादी बनविण्यात आली. उद्देश असा होता की, सर्वांनाच काही ही कला उत्तम तऱ्हेने करून दाखवता येईल असं नव्हे; जसं

आपण बीट किंवा बटाटे जमिनीतून उकरून काढतो, तसं यामध्ये ज्यांना रस नाही त्यांना काढून टाकण्यास मदत होईल.

या कलानैपुण्यातील चाचणीच्या कामावर नाटकमंडळीची नियुक्ती न करता आम्ही व्हेर्शनेवच्या देखरेखीखाली २८ जणांच्या संमिश्र तुकडीकडे हे काम सोपविलं.

या संमिश्र तुकडीच्या नेमणुकीमुळे प्रत्येकाला सक्तीची हजेरी, वक्तशीरपणा दाखवावा लागला. चुकवाचुकवी करणाऱ्यांबद्दल संध्याकाळी रिपोर्ट, कमांडरचे हुकूम, कामामध्ये केली जाणारी थोडीही चुकवाचुकवी वगैरे गोष्टी कमांडर कौन्सिल-पुढे किंवा सर्वसाधारण सभेपुढे आपोआपच येऊ लागल्या, कॉलनीत शिस्त मोडल्याच्या सदरात येऊ लागल्या. त्याबद्दल माझ्याकडून कधीकधी कानउघाडणी किंवा जास्त काम व सुटीच्या दिवशी स्थानबद्धता वगैरेसारखी शिक्षाही होऊ लागली.

ही खरोखरीची सुधारणा झाली. तसं पाहिलं तर नाटकमंडळी ही स्वयं-स्फूर्त संघटना होती व फाजिल लोकशाहीवर भर देण्याकडे तिचा कल असे. सभासदांमध्ये कुरबूर चालत असून वैयक्तिक आवडीनिवडीवर भर दिला जात असे. या गोष्टी प्रामुख्याने नाटकाची निवड करताना अगदी बरोबर लक्षात येत. आमच्या नाट्यकलोपासक मंडळातही त्या व्यक्तीला महत्व देण्यावर भर येऊ लागलेला आमच्या लक्षात आला. कमांडर कौन्सिलचा ठराव सर्वांनी एकमताने मान्य केला. शेतीकाम, वाडीची दुरुस्ती, स्वच्छता. टापटीप वगैरे जरूरीच्या कामां-इतकेच हेही काम जरूरीचं समजलं जाऊ लागलं. कुठल्याही विशिष्ट व्यक्तीनं कोठे व कसा भाग घ्यावा याबद्दल आमची मुलं फारशी चोखंदळपणा दाखवत नसत. कॉलनीच्या हिताच्या दृष्टीनं पडेल ते किंवा वाट्याला येईल ते काम करण्याची वृत्ती वाढीला लागली.

मी नियमाप्रमाणे रविवारी कमांडर कौन्सिलच्या सभेमध्ये येत्या शनिवारी कोणतं नाटक करायचं व त्यात कोणी कोणी काय काय करायचं हे सांगत असे. आणि ते सर्वजण मग ६ ए या संमिश्र तुकडीत सामावले जात असत. त्यांच्यात-ल्याच एकाला त्यांचा म्होरक्या म्हणून निवडण्यात येई. बाकीच्यांना निरनिराळी कामे दिली जात. प्रत्येकाजवळ ६ नंबरचा बिल्ला असे. खालीलप्रमाणे संमिश्र तुकड्या बनविलेल्या होत्या—

६ ए – कलाकार
६ एस् – प्रेक्षागार
६ डब्ल्यू – कपडे वगैरेंची व्यवस्था
६ एच् – शेगड्या पेटविण्याची व्यवस्था
६ एस् सी – दृश्य बदलणारे
६ पी – सामानावर देखरेख
६ एल् इ – दिवाबत्ती व प्रकाशयोजना

६ सी यू – स्वच्छता ठेवणारे

६ एस् इ – ध्वनियोजना

६ सी – पडद्यांची व्यवस्था

आमच्या कॉलनीत सर्व मिळून एकूण ८० मुलंमुली होत्या. वरची यादी पाहिली तर लक्षात येईल की कॉलनीतली सर्व मुलंमुली कुठल्या ना कुठल्या कामाला गुंतविलेली असत. एखाद्या नाटकात बरीच पात्रं असली तर आमची ही फौज कामी पडत असे. या संमिश्र तुकड्या बनविताना आमचं कमांडर कौन्सिल त्या त्या मुलांच्या आवडीनिवडी व त्यांचा कल शक्य तितका लक्षात घेऊन कामाची वाटणी करत असे. परंतु ते नेहमीच शक्य होई असं नाही.

एखादा मुलगा प्रश्न उपस्थित करत असे की,

'अहो, मला ६ ए मध्ये कशाला घातलंत ? मी कधीही नाटकात भाग घ्यायचा प्रयत्न केला नाही.'

त्याला लगेच उत्तर मिळे, 'एखाद्या मझिकसारखा काय बोलतोस ? प्रत्ये-कानं एकदा तरी नाटकात भाग घेतलाच पाहिजे.'

सबंध आठवडाभर आमच्या संमिश्र तुकड्यांतली मुलं, विशेषत: त्यांचे कमांडर, त्यांचा फुरसदीचा वेळ सारखा इकडून तिकडे कॉलनीभर धावपळ करण्यात, कधीकधी शहरातसुद्धा खेपा घालण्यात एखाद्या वेड्याप्रमाणे खर्च करत. कुठच्याही तऱ्हेच्या सबबी सांगणं आम्हाला पसंत नव्हतं, भले कितीही त्रास पडो ! शहरात आमची अनेक दोस्त मंडळी होती. त्यांना आमच्याबद्दल व आमच्या कामाबद्दल सहानुभूती होती. उदा. आमच्या शहरातल्या दोस्त मंडळींकडून आमच्या नाटका-साठी जरूर असणारे कपडे आम्हाला मिळत असत. आणि कधीकधी ते अशक्य झालं तर आमची ६ डब्ल्यू ही संमिश्र तुकडी आमच्याच कॉलनीत असणाऱ्या निर-निराळ्या वस्तू गोळा करून कसल्याही ऐतिहासिक किंवा सामाजिक नाटकासाठी साहित्य तयार करत असत. कॉलनीच्या मालकीच्याच वस्तू काय परंतु आम्हा कर्मचाऱ्यांच्या मालकीच्या वस्तूसुद्धा आमच्या नाटकमंडळींच्या कामासाठी मिळाल्या पाहिजेत असंच जणू काही ठरून गेले होते. उदा. ६ सी संमिश्र तुकडीचा असा पक्का झाला ग्रह होता की कर्मचाऱ्यांच्या खाजगी वस्तू या त्यांच्याच मालकीच्या आहेत. आमच्या नाट्यकलेचा जसजसा विकास होत गेला तशातशा जरूर असणाऱ्या वस्तू विशिष्ट प्रमाणात आमच्याकडे जमत गेल्या. आम्ही अनेकदा सैनिकी पद्धतीची नाटके करत असल्यामुळे आम्हाला त्यामध्ये बंदुकीचे आवाज काढायची जरूरी पडे. त्यासाठी खराखुरा दारूगोळा तसंच सैनिकी गणवेश, खांद्यावरील पट्ट्या व पदके आमच्याकडे जमा झाली होती. हळूहळू नुसतेच कलाकार नव्हेत तर आमच्या इतर कामातसुद्धा उत्तम मशिनगन्स चालविणारे म्हणजे काहीतरी शोध लावून मशिन-गनसारखा आवाज व आग उत्पन्न झाल्याचा भास निर्माण करणारे, वादळ व

गडगडण्याचा आवाज दाखविणारे असे जणू काही तंत्रज्ञ आमच्याच मुलांमधून पुढे येऊ लागले.

दिलेल्या भूमिकेचा अभ्यास करण्यासाठी एक आठवडा आम्ही देत असू. प्रथम आम्ही संभाषण लिहून काढायचा व ते लक्षात ठेवायचा प्रयत्न करून पाहिला. पण आम्हाला ते लवकरच सोडून द्यावं लागलं. शाळेचा अभ्यास, कॉलनीची इतर कामे, घरचा अभ्यास, इत्यादी सर्व गोष्टींमुळे लिहून काढायच्या व आत्मसात करायच्या कामाला आम्हाला वेळच रहात नसे. कारण शालेय शिक्षण हे सर्वप्रथम महत्वाचे होते. म्हणून नाटचकलेचे सर्व नियम झुगारून देऊन आमचे कलाकार खुशाल प्रॉम्प्टरवर अवलंबून रहात व तेच आम्हाला योग्य वाटत असे. हळूहळू आमची मुलं प्रॉम्प्टरच्या तोंडचे शब्द उचलून धरत. कधीकधी आम्ही आमच्या कलाकारांना स्वतःचीच वाक्ये मध्ये घुसडायला पूर्ण मुभा देत असू. प्रयोग व्यवस्थित पार पडण्यासाठी मलाच निर्माता, प्रॉम्प्टर, दिग्दर्शक या निरनिराळचा भूमिका पार पाडाव्या लागत. त्याशिवाय रंगमंच, त्याची व्यवस्था, त्याच्यात होणाऱ्या चुकांची दुरुस्ती, निरनिराळचा प्रवेशांच्या वेळा, त्यात येणारी आलिंगनं व मृत्यू यांची पण नीट दखल घ्यावी लागत असे.

आम्हाला कलाकारांची कधीही उणीव पडली नाही. आमच्याकडे विविध कलागुण असलेली अनेक मुले होती. आमचे प्रमुख कलाकार म्हणजे प्योटोर इव्हानोविच, गोलोविच, काराबानोव, व्हेटकोव्हस्की, बुत्साई, व्हेर्शनेव, झादारोव, मारूस्त्या, लेवचेन्को, कुडल्टी, कोबाल, ग्लैसर व लापोट.

सर्वसाधारणपणे आम्ही जास्तीत जास्त कलाकार सामावता येतील अशी नाटके शोधत असू. कारण आमच्या जास्तीत जास्त मुलांना भाग घ्यायची इच्छा असे. याशिवाय यातूनच अत्यंत स्वाभाविकपणे रंगमंचावर काम करणारी मुलं आम्हाला बाजूला काढायची होती. मी स्वतः नाटचकलेला खूपच महत्व देतो. कारण त्या माध्यमातून आमच्या कॉलनीतली मुलं व्यवस्थित बोलायला शिकली व नवी क्षितिजे सुद्धा त्यांच्यासमोर उघडली गेली. कधीकधी आमच्याकडे पुरेसे कलाकार मुलांच्यातून मिळत नसत. अशावेळी मी आमच्या कर्मचाऱ्यांना ती उणीव भरून काढायला सांगत असे. एकदा तर आम्ही सिलँटीलासुद्धा रंगमंचावर आणला. तालमीच्या वेळी तो अगदीच विचित्रपणे वागला. खरं तर त्याला एकच वाक्य बोलायचं होतं. ते म्हणजे–' आगगाडी तीन तास उशीरा येईल.' आम्ही तसा धोका पत्करला होता, परंतु प्रत्यक्षात त्यानं फारच चांगलं काम केलं.

सिलँटी योग्य वेळीच रंगमंचावर हजर झाला व तसा त्याचा प्रवेश आम्हाला व्यवस्थित वाटला. तो म्हणाला, ' हे पहा, त्याचं असं आहे. गाडी आहे ती तीन तास उशीरा येईल.'

ह्या त्याच्या बोलण्याच्या ढंगाचा प्रेक्षकांवर भलताच परिणाम झाला.

इतकंच काय पण प्रेक्षकांना जणू काही असं वाटलं की, निर्वासितांचा फार मोठा लोंढा स्टेशनवर खोळंबून राहिला आहे. मी प्रॉम्प्टरच्या जागेवरून न हलता त्याला विनवण्या करून सांगत होतो की तुझा प्रवेश संपला आहे. परंतु सिलँटी त्या चाललेल्या धमालीच्या कामाकडे क्षण दोन क्षण पहात राहिला व एकदम रागाने ओरडला,

'काय मूर्ख आहात तुम्ही, तुम्हाला मी सांगितलं की ही येणारी गाडी तीन तास उशीरा येणार आहे, त्याच्यात एवढं आश्चर्य कसलं हो ? '

काल्पनिक निर्वासितांनी त्याचं म्हणणं ऐकलं व ते रंगमंचावरून दूर गेले. परंतु सिलँटी हलण्याचं काही चिन्ह दिसेना. शेवटी मी मोठ्यांदाच सांगितलं, ' अरे मूर्खा, आता बाजूला जा. '

असं एकंदर झालं व मी शेवटी पडदा पाडण्याची खूण केली.

मात्र आम्हाला स्त्रीपात्र मिळविण्याचा नेहमी त्रास पडत असे. आमची मारुस्या लेवचेन्को व नात्स्या नोचवनया या आपला प्रवेश बरोबर करत. परंतु कर्मचाऱ्यांमधून मात्र लिडोच्काशिवाय नाटकात भाग घ्यायला कोणीही पुढे येत नसे. आणि या बायकासुद्धा तशा जातीच्या कलाकार नव्हत्या. त्या कमालीच्या लाजाळू होत्या व एखाद्या प्रवेशात आलिंगन किंवा चुंबन असं काही आलं तर ते करण्यास त्या चक्क नकार देत असत. नाटकात या गोष्टी टाळणं अशक्य होई. नटचा मिळविण्याच्या प्रयत्नात आम्ही आमच्या कर्मचाऱ्यांच्या बायका–बहिणी, काक्या–मावश्या वगैरे नातेवाईकांना चाचणी देऊन पाहिलं, तसंच चक्कीवर काम करणाऱ्या सर्वांना, शहरातील आमच्या मित्रांना विनंती करून पाहिली. परंतु फारसं काही यश मिळालं नाही. राखील आणि ओक्साना या दोघी आल्याच्या दुसऱ्या दिवसापासून आमच्या तालमींमध्ये भाग घेऊ लागल्या होत्या आणि न लाजता त्यांनी चुंबनाचा प्रवेश उत्तम तऱ्हेने वठवला व सर्वांनी त्यांची प्रशंसा केली.

अचानक एके दिवशी प्रेक्षकांमधून कुणा चक्कीमधे काम करणाऱ्या माणसाच्या ओळखीनं आमचा खेळ बघायला आलेली बाई आम्हाला मिळाली. ती म्हणजे जणू काही आमच्या हाती एक ठेवाच आला. तिचं सौंदर्य, तिचा मंजुळ आवाज, तिचं चालणं या सर्व गोष्टी, ज्या एका क्रांतिकारक नाटकात सर्व स्वगेलेल्या एका स्त्रीची भूमिका वठविण्यासाठी आवश्यक होत्या, त्या तिच्या ठिकाणी मिळाल्या. तालमीच्या वेळी तिचं कौशल्य पाहून आम्ही अगदी विरघळून गेलो व नाटक मस्त वठणार या विचारात मश्गूल राहिलो. खेळाची सुरुवात उत्तम तऱ्हेने झाली. पण पहिल्याच अंकानंतर त्या आमच्या ठेवीचा नवरा–रेल्वे टेलिग्राफ ऑपरेटर–रंगमंचाच्या मागे आला व आमच्या सगळ्या नटसमुदायासमोर आपल्या बायकोला मोठ्याने म्हणाला,

' हे बघ, मी काही तुला यापुढे नाटकात काम करू देणार नाही. तू घरी चल. '

ती बिचारी त्याला हळूच म्हणाली, ' असं कसं म्हणतोस, राहिलेल्या नाटकाचं काय होईल बरं! '

' मला तुझ्या नाटकाशी काही कर्तव्य नाही. मुकाट्यानं घरी चल. कुठल्यातरी भंपक लोकांनी माझ्या बायकोचा हात धरावा, तिला आलिंगन द्यावं हे मला खपायचं नाही. '

' पण आम्ही तसं चालू देणार नाही हं ! '

' अग बये, पहिल्याच प्रवेशात तुझं दहा वेळा चुंबन घेण्यात आलं. शी ऽ काय हे ! '

प्रथम आम्ही सारेजण स्तंभितच झालो. आता काय करायचं ? शेवटी आम्ही त्या संशयी नवऱ्याला बाजूला नेऊन त्याच्याशी बोलायचा प्रयत्न करू लागलो. ' हे बघा कॉमरेड, रंगमंचावर चुंबन घेणं म्हणजे काहीच नाही, ' असं काराबानोवनं समजुतीच्या स्वरात म्हटलं.

त्यावर तो विक्षिप्त माणूस म्हणतो कसा: ' महाशय, मला काय तुम्ही आंधळा समजलात ? मी अगदी पहिल्या रांगेत बसलो होतो आणि त्या चुंबनाला अर्थ आहे की नाही ते मला चांगलं समजलं. '

शेवटी मी लापोटला सांगितलं, ' हे बघ, तू हुशार आहेत. तू कसंही करून त्याला बाहेर ने आणि त्याची समजूत काढ. '

लापोटने माझं म्हणणं कबूल केलं. त्यानं त्या संशयी नवऱ्याची कॉलर पकडली आणि त्याला दाबून खुर्चीवर बसवलं व हळूहळू त्याच्या कानात कुजबुजयला सुरुवात केली.

' असं काय करतोस तू ? अरे, नाटक म्हणजे आपला एक सांस्कृतिक भाग आहे आणि एवढ्या चांगल्या कामासाठी तुझ्या बायकोनं रंगमंचावर कुणाचंही चुंबन घेतलं तर ते चांगल्या कारणासाठीच झालं. त्यात तुला एवढं जळफळायला काय झालं ? '

' तर ... तर ? चांगल्यासाठी म्हणे. ते असेल चांगल्या कामासाठी, दुसऱ्या कुणाला. पण माझ्या दृष्टीने ते एकदम चुकीचं आहे,' असे तो तणतणून म्हणाला. त्यावर लापोटनं परत सांगितलं, ' अरे, सर्वांच्याच दृष्टीने ते चांगलं आहे. '

' अहो, पुन्हा एकदा सांगतो. तुमच्या दृष्टीने ते तसं असेल. म्हणून कोणीही माझ्या बायकोचं चुंबन घ्यावं काय ? '

' काय विचित्र आहात हो तुम्ही ? अहो, तिनं कोणी एखादा यार शोधून काढून त्याचं चुंबन घेण्यापेक्षा हे जास्त बरं नाही का ? '

' कुठला यार ? कुणाचा यार ? '

'असं नाही माझं म्हणणं. असं केव्हा केव्हा होतं. आता इथे कसं सर्वांच्यासमोर व तुझ्याहीसमोर जाहीरपणे ती ते करत आहे. पण समज, चोरून मारून, एखाद्या झाडाआड तुझ्या नकळत तिनं चुंबन घेतलं तर ते किती भयंकर आहे सांग बघू ?

'ती असं भलतंसलतं कधीच करणार नाही,' असं तो ठासून म्हणाला.

'अशी तुमची खात्री आहे काय ? अहो, तुमची बायको इतकी सुंदर चुंबन देते. तुम्हाला असं वाटतं का की ती आपली त्याबाबतची हुशारी वाया घालवेल ? गप्प बसा. ती इथं रंगमंचावर करते तेच चांगलं आहे.'

तो बिचारा नवरा या सर्व वक्तव्यानं अगदी भांबावून गेला व शेवटी त्यानं आपलं तोंड बंद करून आपल्या बायकोला नाटक पुरं करायची परवानगी दिली, एकाच अटीवर की ती चुंबनं खरी नसली पाहिजेत. त्याचा आमच्यावरचा राग काही कमी झाला नाही. ती बाई पण बिचारी अस्वस्थ झाली. आम्हाला आमचा खेळ बिघडतो की काय अशी सारखी भीती वाटत होती. तो विक्षिप्त नवरा पहिल्या ओळीत बसून सर्वांना बेचैन करत होता. त्यामुळे दुसरा अंक एखाद्या अंत्ययात्रेसारख्या कसाबसा पार पडला. पण आश्चर्य म्हणजे तिसऱ्या अंकात तो नवरा पहिल्या ओळीतून कुठंतरी नाहीसा झाला. त्यामुळे आम्हा सर्वांना आनंद वाटला. तो कुठे गेला असेल याचा मी विचार करत होतो. परंतु नाटक संपल्यावर ते गूढ काराबानोवने सर्वांना सांगितलं,

'मीच त्याला जायला सांगितलं हो. प्रथम तो तयारच नव्हता. पण शेवटी तो जायला कबूल जाला.'

'हो, पण तू हे कसं काय जमवलंस ?

काराबानोवने डोळे विस्फारून जरा खाकरून सुरुवात केली, 'हे पहा, आपण त्याच्याबरोबर काहीतरी समझोता केलाच पाहिजे. आज आपलं काम जरी व्यवस्थित झालं असलं तरीसुद्धा आपल्याला लवकरात लवकर काहीतरी कृती केली पाहिजे. हे मी तुम्हाला अगदी शपथेवर सांगतो की मी त्याला असं सांगितलं की आमच्या कॉलनीमध्ये अशी एक वल्ली आहे की तुझी बायको त्यांना अडथळा करू शकणार नाही.'

यावर बाकीच्या कामगारांनी त्याला विचारलं, 'मग पुढे काय झालं ?

यावर तो म्हणाला, 'ठीक आहे, तुम्ही कबुलीप्रमाणे वागा म्हणजे झालं', असं म्हणून तो शेवटच्या रांगेत जाऊन बसला.

प्रत्येक दिवशी नाटकाची तालीम होत असे. सर्व नाटक व्यवस्थित बसलं होतं. आम्हाला तर झोप येतच नसे. आमच्या बऱ्याचशा कलाकारांना अजूनही रंगमंचावर कसं व केव्हा फिरावं हे समजत नसे. त्यामुळे प्रत्येक वेळी सर्व गोष्टी अगदी पहिल्यापासून दाखवाव्या लागत. उदा. हातांची हालचाल कशी करायची,

दृष्टी केव्हा वळवायची इत्यादी इत्यादी. म्हणून मी जातीनं या सर्व गोष्टींकडे लक्ष पुरवू लागलो. संभाषण विसरलं तर प्रॉम्प्टर सांगे. शनिवारपर्यंत नाटक संपूर्ण बसावं अशी अपेक्षा होती.

आमचे खेळ तसे वाईट होत नव्हते व आमचा अभिनयही बऱ्यापैकी होत असावा. कारण शहरांतली प्रेक्षक मंडळीही तसा अभिप्राय देत होती. आम्ही खरोखर प्रयत्नपूर्वक चांगला अभिनय करत होतो. त्यात जराही अतिशयोक्ती नव्हती किंवा लोकांचा उगाचच खूष करण्याचा प्रश्न येत नव्हता. आम्ही रशियन तसेच युक्रेनियन नाटक बसवत असू.

शनिवारी आमच्या नाटकगृहाभोवती दुपारपासूनच वर्दळ सुरू होई. एखाद्या नाटकात जर जास्त पात्रे असतील तर बुत्साई प्योटोर व इव्हानोविचला मदतीला घेऊन जेवणानंतर लगेच त्यांना तयार करायला घेई. ते दोन वाजल्यापासून आठ वाजेपर्यंत जवळजवळ साठ जणांना तयार करत व मग स्वतः तयार होत असत.

एखाद्या गोष्टीची किंवा वस्तूची नाटकात जरूरी पडे, त्यावेळी आमची मुलं एखाद्या वेड्यापिशासारखी वागत. समजा एक दिवा अगदी निळ्या रंगाचा हवाय. तर आमची मुलं कॉलनीतील साऱ्या खोल्या, कर्मचाऱ्यांच्या खोल्या, इतकंच काय तर शहरात जाऊन आपल्या मित्रमंडळींच्या खोल्यासुद्धा धुंडाळत व ती वस्तू हजर करत. नाटकात जर समजा एखाद्या प्रवेशात खाण्याचा अभिनय असेल तर त्यांना ते खरोखरी हवे असे. ही आमच्या ६ पी. ची मागणी रूढच होऊन बसली होती. रंगमंचावर नुसता अभिनय करायचा हे त्यांना पटत नसे. त्यांच्या दृष्टीनं ते कॉलनीला कमीपणा आणणारं होतं. यामुळे आमच्या मुदपाकखान्यावर कधीकधी मोठा कठीण प्रसंग ओढवी. कधी केक तर कधी वाटाणे वगैरे खाद्यपदार्थ तयार करावे लागत. वाईन्सच्या बदली आम्ही सोडा वापरत असू.

माझ्या प्रॉम्प्टरच्या जागेवरून मला खाण्यापिण्याचा प्रवेश चालू असताना खूपदा सूचना द्यावी लागत असे. कारण आमची कलाकार मंडळी त्या तऱ्हेच्या प्रवेशात इतकी दंग होऊन जात की पुढ्यातलं खाणे संपेपर्यंत ती तो प्रवेश लांबवत असत. अशा वेळी 'आता ठीक आहे. पुरे आता. ऐकताय का ? खाणे पुरे' अशी आठवण करून द्यावी लागे.

आमची कलाकारमंडळी आश्चर्याने माझ्याकडे बघत व अर्धवट खाऊन झालेल्या पदार्थांकडे बोट दाखवून, 'हे अर्धवट कसं टाकू ? ' असं डोळ्याच्या खुणांनी विचारत. नाईलाजाने तसंच उठावं लागलं तर खूप रागावत. परंतु मी त्याकडे लक्ष न देता त्यांना, 'अरे काराबानोव, बस्स झालं. आता पुरे,' असं कुजबुजत असे.

काराबानोव अर्धवट राहिलेला तो पदार्थ तोंडात कोंबून, 'झालं हो, संपलं,' असं म्हणे.

मध्यंतराच्या वेळी पडद्यामागे मुलं माझ्यावर वैतागत, 'असं काय करता

तुम्ही अँटन. केव्हा तरी असा कोंबडी खायचा योग येतो तर तीसुद्धा तुम्ही आम्हाला पूर्ण खाऊ देत नाही.'

इतर वेळी आमची कलाकार मंडळी रंगमंचावर जास्त वेळ थांबण्यास तयार नसत कारण तिथे चिक्कार थंडी असे.

'रॉयट ऑफ द मशिन्स' या नाटकात काराबानोवला एक तास रंगमंचावर फक्त पंचा अंगावर घेऊन उभे रहावे लागे. हे नाटक आम्ही फेब्रुवारीत बसवलं होतं आणि कधीकधी आमच्या दुर्दैवानं तपमान एकदम कमालीचं खाली उतरत असे. एकातेरिनानं हे नाटक त्या दिवसात करण्याबद्दल नापसंती दर्शविली होती. तिचं म्हणणं होतं की काराबानोव हे नाटक करता करताच थंडीमुळे गोठून जाईल. सुदैवाने तसं काही झालं नाही. परंतु काराबानोवची बोटं मात्र सपशेल गारठून गेली होती व एकातेरिनाबाईंनी औषध चोळून ती ताळ्यावर आणली.

परंतु ही थंडी कधीकधी आमच्या कलानैपुण्याच्या आड येत असे. आम्ही एकदा 'सेमियोत्झोदनी' हे नाटक बसवत होतो. एका बड्या जमिनदाराच्या बगीचामध्ये एक पुतळा असतो, अशी कल्पना त्या प्रवेशात होती. ६ पी. या संमिश्र तुकडीने एक पुतळा मिळवायचा प्रयत्न केला परंतु त्यांना हवा तसा काही तो मिळू शकला नाही. आश्चर्य म्हणजे पडदा वर गेला त्यावेळी एक पुतळा रंगमंचावर चक्क उभा असलेला आम्हाला दिसला. हा पुतळा म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून आमचा शेल्यापुतीनच आपल्या सर्वांगाला खडूची भुकटी फासून उभा असलेला दिसला. त्यानं माझ्याकडे पाहिलं व खाली मान घालून उभा राहिला. मी पडदा खाली टाकायला लावला व पाहिलं तर शेल्यापुतीन आत पळाला होता. ६ पी ह्या संमिश्र तुकडीचे लोक नाराज झालेले दिसले.

६ एस्. ई. या संमिश्र तुकडीचे प्रयत्न नेहमी अतिशय सावधानतेने केलेले व महान असत. आम्ही एक नाटक बसविले होते. त्यात साझानोव्ह हे पात्र प्लेहवे या पात्रावर बाँब टाकते व त्याचा स्फोट होतो असा प्रवेश होता. आमच्या ६ एस्.-ई. चा कमांडर असादची होता. त्याच्या डोक्यात आलं की खराखुरा बाँबस्फोट झाला पाहिजे. त्यानं बोलून दाखविलं की, 'आपण खराखुरा बाँबस्फोट करून दाखवू.'

मी स्वतः प्लेहवेची भूमिका करत असल्यामुळे मला ते जाणून घेण्याची जास्त गरज होती. मी त्याला विचारलं की 'खरा बाँबस्फोट म्हणजे काय करणार ?'

'ज्यामुळे आपलं नाट्यगृह भुईसपाट होईल.'

'हे फार झालं हं !' मी असादचीला म्हटलं. त्यावर त्यानं मला आश्वासन दिलं की, 'अँटन, असा काही स्फोट होऊन अपघात होणार नाही याबद्दल तुम्ही अगदी निश्चित असा.'

त्यानंतर असादचीनं मला त्यानं केलेली तयारी दाखविली. विंगेच्या पुढच्या बाजूला काही रिकामे डबे, टब, बाटल्या पडलेल्या होत्या. त्या प्रत्येक ड्रमच्या

बाजूला एकेका मुलाला डबल बॅरलची बंदूक देऊन उभं केलं होतं. या बंदुकीतून एक हत्ती सहज मरेल एवढी काडतुसं भरलेली होती. रंगमंचाच्या दुसऱ्या बाजूला काचेचे तुकडे जमिनीवर पसरून ठेवलेले होते. काचेच्या प्रत्येक तुकड्याच्या बाजूला एकेका विटेवर एकेका मुलाला उभं करण्यात आले होते. तिसऱ्या बाजूला म्हणजेच प्रवेशद्वाराच्या विरूद्ध बाजूला एकेका मुलाला वीट घेऊन उभे करण्यात आले होते. त्यांच्या हातात पेटलेल्या मेणबत्त्या होत्या व त्यांच्यासमोर कसल्यातरी द्रवाने भरलेल्या बाटल्या त्यांच्या हातात दिलेल्या होत्या.

'पण ही अंत्ययात्रा कशासाठी ?' मी विचारलं.

'तीच तर मुख्य गोष्ट आहे. त्यांच्याजवळ आपण हे पॅरॅफिन देणार आणि वेळ येईल त्यावेळी ते पॅरॅफिन आपल्या तोंडात घेतील व त्या मेणबत्तीवर चुळा थुंकतील. त्यायोगे त्या मेणबत्त्या विझून जातील. अशी मोठी मजा होईल.'

'नीट विचार करा हं! अशामुळे आग लागण्याचा फार संभव आहे!'

'अँटन, तुम्ही एक करा. ते पॅरॅफिन तुमच्या डोळ्यात जाणार नाही याची काळजी घ्या. समजा आग लागलीच तर आम्ही ती विझवून टाकायची खबरदारी घेऊ.'

अशा तऱ्हेने तिन्ही बाजूंनी मुलांनी तयारी करून ठेवली होती. मी मात्र त्या बिचाऱ्या दुर्दैवी मंत्र्याला काय होईल या विचाराने विमनस्क झालो होतो. मी स्वत:लाच बजावलं की, जोपर्यंत व्यक्तिश: प्लेहवेच्या झालेल्या अन्यायाबद्दल मला कैफियत द्यायची नाही तोपर्यंत अगदी वाईटात वाईट काही झालंच तर सरळ प्रेक्षागारातून पळून जायचं. असादचीचा हा धाडशी प्रयोग जरा बेतानंच करावा अशी मी त्याला सौम्य शब्दात विनंती केली.

'पण पॅरॅफिन जर पेटलं तर ते पाण्यानं विझवता येईल का ?'

असादची हार मानणारा नव्हता. त्याला या प्रकारातली सगळी माहिती होती व तो दुसऱ्याला समजेल अशा पद्धतीनं ती तो चांगली सांगू शकत असे.

ज्यावेळी पॅरॅफिन मेणबत्तीवर टाकलं जाईल त्याबरोबर त्याचं रूपांतर वायूमधे होईल व त्याला वेगळं विझविण्यासाठी काही खास करावं लागणार नाही. उलट इतर वस्तूंनाच चुकून आग लागली तर ती विझवावी लागेल.

'समजा रंगमंचावरची आग थांबली नाही असं मला आढळून आलं तर अँटन आम्ही तुम्हाला प्रथम या रंगमंचाबाहेर काढू.'

मी माझ्या नशिबावर हवाला ठेवला. समजा मला या अपघातात काही अपाय झालाच तर माझ्यावर थंड पाण्याचा मारा करावा लागेल. व तेही अगदी बर्फासारख्या थंड पाण्यानं. पण मी माझा कमकुवतपणा ६ एस्. ई. या संमिश्र तुकडीपुढे कसा काय दाखवू ? त्यांनी या प्रयोगासाठी खूप कष्ट घेतले होते, खूप वेळ व शक्ती, हे शोधून काढण्यात खर्ची केली होती.

जेव्हा साझानोव्हने बाँब टाकला त्यावेळी प्लेहवेच्या डगल्यात शिरण्याची मला संधी मिळाली. मला त्याचा काही हेवा वाटला नाही. शिकारीच्या बंदुका टबमध्ये उडविल्या गेल्या. ते टब जोराने हादरले आणि त्यामुळे कानठळया बसणारा आवाज झाला. सगळ्या विटा खाली काचेवर कोसळल्या. इतक्यात ५–६ जणांनी पॅरॅफिन सर्व शक्तिनिशी त्या पेटलेल्या मेणबत्त्यांवर सोडलं आणि त्यामुळे सर्व रंगमंचावर गुदमरून टाकणारा धूर निर्माण झाला. माझ्या मी स्वतःच्याच मृत्यूचा खेळ खेळण्यास तयार नव्हतो आणि जवळजवळ मी बेशुद्ध होऊन रंगमंचावर पडलो. इकडे प्रेक्षकांमध्ये टाळयांचा कडकडाट झडत होता व ६ एस. ई. संमिश्र तुकडीचे आमचे वीर विजयानंदाने ओरडत होते. त्या पॅरॅफिनची चिकट काळपट राख माझ्या अंगावर पडत होती. पडदा ओढला गेला आणि असादचीनं मला काखेत हात घालून उठण्यास मदत केली. त्यानं काळजीच्या सुरात विचारलं, ‘ अँटन, तुम्हाला कुठे भाजलं तर नाही ना ? ’

मी आतल्या आत जळफळत होतो. परंतु प्रत्यक्षात मी काहीच बोललो नाही. ६ एस. ई. संमिश्र तुकडीच्या मनात अशा तऱ्हेचा प्रयोग करून काय साधायचं होतं ते कळायला मार्ग नव्हता.

अशा तऱ्हेने आम्ही एक जहाज यू.एस.एस.आर.च्या क्रांतिकारक किनाऱ्यावर आणून सोडून दिले होते. याच्यातले तंत्र तर फारच गुंतागुंतीचे होते. त्यामध्ये नुसत्या ज्वाळाच दाखवायच्या नव्हत्या तर ते जहाज सर्वच्या सर्व हवेत उडालेलं दाखवायचे होतं. यासाठी आमची काही मुलं जहाजाच्या दुसऱ्या बाजूला उभी राहिली होती आणि त्यांनी त्यातल्या फळ्या, खुर्च्या व टेबले एकदम ढकलली. त्या मुलांनी आपली डोकी सांभाळून या साऱ्या वस्तूंची फेकाफेक केली होती, परंतु त्या जहाजाचा कप्तान प्योटोर इव्हानोविच गोरोविच मात्र स्वतःला तितका सावरू शकला नाही. त्याच्या अंगरख्यावरची चकचकीत कागदी लेस पेटली आणि त्या खुर्च्याटेबलांच्या फेकाफेकीत त्याला इजा पण झाली. त्यानं स्वतः काही तक्रार केली नाही. परंतु तो मोठ्यांदा हसेपर्यंत आमच्या जिवात जीव नव्हता. त्याचे सगळे अवयव शाबूत आहेत अशी खात्री झाल्यावरच आमचा जीव भांड्यात पडला.

काही नाटकातून काही काही प्रवेश दाखवणं कठीण असायचं, परंतु आमची मुलं ते मानायला कधीच तयार नसत.एखाद्या प्रवेशात बंदूक मारायचा धाक दाखवायचे दृश्य असेल तर तो झालाच पाहिजे असा त्यांचा आग्रह असे आणि त्यासाठी मोठ्या दिव्यातून जावं लागत असे. एखाद्याचा खून करायचा प्रवेश असला तर साधा रिव्हाल्वर, त्याच्यातली काडतुसं काढून व त्याच्यात काहीतरी चिंध्या वगैरे घालून मोकळा भाग भरून काढावा लागे. एखाद्या प्रवेशात गोळ्यांचा पाऊस पाडायचं दृश्य असेल तर तो मारणारा त्याच्या अभिनयात अगदी दंग होऊन जाई, आणि बंदुकीचा नेम तो तुमच्या डोळ्यावरच धरत असे. अनेक गोळ्या

झाडायच्या असल्या तर बंदुकीच्या नळीत भरलेला सगळा कचरा नासधूस झाल्याचं दृश्य चांगलं वठवू शकत असे.

प्रेक्षकांचा आमच्यामुळे चांगलाच फायदा होत असे. ते गरम कपडे घालून येत. शिवाय आजूबाजूला शेंगड्या पेटवून ठेवलेल्या असत. त्यांनी पिऊन येऊ नये आणि सूर्यफुलाच्या बिया खाऊन प्रेक्षागारात टाकू नयेत एवढेच निर्बंध घालण्यात आलेले होते. आमच्या जुन्या समजुतीप्रमाणे कोणीही नागरिक सर्व काही झडती घेतल्यानंतर किंचितसा जरी तोंडाला वास येत असलेला आढळला तरी त्याला प्यायलेला म्हणून समजत असत. आमची मुलं शेकडो प्रेक्षकांमधून सुद्धा असा एखादा पिऊन आल्याचा संशय आलेला मनुष्य शोधून काढण्यात तरबेज होती व ती त्याला दवाखान्यातून हुसकून लावत. अशा माणसानं कितीही विनवण्या केल्या तरी ते त्याला दाद देत नसत.

असा एखादा माणूस अगदी कवटाळून सांगत असे की, आपण सकाळी फक्त एक नवटाक घेतली होती. निर्माता म्हणून मला नाटक सुरू व्हायच्या आधी व चालू असतानाही त्रास सोसावा लागे. उदा. एका नाटकात एक वाक्य म्हणताना आमचा कुडल्टी नेहमी काहीतरी गडबड करत असे. गोगोलच्या इन्स्पेक्टर जनरल या नाटकात आमची मुलं अतिशय चांगला अभिनय वठवत. परंतु त्यांनी एकदा मला या नाटकाच्या अखेरीस कमालीचं भडकवलं होतं. मी तसा अगदी थंड स्वभावाचा असूनही त्या नाटकातला गव्हर्नरचा अभिनय वठविताना या मूर्खांच्या चुकीमुळे माझा सपशेल तोल गेला. त्या ठिकाणी अँटन अँटनोविच असं असतानासुद्धा ते सरळ सरळ मला अँटन सेमयोनोविच असं म्हणत होते. त्याच्या म्हणण्याप्रमाणे तो प्रवेश असा होता :

अमोस फिडोरोविच : अँटन सेमयोनोविच, तुमचं नशीब खरोखरच उघडलं आहे असं मी ऐकतो ते खरं आहे का ?

आर्टेमी फिलियोविच : अँटन सेमयोनोविचला मिळालेल्या या अचानक लाभाचं अभिनंदन करायला मला आनंद वाटतो. आणि हे जेव्हा जेव्हा ऐकलं त्या वेळेस ॲना अँड्रेयेवना आणि मारिया अँटोनोवना यांच्याबरोबर मी तो आनंद अगदी मुक्तपणे व्यक्त केला.

रास्तापोव्हस्की: अॅन्टन सेमयोनोविच, मी तुमचं अभिनंदन करतो. परमेश्वर तुम्हाला आणि त्या नूतन तरुण जोडप्याला दीर्घायुष्य व खूप मुलंबाळं, नातवंड-पतवंड देवो.

ॲना अँड्रेयेवना आणि मारिया अँटोनोवना कोरोप्किन: अँटन सेमयोनोविच याचं अभिनंदन करताना आम्हाला फार आनंद वाटतोय.

रंगमंचावर गव्हर्नरच्या कपड्यात या कारट्यांना काहीही बोलणं मला अशक्य होतं. खेळ संपल्यावर विंगेत गेल्यावर मी माझ्या रागाला वाट करून दिली.

सगळे जण आश्चर्यचकित चेहऱ्यानं माझ्याकडे पहात होते. झादारोव पोस्ट-मास्तरचं काम करत असे. त्यानं आश्चर्यानं विचारलं, 'काय झालं एवढं? सगळा खेळ तर किती छान झाला.'

'अरे पण मला तुम्ही अँटन सेमयोनोविच का म्हणत होता?'

'मग आम्ही काय म्हणायला हवं होतं? आम्ही बरोबर म्हटलं. हो हो, त्या गव्हर्नरचं नाव अँटन अँटनोविच असं होतं नाही का!'

'तालमीच्या वेळी तुम्ही बरोबर हाक मारत होता आणि प्रत्यक्ष खेळाच्या वेळी तुम्हाला काय झालं होतं ?'

'जाऊ द्या. त्या शेवटी तालमीच होत्या. परंतु प्रत्यक्ष खेळाला उभं राहिलं की माणसाची डोकी जरा बिघडतातच.'



## ५

# कुलकांचे शिक्षण

मार्चच्या २४ तारखेला आम्ही गॉर्कीचा वर्धापनदिन साजरा केला. आम्ही इतर वर्धापनदिन पण साजरे करत असू, परंतु माफक प्रमाणात करत असू. आमची मुलं इतर वर्धापनदिन साजरे करताना छानपैकी आराम करत, खाण्या-पिण्याचे पदार्थ भरपूर प्रमाणात करत. बाहेरच्या लोकांनाही बोलावत. आमच्या मुलांना सभा–समारंभ साजरे करण्याचा अगदी मनापासून शौक असे. परंतु गॉर्कीच्या जन्मदिवसाचा सोहळा साजरा करण्याला काही एक वेगळंच महत्व होतं. त्या दिवशी आम्ही वसंतऋतूचं स्वागत करत असू ही एक गोष्ट झाली. शिवाय कधी-कधी आमची मुलं सोहळ्याची सर्व तयारी बाहेर उघड्यावर करत. उद्देश असा की आम्ही सारेजण एकत्र बसून त्याचा उपभोग घेऊ शकत असू. अशा वेळी कधी-कधी अचानक भयानक वादळ पूर्वेकडून येई.खाचखळग्यात साठलेलं पाणी थरथरे व बावट्याला सलामी देण्यासाठी वाजणारे आमचे त'शे एकाएकी थंड पडत. अशा वेळी आमची पोरं पूर्व दिशेला तिरकसपणाने बघून 'हां, वसंतऋतूची चाहूल आली हां,' असं म्हणत.

गॉर्कीचा वर्धापनदिन साजरा करण्याच्या समारंभाचं एक वेगळं वैशिष्टच होतं व त्याबद्दल आम्हाला अतिशय आनंद व अभिमान वाटे. जास्तीत जास्त उत्साहानं हा दिवस साजरा करायचा, असे आमच्या पोरांनी ठरवलेले असे. त्या दिवशी आम्ही कोणाही बाहेरच्या पाहुण्यांना बोलावत नसू. एखाद्याला त्या

दिवसाची आठवण राहिली व तो आपणहून आमच्या समारंभाला हजर राहिला तर आम्ही त्याचं मनापासून स्वागत करत असू. केवळ तो स्वयंस्फूर्तीने आलेला असे म्हणूनच. नाहीतर आमचा हा दिवस कौटुंबिक सोहळा म्हणून मानला जाई. म्हणूनच बाहेरच्यांना त्यात वाव नसे. खरोखर हा सोहळा अतिशय साधा परंतु तितकाच ऐक्यपूर्ण असे. या दिवशी सारे गॉर्काईट् एकमेकांच्या निकट सान्निध्यात येत. असं असूनही त्या सोहळ्याला कोणत्याही तऱ्हेनं घरगुती स्वरूप नसे. आम्ही त्या दिवशी सुरुवातीला आमचा बावटा घेऊन कवायत करत असू. काहीजण त्या नंतर भाषण करत व सर्वात शेवटी गॉर्कीच्या फोटोसमोर मानवंदनेचा कार्यक्रम साजरा होई. शेवटी जेवणाच्या टेबलावर सारे बसत असू. ' मी कोणत्याही तऱ्हेने खोटा शालीनपणाचा आव आणत नाही व खरं तेच सांगतो की आम्ही गॉर्कीच्या नावाने पिण्याचा कार्यक्रम न करता सपाटून खाण्याचा कार्यक्रम पार पाडत असू. त्याचं वर्णन कालिनासाहेब आपल्या शब्दात करत की, आम्ही श्रीमंत लोकांना ऐतखाऊ म्हणून म्हणतो पण एवढं पोटात रिचवल्यावर एखाद्या जनावरालासुद्धा काम करण्याची इच्छा होणार नाही. मग माणसाची तर गोष्टच सोडा.

आमचा मेनू असा असे : प्रथम निरनिराळे पदार्थ घालून बनविलेलं सूप. अशा तऱ्हेचं सूप गृहिणी विशेष समारंभाच्या वेळीच बनवितात. त्यानंतर मांस, कोबी, तांदूळ, बटाटे व निरनिराळ्या डाळी एकत्र शिजवून बनविलेला पुलाव. आणि हा पुलाव कोणालाही खिशात भरता येण्यासारखा नसे. यानंतर भाजलेले डुकराचं मांस वाढण्यात येई. हे डुकराचं मांस आम्ही बाजारातून विकत आणत नव्हतो तर आमच्याच कॉलनीत दहाव्या तुकडीने वाढविलेल्या डुकरांमधील एक डुक्कर आम्ही खास राखून ठेवत असू. आमच्या मुलांना डुकरांची देखभाल कशी करायची ते माहीत होतं, पण डुकरांना मारणं त्यांना जमत नसे. आमच्या दहाव्या तुकडीचा कमांडर स्टुपिदसीन हा सुद्धा ते मारायला धजत नसे.

तो म्हणे, ' क्लिओपात्राला आपल्याच्यानं मारवत नाही बुवा. ते कसं छान डुक्कर आहे. '

क्लिओपात्राला शेवटी मारलं जात असे. आमचा सिलँटी ऑटचेनाश ते काम करत असे. वर तो म्हणे,

' त्याचं असं आहे बरं, आमचे शत्रू मेलेल्या डुकराचं मांस खाऊ देत पण आम्ही मात्र चांगलं डुक्कर मारून त्याचं मांस खाऊ.'

क्लिओपात्राची अशा तऱ्हेने वाट लावल्यावर आमचं खाण्याचं काम संपायला हवं होतं, परंतु थोड्याच वेळात टेबलावर मलईच्या वाट्या व त्याचबरोबर चीजकेकचे तुकडे भरलेल्या बशा आमच्यासमोर आल्या. अशावेळी आमचा एकही कार्यकर्ता विश्रांती घ्यायला तयार नव्हता. उलट केक व मलई याचा त्यांनी भरपूर समाचार घेतला. एवढ्यावरच थांबलं नाही तर फळांची जेली भरलेले छोटे

छोटे कप नव्हेत तर चांगल्या मोठमोठ्या बशा दिसू लागल्या. इतकं सारं सरल्यावरच आमचं जेवण संपलं असं आम्ही समजलो. तरीसुद्धा उठताउठता प्रत्येकाला खाऊ व बिस्किटांनी भरलेल्या पिशव्या वाटण्यात आल्या. यावेळी आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणं कालिनासाहेब म्हणाले, 'गॉर्कीचा जन्म वारंवार झाला असता तर बरं झालं असतं.'

एवढं सगळं खाल्ल्यानंतर सुद्धा आमची पोरं स्वस्थ बसली नाहीत किंवा विश्रांती घ्यायला गेली नाहीत. उलट ६ व्या संमिश्र तुकडीबरोबर त्या दिवशीच्या नाटकाचा प्रयोग करण्यासाठी सारेजण नाट्यगृहाकडे गेले. कालिनासाहेबांनी या नाटकात खूपच रस दाखवला.

'आज आपण हे नाटक बघायचंच. कारण या नाटकाबद्दल आपण खूप ऐकलंय व अद्यापि आपल्याला ते बघण्याची संधी मिळाली नव्हती. इतकंच काय, ते नाटक वाचायचा योगही आला नव्हता.'

या ठिकाणी सांगावंसं वाटतं की कालिनानी हे नाटक पहायला न मिळण्याचं कारण आपण दुर्दैवी आहोत अशी वितोंडी हाकाटी केली असली तरी ते घेऊन वाचायची त्यांनी कधी इच्छाही दाखवली नाही. आज कालिनासाहेब अतिशय खुषीत असल्याने त्यांना छेडण्याचा विचार सोडून दिला.

गॉर्कीच्या वर्धापनदिनाच्या सोहळ्याच्या निमित्तानं आम्ही या वर्षी एक नवी कल्पना अंमलात आणायचं ठरवलं होतं. आमच्या कोम्सोमोल संघटनेनं कॉलनीतली चांगली मुले असतील त्यांना 'कॉलनीस्ट' हा किताब बहाल करावा अशी सूचना केली. आमची मुलं व आमचे शिक्षकवर्ग यांनी या नव्या सूचनेवर खूप चर्चा केली व ही कल्पना चांगली असल्याचं सांगितलं. 'कॉलनीस्ट' हा किताब नुसत्या मुलांनाच नव्हे तर शिक्षकवर्गालाही बहाल करावा. थोडक्यात म्हणजे जी जी मुलं व कर्मचारीवर्ग यांना कॉलनी उत्तम प्रकारे असावी अशी तळमळ दिसून येईल त्यांना हा किताब जरूर देण्यात यावा. जे मागे पडले असतील किंवा भांडखोर, तक्रारखोर व पळपुटे असतील त्यांची निव्वळ आश्रित म्हणून गणना करावी. इथं हे नमूद केलं पाहिजे की असे आश्रित आमच्याकडे फारफार तर २० जण निघाले असतील. कॉलनीतल्या जुन्या कर्मचाऱ्यांना कॉलनीस्ट हा किताब मिळाला. त्याचवेळी असं ठरवण्यात आलं की जे नवीन कार्यकर्ते येतील त्यांना एक वर्षाच्या आत हा किताब मिळविता आला नाही तर त्यांना कॉलनी सोडून जावं लागेल.

कॉलनीस्ट हा किताब मिळालेल्या प्रत्येकाला निकेलचा एक बिल्ला देण्यासाठी खार्कोवच्या कारखान्यातून आम्ही मुद्दाम करून आणविला. तो बिल्ला जणूकाही सुरक्षिततेच्या पट्ट्यामध्ये घातला होता व त्यावर टी. आर. एम्. जी. अशीअक्षरं कोरली असून एक चांदणीही त्यावर कोरण्यात आली होती.

त्या दिवशी कालिना इव्हानोविचला पण अशा तऱ्हेचा बिल्ला कवायतीच्या वेळी लटकावण्यात आला. कालिना अतिशय आनंदी व उत्साही दिसत होते व तो आपला आनंद झाकण्याचा त्यांनी जराही प्रयत्न केला नाही.

'मी झार निकोलसच्या पलटणीत अनेक वर्षे चाकरी केली. आणि याचं बक्षीस म्हणून मला फक्त हुस्सार एवढाच किताब मिळाला होता आणि ही कालची कार्टी यांनी मला बिल्ला दिलाय म्हणे ! तसं मला काहीच करावं लागलं नाही पण बिल्ला मिळाल्याचा खरोखर आनंद वाटतो आहे. राजसत्ता जनतेच्या हाती आली म्हणजे त्यांचे पुढारी आपण स्वतः काहीही न घेता आमच्या सारख्यांना देणग्या देत सुटतात.'

कालिनासाहेबांच्या ह्या आनंदावर बोकोवाबाईच्या आगमनाने पाणी पडलं. एक महिन्यापूर्वी जिल्ह्याच्या समाजशिक्षण खात्याची प्रमुख म्हणून तिची नेमणूक झाली होती. ती जरी आमची प्रत्यक्ष अधिकारी नव्हती तरी तिचा आमच्या संस्थेवर काही प्रमाणात डोळा होता. भाड्याच्या गाडीतून उतरताना आमच्या समारंभाच्या तसंच आमच्या मेजवानीच्या टेबलाकडे ती आश्चर्याने बघत होती. कारण जेवण वाढायची पाळी असलेली मुलं अजून जेवण घेत बसलेली होती. कालिनासाहेबांनी तिच्या आश्चर्यचकित चेहऱ्याकडे पाहिलं व मला तिच्या तोंडी देऊन ते पसार झाले.

'आज तुमच्याकडे कसला समारंभ आहे ?' तिनं मला विचारलं.

'गॉर्कीचा वाढदिवस आम्ही साजरा केला' असं मी तिला सांगितलं.

'मग तुम्ही मला आमंत्रण का दिले नाही ?'

'आजच्या दिवशी कोणाही बाहेरच्या माणसांना बोलवायचं नाही असा आमचा रिवाज आहे', असं मी उत्तर दिलं.

'ते काहीही असलं तरी मला जेवण पाहिजे.'

'हो, तुम्हाला जेवण नक्कीच देऊ. अरे कालिनासाहेब कुठे गेले पहा बरं.

'अरे बापरे ! तो विक्षिप्त म्हातारा का ? मधमाशा पाळणारा ? तोच आता एकदम पळाला काय ? आणि सांगू का तुम्ही एका विचित्र परिस्थितीत अडकला आहात. त्या जिल्हा समाजशिक्षण खात्याचे लोक माझा दोन वर्षांचा पगार कापून घेणार आहेत. कुठे पळाले ते तुमचे कालिनासाहेब ? त्यांना बोलवा बघू बाहेर.'

मारिया जरी रागाचा आव आणून बोलत असली तरी तिच्या आवाजावरून कालिनांवर फारसं मोठं संकट आलं आहे असं वाटलं नाही. उलट ती चांगली खुषीतच असावी असं दिसलं. मी एका मुलाला कालिनासाहेबांना बोलावण्यासाठी पाठविलं तर होतंच. व कालिनाही येऊन थडकले. त्यांनी लांबूनच बोकोवाबाईंना अभिवादन केलं.

'काय, तुम्ही जवळ येणार नाही काय ?' असं तिनं हसत हसत विचारलं, तुम्हाला खरोखर काही वाटायला पाहिजे. तुम्ही काय केलंत माहीत आहे ? '

कालिना जवळ येऊन बाकावर बसले व म्हणाले, 'आम्ही काहीच वाईट केलेलं नाही उलट आम्ही फार चांगलं काम केलं आहे. '

आम्ही कालिनाच्या एका आगळिकीचे नुकतेच मागील आठवड्यात साक्षीदार होतो. आम्ही दोघेजण जिल्हा समाजशिक्षण खात्याच्या कचेरीत मारिया कोंड्राल्येवनाला काही एका मामुली गोष्टीसाठी भेटायला गेलो होतो. तिचं ऑफिस चिक्कार मोठं होतं व उत्तम लाकडाच्या बनवलेल्या सांगल्या चांगल्या फर्निचरनं भरून गेलेलं होतं. मारियाबाई त्या सर्वांच्या मधोमध एका टेबलापाशी बसल्या होत्या. या बाई अतिशय लोकप्रिय अशा असाव्यात. त्यांच्या सभोवती बऱ्याचशा लोकांचा घोळका पडलेला दिसत होता, व हे लोक शिक्षणखात्याचे असावेत असं वैशिष्टय जाणवत होतं. त्या एकाजवळ बोलत होत्या. दुसरा एक मध्येच घुसून काहीतरी विचारत होता. एक जण टेलिफोनवर बोलत होता, इतर काहीजण वाचत होते. आपापसात बोलत होते. कोणी सहीसाठी बाईंच्या पुढे कागत सरकवत होता, तर काही माणसांचा घोळका बाजूला उभा राहून ऐकत होता. एकंदरीत ती कचेरीची खोली आवाज, धूर व कागदाचे कपटे यांनी भरून गेलेली दिसत होती.

कालिना व मी एका बाजूच्या कोचावर बसून आमच्या कामाची चर्चा करत होतो. इतक्यात एक हडकुळीशी बाई तावातावाने कचेरीत घुसली व आमच्याजवळ बसून भडाभडा बोलू लागली. तिच्या बोलण्याचा एकंदर सारांश असा होता की कुठल्यातरी बालवाडीत बरीच मुलं आहेत. चांगली शिक्षणपद्धतीही आहे. परंतु तिथे फर्निचर नाही. त्या कचेरीत ही बाई प्रथमच आली नसून यापूर्वी बरेच खेटे घालून तिनं आपलं म्हणणं समजवायचा प्रयत्न केला होता. परंतु तिला प्रतिसाद मिळाला नव्हता. त्यामुळे तिला या खात्याबद्दल घृणा वाटत होती.

ती पुढे म्हणाली की, ' तुम्ही एखाद्या गावात बालवाड्या सुरू करता व त्यांना फर्निचर देत नाही. पोरांनी कशावर बसायचं ? आत्तापर्यंत बरेच वायदे त्यांनी केले व आज अगदी नक्की देण्याचा कबूल केलंय म्हणून मी माझ्या पोरांना तीन फर्लांग गाड्या ओढून आणायला लावल्या आणि इथं कुणाचाच पत्ता न'ही. इथं तक्रार तरी कोणाकडे करायची ? हा सारा प्रकार अगदी घृणास्पद आहे. मी या ठिकाणी सबंध महिनाभर सतत खेपा घालत आहे. आणि या बयेजवळ केवढं फर्निचर आहे बघितलंत ? हिला एवढं फर्निचर कशाला हो हवंय ? '

त्या बाईचा आवाज इतका मोठा असूनही तिच्या बोलण्याकडे कुणाचंही लक्ष गेलं नाही व मारियाबाईंच्या भोवती जमा झालेल्यांपैकी कोणीही तिच्याकडे लक्ष दिलं नाही. अर्थात हे तिथं होत असलेल्या गोंगाटामुळे झालं असावं. कालिनानी

एकदा सगळ्या फर्निचरवरून नजर फिरवली व त्या कोचावर एक थाप मारून तिला विचारलं, 'हे फर्निचर तुमच्या उपयोगी येईल असं समजायला काही हरकत नाही.'

'वा! वा! हे फर्निचर ना? आम्ही याचा फारच चांगला उपयोग करून घेऊ शकतो.'

'मग अडचण कसली?'

'हे जर चांगलं आहे तर तुमच्या मुलांसाठी ते तुम्ही घेऊन जाऊ शकता.'

त्या बाईंचे डोळे एकदम लकाकले. इतका वेळ ती कालिनांच्या चेहऱ्याकडे एकटक बघत होती. एकाएकी तिनं आपळी बुब्बुळं गरागरा फिरवली व पुन्हा कालिनांच्या चेहऱ्यावर आपली दृष्टी स्थिर केली आणि विचारलं, 'हे कसं काय करता येईल हो?'

'त्यात काय अवघड आहे? ते इथून काढायचं आणि तुमच्या गाड्यांत रचून ठेवायचं.' कालिनानं स्पष्ट सांगितलं.

'अरे बापरे! आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणे केलं तर काय होईल हो?'

'अहो, वरून तुम्हाला संदेश, आदेश, धमक्या येतील असंच ना? चिठ्ठ्या-चपाट्या खरडणाऱ्यांचा या खात्यात सुकाळ आहे. तुम्हाला वीट येईपर्यंत हे लिहीत रहातील. कसला विचार करता? घेऊन चला.'

'समजा कुणाच्या परवानगीने नेलंत असं मला कोणी विचारलं तर?'

'खुशाल सांगा की मी परवानगी दिली म्हणून.'

'बरं तर, ठीक आहे. तुमच्या परवानगीनं मी हे नेते.' असं म्हणून त्या बाई शक्य तितका आवाज न करता हळूच कचेरीच्या बाहेर गेल्या.

थोड्या वेळाने त्या बाई आत आल्या. त्यांच्याबरोबर काही जण होते. त्यांनी भरामर जे हाती लागेल ते फर्निचर उचलायला सुरुवात केली. त्यांनी ते दरवाजापर्यंत ओढत नेले व गाड्यांत भरले. त्या फर्निचर ओढण्याचा आवाज साऱ्या खोलीभर दुमदुमला आणि अखेरीस तो मारियाबाईंच्या कानात जाऊन पोचला. त्या एकदम भानावर येऊन उभ्या राहून ओरडल्या, 'अरे तुम्ही चालवलंय तरी काय?'

'काही नाही. आम्ही हे घेऊन जात आहोत,' असं एका ठेंगण्याठुसक्या आभाळी रंगाचा अंगरखा घातलेल्या माणसानं म्हटलं.

'अरे पण न्यायचंय तर जरा सावकाश न्या. एवढा आवाज का करता?' असं बोलून फिरून आपल्या खात्याच्या कामात त्या गर्क झाल्या. कालिनानं एक उपरोधिक कटाक्ष माझ्याकडे टाकला.

'असं तुम्ही कधी पाहिलंय का? ही कार्टी सगळंच्या सगळं सामान खुशाल घेऊन जातात हं.'

मी सारा वेळ चाललेला प्रकार अगदी मजेत पहात बसलो होतो. बिचाऱ्या मारियाबाईंचं ऑफिस अगदीच उघडंनागडं करून टाकली होतं. परंतु मला काही या प्रकाराबद्दल खंत वाटली नाही. ती पोरं इतकंच करून थांबली नाहीत. आम्ही बसलेला कोचही त्यांनी ओढला. मग आम्ही उठलो व तो कोच त्यांना घेऊन जाऊ दिला. ती बाई आपल्या पोरांना ते सामान कसं कसं न्यायचं याची सूचना देऊन कालिनांकडे आली. त्यांचा हात हातात धरून तिनं कृतज्ञतेने तो दाबला व अत्यंत स्नेहभऱ्या व भावपूर्ण नजरेनं आमच्या बुजऱ्या परंतु उदार कालिनांकडे पाहिलं. ती म्हणाली, ' महाशय, तुम्ही आमचं एवढं मोठं काम केलं आहे, आता मला तुमचं नाव तरी कळेल का ?

' जाऊ द्या हो. माझ्या नावाशी तुम्हाला काय करायचंय ? अहो, जिवंत माणसासाठी कोणी देवळात प्रार्थना करत नाही, इतक्यात काही मी मरेन अशी भीती नाही.'

' हे पहा, मला उगाच कोणी आभार वगैरे मानलेले आवडत नाहीत हं !'

' अहो, पण तुमचं नाव सांगा ना.'

' कालिना इव्हानोविच सर ड्यूक असं या व्यक्तीला म्हणतात,' असं मीच शेवटी सांगितलं.

' कॉमरेड सर ड्यूक, मी तुमची फार फार आभारी आहे, ' असं ती पुन्हा पुन्हा म्हणाली.

' ठीक आहे. हो ठीक आहे. परंतु आता हे सामान शक्य तितक्या लवकर इथून घेऊन बाहेर पडा. नाहीतर मध्येच कोणीतरी उपटेल आणि सारे मिळविलेले सामान फुकट घालवून बसाल.'

' ती बाई अगदी भारावलेल्या मनस्थितीत चटकन निघून गेली. कालिनानी आपल्या ओव्हरकोटवरचा पट्टा उगाचच आवळला. घसा साफ करून त्याने आपला पाईप पेटवला.

माझ्याकडे बघून ते म्हणाले, ' तू माझं नाव का सांगितलंस ? काही काही कामे नाव न सांगताच केलेली चांगली असतात. मला लोकांनी आभार मानलेले मनापासून आवडत नाहीत. हो, पण ती बाई अजून सामान घेऊन गेली की नाही ते आधी बघू या !'

थोड्याच वेळात मारियाच्या भोवतालचे सर्व लोक पांगले. ते आपापल्या खात्यांत निघून गेले. मारियाबाईंचं लक्ष आमच्याकडे गेलं. आमचं काम झाल्यावर मारियाबाईंच्या आता कुठे लक्षात आलं. इकडेतिकडे दृष्टी वळवून त्या स्वतः-शीच पण मोठ्यांदा ओरडल्या, ' अरेच्या माझं सारं फर्निचर लोकांनी कुठं नेलं ? माझं सारं ऑफिस यांनी सपशेल मोकळं करून टाकलंय. '

खुर्चीत मागे रेलून बसत कालिनानी गंभीरपणे सांगितलं की, 'त्यांनी ते एका बालवाडीसाठी नेलं आहे.'

दोन दिवसांनी सहजच असं कळलं की ते सारं फर्निचर कालिना इव्हानोविच या व्यक्तीच्या परवानगीनं तिथून हलविण्यात आलं होतं. आम्हा दोघांनाही समाजशिक्षण खात्याकडून तातडीनं बोलावणं पाठविण्यात आलं. अर्थात आम्हाला तिथे जाण्याची फारशी काही उत्सुकता नव्हती.

कालिनानं तर स्पष्ट सांगून टाकलं, 'ह्या मोडक्यातुडक्या चार खुर्च्यांची माहिती द्यायला जाण्यासाठी मला वेळ नाही. मला बरीच कामे आहेत.'

या सर्व घडामोडीमुळे मारियाबाईंच्या पुढं यायला कालिनाला चमत्कारिक वाटत होतं. तरीही नेटानं ते म्हणाले,

'त्यात एवढं काय झालं ? मी जे काही केलंय ते चांगल्या गोष्टीसाठीच केलंय.'

'वा ! फार शहाणे आहात हो तुम्ही. तो परवाना देण्याचा तुम्हाला काय अधिकार होता?'

'आपल्या खुर्चीवर सावरून बसत कालिनानं शांतपणानं उत्तर दिलं, 'हे बघा, मला ते देण्याचा संपूर्ण अधिकार आहे. किंबहुना कोणत्याही माणसाला तो अधिकार आहे असं मी समजतो. उदाहरणार्थ, मी तुम्हाला एखादी स्थावर मालमत्ता विकत घ्यायचा परवाना देतो. बस. घ्या तुम्ही. खुशाल विकत घ्या. विकत घ्या, कुठेही घेऊन जा. माझी काही हरकत नाही,'

मारियाबाई म्हणाली, 'मी सुद्धा तुम्हाला अशी परवानगी देऊ शकते. समजा, मी इथे असलेली सगळी टेबलं घेऊन गेले तर तुमचं त्यावर काय म्हणणं आहे ?'

'बेशक घेऊन जा. आमची काही हरकत नाही.'

'त्याचा परिणाम काय होईल हो ? घेऊन जा म्हणे !'

'काही होणार नाही.'

'कोणीही, कुठेही, काहीही उचलून न्यावं असा तुमच्या म्हणण्याचा अर्थ आहे का ?'

'पण नेणार कोण आणि कुठे ?'

'कोणीतरी नेणारं भेटेल.'

'अहं, कोणीतरी नाही. त्यांनीच ते न्यावं असा माझा आग्रह आहे. मग ते नेत असताना त्यांची काय परिस्थिती होईल व परिणाम काय होतील तेच मला पहायचंय,' असं मारियाबाई म्हणाल्या.

इतका वेळ मारियाबाईंच्या खुर्चीमागे उभे राहून संभाषण ऐकत असलेला

झादारोव म्हणाला, ' अहो, ते काय नेतात वाहून ? त्यांनाच दुसऱ्याला वाहून न्यावं लागतं. '

मारियाबाई जराशा लाजल्या व झादारोवकडे आश्चर्याने बघत म्हणाल्या, ' तुमचं म्हणणं असं आहे तर ! '

अगदी मोकळेपणानं हसत झादारोव म्हणाला, ' मला तरी त्याचा असाच अर्थ असावा असं वाटतंय. '

' वा ! छान ! हे झालं दरोडेखोरांचं तत्त्वज्ञान. काय हो डायरेक्टरसाहेब, तुम्ही तुमच्या मुलांना असंच शिक्षण देता वाटतं ! ' असं मारियाबाई माझ्याकडे बघत घुश्श्यात म्हणाल्या.

' हो. साधारणपणे त्याच प्रकारचं असं म्हणायला हरकत नाही. '

' वा वा, चांगलं देता हं शिक्षण तुम्ही. दुसऱ्याच्या ऑफिसमधलं फर्निचर तिसऱ्यालाच देऊन टाकायचं हे तुमच्या म्हणण्याप्रमाणे बरोबर आहे नाही का ? मग हे शिक्षणच कशाला द्यायला पाहिजे ? वस्तू म्हणे पडल्या होत्या म्हणून त्या घेऊन जायला सांगितलं. याचा अर्थ असाच ना ?'

थोडया अंतराबर आमच्या काही मुलांचा घोळका उभा राहून आमचं संभाषण ऐकत होता. त्यांना त्यात बराच रस असावा असं त्यांच्या चेहऱ्यांवरून दिसून येत होतं. मारियाबाई तर संतापानं लाल व्हायला लागल्या होत्या व त्यांच्या आवाजात जरा केव्हातरी राहून गेलेल्या सूडाची झाक होती. मला अर्थातच हे संभाषण चालू रहावं अशी इच्छा नव्हती. म्हणून मी आवाजात मार्दव आणून तिला शांत करण्याच्या उद्देशानं म्हटलं,

' हे पहा बाई, या विषयावर आपण केव्हातरी शांतपणे बोलू. त्यात खूपच भानगडी आहेत. '

मारियाबाई काही ऐकायला तयार नव्हत्या. ' ते अगदी सरळ व सोपे आहे. तुमचे हे शिक्षण आहे ना ते सधन (कुलक) शेतकऱ्यांना साजेसं आहे. '

इतका वेळ गप्प बसलेले कालिना पुढे सरसावले. मारियाच्या आवाजातली चीडचीड त्यांना झोंबलीच. ते तिच्याजवळ बसत म्हणाले,

' हे पहा बाई, माझ्यासारख्या म्हाताऱ्यावर काय चिडता ? तो कुलक शद्ब वापरू नका हं. आमची मुलं, या कॉलनीतली मुलं, अगदी सोविएतच्या वातावरणात वाढली आहेत हं. मी थट्टा करत होतो. मला वाटलं की ही मालकीण समोर आहे ती माझी थट्टा समजून घेईल. तिच्या लक्षात येईल की मुलांना बसायला खुर्च्या नाहीत, म्हणून त्यांनी नेल्या असतील. पण तसं दिसत नाही. तिचं फर्निचर तिच्या डोळ्यासमोर उचलून नेलं तरी तिला पत्ता लागला नाही व आता त्या नेणाऱ्याचा कसून तपास करत आहेत, आणि आम्हाला वर सांगते की तुमचं शिक्षण हे सधन शेतकऱ्याला शोभेल असं शिक्षण आहे. वा छान! '

‘हो, पण म्हणून तुमची मुलं देखील पुढं असं करतील ना!’ आता त्यांचा विरोधी सूर जरा खाली आला होता.

‘करू देत हो, आमची मुलं तसंच करू देत.’

‘पण काय हो, असं का म्हणून.’

‘अहो, निष्काळजी मालक मालकीणींना त्याशिवाय कसा धडा मिळेल?’ असं कालिना म्हणाले.

काराबानोव गर्दीतून वाट काढत पुढे आला. तो सरळ मारियाबाईजवळ गेला. त्यानं एका काठीला पांढरा शुभ्र रुमाल गुंडाळला होता व ती काठी मारियाबाईकडे सरकवली. त्याच दिवशी कॉलनीतल्या सर्व मुलांना आम्ही पांढरे हातरुमाल समारंभाच्या निमित्ताने भेट म्हणून दिले होते. काराबानोव म्हणाला, ‘मारियाबाई, हे पांढरे निशाण दाखवा पाहू.’

मारियाबाईंच्या चेहऱ्यावरचा भाव बदलला. त्यांचा चेहरा एकदम उजळून उठला. आम्हाला जरा आश्चर्यच वाटलं.

मारियाबाई एकदम म्हणाल्या ‘मी हरले हं! अगदी सपशेल हरले. तुमचं शिक्षण सधन (कुलक) शेतकऱ्यांचं शिक्षण नव्हे हे एकदम कबूल. मला कोणी लुटलं नाही. माझ्याबरोबर समाजशिक्षण खात्यातल्या स्त्रियांनीसुद्धा ही हार कबूल केली.’

त्या रात्री कुणाचे तरी कातडी जाकीट घालून मी बसलो होतो. प्रॉम्प्टरच्या खोलीतून मी बाहेर पडलो. हळूहळू रिकाम्या होत जाणाऱ्या प्रेक्षागारात मारियाबाई बसून आमच्या मुलांच्या हालचाली अगदी लक्षपूर्वक पहात होत्या. इतक्यात टोस्काचा भसाड खरखरीत आवाज निघाला,

‘सेमयॉन सेमयॉन, अरे तुझा पोशाख दिलास का? जाण्यापूर्वी तो द्यायला विसरू नकोस.’

काराबानोवनं त्याला उत्तर दिलं, ‘अरे शहाण्या, मी आज जो पार्ट केला त्यात फाटकेतुटके कपडे आहेत. पोशाख कशाला म्हणतोस त्याला! (गॉर्कीच्या दी लोअर डेप्थ या नाटकातलं ते पात्र होतं.’)

‘बरं बरं, कळलं. मग ते नमुनेदार कपडे भेट म्हणून तुझ्याकडेच राहू देत,’ असं टोस्कानं आतून ओरडून सांगितलं.

व्होल्कोव रंगमंचाच्या कडेवर उभा राहून गॅलॅटेन्कोला हाक मारत होता, ‘अरे गॅलॅटेन्को, त्या भट्टया अजून कशासाठी चालू आहेत? हे बरोबर नाही. त्या ताबडतोब विझव बघू.

‘त्या विझतील रे आपोआप’, असं गॅलॅटेन्कोनं उत्तर दिलं. त्याला विलक्षण झोप येत होती.

'हे पहा, त्या ताबडतोब विझव. फुकट सरपण जाळणं आपल्याला परवडत नाही हे तुला चांगलं माहीत आहे. हा हुकूम आहे आणि तो पाळलाच पाहिजे.'

'हुकूम हुकूम, बरं बाबा, मी विझवतो भट्टचा,' असं जरा कुरकुरतच त्यानं आपलं काम केलं.

काही मुलं नाटकात वापरलेलं पलंग वगैरे सामान सुटे करून गोळा करत होते व एकीकडे नाटकातलं गाणं गुणगुणत होते.

'हे सारे तुकडे उद्या सुताराकडे गेले पाहिजेत' असं मिट्का झेवेली कोणाला तरी सांगत होता. त्याला कशाची तरी आठवण झाली व तो 'अँटन अँटन' करून ओरडला.

ब्रातचिन्कोनं आतून उत्तर दिलं, 'अरे, एवढं गाढवासारखं ओरडायला काय झालं ? मी इथंच आहे.'

'उद्या गाडी मला देशील का,' असं मिट्कानं त्याला विचारलं.

'देईन देईन, ' असं ब्रातचिन्कोनं उत्तर दिलं.

'आणि घोडा पण देशील ना ? '

'का ? तू स्वत. ओढ ना गाडी,' असं ब्रातचिन्को म्हणाला.

'नाही रे बाबा, मी तेवढा ताकदवान नाही ? '

'तुला पोटभर खायला मिळत नाही ? '

'नाही ना. म्हणून तर .'

'बरं बरं, माझ्याकडे ये. मी तुला भरपूर वैरण देईन. '

'हे सर्व चालल असतांना मारियाबाईच्या जवळ जाऊन मी त्यांना विचारलं, 'रात्र बरीच झाली आहे. तुम्ही कुठे झोपणार आहात ?'

त्या म्हणाल्या, 'मी लिडोच्काची वाट पहात आहे. ती तोंडाचा रंग पुसून; येत आहे. मी आज तिच्याच खोलीत झोपणार आहे.' त्या पुढे म्हणाल्या, 'आंतोन सेमयोनोविच, तुमची मुलं खरोखर छान आहेत. एवढी रात्र झाली अजून त्यांचं काम चालूच आहे. बिचारी खरं तर खूप थकली आहेत, त्यांना आता काही खायला वगैरे नाही देणार तुम्ही ? ज्यांनी भाग घेतला त्यांना तरी काही खायला घालणार आहात का ? '

'असं पहा, सर्वांनीच खूप काम केलंय, ' त्यामुळे तसा फरक करता येणार नाही,' असं मी सांगितलं.

'हे पहा, तुम्ही व तुमच्या शिक्षकवर्गानंसुद्धा आजच्या खेळात भाग घेतला होता. मग तुम्ही सारेजण एकत्र बसून झालेल्या कार्यक्रमावर चर्चा वगैरे करावी व ते करताना थोडे काहीतरी खावे असं का करत नाही?'

'मारियाबाई, तुमचं म्हणणं ठीक आहे. पण आम्हाला सकाळी सहा वाजता उठायचं असतं.'

'त्यासाठी का तुम्ही त्यांना तसंच झोपवणार?'

'हे पहा बाई, तुमच्या कल्पनेपेक्षा आमचं आयुष्य फार फार कष्टाचं आहे. समजलं का ? मारियाबाई यावर विचारात गढल्या. इतक्यात लिडोच्का रंगमंचावरून खाली उतरली. जाताजाता ती म्हणाली, 'आजचा आपला प्रयोग छान झाला असं नाही वाटत तुम्हाला ?'



# ६

## मदनबाण

गॉर्कीच्या वाढदिवसाच्या समारंभानंतर वसंतऋतू सुरू झालाच म्हटलं तरी चालेल. हा बाहेरचा नैसर्गिक वसंतऋतू सुरू झाला, तसाच आमच्या काही मुलांच्या मनामध्येही वसंतऋतू सुरु झाल्याचा भास व्हायला लागला.

आमच्या नाटयकलेच्या आवडीतून आमची मुलं व आजूबाजूच्या परिसरातील तरुण मंडळी यांच्यात बरीच ओळख वगैरे झाली होती. अशा ओळखीतूनच एकमेकांबद्दलच्या भावना वाढीला लागल्या होत्या.त्याला आमच्या सामाजिक शैक्षणिक तंत्राचे काही संकेत असायची जरूर नव्हती. ही सुरुवात प्रथम कमांडर कौन्सिलच्या आदेशानुसार झाली. ६ एस्. संमिश्र तुकडी, त्यात एस्. अक्षर असलेली म्हणजे (स्पेक्टेटर) प्रेक्षकसमूहात काम करणारी आमची मुलं ती पण याला बळी पडलेली आमच्या ध्यानात आली.

जी मुलं प्रत्यक्ष नाटकात काम करत असत–६ ए संमिश्र तुकडीची–ती बिचारी आपल्या कामात अगदी गुरफटून गेलेली असत. खरं तर पुष्कळदा नाटकातले प्रियाराधन हे अर्थातच नाटकापुरतेच प्रेम करणे असायचं. ती या प्रथम दर्शनी उद्भवणाऱ्या प्रेमाच्या जाळयात अडकत नसत. तसंच संमिश्र ६ तुकडीची इतर मुलं, ती सुद्धा यातून बचावली होती. वादळ, वारा, गोळीबार वगैरेचे सीन दाखविण्यात गुंतलेली संमिश्र ६ एस्. इ. ची मुलं, विशेषत: आमचा तारानेट् कुठेतरी इजा करून घेऊन हाताला पट्टी मारून येत असे, ती ही या रोगातून

बचावली, त्याला बळी पडली नाहीत. कदाचित त्यातले कानठळ्या बसवणारे आवाज, वाहनांच्या वाहतुकीचे आवाज, बोटी बुडाल्याचे आवाज व आगी लागून धुरकटलेलं वातावरण, यामुळे या रोगाला थारा मिळाला नसेल. रंगमंच सजविणाऱ्या किंवा सामानाची हलवाहलव करणाऱ्या मुलांच्या मनात प्रेमज्योत पेटू शकली नाही. याला कारण, शिक्षणतज्ज्ञांच्या मते, त्यांचं अवधान दुसऱ्या कामात गुंतल्यामुळे ही प्रेमाची लाट त्यांच्या मनात पसरली नसावी. प्रेक्षागारात उब येण्यासाठी भट्ट्या पेटविणारी आमची मुलंही या मदनबाणाच्या माऱ्यातून वाचली. त्यांचाही प्रेक्षकांशी खूप निकटचा संबंध येई. पण ती कोळशांनी व राखेनी इतकी भरून जात की मदनबाण त्यातून शिरणंच कदाचित अशक्य असेल.

संमिश्र ६ एस. या तुकडीची मुलंच सर्वात धोक्यात होती. ती नेहमी आमच्याकडे असलेले चांगल्यातले चांगले कपडे वापरत. त्यांनी गबाळेपणा केला तर मी त्यांना लगेच रागावत असे. त्यांच्या कोटाच्या वरच्या खिशातून पांढरी शुभ्र हातरूमालाची टोकं डोकावताना दिसत. त्यांचे केस अतिशय काळजीपूर्वक वळवलेले असत. तसंच त्यांना एखाद्या मुत्सद्याप्रमाणे अतिशय सौजन्याने वागावं लागे. एखाद्या दंतवैद्याप्रमाणे फार लक्षपूर्वक रहावं लागे. अशा तऱ्हेने सर्व बाजूंनी तयार असलेली ही मुलं नेमकी गोन्चारोवका, बिरोगोवका किंवा होलोव्हाय गावातल्या सुंदरींच्या जाळ्यात अडकत असत. यामध्ये व पॅरिसच्या सौंदर्यप्रसाधन आवारात गेले असता प्रेमात अडकळणाऱ्यांच्यात तसा काहीच फरक नसे.

पहिल्या भेटीगाठी नाट्यगृहाच्या दारात तिकीटं तपासताना किंवा जागा शोधून देताना होत असत. अर्थात त्या तितक्या धोकादायक नसत. नाटकात काम करणारे किंवा ही सुंदर सुंदर नाटकं करून दाखवणारे त्यांच्या अभिनयामुळे किंवा निरनिराळ्या नाटकात कराव्या लागणाऱ्या तंत्रामुळे खरं तर नाटक पहायला येणाऱ्या मुलींना जास्त आकर्षक वाटत. परंतु त्यांच्यापर्यंत पोचणं एकंदर अवघडच असे. त्याशिवाय गावातले प्रेमवीरसुद्धा त्या स्तुतीमध्ये भाग घेत असत. त्यांना या लोकांबद्दल असूया वाटत नसे. परंतु असे एकामागून एक प्रयोग होत गेल्यानंतर अनादी कालापासून जगात जो एक गोड गोंधळ होतो तोच आमच्या आमच्या कॉलनीतल्या मुलांच्या बाबतीतही झाला व त्याबद्दल आश्चर्य वाटायचं कारण नाही. पिरोगोवकातील परास्का किंवा व्होलोव्हायची मारुस्या गुलाबी गाल चमकणारे डोळे, दाट भुवया, चकचकीत नवे कपडे, निरनिराळ्या फॅशनचे कपडे व ओठांवर खेळणारं युक्रेनियन उच्चारातलं इटालियन संगीत त्यांना दाद घेणारे आमचे गॉर्कीइट नजरेत भरल्यावाचून रहात नसत. हे सगळे गुण एकवटलेले असल्यानंतर आमच्या मुलांना प्रवेश मिळणार नाही असं होणं अशक्य. मग कधी-कधी नाटक संपल्यानंतर काही मुलं माझ्याकडे येऊन मला विनयशीलपणानं

विचारत, 'अँटन, पिरोगोवका गावच्या मुली एकटयाच परत जायला जरा घाबरतात. त्यांना मी घरी पोचवून येऊ का ?'

अर्थातच या सबबीला काही अर्थ नाही, हे सांगणारा व ऐकणारा मी या दोघांनाही चांगलं माहीत असे. याच्यामागची भूमिका काय आहे हे न कळण्याइतके आम्ही दोघेही खुळे नव्हतो. कुठल्यातरी मुलींना घरी एकटं जायला भीती वाटते हे निखालस खोटं. उगाचंच मुलींना असं अनेकवचन वापरणं ही तर अतिशयोक्तीच वाटे. शिवाय परवानगीची तशी काही जरूरी ही नसे. नुसत्या कटाक्षानं एखादा भित्रा प्रेक्षक मुलींसाठी वाटाड्या म्हणून जाणं यात परवानगी घेतली जात नसे.

वरील कारणांसाठी मी अगदी उदारपणे परवानगी देत असे. माझ्या शिक्षण-तज्ञाच्या मनात येणारे किंतु मी दाबून टाकत असे. शिक्षणतंत्र हे प्रेम वगैरे काही जाणत नाही. कारण त्या तत्त्वाप्रमाणे शिक्षणपद्धती जेव्हा फसते तिथेच असल्या प्रेम वगैरे गोष्टी डोकं वर काढतात. सर्व काळी सर्व लोकांमध्ये शिक्षणातंत्रज्ञांनी प्रेम या गोष्टीचा कडाडून निषेध केला. मलासुद्धा कधीकधी कॉलनीतल्या एखाद्या मुलानं कोम्सोमोल किंवा सर्वसाधारण सभा चुकविली, अभ्यासाकडे दुर्लक्ष केलं, सामुदायिकाच्या एका घटकाची असलेली जबाबदारी पार पाडली नाही व एखादी मारूस्या किंवा नताशा हिच्या तो आहारी गेला तर मनातल्या मनात त्या मुला-बद्दल असूया व थोडासा रागही येत असे. कारण ती मारूस्या किंवा नताशा, शिक्षणतंत्र, राजकारण किंवा नीतीमूल्यं या सर्वांमध्ये माझ्यापेक्षा कितीतरी पटीनं कमी असे. कुठल्याही गोष्टीचा सारासारा विचार करण्याचा माझा कल असल्यामुळे माझ्या असूयेला डोकं वर करायला मी फारसा वाव दिला नाही. परंतु माझे सहकारी व शिक्षण खात्यातले अधिकारी या बाबतीत माझ्यापेक्षा जास्त कडक होते. या मदनाच्या आगांतुक लुडबुडीमुळे ते त्रस्त होत.

ते म्हणत, 'अहो, या असल्या गोष्टींना आपण थारा देता कामा नये'

अशा विषयावरील चर्चा फार मोलाच्या असत, कारण त्या वस्तुस्थितीवर प्रकाश टाकत. प्रत्येकानं आपलं सारासार ज्ञान व जीवनाचं सार यावर दृष्टी ठेवावी. स्वप्निल विश्वात वावरणं बरं नव्हे. समजा, मी श्रीमंत असतो तर मी कॉलनीतल्या मुलांची लग्ने करून देईन किंवा आमच्या आजूबाजूचा परिसर कोम्सोमोलच्या विवाहित स्वयंसेवकांनी भरून टाकीन. त्यात अर्थात वाईट काहीच नाही. हो पण हे साकार व्हायला खूपच पुढं जायला हवं. खरं तर गरीबीत वाढलेल्यांना सुद्धा विधायक सूचना करणे अशक्य नसतं. मी प्रेमात पडलेल्यांना उगाच तत्त्वज्ञान सांगून त्यांचा विरस करत नसे. ते मर्यादेबाहेर जात नाहीत एवढी काळजी जरूर घेत असे. एकदा मोकळेपणी गप्पा मारताना ऑप्रिश्कोनं मला मारूस्याचा फोटो दाखवला होता. त्यावरून निष्कर्ष काढला की आम्ही तात्विक विचार करत बसलो तरी काही-जणांचे आयुष्य मार्गावर लागण्याच्या बेतात आहे.

तो फोटो तसा फारसं काही सूचित करत नव्हता. फोटोतली मुलगी रुंद बसक्या नाकाची, सर्वसाधारण मुलींप्रमाणेच होती. पण त्या फोटोमागे जे लिहिलं होतं ते बरंच काही सांगून जात होतं: प्रिय डिमिट्रीला मारूस्त्याची प्रेमपूर्वक भेट. माझ्यावर प्रेम कर व मला विसरू नको.

डिमिट्री ऑप्रिश्को माझ्यासमोर खुर्चीवर बसला होता. त्याचं चित्त जणू हरवलं होतं व त्याचं प्रदर्शन तो उघडपणे करत होता. त्याच्या नेहमीच्या वागण्यातले फारच थोडे अवशेष शिल्लक राहिले होते. त्याच्या केसांचा कपाळावर नेहमी रूळणारा झुबका अगदी व्यवस्थित वळवून बसवला होता. विनोदाला साथ देणारे, पटकन चकाकणारे त्याचे घारे डोळे व दिलखुलास हसू लोपून जाऊन त्या ठिकाणी काळजीनं व एक प्रकारच्या शरणागतीनं जागा घेतली होती.

'तू काय करायचं ठरवलं आहेस ?' असं मी त्याला एकदा विचारलं.

त्यावर तो खुशीत हसून म्हणाला, 'आंतोन, तुमच्या मदतीशिवाय काहीही होऊ शकत नाही. तिच्या वडिलांना पण यातलं काही माहीत नाही. मारूस्त्याला अजून खात्री वाटत नाही. तिच्या वडिलांनी नापसंती दर्शविली नाही. पण ती सर्वसाधारण आहे. विशेष असं काहीच नाही.'

'बरं, आपण थोडं थांबू व मग विचार करू.' असं मी त्याला कबूल केलं.

आप्रिश्को यावर खूष झाला. माझ्या बोलण्यामुळे त्याचं समाधान झालेलं दिसलं. त्याने फोटो नीट, काळजीपूर्वक आपल्या खिशात ठेवला व आनंदानं निघून गेला.

चोबोट हा त्यापेक्षाही जास्त विचित्र मनःस्थितीत होता. तो म्हणजे एकलकोंडा व भावनाप्रधान असून त्याच्यामध्ये विशिष्ट असे गुण नव्हते. तो आमच्या कॉलनीत आला तोही विचित्र परिस्थितीत आणि नंतरही सुरामारी वगैरे प्रकरणात सापडला. त्यानंतर मात्र तो हळूहळू कॉलनीच्या शिस्तीत हळूहळू बसत गेला. तरीही एकंदरीने तो सर्व मुलांपासून अलिप्त रहात असे. त्याचा चेहरा एकंदरीत बथ्थड असून रागावला म्हणजे त्याचे डोळे भकास दिसत असत. तो शाळेत अगदी जबरदस्तीनेच बसत असे. मोठ्या कष्टाने इतक्या दिवसांनी तो थोडाबहुत वाचायला शिकला होता. तरीही वेळोवेळी तो जे अर्थपूर्ण उद्गार काढत असे त्यामुळे तो मला आवडत असे. कोम्सोमोल संघटनेत त्याला प्रथम दाखल करण्यात आलं होतं. कोम्सोमोलचा चिटणीस कोहलचं त्याच्याबद्दल ठाम चांगलं मत होतं. तो म्हणे,

'चोबोट कधी व्याख्यान देऊ शकणार नाही किंवा एखाद्या गोष्टीची जाहिरातही करू शकणार नाही. पण त्याच्या हातात मशिनगन दिलीत तर ती तो प्रभावीपणे चालवेल व मरेपर्यंत ती सोडणार नाही.'

सबंध कॉलनीला ठाऊक होतं की चोबोट व नताशा पेट्रेन्को यांचं एकमेकां-

वर प्रेम आहे. नताशा मौसी कारपोविचकडे रहात असे. ती आपली भाची आहे असं मौसी सर्वांना सांगे. परंतु ती खरी त्याच्या शेतावर काम करणारी मुलगी होती. मौसी कारपोविच तिला आमच्या नाटकांना वगैरे येऊ देत असे. पण ती बिचारी नेहमी कोणीतरी वापरलेले व तिच्या अंगाला न बसणारे असे घाणेरडे कपडे घालून येई. तिचे बूट तर अगदी जुन्या पद्धतीचे व तिच्या पायाला मोठे होणारे असे असत. आम्ही तिला चांगल्या कपड्यात कधीच पाहिली नाही. तसल्या त्या मळक्या, जुन्या व ढगळ कपड्यात नताशा एखाद्या शेतातल्या बुजगावण्यासारखी दिसे. या सगळ्यातूनही तिचा आकर्षक चेहरा उठून दिसे. त्या फाटक्या, मळकट शालीतून तिचा जो चेहरा दिसे तो चेहरा नसून एक शुद्ध, निर्मळ हसऱ्या विश्वासाचं जणू प्रतिकच होता. नताशा कधीही तोंड वाकडं करत नसे, संशय घेत नसे किंवा दु:खी दिसत नसे. ती अतिशय उत्सुकतेने ऐके. तिच्या जाड भिवयांची सतत हालचाल होई. योग्य वेळी ती हसून साथ देई. अशा वेळी तिचे सुंदर लहान दात मोठे छान दिसत. त्यातल्या त्यात वरचे किंचित पुढे आलेले दोन दात प्रामुख्याने लक्षात येत.

नताशा नेहमी खूपशा मुलींच्या घोळक्यात येई. परंतु त्या गडबड, गोंधळ–घोळ करणाऱ्या वयातही तिचा शांत, निरागस, गंभीर चेहरा वेगळाच उठून दिसे.
चोबोट न चुकता तिला सामोरा जाई व बाकावर तिच्याशेजारी मुकाटपणे बसून राही. तिला विचित्र वाटेल असं तो कधी वागला नाही. किंवा बाह्यत: तिच्या मनात हालचाल निर्माण करण्याचा प्रयत्न करत नसे. ही मुलगी चोबोटसारख्या मुलावर प्रेम करू शकेल यावर माझा विश्वासच बसला नाही. परंतु साऱ्या कॉलनीतल्या मुलांनी माझं म्हणणं संयुक्तरित्या खोडून काढलं.

'काय म्हणता? नताशा? प्रेम करणार नाही? अहो, चोबोटसाठी ती आगीतून जायला किंवा पाण्याचा लोंढा ओलांडायला जराही मागंपुढं पहाणार नाही.'

खरं सांगायचं तर आम्हाला प्रेमाच्या वगैरे भानगडीत पडायला खरोखर वेळच नव्हता. सारा मोसम आमच्यापुढे उभा होता. सूर्य सालाबादप्रमाणे आमच्यावर अठरा तास तळपत रहाणार होता. शेरेसुद्धा जणू काही सूर्याशी स्पर्धा करत असल्यासारखा आमच्यावर कामाचा एवढा बोजा टाकत होता की आम्हाला श्वास घ्यायला फुरसद ठेवत नसे. तरी बरं गेल्या वर्षीच आम्ही त्याचा शेतीकामाचा आराखडा मोठ्या उत्साहात सर्वसाधारण सभेत मंजूर केला होता. वस्तुत: शेरेनं पाळीपाळीनं सहा पिके घ्यावी असं अधिकृतपणं ठरलं होतं. पण ते जरी दिसायला सोपं असलं तरी तो एकंदर कार्यक्रम खूप गुंतागुंतीचा होता. शेरेनं धान्य असे फारच थोड पेरलं होतं. सात एकरांमधे त्यानं रब्बी गहू पेरला होता, एक लहानशा तुकड्यात त्यानं ओट पेरलेला होता व आवाराच्या एका कोपऱ्यात बार्ली पेरली होती. तसंच त्यानं जमिनीचा काही भाग नवीन प्रयोगासाठी ठेवला होता. त्या ठिकाणी तो कधीही

न पाहिलेल्या व न एकलेल्या रायच्या जातीची पिकं घेणार होता. त्याचं म्हणणं होतं की शेतकऱ्यांना जरा आश्चर्यचकित करायचं. हे रायचंच पीक आहे हे त्यांना ओळखता येणार नाही. शेतकरी काय, पण आम्हीसुद्धा बुचकळ्यात पडलो होतो. बटाटे, मीठ, कलिंगडं, कोबी इ. निरनिराळ्या प्रकारच्या भाज्या तसंच वाटाणे या सर्व वस्तू निरनिराळ्या विभागात त्यानं लावलेल्या होत्या. त्यामध्ये इतका सूक्ष्म फरक असे की त्यात एका प्रकारापासून दुसरा प्रकार वेगळा काढणं फार कठीण जाई. मुलं तर म्हणत की शेरेनं या सगळ्यामध्ये प्रतिक्रांतिकारक पद्धतीने शेती व पीके घेतलेली आहेत. त्यांनी राजे, झार, राण्या, सरदार या सर्वांना निर्माण केलं आहे.

शेरेनं जमिनीचे छोटे छोटे भाग नमुनेदार पद्धतीनं विभागले होते व प्रत्येक भागाला व्यवस्थित कुंपण घालून त्या त्या भागात काय पेरलं आहे, किती पेरलं आहे हे दर्शविणारे छोटे छोटे फलक लावले होते. जी मुलं गाई वगैरेपासून या पिकांचे रक्षण करत त्यांनी एक गंमत केली. शेरेनं लावलेल्या फलकांशेजारीच त्यांनी आपले फलक लावले. या प्रकारामुळे शेरे अतिशय रागावले व त्यांनी ताबडतोब कमांडर कौन्सिलची तातडीची सभा बोलावली. आम्ही पूर्वी कधीही ऐकलं किंवा पाहिलं नव्हतं अशा आवाजात त्या दिवशी शेरे बोलायला उठले :

'हा शुद्ध मूर्खपणा व गाढवपणा आहे,' अशी सुरुवात करून ते पुढे म्हणाले, 'मी या सर्व प्रकारांना जी नावं दिली आहेत त्या नावांनीच ते प्रकार जगभर ओळखले जातात. एखाद्या प्रकाराचं नाव जर अंटा तुसियाचा राजा असं दिलं असेल तर ते माझ्याही डोक्यातलं नसून त्या प्रकाराचं ते नाव जगभर बोललं जातं. मी काही माझ्या डोक्यातून ही नावे शोधून काढत नाही. या नावांची टवाळी करणं म्हणजे शुद्ध मवालीपणा आहे. आणि तीसुद्धा जनरल बीट, कर्नल वाटाणे, कॅप्टन कलिंगडे व लेफ्टनंट टोमॅटो अशा तऱ्हेने करण्याची काय जरूरी होती?'

कमांडर बिचारे जरा गोंधळातच पडले. या भाज्यांमधील फौजेचं कशा तऱ्हेनं वर्गीकरण करावं ते त्यांना समजेना. त्यांनी सरळसरळ प्रश्न टाकला, 'ही असली मूर्खपणाची थट्टा करण्यात कोणी भाग घेतला ? प्रथम ते राजे होते व मग ते कॅप्टन झाले, कसे व का झाले ते कोणाला ठाऊक ?'

मुलांनाही हसू दाबणं अशक्य झालं. ते सारे शेरेला घाबरून गेले होते. सिलँटीला या सगळ्या भांडणातला मुद्दा समजला. वातावरण मोकळं करण्यासाठी नेहमीच्या पद्धतीप्रमाणे तो म्हणाला, 'त्याचं असं आहे, राजा असला तरी तो खाता येतो असं याचे म्हणणं आहे. गाईंनी खाल्ला तरी फारसं बिघडणार नाही. राहू दे त्याला राजाच.'

कालिनानं शेरेची बाजू घेतली. ते म्हणाले, 'काय रे, तुम्ही फार शहाणे झालात नाही ? आपणच फार मोठे क्रांतिकारक आहोत असं तुम्हाला सांगायचंय,

म्हणून तुम्हाला राजे लोकांशी भांडणं करायचंय का ऐतखाऊंची त्रेधा उडवायचीय? काही काळजी करू नका. आम्ही तुम्हाला एकेक सुरा देतो आणि तुम्ही दमेपर्यंत कापाकापी करत रहा.'

आमच्या मुलांना त्याचा अर्थ समजला व त्यांनी कालिनाचं म्हणणं मुकाट्यानं मान्य केलं. अशा तऱ्हेने आमच्या शेतकी भाजीपाल्यातला प्रतिक्रांतिकारी वाद-विवाद मिटला. त्यानंतर शेरेनी गुलाबाची २०० रोपं मुख्य इमारतीच्या समोर लावली व त्याला 'हिमराणी' असं नाव दिलं. एकाही मुलानं त्या नावाबद्दल तक्रार किंवा थट्टा टवाळी केली. नाही. काराबानोव म्हणाला, 'राजा असो वा नसो जोपर्यंत ती सुवास देतात तोपर्यंत आमचं काहीही बिघडत नाही.'

आम्हाला सर्वात जास्त कोणी हैराण केलं असेल तर ते बीटच्या पिकानं. ते अगदी विक्षिप्त पीक होते; पेरायला सोपं पण देखभाल करायला अतिशय कटकटीचं. ते जमिनीतून जरा सावकाशीनंच वर यायला लागलं की लगेचच बाजूला उगवणाऱ्या फालतू गवतापासून त्याचं रक्षण करावं लागे. पहिल्या पहिल्याने तर हे काम फारच त्रासदायक असे. नवीन बीटचं रोप हे रानटी गवतापासून वेगळं ओळखणं कठीण पडे व म्हणून शेरेनं जुन्या मुलांची या कामावर नेमणूक करायला सांगितली. पण आमच्या जुन्या मुलांनी यावेळी मात्र तक्रार केली.

'आम्ही आता का म्हणून बीटची साफसफाई करावी ? हे काम आम्ही पूर्वी थोडंच केलंय?'

पहिली साफसफाई झाल्यानंतर लगेचच दुसऱ्यांदा साफसफाई करावी लागे. परंतु सर्वांचं लक्ष कोबी व बटाटे याकडे पण वेधले. तितक्यात गवतकापणी पण येऊन ठेपली. आता काय करायचं ? शेरेनं मात्र अगदी शांतपणाने आपल्या अर्जात लिहिलं की,

'४० माणसं बीटची साफसफाई करायला हवीत.'

व्हेर्शनेव कमांडर कौन्सिलचा सेक्रेटरी होता. त्यानं शेरेची वरील विनंती प्रथम स्वतःशीच वाचली व जोराने टेबलावर मूठ आपटत तो म्हणाला,

'छान ! पुन्हा आता बीटची साफसफाई ? हे संपणार तरी कधी ? मला वाटतं हे सर्व उडवून द्यावं. शेरेसाहेब, तुम्ही जुनीच विनंती चुकून पुन्हा नाही ना केलीत?'

शेरेनं शांतपणे उत्तर दिलं, 'अगदी नवीनच विनंती आहे. ४० माणसं, आणि तीही जुनीच, कृपा करून मला द्यावी.'

मारिया कोंड्राटीयेवना एक छोटीशी झोपडी घेऊन या उन्हाळ्यात आमच्या कॉलनीजवळ रहात होती. ती या कमांडर कौन्सिलच्या सभेला हजर होती. आमच्या मुलांचा हा वैताग पाहून आपल्या गालावरच्या खळ्या दाखवत तिने स्मितहास्य केलं.

'काय आळशी आहात रे तुम्ही सारेजण? तुम्हाला बीट मात्र खायला पाहिजे हे मला चांगलं माहीत आहे.' खाली मान घालू सेमियान बसला होता. त्यानं बोलायला सुरुवात केली,

'खरं तर हे बीट म्हणजे प्रथम घोड्याचं खाणं आहे. तरीही हरकत नाही. दुसरं एक मात्र सुचवायचंय. बाई, तुम्ही एक दिवस साफसफाईत मदत करायला का येत नाही ? तुम्ही एक दिवस येण्याची कृपा केलीत तर मी एक संपूर्ण संमिश्र तुकडी बीटची साफसफाई संपेपर्यंत द्यायचं कबूल करतो. एकदाचं ते काम संपवून टाकू.'

आता सहानुभूती कुठे व कोणाला दाखवावी असा विचार करत मारिया-बाई माझ्याकडे मंदस्मित करत आणि मुलांकडे कौतुकानं बघत मला म्हणाल्या,

'तुमच्या मुलांकडे बघा जरा.'

मारिया कोंड्राटीयेवना सध्या रजेवर होत्या व त्यामुळे दिवसा त्या मोकळ्याच होत्या. परंतु दिवसा आमच्या कॉलनीत पाहुण्यांचा वेळ जाणं जरा कठीणच असे. आमची मुलं कामावरून आल्यामुळं त्यांचं अंग धूळ व घाम यांच्या मिश्रणानं चिकट तेलकट तसंच उन्हामुळे करपलेलं असे. त्यामुळे त्यांच्या अंगाचा मूळचा रंग समजायला कठीण पडे. ते जेवणासाठी येत. प्रथम ते आपले कपडे काढून कुडल्टीच्या बाजूच्या कोपऱ्यात टाकत व मग कोलोमॅकच्या पाण्यात सूर मारत असत. त्याच्यामुळे कोलोमॅकच पाणी खळखळत असे. तिच्या आजूबाजूच्या परिसर त्यांच्या आरडाओरडीने, खेळण्याखिदळल्याने दणाणून जाई. बाजूच्या झुडपांत उभ्या राहून मुली त्यांना लवकर बाहेर येण्याबद्दल लकडा लावत. त्या म्हणत,

'तुम्ही मंडळी किती वेळ पाण्यात खेळत बसलात ? आता आमची पाळी आहे. आम्हाला जागा द्या पाहू.'

त्यांचा मॉनिटर काठावर येरझारा घालत मुलं पाण्याबाहेर येण्याची उत्सुकतेने वाट पाही. ही मुलं कशीतरी बाहेर येत व ओल्या अंगावर कपडे चढवत. त्यांच्या केसातून व अंगावरून पाण्याचे ओघळ ठिबकत असत. ते सर्व जण मग जुन्या बगीचात कारंज्याभोवती टेबले मांडलेली असत तिथे जेवायला बसत. मारियाबाई तिथे बसून एकट्याच साऱ्यांची वाट पहात बसलेल्या असत. ती तेवढी एकटीच आमच्या त्या मळकट जमावात स्वच्छ व व्यवस्थित कपडे केलेली म्हणून उठून दिसत असे. आमच्या कालिनासाहेबांना सुद्धा याची दखल घेऊन शेरा मारल्यावाचून रहावत नसे.

ते म्हणत, 'बाई मोठी छान आहे हं! आंतोन, तू तिच्याकडे एवढ्या अलिप्त-पणे पहातोस हे काही बरे नव्हे. ती तुझं लक्ष वेधून घेण्याची अपेक्षा करते. पण तू तिच्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करतोस. एखाद्या मझिकसारखा (श्रीमंत व घमेंड-खोर) वागू नकोस.'

'मीच कॉलनीत प्रेमचेष्टा सुरू कराव्यात असं तुम्हाला म्हणायचं आहे काय ? छे ! असलं माझ्या हातून होणार नाही,' असं मी त्यांना उत्तर दिलं.

त्यावर आपला पाईप पेटवत नेहमीच्या सुरात कालिना परत म्हणाले, 'अरे, माझं म्हाताऱ्याचं ऐक. तू तसाच कोरडा राहशील बघ.'

'अहो, मला मारियाच्या स्वभावाबद्दल व वर्तनाबद्दल शास्त्रोक्त चिकित्सा करायला सवड नाही. कदाचित ती मला वरचेवर चहाला येण्याचं निमंत्रण देई त्यात तर ही अपेक्षा नसेल ना ? प्रत्येक वेळी मी तिला नकार देई व ती चिडून जात असे. शेवटी एक दिवस मी तिला अगदी अजीजीनं सांगितलं की बाई मला खरोखर चहा आवडत नाही.'

एक दिवस जेवणानंतर सारी मुलं निघून गेली व जेवणाच्या टेबलावर मी व मारिया दोघेच उरलो होतो. तिनं अगदी मित्रत्वाच्या भावनेनं मला म्हटलं, 'महाशय सेमयानोविचसाहेब, तुम्ही आज संध्याकाळी जर माझ्याकडे आला नाहीत तर तुम्ही फारच शिष्ट आहात असं मी समजेन हं !'

'पण तुम्ही काय चहा देणार ना मला ?' असं मी विचारलं.

'वा ! वा ! मी आज आईस्क्रीम देईन. माझ्याकडे आईस्क्रीम आहे बरं. मी तुमच्यासाठी खास आईस्क्रीम बनवणार आहे.'

'बरं आहे. येईन मी,' असं मी अनिच्छेनंच उत्तर दिलं, 'हो, पण किती वाजता यायचं ?'

'बरोबर आठ वाजता.'

'हो. बरी आठवण झाली. मला साडेआठला निरनिराळ्या कमांडर्सचा अहवाल घ्यायचा आहे. मग काय करू ?'

'बापरे ! तुम्ही शिक्षणतंत्रातले अगदी वल्ली आहात. बरंय, ठीक नऊ वाजता या. मग तर झालं.'

काय दुर्दैव ! रिपोर्ट घेऊन झाल्यावर नऊ वाजता मी ऑफीसमध्ये बसलो होतो. आपल्याला आईस्क्रीम खायला जायचंय व मी अजून दाढीसुद्धा करू शकलो नाही म्हणून हळहळत बसलो होतो. इतक्यात आमचा मिट्का झेवेली ओरडत धावत आला व सांगू लागला,

'आंतोन, लवकर चला.'

'अरे, पण झालंय काय ?'

'मुलांनी चोबोटला व नताशाला आणलंय. तो म्हातारा मौसी कारपोविच पण आहे.'

'ती सारी माणसं आहेत कुठे ?'

'तिकडे बगीचात जमली आहेत.'

मी तसाच लगबगीने बगीचाकडे धावलो. लिलीच्या झुडपाच्या बाजूला

असलेल्या बाकावर नताशा घाबरून बसली होती. तिच्याभोवती साऱ्या मुली व स्त्रिया जमल्या होत्या. मुलं सारी एका बाजूला घोळका करून काहीतरी चर्चा करत होती. काराबानोवचे शब्द कानावर आले,

'नशीब म्हणावं की त्यांनी त्या हरामखोराला मारलं नाही.'

झादारोव संतापानं चिडलेल्या चोबोटला शांत करण्याचा प्रयत्न करत होता.

'हे बघ, तसं काही भयंकर घडलं नाही. आंतोन आलेच. बघ सारं ते आता सुरळित करतील.'

एकमेकांशी बोलताना मध्येच अडवत त्यांनी मला झालेला प्रकार सांगितला. तो असा : मौसी कारपोविचनं नताशाला चांगली शिक्षा करायचं ठरवलं होतं. कारण म्हणे ती काही कापड धुवायला विसरली होती. मौसीनं चाबकाने दोन फटके ओढले होतेच. इतक्यात चोबोट तिथे जाऊन पोचला. त्यावर चोबोटनं काय केलं ते समजलं नव्हतं. कारण तो चूप बसून होता. पण आजूबाजूचे शेजारीपाजारी सांगत होते की धावत जाऊन त्यांनी मौसीबाबाचं विव्हळणं पाहिलं व आरडाओरडा ऐकला. मौसीबाबाला जागजागी लागून रक्त येत होतं. मौसीबाबाचा एक मुलगा तशाच परिस्थितीत होता. मध्यभागी उभा राहिलेला चोबोट एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे दिसत होता. नताशा एका शेजाऱ्याच्या झोपडीत लपलेली आढळून आली.

या सगळ्या प्रकारात आमच्या मुलांनी देवाणघेवाण अगदीच केली नव्हती असं म्हणणं अशक्यच होतं. कारण देवाणघेवाणीच्या खुणा--बुक्के व फटके दिल्याचे स्पष्टपणे सांगत होत्या. अर्थात ते सारं संरक्षणासाठी होतं असा आमच्या मुलांचा दावा होताच. पण आपण काहीही केलं नाही असं प्रांजलपणे त्यांनी सांगितलं. नाटकी आविर्भावात त्यांनी सांगितलं की, 'आम्ही खरोखर काही केलं नाही. आम्ही उलट मारामारी सोडवली व मलमपट्टी केली.' काराबानोवनं उलट नताशाला धीर देऊन सांगितलं की 'तू जराही घाबरू नकोस. तू आमच्या कॉलनीत चल कशी. तुला चांगली सोबत मिळेल.' वगैरे वगैरे.

मी या प्रकारात गोवल्या गेलेल्या सगळ्यांना माझ्या ऑफिसात जमायचा हुकूम दिला.

नताशा कमालीची गंभीर झाली होती व डोळे विस्फारून सगळीकडे बघत होती. तिची सारी भीती तिच्या थरथरणाऱ्या ओटांवरून व गरम झालेले तिचे गाल थंड करण्यासाठी जणू मधूनच ओघळणाऱ्या अश्रूंच्या टीपातून दिसत होती.

'आता काय करायचं ? याचा एकदा कायमचा निकाल लावलाच पाहिजे' असं कारबानोव म्हणाला.

'खरंच एकदा निकाल लावून टाकू या' असा मीही दुजोरा दिला.

'लग्न करून टाका त्यांचं,' असं बुरून पुटपुटला, 'लग्न करायला खूप अवकाश आहे अजून. ते निकडीचं काम नाही. पण नताशाला कॉलनीत भरती करायचा आपल्याला संपूर्ण अधिकार आहे. याला कोणाचा विरोध आहे का? नाही. उत्तम.'

'आता आरडाओरडा करू नका. आपल्याकडे मुलींसाठी भरपूर जागा आहे. कोल्या, उद्याच्या पाचव्या तुकडीत हिचं नाव घालून टाक पाहू,' असा मी हुकूम दिला.

कोलकानं 'मान्य आहे' असं म्हटलं.

नताशानं झटक्यात आपली फाटकीतुटकी शाल फेकून दिली. तिचे डोळे अतीव आनंदाने चमकले. ती धावतच माझ्याकडे आली व एखाद्या लहान मुला-प्रमाणे आनंदाने मला म्हणाली,

'खरंच का हो मला कॉलनीत प्रवेश देणार? तुमचे कसे आभार मानू काका?

मुलांनी आपल्या भावना मोठ्यांदा हसून प्रगट केल्या. काराबानोव टाळ्या पिटत म्हणाला,

'किती छान झालं? आता कशाची भीती नाही. आमच्यापैकी कुणाच्याही अंगाला हात तर लावू द्या!'

मुली उत्साहानं नताशाला आपल्या डॉरमिटरीत घेऊन गेल्या. मुलं बराच वेळ तिथं गप्पागोष्टी करत बसली होती. चोबोट माझ्यासमोरच विमनस्क स्थितीत बसला होता. तो आभार मानताना म्हणाला,

'असा गोड शेवट होईल असं मला कधीच वाटलं नव्हतं. एका अगदीच सामान्य माणसाला तुम्ही एवढं संरक्षण दिलं त्याबद्दल आभार मानायला माझ्या-कडे शब्द नाहीत. लग्न काही आम्हाला एवढ्यात करायचं नाही.'

आम्ही सारेजण रात्री बऱ्याच उशीरापर्यंत झालेल्या प्रकाराची चर्चा करत होतो. मुलांनी अशाच प्रकारच्या आणखी काही केसेस सांगितल्या. सिलँटीनं नेहमीप्रमाणे आपलं मत न विचारताच दिलं. इतक्यात मुली नताशाला कॉलनीच्या गणवेशात घेऊन आल्या. नववधूच्या नव्हे हं! ती अगदी सडपातळ बांध्याची होती. शेवटी कालिना सुद्धा तिथे येऊन थडकले व संध्याकाळच्या झालेल्या प्रका-राचा समारोप करावा अशा थाटात म्हणाले, 'एवढं चलबिचल होण्यासारखं काही झालं नाही. तुम्ही काही कोणाचं डोकं उडवलेलं नाही. तो चांगला जिवंत आहे. सगळं काही ठीक होईल. जरा बाहेर येऊन बघा. सारे सधन शेतकरी कसे मऊ झाले आहेत. परंतु मेल्याशिवाय ते पूर्ण शांत होतील अशी समजूत करून घेऊ नका.'

मध्यरात्र उलटून गेली होती. मी व कालिना फेरफटका मारण्यासाठी राईकडे वळलो. ती उबदार परंतु स्तब्ध रात्र कालिनाचे शब्द जणू काही नीट ऐकून घेत होती. पॉपलरची झाडे उंच ताठ उभी राहून जणू काही आमच्या कॉलनीवर आपल्या मनानं पहारा करत होती. कदाचित आजूबाजूच्या घडामोडींमुळे व बदलांमुळे त्यांना आश्चर्य वाटत असेल. ट्रेपकेवाडीवर पहारा करायचं काम यापूर्वी त्यांनी केलं व आता ते आमच्या गॉर्की कॉलनीवर ते पहारा करत होते. पॉपलर वृक्षांच्या मधून मारियाबाईंची झोपडी आजूबाजूच्या अंधारातून जणू काही आमच्याकडे रोखून बघत होती. एकाएकी झोपडीची एक खिडकी उघडली गेली व कुणीतरी आतून बाहेर उडी टाकली. उडी टाकणारी व्यक्ती प्रथम आमच्याच दिशेने येताना दिसली. पण मध्येच थांबून ती परत झुडपात नाहीशी झालेली दिसली. १९१८ साली मिरगोरोव गाव कसं खाली करण्यात आलं ते कालिना सांगत होते. त्यांचं बोलणं मध्येच खुंटलं व ते चटकन म्हणाले,

'पाहिलंस तो पक्का काराबानोव. पण तो खरा व्यवहारी आहे हं! तुझ्यासारखा पढीक नाही. तू सुशिक्षित सद्गृहस्थ तसाच कोरडा राहिलास.'



## ७

# ‘नवीन भरती’

मौसी कारपोविचला कॉलनीत येताना पाहून आम्हाला असं वाटलं की, तो आणि चोबोटमध्ये जे काही झालं त्याचाच जाब विचारायला हा आला असला पाहिजे. त्याच्या डोक्याला खरोखरच एक बँडेज बांधलेलं होतं, आणि मौसी कारपोविच एखाद्या हुतात्म्याप्रमाणे बोलत होता. परंतु त्यानं दुसराच विषय काढला. एखाद्या सच्चा ख्रिस्ताप्रमाणे तो शांततेची भाषा बोलू लागला.

‘त्या भाकड गाईबद्दल मी बोलायला आलो आहे असं समजू नका तर मला दुसऱ्याच एका विषयावर बोलायचं आहे. अहो, मी तुमच्याशी भांडेन कसा? देवाची शपथ, तुमच्याबरोबर भांडण्यासारखं काय आहे? काय व्हायचं असेल ते होईल. मी तुमच्याकडे त्या चक्कीबद्दल बोलण्यासाठी आलो आहे. व्हिलेज सोविएतकडून एक अभिनव कल्पना मी आणली आहे.’

कोव्हल त्याच्याकडे चमत्कारिकपणे पहात म्हणाला,

‘चक्कीबद्दल कल्पना आणलीयत?’

‘होय चक्कीबद्दलच. तुम्ही ती चक्की भाड्यानं देऊ इच्छिता ना ? व्हिलेज सोविएतने ( ग्रामपंचायत ) आपला अर्ज त्याचसाठी वरती पाठविला आहे. आम्हाला असं वाटतं की ग्रामपंचायतीचा जेवढा अधिकार तेवढाच तुमचाही अधिकार आहे. एका बाजूला तुम्ही व एका बाजूला आम्ही अशी विभागणी होणं आम्हाला योग्य वाटत नाही.’

'असं काय? ' असं कोव्हलनं उपाहासानं म्हटलं. वकिली थाटाच्या चर्चेला सुरुवात झाली. मी कोव्हल आणि इतर मुलांना वाकली वेष व पांढरे टाय घालायला सांगितले. जेणेकरून लूका सेमियानोविच आणि मौसी कारपोविच अडचणीत येणार नाहीत व स्वतःचा जीव धोक्यात न घालता निर्भयपणे कॉलनीत येऊ शकतील.

त्याचवेळी आम्ही कॉलनीतले सर्वजण नवीन घोडे खरेदी करण्याच्या विचारात दंग होतो. आमचे सारे उमदे घोडे चांगलेच म्हातारे झाले होते. आमचा 'रेड' घोडाही म्हातारा झाला होता. त्याला दाढी यायला लागली होती. कमांडर कौन्सिलनं लॅडीला अपंग ठरवून (पेन्शनीत) निवृत्त केलं होतं. त्यांना कॉलनीतच एका खास जागेवर बांधलं होतं व शेवटच्या दिवसापर्यंत कायमचा शिधा देण्याची व्यवस्था केली होती. क्वचितच माझ्या खास परवानगीने लॅडीला जुंपण्यात येई.

बँडीट, फाल्कन व मेरी या घोड्यांवर शेरेसाहेब नेहमी रूष्ट असे.

चांगलं शेत करायचं असेल तर चांगले घोडे असले पाहिजेत. चांगले घोडे नसतील तर शेतही चांगलं नांगरता येणार नाही, असं शेरेचं म्हणणं असे.

आमचा ब्रातचिन्को हा प्रत्येक नव्या घोड्याच्या प्रेमात वेडा होत असे. तरीही त्यातल्या त्यात तो रेडलाच पसंत करी. शेरेच्या सहवासात राहून तो नवे घोडे आमच्या कॉलनीत लवकरच येतील अशी आशा धरून बसला होता. आमच्यापैकी शेरे, कालिना, मी व ब्रातचिन्को असे चौघेही जण जवळपास भरणाऱ्या घोड्यांच्या बाजाराला न चुकता भेट देत असू. आम्ही आत्तापर्यंत शेकडो घोडे बघितले, पण विकत मात्र एकही घोडा घेतला नाही. कधीकधी ते बाजारातले घोडे आमच्या घोड्यांपेक्षाही निकृष्ट जातीचे असत. कधीकधी त्यांची किंमत फारच भरमसाट असे. काही वेळा शेरेला त्यांच्यात काहीतरी दोष किंवा रोग आढळून येई. खरं सांगायचं तर अशा बाजारातून चांगल्या प्रतीचे घोडे मिळणं मुश्किलच होतं. युद्ध व क्रांती यामुळे सर्व चांगले घोडे जणू काही नष्टच झाले होते व नवीन निपज अद्याप झालेली नव्हती. ब्रातचिन्को एकेक वेळी बाजारातून धुसमसत परत येई,

'बाजारात घोडेच नाहीत हे आश्चर्य नाही का ? आपल्याला चांगले घोडे पाहिजे असतील तर आपण काही या बड्या लोकांच्या दारोदार हात पसरून फिरायचं काय ? '

एकदा आमचे कालिनासाहेब घोड्यांच्या बाबतीत काही नवीन शोधण्याच्या खटपटीत होते. त्यांना सैन्यातला जुना अनुभव होता. दुसऱ्यांच्या चांगल्या घोड्यांबद्दल मनात असूया बाळगणारे शेरेसाहेब कालिनासाहेबांवर विश्वास ठेवायचे- एके दिवशी काही तज्ज्ञांच्या बैठकीत कालिनासाहेब म्हणाले, 'काही श्रीमंत शेतकऱ्यांकडे चांगले घोडे आहेत. परंतु ते बाजारात विकायला आणत नाहीत असे मौसी व ल्यूका म्हणत होते.'

'तसं काही एक नाही हं!' असं शेरे म्हणाला, 'त्यांच्याकडे उत्तम प्रतीचे घोडे नाहीत. आपल्यासारखेच त्यांचेही घोडे आहेत. ठीक आहे. थोड्या दिवसांनी आपल्याकडेही नवी निपज होईल. अजून थोडा धीर धरायला हवा.'

कालिना म्हणाले, 'मी सांगतो ना तुला की त्यांच्याकडे आहेत. तो लेकाचा भामटा ल्यूका आजूबाजूच्या भागातल्या सर्वांना ओळखतो व त्याला अगदी खडान्‌खडा बातमी असते. तू असा विचार कर, चांगला माल (उत्तम जातीचे घोडे) आपल्याला जातिवंत शेतकऱ्याकडे नाही मिळणार तर आणखी कोणाकडे मिळणार? खरा शेतकरी शेतावर असलेल्या घरातूनच रहात नाही का? पण हे लुच्चे मुकाट्याने घरातल्या घरात घोड्यांची पैदास करतात व बाहेर दाखवायला कसली तरी जनावरे ठेवतात. कारण त्यांना जातिवंत घोडे पळवून नेले जाण्याची भीती वाटते. आपण जर त्यांच्याकडे व्यक्तिशः गेलो तर आपल्यालाही एखादं चांगलं जनावर विकत घेता येईल.'

मी पण तत्वाच्या भानगडीत न पडता घोड्यांच्या प्रश्नांचा निकाल लावून टाकायचं असं ठरवलं.

'पुढच्या रविवारी आपण अवश्य जाऊ. जमल्यास खरेदी करून टाकू'.

'खरंच जाऊ,' शेरे म्हणाला, 'आपण जरी घोडा खरेदी केला नाही तरी या आपल्या फेरफटक्यात बऱ्याच गोष्टी पहाता येतील. हे शेतकरी कशा तऱ्हेने पिके घेतात ते सुद्धा पहाणे आवश्यक आहे.'

रविवारी आम्ही आमचे घोडे जुंपून गाडी तयार केली व सावकाशपणे गावांना जोडणाऱ्या रस्त्याला लागलो. गोन्चारोवका हे गाव एका लहानशा मार्गाने खार्कोवच्या मोठ्या रस्त्याला जोडलेलं. त्याच रस्त्याने आम्ही बरेच आतमध्ये गेलो. या बाजूला यापूर्वी आम्ही कधीही आलो नव्हतो.

टेकडीच्या उताराच्या वरच्या टोकाला उभे राहिलं असता सबंध खालचा परिसर दिसत होता. आमच्यापुढे अगदी क्षितिजाकडे दृष्टी पोचेपर्यंत अगदी सपाट जमीन पसरलेली दिसत होती. जणू काही एखाद्या स्टीमरोलरनं ती इतकी समपातळीत केल्यासारखी भासत होती. त्याच्यामध्ये काही विविधता नसली तरी त्याच्या साचेबंदपणातच त्याचं सौष्ठव होतं. जिकडेतिकडे मक्याची शेतं अधूनमधून वाऱ्याच्या झुळकीबरोबर सोनेरी, हिरवट सोनेरी किंवा भुरकट सोनेरी दिसत असून मधूनच शाळूचा गडद हिरवा रंग चमकत होता. किंवा मधूनच दिसणारं गव्हाचं शेत हे खळीप्रमाणे शोभून दिसत होतं. या सर्व सोनेरी पार्श्वभूमीवर छोटी छोटी पांढरी शुभ्र छपराची घरं ओळीत बांधलेली दिसत होती. प्रत्येक घराच्या भोवती खोलगट परंतु आकारहीन असा बगीचा दिसत होता. प्रत्येक समूहाच्या भोवती दोन ते तीन 'विलो' वृक्ष, 'आस्प' वृक्ष व कुठेकुठे 'पॉपलेट'

वृक्ष असून कलिंगडाची जागा ही राखणीला बांधलेल्या खोपटासकट दिसत होती. सर्व अगदी आखून केलेलं दिसत होतं. एखाद्या कलावंताने बिनचूक देखावा काढावा त्याप्रमाणे.

हे चित्र पाहून कालिना खूष झाला. तो म्हणाला, 'हे बडे शेतकरी कसे रहातात पाहिलंत ? त्यांनी सारं कसं शिस्तीत मांडून ठेवलंय.'

'होय बुवा' शेरे थोडच्या नाखुषीनंच म्हणाला.

'आपण त्या दुसऱ्या बाजूने तिकडे जाऊ,' असं कालिना म्हणाले.

ब्रातचिन्कोनं आमची गाडी गवतात तयार झालेल्या पायवाटेनं नेऊन एका जुन्या पद्धतीच्या फाटकासमोर उभी केली. ते फाटक 'विलो' वृक्षांच्या खोडाचं बनविलेलं दिसत होतं. एक करड्या रंगाचा कुत्रा बाकाखालून बाहेर आला. त्यानं आपले हातपाय ताणले व आळसटलेल्या आवाजात आमच्याकडे पाहून तो भुंकला. घराचा मालक आपली दाढी कुरवाळायची थांबवून बाहेर आला. माझे अर्धवट सैनिकाचे कपडे पाहून तो जरा चमकला. काळजीची सूक्ष्म रेषा त्याच्या चेहऱ्यावर उमटली.

'नमस्कार महाशय, नुकतेच चर्चमधून परत आलेले दिसता,' कालिना संभावितपणे म्हणाले.

'मी नेहमी चर्चला जात नाही' असे त्या कुटुंबप्रमुखानं त्याच्या रखवालदार कुत्र्यासारखंच आळसटलेल्या आवाजात उत्तर दिलं. 'हां, माझी बायको मात्र वरचेवर चर्चमध्ये जाते हं. आपण कोठून आलात बरं ?'

'आम्ही काही कामासाठी आपणाकडे आलो आहोत. आपणाकडे काही घोडे विकाऊ आहेत असं आम्ही ऐकलं ते खरं आहे का ?'

तो गृहस्थ आम्हा सर्वांकडे आळीपाळीनं पहात राहिला. त्याने आमच्या रेड व मेरी या विजोड घोड्यांचे निरीक्षणही केलं असणार. तो एकंदर जरा चरकलेला दिसला.

'इकडे चांगले घोडे आहेत हे मी कसं सांगू शकणार ? त्याबद्दल मला काहीच माहिती नाही. माझ्याकडे एक घोडा आहे आणि कदाचित तो तुमच्या पसंतीला येईल.' असं म्हणून तो घोड्याच्या तबेल्यात गेला व एका कोपऱ्यात बांधून ठेवलेल्या तीन वर्षांच्या घोडीला घेऊन आला. ती घोडी चांगली धष्टपुष्ट तरतरीत दिसली.

त्या घोडीला पाहून शेरेनं विचारलं, 'हिला कधी गाडीला जुंपलंय का ?' त्यावर तो म्हणाला, 'तिला जुंपू शकतो व ती चांगलं कामही देईल याबद्दल माझी खात्री आहे, परंतु मी मात्र अद्याप तिला गाडीला जुंपून कुठेही नेलेलं नाही.'

'ती फारच लहान असल्याने तिचा काही उपयोग होणार नाही. आम्हाला कामाला जुंपायला घोडा हवा आहे,' असं शेरे म्हणाला.

'ती लहान आहे हे खरं,' तिचा मालक म्हणाला, 'परंतु चांगल्या ठिकाणी गेली तर ती भराभरा वाढेल. मी गेली तीन वर्षे तिची जोपासना करतोय. घोडी कशी आहे ते तुम्ही बघतच आहात.'

घोडी खरोखरच चांगल्या स्थितीत होती. अगदी घासूनपूसून स्वच्छ केल्याने तिची कातडी चकाकत होती. तिची आयाळ पण विंचरून लावली होती. तिच्या मालकापेक्षाही घोडीच जास्त उठून दिसे.

'बरं, साधारण हिच्या किंमतीची आम्हाला कल्पना द्याल का?' आम्ही विचारलं.

'साधारणपणे सहा शंभर म्हणजे काही जास्त नाही. तुम्ही लोक तसे चांगले गरजू परंतु व्यवस्थित दिसताहात. हे काही फार नाही.'

इतका वेळ विलो वृक्षांकडे पहात असलेला ब्रातचिन्को तो आकडा ऐकून खडबडून म्हणाला, 'काय म्हणता? सहाशे रुबल?'

'होय, होय. मी सहाशे सांगितले. अगदी बरोबर आहे.'

'असल्या भुक्कड जनावराला सहाशे रुबल मागता?' ब्रातचिन्कोला आपली नापसंती आवरणं अशक्य झालं होतं.

'तू नालायक आहेस. फार शहाणे दिसता. तुम्हाला घोड्याची काय माहिती आहे त्याची कल्पना आली. घोडीची परीक्षा घ्या आणि मग बोला काय ते.'

कालिना ही तणातणी शांत करण्याच्या उद्देशानं म्हणाले, 'घोडीला घाणेरडी असं काही म्हणता येणार नाही. ती चांगली आहे परंतु आमच्या उपयोगी पडणार नाही.'

शेरे मुकाट्यानं स्मितहास्य करत होता. आम्ही आमच्या गाडीत येऊन बसलो व पुढे चालू लागलो मघाचा करड्या रंगाचा कुत्रा तशाच त्या आळसटलेल्या आवाजात भुंकला. परंतु त्याच्या धन्यानं आमच्याकडे फारसं लक्ष न देता शांतपणे फाटक लावून घेतलं.

अशा तऱ्हेने आम्ही जवळजवळ १०–२० घरं पालथी घातली असतील. प्रत्येक ठिकाणी घोडे आढळून आले परंतु आम्ही काहीही खरेदी केली नाही. असं करत करत बऱ्याच उशीरा, संध्याकाळी घरी येऊन पोचलो. शेरेना तिथल्या पीकपाण्यात फारसा रस वाटला नाही. ते आपल्या विचारातच दंग होते. ब्रातचिन्कोनं आपला आपला राग रेडवर काढला. त्याला एकसारखा चाबकाने फटकारत तो एकीकडे तोंडात बडबडत होता, 'तुझं काय डोकं फिरलंय? तुला काय कधी खायला मिळालं नाही. घरी चल. मी तुला दाखवतो.'

कालिनासाहेब बाहेर पहात स्वतःशीच म्हणाले, 'पहा, काय साले नीच लोक

आहेत. तुम्ही विका अगर विकू नका. परंतु आपल्या दाराशी आलेल्या माणसांचे स्वागत वगैरे तरी कराल की नाही ? भामटे लेकाचे. आमच्यासारखे लोक सकाळपासून भटकत आहेत तर आम्हाला देण्यासाठी यांच्याकडे काही खीर वगैरे सुद्धा नव्हती ? ते सोडा, कमीत कमी उकडलेले बटाटे तरी. याला स्वतःची दाढी विचरायला सुद्धा वेळ नव्हता म्हणे. पाहिलंत ना कसा गबाळ्यासारखा उभा होता आणि त्याच्या घोडीला ६०० रूबल किंमत सांगतो. त्यानं स्वतः त्या घोडीची मशागत केलेली दिसत नाही. तुम्ही पाहिलंत का ? त्याच्याकडे कितीतरी नोकर काम करत. होते.'

मी ते पाहिलं होतं. फाटक्या मळक्या कपड्यांतले चेहरे. आम्हा शहरी माणसांना बघून घाबरून पण काहीशा कुतूहलाने तबेल्याच्या दारात व डुकरांच्या खुराड्याजवळ उभे राहून बघत होते. त्यांच्या घरापुढे एकदम आलेली एवढी सभ्य मंडळी पाहून ते चक्रावून गेले होते. त्यांच्यापैकी एखाद्याने अगदी मुकाट्यानं केव्हा-तरी घोड्याचा लगाम मालकाच्या हातात देण्याचं काम केलं असेल किंवा केव्हातरी आपल्या सारख्याच त्या मुक्या जनावराच्या पाठीवर प्रेमानं थोपटलं असेल.

कालिना एकटेच बडबड करून कंटाळले व मुकाट्याने आपल्या पाईपशी चाळा करत राहिले. आम्ही कॉलनीच्या फाटकाशी पोचेपर्यंत ते कसेबसे गप्प होते तिथे पोचल्याबरोबर ते चक्क ओरडलेच. 'अरे, आम्ही भुकेने अगदी हैराण झालोय. त्या चोरांनी आम्हाला खायला काहीही दिलं नाही.'

कॉलनीमध्ये ल्यूका सेमियानोविच व मौसी कारपोविच आमचीच वाट पहात असलेले आम्हाला दिसले. आमच्या फेरफटक्यातून काही निष्पन्न झालं नाही याचं ल्यूकाला आश्चर्य वाटलं.

तो म्हणाला, ' छे, असं कसं शक्य आहे ? बरं, ठीक आहे. अँटन व कालि-नांना मीच याबद्दल सांगितलं आहे. तेव्हा मला आता यात जातीनं लक्ष घातलं पाहिजे. तुम्ही काळजी करू नका. व कालिनासाहेब तुम्ही उगीच धडपड करू नका व डोक्याला त्रास करून घेऊ नका. या वयात तुम्हाला ते परवडणार नाही. कालिनासाहेब, पुढच्या आठवड्यात तुम्ही व मी दोघे जाऊ परंतु अँटनना मात्र घरीच राहू देत हं ! हे पक्के कडवे बोल्शेविक दिसतात व लोक घाबरून जातात.'

दुसऱ्या रविवारी कालिना व लूका, लूकाच्या गाडीतून शेतमळे पहायला निघाले. ब्रातचिन्कोला हे सर्व फारसं पसंत नव्हतं व काहीशा घुश्श्यातच तो कालिनाना म्हणाला, ' जाता आहात पण खायला वगैरे बरोबर घेऊन जा. नाही-तर मागच्यासारखी फजिती व्हायची ! '

लूका आपली भरगच्च दाढी कुरवाळीत होता. ती त्याच्या कशिदा काढ-लेल्या सदऱ्यावर रुळत होती. तो किंचितसा हसून म्हणाला, ' कॉ. ब्रातचिन्को, असं कसं म्हणतोस. आम्ही न्याहरी बरोबर घेऊन कशाला जायचं ? आज आम्हाला

मस्तपैकी खीर व मटनाचं जेवण मिळेल. इतकंच काय पण चांगल्यापैकी प्यायलाही मिळेल.'

लूकानं त्याचं बोलणं ऐकत असलेल्या कालिनाकडे पाहून डोळे मिचकावले व गाडीत चढून लगाम खेचला. त्याचा तो उंचापुरा धिप्पाड घोडा चालू लागला व गाडी हा हा म्हणता दिसेनाशी झाली.

संध्याकाळी सर्व मुलं एकाएकी फाटकापाशी जमली. जणू काही आगीच्या बंबाचा इशारा मिळाला होता. कालिनासाहेबांच्या आजच्या फेरफटक्यातून काय निष्पन्न झालं ते समजून घेण्याची सर्वांनाच फार घाई झाली होती. लूका सेमियानोविचचा घोडा गाडीच्या मागच्या बाजूला बांधलेला होता व गाडीला एक सुंदरपैकी हिरवट रंगाची घोडी जोडलेली होती. कालिना इव्हानोविच व लूका सेमियानोविच यांच्या प्रसन्न चेहऱ्यावरून त्यांना घोड्याच्या मालकानं खायला प्यायला घालून संतुष्ट केल्यासारखं दिसत होतं. कालिनासाहेबांना गाडीतून उतरायला जरा कठीणच पडलं. पण आपली स्थिती लक्षात येऊ न देण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. मिश्किल चेहऱ्याच्या काराबानोवनं त्यांना गाडीतून उतरायला मदत केली.

'मग काय, आज तुम्हाला अगदी खास मेजवानी मिळाली ना ?'

'होय तर. पहा कसे मस्त घोडे आम्ही आणलेत ते,' कालिनाने त्या घोडीच्या पाठीवरून हळुवारपणे हात फिरवला. जनावर खरोखरीच अगदी उमदं होतं. त्याचे पाय चांगले मजबूत होते. रुंद छाती व एकंदर भरलेलं शरीर दिसत होतं शेरेनं सगळीकडून नीट निरखून पाहिल्यावरसुद्धा त्याला त्याच्यात काही दोष काढता आले नाहीत. तो सारखा घोड्याला हळुवारपणे पाय दाखविण्यास विनवणी करत होता. मुलांना घोडी फारच आवडली. बुरून घोड्याच्या चोहोबाजूंनी गोलगोल फिरून म्हणाला,

'अखेरीस कॉलनीत खरोखरच चांगली म्हणण्यालायक घोडी आली.'

काराबानोवला पण घोडी फार आवडली. तो म्हणाला, 'घोडी खरोखरच काम करवून घेण्याजोगी आहे. अशा घोडीला ५०० रूबल द्यायला काहीच हरकत नाही. अशा प्रकारच्या जर डझन घोड्या आपल्याला मिळाल्या तर आपण रोज मस्त जेवण घेऊ शकू. ब्रातचिन्कोनं प्रेमानं त्या घोडीच स्वागत केलं. घोडीभोवती फिरून तोंडाने चक्चक् असे आवाज काढले. घोडीच्या त्या एकंदर डौलदारपणाने त्याचा आनंद अगदी मावत नव्हता. आता नव्या घोडीसाठी काय काय करायचे याचे विचार त्याच्या डोक्यात घोळू लागले. 'आता आपल्याला एका चांगल्या जातीच्या घोड्याची जरूर आहे असे नाही तुम्हाला वाटत ? म्हणजे आपण आपल्या इथेच चांगल्या घोड्यांची निपज करू शकू. मी काय म्हणतो ते तुमच्या लक्षात आलं काय?'

शेरेला त्याच्या म्हणण्याचा अर्थ पुरेपूर समजला होता. त्या घोडीचं नाव

डॉन असं होतं. तिच्याकडे एक कटाक्ष टाकून तो म्हणाला, 'आपल्याला मोठा उमदा घोडा हवा हे खरंच आणि मी तो एके ठिकाणी हेरूनही ठेवला आहे. आपली सुगी संपली की मी स्वतःच जाऊन घेऊन येईन.'

यावर्षी सकाळपासून संध्याकाळपर्यंत कॉलनीत सतत काम चालू असे. शेरेनं कामाची घडी अशी काही छान बसवली होती की कुठेही गडबड गोंधळ होत नसे. आमच्या संमिश्र तुकड्या, काही मोठ्या व काही छोट्या, काही जुन्या मुलांच्या बनविलेल्या किंवा काही मुद्दाम नवीन छोट्या मुलांच्या बनविलेल्या फावडी, कुदळी, खुरपी घेऊन किंवा कधीकधी नुसत्या त्यांच्या दोन्ही हातांनी काम करायला जात होत्या व काम करून येत होत्या. त्यांच्या जाण्यायेण्यात काटेकोर व्यवस्थितपणा एकाद्या धावणाऱ्या गाडी सारखा वक्तशीरपणा होता. त्याचबरोबर त्यांच्या हसण्याखिदळण्यातही जिवंतपणा होता. आपल्याला काय करायच आहे कुठे व कसे करायचे आहे याबद्दलची पूर्ण जाणीव व आत्मविश्वास पुरेपूर दिसत होता. कधीकधी आमची ओल्गा व्होरोनोव्हा, आमची दुय्यम शेतकीतज्ञ, आपल्या कामावरून परत आल्यावर ऑफिसात पाणी पितापिता मॉनिटरला सांगत असे, 'संमिश्र पाच तुकडीला थोडी मदत पाठव रे.'

'का बरं, कशासाठी ?'

'ते जरा त्यांच्या कामात मागे पडतायत. उन्हाळा फार होतोय, त्यामुळे कदाचित असे होत असेल.'

'बरं, तुम्हाला किती पाहिजेत ?'

'काही नाही. फक्त पाच मुली आहेत का रिकाम्या.'

'नाही हो, फक्त एकच आहे.'

ओल्गा तोंड पुसत पुसत कुठेतरी एकदम नाहीशी होई. मॉनिटर आपली नोंदवही हातात घेऊन पेअरच्या झाडाखाली जात असे. कारण संमिश्र तुकडीचा एक राखीव भाग तिथे असे ड्युटीवर असलेला कमांडर बिगुलवाल्याच्या मागे हळूहळू जाई. थोड्याच वेळात राखीव तुकडीला बोलावणारा बिगुलचा विशिष्ट आवाज घुमू लागे. झाडांच्या मागून किंवा नदीत डुंबत असलेली किंवा क्वचित आपल्या खोल्यातून झोपली असलेली छोटोछोटी मुलंसुद्धा धावत बाहेर येत व पेअर झाडाच्या बाजूला जमत आणि पाच लोकांची एक तुकडी शेतावर मदतीला जाई.

आम्ही नुकतीच चाळीस नवीन मुलं घेतली होती. आमच्या जुन्या मुलांनी सबंध रविवार त्यांना साफ करण्यात, कपडे देण्यात व निरनिराळी योग्य कामे वाटून देण्यात खर्च केला होता. आम्ही नव्या तुकड्या तयार केल्या नाहीत तर असलेल्या सर्व रेड हाऊसमध्ये पाठवून दिल्या व प्रत्येकाला आणखी कामे वाटून दिली. यामुळे आमच्या नव्या पाहुण्यांना जुन्यामध्ये तुकडीत समाविष्ट होता

आलं. त्यामुळे त्यांना स्वतःला लवकरच गॉर्काईट् म्हणून घेता आलं. त्यांना अजून कवाईत बरोबर करता येत नव्हती. काराबानोवच्या भाषेत ते नुकतेच रांगायला लागले होते.

नवीन आलेली मुलं अगदीच लहान होती. बहुतेकजण १३ ते १४ वयाची होती. पण सगळी कशी अगदी तरतरीत हसतमुख असायची. त्यातल्या त्यात एक सर्वात लहान मुलगा आंघोळ करून चांगले सॅटीनचे चकचकीत कपडे घालून आला की फारच गोड दिसे. त्याचे केस नीटसे कापलेले नव्हते. आमच्या बेलुखिनने सांगितलं, 'तुम्ही त्यांच्या केसांची काळजी करू नका. ते आपापले केस व्यवस्थित कापताहेत. तुम्हाला वाटतात तितके काही ते अजाण नाहीत आणि आपला न्हावी नाहीतरी आज येईलच आणि तो सर्वांचेच केस व्यवस्थित कापेल.

आमची नवीन पाहुणे मंडळी पहिले एकदोन दिवस सबंध कॉलनीभर भिरभिरत. नवीन गोष्टी पाहून त्यांना आश्चर्य वाटायचं. ते आमच्या डुकरांच्या घराकडे गेले. आणि तिथे काम करणाऱ्या आमचा कडक स्वभावाच्या स्तुपिदसिनकडे आश्चर्याने पहात होते.

ब्रातचिन्कोनं मात्र या नवीन मंडळींकडे जराही लक्ष द्यायचं कटाक्षानं टाळलं.

'तुम्ही सारेजण इथे काय करत आहात? तुमची जागा सध्या जेवणघरात आहे.'

'पण जेवणघरात काय म्हणून ?' ते विचारत.

'मग नाहीतरी तुमचा काय उपयोग आहे? सध्या खाणे एवढाच उद्योग तुम्हाला करता येण्यासारखा आहे.'

'नाही हो. आम्ही काम करणार आहोत.'

'माहीत आहे तुम्ही काय काम करणार आहात ते. तुम्ही केलेलं काम तपासून पहायला आम्हाला दोन माणसं ठेवावी लागतील. बरोबर आहे की नाही ?'

'पण कमांडरनं तर आम्हाला सांगितलं की परवाच्या दिवशीपासून आम्हाला काम करता येईल. पहा तुम्ही.'

'बरं बरं, मी पाहीनच. तुम्हाला काय वाटलं, मला माहीत नाही? तुम्ही म्हणाल, काम गरम होतंय. दुसरा म्हणेल, मला भयंकर तहान लागली आहे. तिसरा म्हणेल, अरे बाबा मी दमलोय.'

यावर ती छोटी मंडळी मनापासून हसली, 'पण अम्मा अम्मा म्हणत आम्ही काही रडणार नाही हां.'

पहिल्याच दिवशी संध्याकाळी ब्रातचिन्कोनं काही पोरं शोधून काढली. ज्यांना

घोड्याची आवड होती अशांना त्यानं जवळ केलं. आणि काय गंमत, पाण्याचे पिंप वाहून नेण्यासाठी एक गॉर्कीइट हातगाडीवरून निघाला. त्याचं नाव झोड-रोझ्नी. फाल्कनला तबेल्यातून काढून घेऊन जात असताना तबेल्याच्या दारातून त्याला ब्रातचिन्कोकडून सूचना दिल्या जात होत्या. 'अरे, त्या घोड्याला हळू चालव. तू काही आग लागल्या ठिकाणी जात नाहीस.'

थोड्याच अवधीत ही मुलं संमिश्र तुकड्यांतून भाग घेऊ लागली. अडख-ळत धडपडत, जुन्यांच्या बरोबर काम करू लागली. बटाट्याच्या शेतात रांग न मोडता काम करायची त्यांची धडपत चालू होती. जणू काही त्यांना असं दाखवा-यचं होतं की आम्हीसुद्धा कमी नाही. खरं तर जुन्यांना एक सबंध रांग दिलेली असे. तर नव्यांना एक रांग दिलेली असे. मग घाम पुसत हळूच तो दुसऱ्याला विचारी,

'हे केव्हा संपणार रे?'

आता आम्ही गहू झोडपायला घेतला होता. शेरे डोक्यापासून पायापर्यंत घामाने व धुळीने भरला होता. तशाच स्थितीत तो किती पेंढ्या आणल्या ते बघत होता.

'आपण परवा दिवशी झोडपायला सुरुवात करू. उद्या आपण घोडा बघा-यला जाऊ.

त्यावर ब्रातचिन्कोकडे सूचक कटाक्ष टाकून सेमयॉन म्हणाला, 'मी जाईन हां.'

'मग जा. मला काय सांगतोस. पण खरोखरच तो घोडा चांगला आहे का?' ब्रातचिन्कोनं विचारलं.

शेरे म्हणाला, 'घोडा वाईट तर नाहीच.'

'तुम्ही काय तो सोविएतच्या बाजारातून आणणार आहात काय? केव-ढ्याला आणणार आहात?'

'होय सोविएतच्या बाजारातूनच ३०० रुबल्सला आणणार आहोत.'

'होय, म्हणजे तुम्ही अगदी सोविएत घोडाच आणणार म्हणायचं,' कालिना म्हणाले. आणि हा एवढा मोठा उंचवटा तुम्ही कशासाठी घातला आहे?'

'तो काही फार उंच नाही. अहो, हे गवत अगदीच हलकं आहे.'

'रविवारी सर्वांनी पूर्ण विश्रांती घेतली. खूप वेळ पाण्यात डुंबून घेतलं. काहीजणांनी नवीन मुलांना मदत केली. संध्याकाळच्या वेळी आमच्यातली काही शिष्ट मंडळी पोर्चमध्ये बसली होती. रातराणीचा मंद सुगंध दरवळत

ोता. नवीन मुलांना काही गोष्टी सांगून त्यांच्यावर छाप मारायचा प्रयत्न चालला होता. काहीजण बाजूला बसले होते.

इतक्यात पवनचक्कीच्या कोपऱ्यावर धुळीचा लोट दिसला. त्यामध्ये एका घोडेस्वाराची अस्पष्ट अशी आकृती वेगाने दौडत येताना दिसली. जणू धुराच्या लोटात मधूनच बॉयलरची आकृती दिसावी त्याप्रमाणे. सेमियॉन अगदी आमच्या पुढ्यात येऊन थांबला. घोडा छानच सोनेरी रंगाचा होता. आम्ही सारेजण अगदी स्तब्ध बसून राहिलो. पूर्वी अशा तऱ्हेचे दृश्य आम्ही चित्रातच किंवा परीकथात पहात होतो. असं वर्णन गोगोलच्या ' टेरीबल रिव्हेंज 'मध्ये वाचलं होतं. त्या घोड्यानं सेमियॉनला अगदी अलगद, व्यवस्थित उचलून धरलं होतं. घोड्याची जाड व केसाळ शेपटी, त्याची सोनेरी आयाळ वाऱ्यावर भुरभुरत होती. घोडा इतक्या वेगानं आला की, त्याचं ते सगळं बारीक निरीक्षण–त्याची रुंद मान, त्याचं ऐटबाज वळण, त्याचे बारीक परंतु पुष्ट पाय व त्याचं शिरतबद्ध चालणं– करायला आम्हाला प्रथम सवडच मिळाली नाही.

सेमियॉन घोड्यावर बसून आमच्यासमोर आला. घोड्याचं घाटदार डोकं अगदी वर उंचावून दाखवले. त्याचे तीक्ष्ण व चकाकणारे काळेभोर डोळे बरोबर एका माणसाच्या हृदयाला जाऊन भिडले. आणि तो म्हणजे आमचा ब्रातचिन्को. त्यानं आनंदाने टाळ्या पिटल्या व त्याचं अंग थरथरलं.

' हा घोडा खरंच आपलाच आहे का ? '

' हो, अगदी आपलाच आहे,' असं सेमियॉननं अभिमानानं सांगितलं.

एकाएकी ब्रातचिन्को काराबानोवच्या अंगावर खेकसला, ' खाली उतर पाहू आधी, त्या घोड्यावर तू कायमचा बसून रहाणार आहेस काय ? इतका वेळ बसलास ते पुरे नाही झालं. बघ त्याच्या तोंडाला केवढा फेस आलाय तो, सधन शेतकऱ्याचे चाळे आमच्याकडे नाही चालायचे.'

ब्रातचिन्कोनं घोडयाच्या लगामाचा ताबा घेतला व रागारागाने तो हुकूम देत राहिला. सेमियॉन बिचारा घोड्यावरून खाली उतरला.

' मला सगळं काही समजतंय बरं का ? असा घोडा जर पूर्वी कोणाजवळ असेल तर तो नेपोलियनजवळच फक्त. '

ब्रातचिन्को एकदम घोड्यावर स्वार झाला व हळुवारपणे घोड्याची मान कुरवाळत राहिला. एकाएकी लाजला व त्यानं तोंड फिरवून डोळ्यांच्या कडा सदऱ्याच्या बाहीला पुसल्या.

सगळी मुलं आनंदानं हसली. कालिनानी आपला घसा साफ केला व पुन्हा एकदा हसले, ' सेमियॉन म्हणतो त्यात काहीच शंका नाही. परंतु मी असे म्हणेन की एवढा उत्तम घोडा असला तरी आपल्याकडे मात्र त्याची एवढी निगा राहणार नाही. '

' ब्रातचिन्को त्यांच्याकडे रागारागाने जात म्हणाला, ' कोण म्हणतो रहाणार नाही म्हणून ? ' नंतर बाकीच्या मुलांकडे वळून तो म्हणाला, ' मी एकेकाला चांगला मारीन. जो कोणी या घोड्याला हात लावील त्याला मी चांगला पिटून काढीन. वेळ पडल्यास मी डोकंसुद्धा फोडीन. '

त्यानं घोड्याचं तोंड चटकन वळवलं आणि घोडा पण अगदी मवाळपणे हळूहळू पावले टाकत त्याच्या मागून गेला. जणू प्रथमच आपल्याला खरा जाणणारा मालक मिळाला असं त्याला वाटलं असावं. त्या घोड्याचं नाव आम्ही मोलोडेट्स असं ठेवलं.

□

# ८

## "तुकडी नं. ९ आणि १०"

जुलैच्या सुरुवातीला ती पवनचक्की आम्हाला ३ वर्षांच्या कराराने मिळाली व तिचं भाडं वार्षिक ३००० हजार रूबल ठरवलं. ती चक्की कोणाबरोबरही भागीदारी न ठेवता सर्वस्वी आमच्या स्वाधीन करण्यात आली.

याचा परिणाम म्हणजे व्हिलेज सोविएतबरोबरचे आमचे संबंध एकदम दुरावले व ती व्हिलेज सोविएत पण बरखास्त होण्याच्या बेतात आली. या चक्कीचा ताबा मिळण्यात सर्वस्वी आमच्या कोम्सोमोल संघटनेचा विजय होता. कारण त्यांनीच या बाबतीत जास्त प्रयत्न केला होता.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे आमची कॉलनी खरोखरच श्रीमंत व्हायला लागली. एक शिस्तबद्ध उद्योगसमूह बनली.

थोड्याच दिवसांनी दोन घोडे खरेदी करणं म्हणजे आमच्या अंदाजपत्रकावर मोठाच ताण पडत होता. परंतु उन्हाळ्याच्या मध्यावर आम्ही चांगल्या निपजीच्या गाई व शेळ्या-बकऱ्या तसेच फर्निचर घ्यायला पैसे बाजूला ठेवू शकलो.

शेरेनं आमच्या अंदाजपत्रकात खर्चाचा आकडा वाढवत नाही म्हणत एक नवा गाईचा गोठा हवा असल्याची मागणी केली व बघता बघता ती इमारत तयारही झाली. शेरेनं त्याच्यापुढं उत्तम बगीचा करण्यासाठी फुलांचे ताटवे काढले. उद्देश हा की गाईच्या गोठ्यामुळे होणारी घाण व येणारी दुर्गंधी या दोन्हीचाही निचरा व्हावा. आम्ही नव्या गोठ्यात पाच उत्तम प्रतीच्या गाई

आणल्या व आमचं एक छोटं वासरूही त्यात बांधलं. आश्चर्याची गोष्ट म्हणजे हे वासरू बघता बघता वाढलं व त्याचं रूपांतर झकासपैकी एका बैलात झालं. त्या बैलाचं नाव आम्ही ' सीझर ' असं ठेवलं.

सीझरच्या जन्माचा दाखला मिळवायला शेरेला बराच त्रास झाला. परंतु त्याच्या विशिष्ट खुणांमुळे तो आमच्या गाईंच्याच जातीचा आहे हे सिद्ध व्हायला वेळ लागला नाही. आमच्या मोलोडेट घोड्याला पण दाखला मिळाला. दाखला मिळविणारा आमच्या संग्रहातला दुसरा प्राणी म्हणजे ' व्हॅसली इव्हानोविच ' नावाचा आमचा डुक्कर. अस्सल इंग्लीश जातीचा हा डुक्कर मी कॉलनीत काही दिवसांपूर्वी एका प्रयोगशाळेतून आणला होता. ट्रेपकेला रहायला आल्यानंतर त्याचं नामकरण केलेले होतं.

या सर्व परदेशी पाहुण्यांमुळे खताचा साठा करणे, आम्हाला खरोखरीच सोपं गेलं.

आमच्या दहाव्या तुकडीच्या ताब्यात डुकरांचं घर दिलेले होते. स्टुपिदसीन हा त्याचा प्रमुख होता. हे खातं अतिशय महत्वाचं होतं. तसंच प्रयोगशाळांमध्ये ते दुसऱ्या नंबराने झळकत होतं. दहाव्या तुकडीचे चवदाजण अगदी वाखाणण्यासारखे होते. डुकरांचे खुराडे इतके व्यवस्थित व स्वच्छ असे की त्याबद्दल कोणीही साशंक नव्हतं. हे डुकरांचं घर आमच्या ट्रेपकेवाडीच्या आवारात मधोमध होतं. जणू काही भूमितीमधील वर्तुळच काढलेलं असावं, त्याप्रमाणे ते चकाकणारं व चटकन नजरेत भरणारं होतं. परंतु हे कुणाच्याही लक्षात आलं नाही की असं डुकराचं घर मधोमध बांधणं हे गॉर्की कॉलनीला भूषणावह नाही.

काही निवडक मुलांनाच त्यामध्ये जायची परवानगी होती व नवीन मुलांना एक सहलीचं ठिकाण म्हणून जायला मिळे. माझी किंवा शेरेची सही असलेला पास औपचारिक परवाना म्हणून दाखवला जाई म्हणून कॉलनीतल्या बाकीच्या मुलांना व आजूबाजूच्या गावातील खेडुतांना दहाव्या तुकडीचं काम म्हणजे काहीतरी गौडबंगाल वाटे. तिथं प्रवेश मिळणं म्हणजे मोठा मान समजला जाई.

आमच्या प्रतिक्षागृहात प्रवेश मिळणं तसं सोपं होतं. दहाव्या तुकडीचा कमांडर स्टुपिदसीन याची परवानगी लागत असे. इथं छोटी डुकरं विकण्यासाठी तसंच आजूबाजूच्या खेड्यातील डुकरं कलम करण्याठी आणली जात.

कलम करण्यासाठी ३ रुबल्स फी आकारली जाई व स्टुपिदसीनचा मदतनीस ओवचारेन्को घेतलेल्या पैशाची पावती देत असे. प्रतिक्षागृहात छोटी-छोटी डुकरं वजन करून दिली जात. आजूबाजूच्या शेतकरी मंडळींचा डुकरं वजनावर विकण्याला विरोध होता. ते म्हणत, ' डुकरं वजनावर विकणं हे आम्ही ऐकलंच नाही.'

आमच्या प्रतिक्षागृहात डुकरांच्या निपज होण्याच्या वेळेला नेहमीच गर्दी

होत असे. कारण शेरे प्रत्येक रांगेतली सात डुकरं, तीसुद्धा प्रथमच जन्माला आलेली आणि चांगली धष्टपुष्ट असलेली, विकायला ठेवी व डुकरांची आवड असेल त्याला बाकीची मोफत देऊन टाकी. आमचा स्टुपिदसीन डुकरं विकत घेणाऱ्या माणसाला, त्या लहानग्या डुकराला बाटलीत दूध कसं पाजावं, किती पाजावं, किती वेळा पाजावं तसेच त्या लहानग्याला आंघोळ कशी घालावी व त्याला पक्का खुराक केव्हा सुरू करावा या सर्व सूचना तिथल्या तिथेच देत असे. आईचं दूध पीत असलेली अगदी लहान डुकरं गरीब शेतकऱ्यांच्या कमिटीचं शिफारसपत्र आणले तरच दिली जात. शेरेला साधारणपणे डुकराच्या विण्याच्या मुदतीची कल्पना असे. आमच्या डुकरांच्या घराच्या दारावर साधारणपणे ती मुदत लिहून ठेवलेली असे. त्यामुळे नेणाऱ्या माणसांनी केव्हा व कधी यावे हे आपोआपच बरोबर कळत असे.

या डुक्कर निपजायच्या धंद्यामुळे आमची साऱ्या जिल्हाभर ख्याती झाली व शेजारपाजारच्या खेड्यांमध्ये आम्हाला अनेक मित्रमंडळी मिळाली. आमच्या सभोवतालच्या खेड्यांमध्ये चांगल्या इंग्लिश जातीची डुकरे व डुकरिणी खाऊन खाऊन गलेलठ्ठ झाली होती. परंतु डुकरांची निपज करण्याच्या दृष्टीने ती अगदी निरुपयोगी होती.

आमच्या डुकरांच्या घराचा दुसरा मुख्य भाग म्हणजे 'नर्सरी.' इथे जणू काही प्रयोगशाळाच होती. त्यामध्ये प्रत्येक प्राण्यावर स्वतंत्रपणे देखदेख होत असे. व त्याच्या भविष्यकाळाबद्दलही विचार करण्यात येई. शेरेच्या हातात अनेक प्राणी होते व त्यांचा आकडा वसंतऋतूत नेहमीच वाढत असे. आमच्या मुलांना यातल्या काही प्राण्यांना नुसतं पाहून ओळखता येत असे आणि ते त्यांची होणारी वाढ अतिशय औत्सुक्याने व मन लावून पहात असत. त्यातल्या त्यात त्यातील काही प्राण्यांना मी, कालिना, कमांडर कौन्सिल व अनेक मुले ओळखत असू. वॅसिली इव्हानोविच व मॉथीडा यांच्या बच्च्यावर सगळ्यांचे लक्ष केंद्रित झालेल होतं. तो जन्माला आला तोच अगदी धिप्पाड, बांधेसूद व आम्हाला हव्या असणाऱ्या सगळ्या गोष्टी त्याच्यात एकवटलेल्या आढळल्या. तो आपल्या बापापेक्षा सवाई होणार याबद्दल शंकाच नव्हती. त्यानं आमच्या सगळ्या अपेक्षा पुऱ्या केल्या. आणि आम्ही त्याच्या बापाच्या शेजारीच त्याला खास गव्हाण तयार केले. त्याचं नाव आम्ही प्योटर वॅसिलेविच असे ठेवले.

याच्यापुढे गव्हाणीचा प्रश्न येई. या ठिकाणी वजन व पावत्या यांची आकडेवारी असे. तसेच अगदी मध्यमवर्गीय असं शांत व सुखद वातावरण असे. आईपासून दुरावल्यानंतर काही प्राणी तात्विक हरकती उत्पन्न करत किंवा काही जण मोठा आवाज करून तात्विक हरकतींचे प्रात्यक्षिक दाखवत. परंतु महिना भराच्या अवधीत ते गवतावर शांतपणे पडून त्यांना दिलेले खाद्य मुकाट्यानं खात. शेवटी एक दिवस त्यांना जबरदस्तीने खायला घालून त्यांचं हे चरित्र संपविण्यात

येई. एक दिवस अशा प्राण्यांना कालिना व सिलँटी यांच्या अधिकारात दिले जाई. मग त्यांचा शेवट करून झकासपैकी पोर्कमध्ये त्यांचं रूपांतर होई अशावेळी आल्योश्का, व्होल्कोव चरबी गोळा करण्यासाठी भांडेही घेऊन येत.

सगळ्यात शेवटच्या गव्हाणीत डुकरीणी असत. परंतु या ठिकाणी त्यातले जाणकारच जाऊ शकत. मात्र ही पवित्र जागा व पवित्र मंडळी बघायला मी सुद्धा कधी जात नसे.

या डुकरांच्या धंद्यामुळे आमच्या मिळकतीत चांगलीच भर पडली. एवढ्या थोड्या अवधीत हा धंदा इतका किफायतशीर होईल याची आम्ही कधी कल्पना पण केली नव्हती. धान्योत्पादन अगदी शिस्तबद्ध झाल्यामुळे आम्हाला आमच्या संग्रही असलेल्या प्राण्यांना भरपूर खाऊ घालणं परवडत असे. तसंच बटाटे व भोपळे यांचाही आम्हाला भरपूर उपयोग होई. हिवाळ्यात या सर्व गोष्टी आम्हाला व्यवस्थित झाकून ठेवाव्या लागत.

आम्हाला पवनचक्की मिळाल्याने आमचे क्षेत्र विस्तृत झाले. त्याशिवाय चक्कीवर येणाऱ्या दळणामुळे आम्हाला खूपसा कोंडा उपलब्ध होत असे. हा कोंडा म्हणजे डुकरांच्या व प्राण्यांच्या अन्नाचा एक अत्यंत आवश्यक पदार्थ होता.

चक्की मिळाल्याने आमचा अजून एक महत्वाचा फायदा झाला. आमचं आजूबाजूच्या गावातलं आसन स्थिर झालं व काही महत्वाची धोरणं आम्ही ठरवू लागलो. चक्की म्हणजे जणू काही परदेशी वकिलातच झाली. शेतकऱ्यांमधल्या सतत होणाऱ्या बारीकसारीक हालचालीत आम्हाला गुंतवल्याशिवाय कोणतीही गोष्ट होणं मुश्किल होतं. प्रत्येक खेड्यात गरीब शेतकऱ्यांची एक समिती असे. ते अतिशय कष्टाळू व शिस्तबद्ध असत. त्याचप्रमाणे काही मध्यम शेतकरीही असत. पण ते मात्र एकाद्या वाटाण्याप्रमाणे घट्ट व गुबगुबीत असत. तसेच ते वाटाण्यासारखेच वेगळे वेगळे व अहंमन्य असत. तसेच श्रीमंत शेतकरी चांगले गलेलठ्ठ व गंभीर चेहऱ्यांनी आपल्या आपल्या वाड्यातून रहात. ते आतून चिडलेले व जुन्या वैभवाच्या आठवणीत मग्न झालेले असत.

सुरुवातीला आम्ही आमचे व्यवहार सामुदायिकाबरोबर करत असू. सामुदायिकाला प्राधान्य देऊ असं जाहीर करून टाकलं होतं. त्याप्रमाणे आम्ही आजूबाजूच्या परिसरातल्या सामुदायिकांची यादी मागवली होती गरीब शेतकऱ्यांनी आपली सामुदायिके लवकर बनविली व ते अगदी वक्तशीरपणे येत. आपल्या प्रतिनिधींचे म्हणणं ऐकत व सर्व आर्थिक व्यवहार चटकन व मुकाट्यानं करून टाकत. त्यामुळे चक्कीचे काम चालण्यात कोणताही अडथळा येत नसे. बड्या व श्रीमंत शेतकऱ्यांनी सुद्धा आपली छोटीछोटी सामुदायिके बनविली. ती बनवताना शक्यतो आपले सगेसोयरे व आपल्याच विचारांच्या लोकांना घेण्याची त्यांनी खबरदारी

घेतली. त्यांच्या संघटनेत एक प्रकारचा विचित्र गूढपणा असे व त्यांच्यातला प्रमुख कोण हे समजून येणं कठीण जात असे.

मध्यम शेतकऱ्यांची टोळकी चक्कीवर येत तेव्हा आमचं काम फार कठीण होई. कारण ते केव्हाही जमावाने येत नसत तर एकटे दुकटे येत. त्यांचा प्रतिनिधी होता तो प्रथम आपलं धान्य दळून घेण्यासाठी पुढे करी व घरी निघून जाई. त्याच्यामागून त्याच्या संघटनेचे चिडलेले, साशंक लोक येत. तो बेजबाबदारपणे वागल्याची त्यांना शंका येई. ते आपसात तक्रार करत. आपण नाश्ता करण्यासाठी गेलो होतो किंवा सॅमोगान (एक प्रकारचे पाणी गरम करायचे भांडे) ते उकळून जाईल तो अशी सबब सांगे. कधीकधी आमचे हे सगळे ग्राहक आपसातील घरगुती भांडणं आमच्या चक्कीच्या तिथेच उकरून काढत. ही त्यांची भांडणं, मारामाऱ्या, शिवीगाळ हे आमच्या रात्रीच्या जेवणापर्यंत चालत असे. आमची मुलं ती भांडणं सोडवता सोडवता थकून जात. याउपरही यातली काही ग्राहकमंडळी मारामारीत झालेल्या जखमांना मलमपट्टी करण्यासाठी एकातेरिनाबाईंच्या छोटयाशा प्रथमोपचार केंद्रात येत. आमची नववी तुकडी चक्कीवरच काम करत असे. त्यांचा कमांडर असादची एक दिवस चिडून एकातेरिनाबाईंच्या प्रथमोपचार केंद्रात गेला व रागारागाने म्हणाला,

'बाई, तुम्ही या लोकांना कशासाठी मलमपट्टी करता? हे कधीकाळी शहाणे होतील असं वाटतं का तुम्हाला? हे सारे मझिक आहेत. ते आता मलमपट्टी करून घेतील व परत मारामारी करतील. तुम्ही त्यांना आमच्या स्वाधीन करा. आम्ही त्यांची मलमपट्टी करतो. चक्कीपाशी ते आम्हाला कसा त्रास देतात ते तुम्ही पहायलाच या.'

असादचीच्या म्हणण्यात खरोखर तथ्य होतं. आमची नववी तुकडी व चक्कीचा मॅनेजर कुडल्टी या माथेफिरू लोकांना कसं ताळयावर आणावं हे चांगल्या प्रकारे जाणून होते. काही दिवसातच त्यांनी या लोकांचा विश्वास संपादन केला व त्यांच्यावर चांगली हुकमत बसवली.

रात्रीच्या जेवणाच्या वेळेपर्यंत आमची पोरं मुकाटयानं हॉपरजवळ उभी रहात. आमच्या ग्राहकांनी घेतलेल्या पेयाचे परिणाम – हातवारे करणे, एकमेकांच्या पिठाच्या पिशव्या ओढणे, कधी न संपणारे हिशोब, एकमेकात मिसळलेले हिशेब–हे सर्व शांतपणे पहात असत. ते अगदी सहनशक्तीच्या पलिकडे गेलं म्हणजे असादची चक्कीच्या दाराला कुलूप लावी व धाकदपटशा मार्गाचा अवलंब करत असे. आमच्या नवव्या तुकडीची मुलं अतिशय झिंगलेल्या व शिवीगाळ करणाऱ्या ग्राहकांना जबरदस्तीने धरून कोलोमॅक नदीच्या काठावर घेऊन जात. जणू काही झालंच नाही असं दाखवत, गोडगोड बोलून त्यांना किनाऱ्यावरच्या वाळूत बसवत व अगदी व्यवस्थितपणे ७–८ बादल्या पाणी एकेकाच्या अंगावर ओतत. ही

झिंगलेली माणसं प्रथम काय होतंय ते न समजल्यामुळे कोडगेपणी त्याच विषयावर बरळत रहात. असादची त्यांचे ते मजबूत धिप्पाड पाय फाकून व दोन्ही हात तुमानीच्या खिशात घालून त्या प्यायलेल्या माणसांची बडबड लक्षपूर्वक ऐकी आणि त्यांच्या हालचालींवर बारकाईने लक्ष ठेवी. तुकडीच्या मुलांना 'त्या गाढवाच्या अंगावर आणखी बादल्या ओत' अशा सूचना देई. सांगितल्याप्रमाणे लापोट ते आचरणात आणी. जणू एखादा डॉक्टर आपल्या रुग्णाकडे पाहील त्याचप्रमाणे तो त्या माणसाच्या चेहऱ्याकडे बारकाईने पहात राही.

पाण्याने भिजलेला तो माणूस हळूहळू शुद्धीवर येऊन डोळे चोळत इकडेतिकडे पाही व डोक्याला झटका देत विचारी,

'एऽ ए ,तुला माझ्या अंगावर पाणी उडवायचा कोणी अधिकार दिला?'

त्या आरडाओरडाकडे दुर्लक्ष करत असादची लापोटला सांगे,

'हां, आणखी एक शुद्ध पाण्याचा डोस पाज.'

अशावेळी लापोट एखाद्या गाण्याची लकेर मारत पाण्याची बादली त्या माणसाच्या डोक्यावर पालथी करी. एखाद्या दुर्मिळ औषधाचा डोस द्याव। तशा थाटात लापोट ती पाण्याची बादली अगदी शेवटचा थेंब संपेपर्यंत ओती. नंतर त्या ओलेत्या माणसाच्या पाठीवर हात ठेवून अगदी प्रेमळ आवाजात लापोट त्याला सांगे,

'सावकाश श्वास घे आणि जोराने सोडून दे.'

आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो बावचळलेला माणूस लापोटने सांगितलेली सूचना अगदी मुकाट्याने अंमलात आणी तो खरोखरच श्वास जोराने घेई व सोडताना पोट बाहेर काढी व जोराने ठसका देई. लापोट सुटकेचा निश्वास सोडी व म्हणे 'प्रकृती ठीक; तपमान .५ अंश, नाडीचे ठोके ३७०.'

लापोट अशावेळी न हसता आपला चेहरा अगदी गंभीर ठेवत असे. नाडीचे ठोके मोजणं, श्वासोच्छवास पहाणं वगैरे गोष्टी शास्त्रोक्त पद्धतीने पार पाडी. परंतु तुकडीतली बाकीची मुलं पाण्याच्या बादल्या ओतण्यासाठी शिस्तीत उभी रहात. त्यांना मात्र या सगळ्या प्रकारामुळे मौज वाटे व हसू दाबणे कठीण जाई. तसंच काही शुद्धीवर असलेले गावकरी हा प्रकार पाहून सहानुभूती दाखवत. लापोट अशावेळी त्या घोळक्यासमोर उभा राहून गंभीरपणे विचारी.

'चला, पुढचा पेशंट येऊ द्या. आणखी कुणाला पाण्याचा औषधोपचार पाहिजे आहे?'

गावकरी लापोटचं म्हणणं अगदी मन लावून ऐकत व प्रत्येक शब्दावर मनापासून हसत. त्यानंतर लापोट असादचीकडे वळून म्हणे,

'कॉमरेड, प्रोफेसर, आता नवीन रुग्ण कोणीही नाहीत.'

'मग अपंग लोकांना कोरडं करायचा उपचार सुरू करा,' अशी आज्ञा असादची देई.

नवव्या तुकडीची मुलं उत्साहानं हळूहळू शुद्धीवर येत असलेल्या त्या दारुड्यांना गवतावर आणून झोपवत. म्हणजे त्यांना चांगलं ऊन खाता येई.

'अरे, आम्ही आमचे येऊन झोपू शकतो की! तुम्ही का त्रास घेता?' त्याचा आवाज व डोकं बरंचसं ताळ्यावर आल्यासारखे वाटे. आपण आता ठीक आहोत असं तो चक्क बोलूनही दाखवी. यानंतर मात्र लापोट अगदी मनापासून हसे. असादचीला सांगे, 'हा रुग्ण बरा झालाय बरं का ? आता याला रजा द्यायला हरकत नाही.'

तरीही अर्धवट शुद्धीत असलेले काहीजण प्रतिकार करायचा प्रयत्न करत व नेहमीच्या सवयीप्रमाणे झटकन एखादी शिवी हासडून टाकत. अशावेळी असादची पाण्याने भरलेली बादली पुढे करी. म्हणजे ते एकदम शुद्धीवर येत व त्याला विनंती करत,

'नको रे बाबा पाणी ओतू, अरे माझ्या तोंडातून शिवी चुकून बाहेर पडली. मी आता पूर्णपणे शुद्धीवर आलो आहे.'

अशा तऱ्हेने लापोट अशा लोकांना अगदी व्यवस्थित तपासत असे. जणू त्यांची प्रकृती फारच बिघडलेली आहे. बाकीची पोरं व गावकरी खूप मोठ्यांदा खळखळून हसत. मध्येच एखादा कोणीतरी म्हणे, 'शिव्या द्यायची तुला सवय आहे काय ? ती तुला साधारण केव्हापासून लागली सांग पाहू.'

तो बिचारा सांगे, 'देवा शपथ, असं पुन्हा होणार नाही.' त्याचा चेहरा शरमेनं व गोंधळामुळे जास्तच बावळट दिसे. व कुरकुर करायचा तो बंद करी. शिवाय कोलोमॅकच्या दुसऱ्या किनाऱ्यावर मुलांनी पाण्याच्या बादल्या तशाच हातात धरून ठेवलेल्या असत. त्या माणसाला पुढे विचारण्यात येई,

'कधीपासून ही घाणेरडी सवय तुम्हाला लागली ? तुझ्या आईवडिलांना पण अशीच शिव्या द्यायची सवय होती का ?'

यावर तो माणूस मूर्खासारखा हसून बोले, 'हे काय विचारता ? होतीच.'

'आणि तुझ्या आजोबाला होती आणि माझ्या चुलत्यालासुद्धा होती.'

'तुझी आजी पण शिव्या देत असे का?'

'हो होतीच. पण थांबा हं. मी कधी माझ्या आजीला शिव्या देताना ऐकलं नाही. तिला कदाचित सवय नसावी.'

बोलणाऱ्या त्या माणसाची आई अजून सुदृढ आहे हे ऐकून लापोटसकट सर्व बघे हसत.

'बरं ते जाऊ द्या. सारे काही ठीक होईल. पण तुम्हीच आता आमच्याकडे या.'

तो रुग्ण आपल्या इतर मित्रमंडळींसह खूप मनापासून हसे.

असादची चक्कीचे कुलूप काढताना लापोट त्याच्याकडे हसून बघे.

लापोट व असादची अशा वेळी त्या माणसाला सांगत, ' तुमची मनापासून जर इच्छा असेल तर आम्ही अवश्य तुमच्या घरी येऊ. परंतु तुम्ही कमीतकमी दोन आठवडे त्यासाठी आमच्याकडे अर्ज टाकला पाहिजे. आमच्यासाठी खास गाडी पण पाठवा किंवा घोडेसुद्धा चालतील. शिवाय पाण्याचा बादल्याही तुम्हाला भरून ठेवाव्या लागतील. आम्ही तुमच्या आईवडिलांना अवश्य भेट देऊ व त्यांनाही जरूर पडल्यास तपासू. '

' याच्या आईला उपचाराची जरुरी नाही कारण त्याच्या आईला अजून काहीही झालेलं नाही.' अशावेळी घोळक्यातला एखादा पुढे येऊन विचारी,

' माफ करा हो, मी त्या रुग्णाच्या आईवडिलांबद्दल नाही विचारलं मी तुमच्या आईबापाबद्दल मी चौकशी केली व तुम्ही उत्तर दिलंत की होय बरोबर आहे.'

अशा वेळी तो रुग्ण म्हणे, ' अहो, मी कधी माझ्या आईबापांबद्दल बोललो ?'

हे ऐकून गावकरी लोक टाळ्या वाजवून जोरजोराने हसत.

' कमाल आहे हं राव तुमची. आपल्या स्वतःच्याच आईची हा बदनामी करतोय पहा. '

' कोण म्हणतं हो ?'

' हो हो. अहो तो येवतूक जो नुकताच आजारी होता, म्हणतो की मी मरतो, खरोखरच मी मरतो. मूर्ख लेकाचा. आणि तो एवढासा मुलगा पहा बरं. बिलकुल हसत नाही. किती गंभीर आहे. खरोखरच मजेदार डॉक्टर आहे.'

यानंतर लापोट मोठ्या दिमाखानं चक्कीकडे हसत येई व इंजिनरूमचा पडदा बाजूला करून आपलं काम चालू करी. आताचे वातावरण आधीच्या आचरटपणापेक्षा अगदीच वेगळ्या तऱ्हेचे असे. आलेले सगळे गृहस्थ कुडल्टीचे हुकूम भराभर व जास्त उत्साहाने अंमलात आणत. काहीही कुरकुर करत नसत. लापोट जे जे काही बोलेल ते अगदी ध्यानपूर्वक ऐकत. तशी आमच्या लापोटची भाषा व नकला करण्याची पद्धत कधीही न संपणारी होती. संध्याकाळ होत आली की चक्कीचे काम संपे. मग सारे गावकरी परत जाण्यास तयार असत. जाताजाता काही जण आमच्या मुलांचे हात प्रेमाने दाबत व सकाळी झालेल्या प्रकाराची पुन्हापुन्हा आठवण काढून स्वतःची करमणूक करून घेत. ते आपापसात बोलत,

' काय म्हणे, त्याची आजी मोठी हुशार तल्लख पोर आहे. आपल्या गावात जर असा एकेक पोर असता तर चर्चला जाण्याचं आपण कधी मनातसुद्धा आणलं नसतं.'

त्यावर दुसरा म्हणे, ' हे कारपोक, तू अगदी ठणठणीत कोरडा झालास का?

तुझं डोकं शाबूत आहे का ? सर्व काही ठीकठाक आहे ना ? तुझी आजीसुद्धा ठीक आहे ना ?' असं म्हणून ते मोठमोठ्यानं हसत.

बिचारा कार्पोक लाजून आपल्या दाढीतल्या दाढीत हसे. एकीकडे आपल्या पिठाच्या थैल्या गाडीत ठेवी. नंतर तो म्हणे,

'अरे काय गंमत. मी म्हणे इस्पितळात होतो. आपण कधी इस्पितळात जाऊ असा विचारही कधी डोक्यात आला नव्हता.'

तिसरा त्यावर म्हणे, 'हासड पाहू एखादी शिवी. का शिवी हासडायची विसरलास ?'

त्यावर दुसरा एखादा म्हणे, 'आता नाही रे बाबा शिव्या द्यायच्या. स्टोरोत्स्झेवोए गाव ओलांडून पलीकडे गेलो म्हणजे मग तो शिवी देईल.' असं म्हणून सारेजण पुन्हा एकदा मोठ्याने हसत.

आमच्या या पाण्याच्या उपचाराचा आजूबाजूच्या सर्व गावांतून मोठा बोलबाला झाला होता. व आमच्या चक्कीवर येणारी मंडळी त्या गोष्टीची वारंवार आठवण काढून लापोटशी जास्तीत जास्त दोस्ती करायचा प्रयत्न करत. लापोट काही कमी नव्हता. तोही मोठ्या गंभीरतेने हस्तांदोलनासाठी आपला हात पुढे करी आणि म्हणे,

'अहो, तसं पाहिलं तर मी उपप्रमुख आहे. तो असादची आहे ना? तो आमचा खरा गुरू.'

असादची अशावेळी काहीशा तुच्छतेनेच बोलणाऱ्याकडे पाही. बोलणारा तिथेच न थांबता लापोटच्या खांद्यावर जरासं थोपटून म्हणे,

'अरे, तू उपप्रमुख कसा? तुला माहीत आहे का, आमच्या गावात आजकाल कोणी शिवीगाळ करायला लागलं तर त्याला विचारतात, 'काय राव, त्या पाजी डॉक्टरला बोलावू काय? तो आपल्या घरी भेट द्यायला केव्हाही तयार आहे.' अशा तऱ्हेची चर्चा चाले.

आम्ही आमच्या मनाप्रमाणे चक्कीच्या परिसरात खेळीमेळीचं वातावरण आणण्यात यशस्वी झालो. शिस्तसुद्धा चोरट्या व हळुवार पावलांनी शिरली. कोणीही; केव्हाही जुन्या तऱ्हेनं वागायचा प्रयत्न केल्यास त्याला अगदी सावधानतेने ताळ्यावर आणून सोडण्यात येई.

जुलै महिन्यात आम्ही विलेज सोविएतच्या निवडणुका केल्या. लूका सेमियानोविच व त्याच्या दोस्तमंडळींनी फारशी गडबड न करता आपल्या जागा सोडल्या. पावेल पावलोविच निकोलायेन्को याला गावचा प्रमुख व डेनिस कुडल्टीला आमच्या कॉलनीचा प्रमुख म्हणून गावच्या सोविएतवर निवड झाली.

□

९

# ‘ चौथी संमिश्र तुकडी ’

जुलैच्या अखेरीस ५० जणांची आमची संमिश्र तुकडी बुरूनच्या हाताखाली काम करत होती. आमच्या त्या संमिश्र चौथ्या तुकडीचा कमांडर बुरुन ठरून गेला होता. कारण या कठीण पदावर कॉलनीतला कोणताही मुलगा काम करावयास तयार नव्हता.

चौथी संमिश्र तुकडी सकाळपासून संध्याकाळपर्यंत काम करत असे. ही मुलं कुठच्याही इशाऱ्यासाठी थांबत नसत, किंवा त्या तुकडीतल्या मुलांना बोलावण्यास आम्हाला बिगुल वाजवावा लागला नाही, काम संपलं हे कधी सांगावंही लागलं नाही. सध्या बुरुनची चौथी संमिश्र तुकडी धान्य झोडपण्याचं काम करत असे.

पहाटे ४ वाजता बिगुलचा इशारा झाल्याबरोबर नाश्ता वगैरे करून चौथी संमिश्र तुकडी मधल्या ‘व्हाईट हाऊस’च्या मुख्य दरवाजाच्या समोर असलेल्या फुलांच्या ताटव्यासमोर रांगेत उभी राही. सर्व शिक्षकमंडळी बाकी सर्व मुलांच्या उजव्या बाजूला उभी रहात. शिक्षकमंडळींना चौथ्या संमिश्र तुकडीच्या कामात भाग घ्यायची जरुरी नव्हती. त्यापैकी फक्त दोघेजण, जे त्यादिवशी ड्युटीवर असत, त्यांना मात्र थांबावे लागे. कॉलनीमध्ये चौथ्या संमिश्र तुकडीत काम करणं ही एक वहिवाट पडून गेली होती. त्यामुळे कोणीही स्वाभिमानी मनुष्य चौथ्या संमिश्र तुकडीच्या संघटनेची शिस्त तोडू शकत नसे. उजव्या बाजूला रांगेमध्ये शेरे, कालिना, इव्हानोविच, सिलॅंटी, ऑटचेनॅश, ओक्साना सखैल, आमच्या तशाच

दोन बीजी, आमचा सेक्रेटरी स्पिरिडॉन, तसंच चक्की चालवणारा प्रमुख, तसंच आमच्या चाकाच्या वर्कशॉपचा प्रमुख कोझीर, मिझियॅक म्हणजेच आमचा विक्षिप्त माळी, त्याची बायको, झुर्बीन, त्याची सुंदर बायको नाडेन्का आणि अनेकजण उभे रहात. त्यातील काहींची नावंही मला माहीत नाहीत.

याशिवाय कॉलनीच्या इतर तुकड्यांचे स्वयंसेवक किंवा नवव्या, दहाव्या, तबेल्याचं काम करणाऱ्या दुसऱ्या, गाईच्या गोठ्याचं काम करणाऱ्या तिसऱ्या तुकड्यांतील मंडळी पण हजर रहात.

मारिया कोंड्रॅयेवना, बोकोवाबाई आमच्याबरोबर लवकर उठण्याची तसदी घेत असत व तशाच त्या रात्रीच्या कपड्यांत बघण्यासाठी बाहेर येत. परंतु आमच्या मुलांच्या किंवा कर्मचाऱ्यांच्या बरोबर रांगेत उभ्या रहात नसत तर पुढच्या व्हरांड्यात बुरुनबरोबर गप्पा मारत बसत. बरेच दिवसांपासून मारियाबाईंनी मला चहाला किंवा आईस्क्रीम खायला बोलवायचे सोडून दिलं होतं. परंतु तशा त्या इतरांप्रमाणे माझ्याशी पण चांगल्या वागत. त्यांनी न बोलावल्यामुळे मला जराही वाईट वाटलं नाही. उलट मला त्या पूर्वीपेक्षा जास्त बऱ्या वाटू लागल्या होत्या. त्यांचे डोळे व एकंदर भाव पूर्वीपेक्षाही खूपच स्थिर व गंभीर झालेला दिसत होता. तसंच त्यांच्या वागण्यातही जास्त समंजसपणा आला होता. अलिकडे मारियाबाईंनी आमच्या लहान मुलांशी व मुलींशी बरीच दोस्ती केली होती. तसंच सिलॅंटीबरोबरही त्यांची चांगलीच घसट होती. आमच्या काही विक्षिप्त व विचित्र स्वभावाच्या मुलांना ताळ्यावर आणण्यासाठी त्या श्रम घेत. तसं मारियाबाईंचं एकंदर व्यक्तिमत्व आकर्षक व खिलाडू वृत्तीचं होतं. तरीसुद्धा मला त्यांना आठवण करून द्यावी लागे की, 'मारियाबाई, आपणही रांगेत उभ्या रहा. आपणही उभ्या राहिलात म्हणजे काम करणाऱ्या बाकीच्यांना आनंद वाटेल.'

मारियाबाईंनी स्मितहास्य केलं, आपल्या नाजूकसाजूक बोटांनी कपाळावर रुळणाऱ्या केसांच्या बटा मागे सारल्या व आपल्या गोड अशा आवाजात जरा हिसका घेत म्हणाल्या 'फार आभारी आहे हं. आज आपण मला कुठल्या कामाला पाठवणार आहात बरं? धान्य झोडपायला?'

बुरूनने उत्तर दिलं, 'धान्य झोडपायला नाही, पण कागद झोडपायला. तुम्हाला आज किती धान्य वेगळं झालं तो हिशोब लिहावा लागेल.'

'हो. पण मला ते लिहिता येईल का?'

'त्याची काळजी तुम्ही करू नका. मी ते सर्व काही तुम्हाला दाखवीन.'

'पण हे काम अगदीच साधं आहे असं नाही का तुम्हाला वाटत?'

बुरून हसला व म्हणाला, 'तसं पाहिलं तर आमची सगळीच कामं सारखीच आहेत. दुपारी जेव्हा चौथ्या संमिश्र तुकडीची मंडळी जेवायला येतील त्यावेळी तुम्ही आम्हाला काय हवं ते सांगा'.

'अरे वा, कमाल आहे हं आज. आज आम्ही आल्याबरोबर जेवण देणार.'

मारियाबाईंचा एकंदर भाव पाहून मी तोंड बाजूला करून हसलो. मारियाबाई उजव्या बाजूच्या रांगेत उभ्या राहून काहीतरी सांगत होत्या व हसत होत्या. कालिना हा अगदी शिस्तप्रिय मनुष्य मारियाचा हात हातात घेऊन तिच्याशी काहीतरी बोलत होता व हसत होता.

आठ जण ढोल वाजवणारे आमच्याकडे एकदम धावत आले व त्यांनी उजव्या बाजूला आपली रांग लावली. चार जण बिगुल वाजविणारे आपली नेहमीची उडती बागडती चालायची पद्धत सोडून सावकाश येऊन बिगुल वाजविण्याच्या तयारीत उभे राहिले. मग सगळीच मुलं आपापल्या जागी शिस्तीत उभी राहिली.

'सावधान' असं म्हणून 'बावटयाला अभिवादन द्या.'

अभिवादनासाठी सगळे हात भराभर वरती झाले. नास्त्या नोचेवनया ही आमची कॉलनीची मॉनिटर होती. तिनं आज अगदी चांगल्यापैकी पोषाख केला होता व हातावर लाल पट्टा बांधला होता. ढोल व बिगुल यांच्या तालावर आमच्या कॉलनीची रेशमी गॉर्की पताका दोन्ही बाजूला दोन बंदुकधारींच्या पहाऱ्यात चालली होती.

'चार जणांची एक रांग करून आगेकूच करा' असा इशारा दिला गेला.

मोठ्या माणसांच्या रांगेत जरासा गोंधळ झाला. मारियाबाईंनी बारीकसा आवाज काढला व बावरलेल्या चेहऱ्यानं माझ्याकडे पाहिलं. परंतु पुढच्या ढोल वाजवणाऱ्यांच्या आवाजाने झालेली चूक फारशी कुणाच्या लक्षात आली नाही. चौथी संमिश्र तुकडी कामाला निघून गेली.

बुरून धावत धावत येऊन आपल्या तुकडीला मिळाला व नंतर कवायतीच्या तालात चालू लागला. तो आपली तुकडी गव्हाच्या गंजी लावलेल्या ठिकाणी घेऊन गेला. ही गंजी सिलँटीनं लावली होती. आजूबाजूला अशाच लहानमोठ्या गंजी लावलेल्या होत्या. परंतु त्या इतक्या व्यवस्थितपणे लावलेल्या नव्हत्या. त्या राय, ओट, बार्ली वगैरेच्या होत्या. त्या अशा तऱ्हेने लावल्या होत्या की अगदी हाडाचा शेतकरीसुद्धा रायची गंजी व बार्लीची गंजी यातला फरक ओळखू शकला नसता. ह्या गंजी काराबानोव, चोबोट व फ्रेडरेन्को यांनी खूप कष्ट व मेहनत घेऊन तयार केलेल्या होत्या. सिलँटीच्या गंजीची सर त्याला येत नव्हती.

तेलकट कपडे घातलेले यांत्रिकी स्वयंचलित यंत्र चालवणारे चौथ्या संमिश्र तुकडीची वाट पहात यंत्राच्या शेजारी उभे होते. हे यंत्र आम्ही शेजारच्या गावातून आणलं होतं. धान्य झोडपण्याचं यंत्र मात्र आम्ही नुकतेच विकत घेतलेलं आमचं स्वतःचंच होतं. हे यंत्र आम्ही मागच्या वसंतऋतूत हप्तेबंदीनं आणलं होतं. आमच्या या नव्या आयुष्यात हे यंत्र पण नवीनच होतं.

बुरूननं आदल्या दिवशी आखणी केल्याप्रमाणे आपली तुकडी बरोबर उभी

केली. तो संमिश्र चौथ्या तुकडीचा जुनाच कमांडर होता. आमची पताका ओटच्या गंजीवर आम्ही नेऊन ठेवली.

गहू झोडपण्याचं काम संध्याकाळच्या जेवणापर्यंत संपलं. कापणीयंत्राच्या वरच्या फळीवर हसऱ्या व आनंदी चेहऱ्यांची गर्दी दिसत होती. त्या आमच्या सगळ्या मुलींच्या सर्वांगावर गव्हाचा तूस उडाल्याने त्यांचे चेहरे सोनेरी दिसत होते व त्यातून त्यांचे डोळे तेवढे चकाकत होते. त्या सर्व मुलींच्या घोळक्यात लापोट तेवढा एकटाच मुलगा होता. तो जराही दमत नसे. त्याचं तोंड आणि त्याची पाठ यांना जराही विश्रांती नसे. आमचा सिलँटी सगळ्यात जास्त महत्वाच्या व जबाबदारीच्या जागेवर होता. त्याचं टक्कल पडलेलं डोकं व तुरळक मिशा यामुद्धा गव्हाच्या तुसाने झाकून गेल्या होत्या.

एकाएकी लापोट ओक्सानाकडे वळून म्हणाला, 'अग बये, आपल्या मुलांनी तुझी गंमत केली आणि तुला गहू आहे असं सांगितलं. तो गहू नव्हे. तो आहे वाटाणा बरं!'

ओक्सानानं गव्हाची एक सबंध पेंढी न बांधताच हातात घेतली व ती लापोटच्या हातावर ठेवली. तरीसुद्धा आपले शब्द चुकीचे आहेत असं मानायला लापोट तयार नव्हता.

मला धान्य झोडपण्याचं काम फार आवडत असे. विशेषत: संध्याकाळच्या वेळी झोडपायला एक प्रकारची मजा येत असे. झोडपण्याच्या यांत्रिक कामामध्ये एक प्रकारचं संगीत आपोआपच चालत असे व कानांना ते विशिष्ट प्रकारचं संगीत ऐकायची सवय झाली होती. त्या संगीतात क्षणाक्षणाला बदल व्हायचा. तरीसुद्धा ते एकाच प्रकारचं आहे असं वाटत असे. हे संगीत त्या गुंतागुंतीच्या हालचालीत एक प्रकारची आनंदी पार्श्वभूमी क्वचित कंटाळवाणी परंतु कधीही न थांबणारी, न थकणारी असे. एकएक थप्पी जणू काही जादूच्या करामतीप्रमाणे त्या गंजीतून उठे. व जणू काही आपला शेवटचा प्रवास करण्यासाठी मुलांच्या प्रेमळ हातांतून त्या आधाशी यंत्रामध्ये जाऊन पडे. एका बाजूला कडब्याचा व तूसकटाचा ढीग व दुसऱ्या बाजूला त्यापासून जबरदस्तीने वेगळे केलेले बिचारे दाणे यांची रास जमा होई. अशा तऱ्हेने बिचाऱ्या मृत्युशय्येवर पोचवल्या गेलेल्या कडब्यालाच उद्देशून आमच्या मुलांच्या चेष्टा, कोटया चालत व त्यावर हास्याचे फवारे उडत. मुलं एकीकडे कंटाळलेली, थकलेली, सारा वेळ ओझी इकडून तिकडे नेताना पळताना वाकावे लागल्याने दमलेली, धुळीनं माखलेली अशी उन्हाळ्यातल्या संध्याकाळच्या शांत व थंड वातावरणाने उत्साहित होत. आवाजाचा एकसूत्रीपणा, यंत्राच्या किणकिणीचा रटाळपणा यांच्या जोडीला यंत्राच्या वरच्या भागात काम करणाऱ्या माणसांच्या थकव्यातून निर्माण झालेल्या कर्कश व तापदायक आवाजाची सतत भर पडत असे. त्या सगळ्या गोष्टी, वेगवेगळ्या करून सांगणे कठीण असले तरीसुद्धा त्या धान्य

झोडपण्याच्या चाललेल्या कामाकडे सतत पहाण्यात मौज वाटे व त्यापासून दूर जाऊ नये असं वाटे. गव्हाच्या तुसांनी भरलेल्या आमच्या मुलांकडे बघून मला फोटोच्या निगेटिव्हची आठवण होई. भुऱ्या केसांची, लाल केसांची, काळ्या केसांची सगळीच डोकी एकसारखी दिसत. या सर्वात मान मोडून सकाळपासून हातात वही घेऊन सतत उभी असलेली मारियाबाईंची आकृती व तिच्या शेजारी असलेली दुसरी आकृती ओळखणे कठीण होई. पण मला माहीत होतं की 'ती दुसरी आकृती म्हणजे एडवर्ड निकोलाएविचची होती. हे त्याच्या अतिशय आर्जवी आवाजावरून ओळखता येत होतं.

'कॉमरेड बोकोवा, आपली बार्ली एकूण किती झाली?' असं त्याने विचारलं.

मारियाबाईंनी मावळत्या सूर्यकिरणांच्या उजेडात वही धरून '४०० मण' असं थकलेल्या आवाजात उत्तर दिलं. तिच्या त्या आवाजाने मला तिची फार किंव आली. लापोटसारख्याची गोष्ट निराळीच होती. कितीही थकलेला असला तरी तो त्यातून काहीतरी थकवा झाकायचा मार्ग शोधून काढत असे.

'गॅलॅटेन्को, गॅलॅटेन्को,' असं तो मोठमोठ्याने ओरडला. त्याचा आवाज खळ्यावर दुमदुमला.

गॅलॅटेन्को जवळजवळ दोन मण वजनाचा गवताचा भारा कसाबसा डोक्यावर धरून लडखडत चालला होता. तो एकदम थांबला व तितक्याच जोराने परत ओरडून त्याने 'काय पाहिजे तुला ?' असं लापोटला विचारलं.

'तू एक मिनिट ताबडतोब इकडे ये पाहू,' असं लापोट म्हणाला.

गॅलॅटेन्कोची लापोटवर कमालीची भक्ती होती. तो लापोटच्या विनोदी, कमालीच्या खेळकर स्वभावावर खूष होता व गॅलॅटेन्कोचं कोणतंही काम एकटा लापोट समजून घेत असे. गॅलॅटेन्को हा आळशी नाही याबद्दल लापोट सर्वांची खात्री करून देत असे. अशी त्या दोघांची जोडी होती.

गॅलॅटेन्कोनं डोक्यावरचा भारा इंजिनपुढे टाकला व तो ताबडतोब झोडपण्याच्या यंत्राकडे धावला. हातातल्या फावड्यावर तो जरा रेलला, मनातल्या मनात आपल्याला एक मिनिटाची का होईना, विश्रांती घ्यायला मिळाली याबद्दल तो मनातून खूष होता. त्यानं लापोटला विचारले, 'तू मला कशासाठी रे बोलावलंस ?'

लापोट खाली वाकून त्याला म्हणाला, 'मी सांगतो ते ऐक.' आजूबाजूला उभे असलेले सर्वजण त्याचं संभाषण मोठ्या उत्सुकतेने ऐकू लागले. कारण नेहमीच त्या दोघांच्या संभाषणातून बाकीच्यांची काहीतरी करमणूक होत असे.

'मी ऐकतोय तू सांग' गॅलॅटेन्को.

'तू आपल्या झोपण्याच्या खोलीत जा बरं.'

'बरं जातो.'

‘माझ्या उशीखाली हात घाल.’

‘उशीखाली हात ? तो कशासाठी?’

‘होय रे माझ्या उशीखाली हात घाल. आणि तुला तिथे काय सापडेल ?’

‘मला समजलं. तुझ्या उशीखाली हात घालायचा तिथे काहीतरी आहे.’

‘माझ्या उशीखाली एक हाताची जोडी तुला सापडेल.’

‘मी ती घेऊन काय करू, असं तुझं म्हणणं आहे?’ असं गॅलॅटेन्कोनं विचारलं.

‘ती इकडे घेऊन ये आणि मला दे. हे माझे हात काही फारसे चांगले नाहीत,’ असं म्हणून लापोटने आपले दोन्ही हात बाहेर काढून दाखवले व आजूबाजूला उभे असलेले सर्वजण मोठ्याने हसले.

‘असं काय ?’ असं म्हणून गॅलॅटेन्को गप्प बसला. त्यानं पाहिलं की सर्वजण लापोटच्या बोलण्यावर आपल्याकडे बघून हसले. म्हणून आपण काहीही मूर्खासारखं बोलायचं नाही असं त्यानं अगदी मनाशी ठरवलं. त्याला आपण खरोखरच शहाणपणा केला असं थोडंसं समाधान वाटलं. तरीही त्याच्याकडे बघून सर्वजण हसतच राहिले. झोडपण्याचं यंत्र हळूहळू आवाज करत होतं. बुरुन येऊन त्याच्या अंगावर एकदम खेकसला,

‘काय फाजिलपणा चाललाय ? तू आपलं काम का थांबवलंस ? अरे, गॅलॅटेन्को, मी तुला सांगतोय आलं का लक्षात ?’

सगळेजण एकदम स्वस्थ बसले. लापोट गंभीरपणे व अगदी कमालीच्या थकलेल्या काळजीयुक्त स्वरात व बुरुनवरच्या विश्वासाने त्याला म्हणाला,

‘अरे, मी सांगतो तुला. हे माझे हात आहेत ना, ते अगदी पार थकून गेले आहेत म्हणून गॅलॅटेन्कोला जाऊ दे व माझे दुसरे राखीव हात घेऊन येऊ दे.’

बुरुन एकदम जरा तडकला व गॅलॅटेन्कोवर जरासा चिडून म्हणाला,

‘जा बरं बाळ आणि लापोटचे हात घेऊन ये. त्यामुळं तुला काही फारसा त्रास पोचणार नाही. कारण तू इतका आळशी आहेस त्याला काय करायचं ?’

धान्य झोडपण्याचं काम एकदाचं संपलं. श्वास रोखून धरलेल्यांनी एकदम हसायला सुरुवात केली. आज शेरेसुद्धा मनापासून हसला. यंत्रावर काम करणारे ते कामगार इंजिन सोडून गुडघ्यावर हात ठेऊन मोठमोठ्याने हसत सुटले. बिचारा गॅलॅटेन्को डॉर्मिटरीकडे धावला व सिलँटी त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहिला.

तो म्हणाला, ‘अरे काय रे दोस्तांनो, त्याची अशी टवाळी काय करता ?’

गॅलॅटेन्को एकदम स्तब्ध उभा राहिला व विचार करू लागला. काराबानोव गवताच्या गंजीवर उभा राहून गॅलॅटेन्कोवर ओरडला,

‘अरे, तू उभा काय राहिलायंस ?’

पण गॅलॅटेन्को नुसताच हसला. आत्ताशी त्याच्या डोक्यात प्रकाश पडला. तो हसतच हळूहळू खळ्यापाशी आला. मुलांनी त्याला ओरडून विचारलं,

'अरे तू कुठे गेला होतास ?'

तो म्हणाला, 'लापोटनं मला त्याचे राखीव हात घेऊन यायला सांगितलं होतं.'

'मग तू ते जाऊन आणलेस का ?'

'छे रे, त्याचे असे राखीव हात नाहीतच. तो उगाच मला मूर्ख बनवत होता.

बुरुन म्हणाला, 'आता तुमचा पाणचटपणा पुरे हा. तुमचे खाजगी हात वगैरे तिथेच राहू द्या. मुकाट्याने भराभरा आपलं काम संपवा पाहू.'

'बरं आहे. तू पुरे कर म्हणतोस तर पुरे करतो. आपल्याला आपले हे जुनेच हात वापरावे लागतील,' अशी लापोटनं मल्लिनाथी केली.

नऊ वाजता शेरेनं इंजिन बंद केलं. बुरुनकडे जाऊन तो म्हणाला, 'मुलं तर सगळी थकलेली दिसतात. पण अजून जवळजवळ अर्धा तास पुरेल एवढं काम आपल्याकडे शिल्लक आहे. मग काय करायचं ?'

बुरुन म्हणाला, 'काही हरकत नाही. आपण ते सर्व संपवून टाकू.'

लापोट वरून ओरडला, 'कॉमरेड गॉर्काईट्स, अजून अर्धा तास राहिलेलं काम संपवायला लागेल. पुढच्या अर्ध्या तासात आपणच संपून जाऊ. म्हणून माझी या प्रस्तावाला संमती नाही.'

'म्हणजे तुला म्हणायचंय तरी काय ?' असं बुरुननं रागातच विचारलं.

'हो, माझा याला विरोध आहेच. अरे, त्या अर्ध्या तासात आपण खरो-खरच खलास होऊन जाऊ, होय की नाही रे गॅलॅटेन्को ?'

'हो, लापोट म्हणतो ते अगदी बरोबर आहे. आपण खरोखरच पुढच्या अर्ध्या तासात खलास होऊन जाऊ,' असं गॅलॅटेन्को म्हणाला.

लापोटनं आपली मूठ वळवून हात वरती केला आणि तो ओरडला, 'आणखी अर्धा तास आम्ही काम करणार नाही. आमचं म्हणणं हे काम आपण पाव तासात म्हणजे १५ मिनिटात सारा ढीग संपवला पाहिजे. तुमचे अर्धा तास वगैरे मी काही जाणत नाही.'

'लापोट म्हणतो ते अगदी बरोबर आहे,' असं गॅलॅटेन्कोनं आपलं मत दिलं.

शेरेनं इंजिन चालू केलं व पुन्हा एकदा हास्याचा फवारा उडला. खरो-खरच सगळं काम २० मिनिटात संपलं. सर्वांना तिथेच गवतावर पडून झोपाव असं वाटलं. कारण सगळेजण कमालीचे दमलेले होते. पण बुरुनचा हुकूम आला,

'होशियार'

बिगुल वाजविणारे व ढोल वाजविणारे इतका वेळ बाजूला उभे होते, ते धावत पुढे आले. चौथी संमिश्र तुकडी त्यांच्यामागे आपली पताका घेऊन चालू लागली व ती त्यांनी व्हाईट हाऊसमध्ये नेऊन ठेवली. मी मिळेल तिथेच त्या खळ्यावर थोडा वेळ रेंगाळलो. व्हाईट हाऊसमधून, मुलांच्या बावटचाला दिलेल्या सलामीचे आवाज मी उभा होतो तिथपर्यंत ऐकू येत होते. अंधारात एक व्यक्ती हातात एक काठी घेऊन एकाएकी माझ्या अंगावर येऊन आदळली.

'कोण आहे ?' मी जोरात विचारलं.

'माझं नाव व्होलोविक, अँटन सेमियानोविच. मी तुमच्याकडे झोडपणी यंत्र मागण्यासाठी आलोय. मी व्होलोविक गावचा रहाणारा आहे.'

'माझ्याबरोबर चल,' असं मी त्याला म्हणालो.

आम्ही दोघे व्हाईट हाऊसकडे गेलो. व्होलोपिक तसा वयस्कर दिसत होता. अंधारात तो स्वत:शीच बडबडत चालला होता.

'इथे खरोखरच छान आहे हं. इथे रहायला कुणालाही आवडेल.'

'तुम्ही काय म्हणता ?' असं मी विचारलं.

यावर तो म्हणाला, 'तुम्ही क्रूस व पताका घेऊन धान्य झोडपणी करता ? खरोखरच ही चांगली गोष्ट आहे.'

'तुला क्रूस कुठे दिसला बाबा ? आमच्याकडे क्रूस वगैरे काही नाही. फक्त पताका आहे. आमच्याकडे पाळकसुद्धा नाही.'

व्होलोविक थोडासा पुढे गेला व काठीने काहीतरी दाखवत म्हणाला, 'अहो पाळक नसला तरी काही बिघडत नाही. परंतु खरं तर असं आहे की लोकांनी उत्सव वगैरे करावे म्हणजे एक प्रकारची सुट्टीच मिळते. लोकांना सुगीमध्ये एकत्र आणणं हा सर्वात मोठा उत्सव आहे. आपले लोक आजकाल हेच मुख्य विसरलेले आहेत.'

व्हाईट हाऊसमध्ये खूपच आवाज येत होते. खरं तर सगळी मुलं खरोखर थकली होती. परंतु नदीत डुंबायचा त्यांना कंटाळा येत नाही. नदीत डुंबून आली की सारा थकवा दूर होतो. बगीचात जेवणाची टेबलं मांडलेली होती व पोरांचा गोंगाट चालू होता. [illegible]बाई मात्र अगदी रडकुंडीला आली होती. कारण ती दमली होती. तिला आमच्या कॉलनीतली मुलं आवडत होती व खऱ्याखुऱ्या माणुसकीची जाण तिच्या मनात आता रुजली होती. तिनंही काम करणाऱ्या, आनंदी व मोकळ्या सामुदायिकाची रहाणी कशी असते ते प्रत्यक्ष अनुभवलं होतं.

'काय बाई, तुम्हाला दिलेलं काम फारसं अवघड नाही वाटलं ना तुम्हाला?' बुरुननं तिला विचारलं.

'मला काही समजत नाही बाबा म्हटलं तर ते कठीणच होतं. पण ते फारसं महत्वाचं नाही. कसलंही काम असलं तरी त्यात आनंद असतो एवढं मात्र खरं'.

सिलँटी माझ्या शेजारी जेवायला बसला होता आणि अगदी हळू आवाजात

सांगू लागला, 'ते रविवारी लग्नाचं ठरवायला येणार आहेत असं त्यांनी मला तुम्हाला सांगायला सांगितलंय. आपल्या व्होल्गाबद्दलच सांगणार आहेत हे तुमच्या लक्षात आलंच असेल ना ?'

'निकोलायेन्कोकडून का ?' मी त्याला विचारलं.

'हे पहा. तो म्हातारा पावेल इव्हानोविच आहे ना ? त्याच्याकडून. मी सांगतो की अँटन, तुम्ही अगदी सगळं काही व्यवस्थित करा हं. तुम्हाला माहीत आहे ना की टॉवेलखाली हात झाकायचे असतात. भाकरीबरोबर मीठ द्यायचं असतं. वगैरे वगैरे सर्व काही.'

'हे पहा सिलँटी, तूच ती सर्व तयारी कर ना. म्हणजे बरं होईल.'

'तयारी सर्व काही करू हो. पण तुम्हाला माहीत आहे ना की अशा वेळेला थोडंसं पिणबिणं चालतंच.'

'हे बघ, ती दारुबिरू काही चालणार नाही हं. सिलँटी तू चांगल्या दोन वाईनच्या बाटल्या तयार करून आण,' असं मी त्याला बजावलं. □

# १०

## ' लग्नजुळवणी '

रविवारी आमच्याकडे पावेल इव्हानोविच निकोलायेन्को यांच्याकडून काही मंडळी भेटायला आली. त्यामध्ये कुझ्मा पेट्रोविच, मोगोरीच, ऑसिप इव्हानोविच, स्टोमुखोव यांना आम्ही ओळखत होतो. कुझ्मा पेट्रोविच हा तर अगदी आमच्या चांगलाच माहितीचा होता. कारण तो नदीच्या पलिकडच्या तीरावर आमच्यापासून जवळच रहात होता. कुझ्मा हा एक कुचकामी व नुसताच बडबड्या माणूस. त्याचं स्वत:चं शेत वाळूने व काही ठिकाणी रानटी झाडांनी भरलेलं होतं. तो आपल्या शेतावर कधीच काम करत नसे व जे काय योगायोगाने उगवेल ते तो चालवून घेत असे. त्याच्या शेतातून अनेक पाऊलवाटा गेलेल्या होत्या. कुझ्माचा चेहरा त्याच्या त्या जमिनीसारखाच होता. त्यावर कोणतीही भावना व्यवस्थितपणे दिसत नसे. त्याची दाढीपण अस्ताव्यस्त वाढलेली होती. तिला व्यवस्थित कापून आकार देण्याचे कधीही त्याच्या डोक्यात आलं नाही. त्याच्या चेहऱ्यावरही अनेक आठ्या, सुरकुत्या यांचं जाळं पसरलं होतं. अशा त्याच्या त्या चेहऱ्यात व शेताच्या ठेवणीत फक्त एकाच गोष्टीचा फरक होता. आणि तो म्हणजे त्याचं लांबट निमुळतं नाक. ओसिप हा याउलट चांगलाच देखणा होता. त्याचा चेहरा खरोखरच आकर्षक असून त्याच्या शरीराला एक प्रकारचं सौष्ठव होतं. गोन्चारोवका गावात त्याच्याइतका चांगला दुसरा मनुष्य नव्हता. त्याच्या मिशा भरदार व लालसर होत्या. डोळे मोठे व पाणीदार होते. त्याचा वेष थोडाबहुत सैनिकी व थोडाबहुत

शहरी थाटाचा होता. तो अतिशय तरतरीत व सटपटीत होता. त्याचे सुखवस्तू शेतकऱ्यांमध्ये बरेच नात्यागोत्याचे संबंध होते. असं असूनही त्याच्या मालकीची थोडीही जमीन नव्हती. त्याचा शिकार करण्याचा धंदा होता एवढंच सर्वांना माहीत होतं. तो नदीच्या तीरावर एकटाच एका झोपडीत रहात असे. त्याच्याकडे कोणी येत जात नसे.

ही पाहुणेमंडळी येणार आहेत हे जरी आम्हाला माहीत असलं तरी ती एकदम अचानक येऊन थडकली त्यामुळे आमची काहीच तयारी झालेली नव्हती. व असल्या बाबतीत काय तयारी करायची त्याची आम्हाला काहीच माहिती नव्हती. ते आले त्यावेळेस आमचं ऑफिस एकदम ठाकठीक होतं. मी आणि कालिना याशिवाय त्यावेळी ऑफिसमध्ये तिसरं कोणीही नव्हतं. ही मंडळी आली व आमच्याशी हस्तांदोलन करून कोचावर बसली. मला काय बोलावं, विषयाला सुरुवात कशी करावी तेच समजेना. परंतु ऑसिप इव्हानोविचनं बोलायला सुरुवात केली, व त्यामुळे मला हायसं वाटलं.

तो म्हणाला, 'पूर्वी अशाप्रसंगी लोक शिकारीच्या गोष्टी काढत की आम्ही असे शिकारीला गेलो होतो. आम्हाला एक कोल्हा भेटला. तो कोल्हा म्हणजे एक सुंदर मुलगी होती. वगैरे ... वगैरे ... मला वाटतं आपल्याला काही अशा विषयानं सुरुवात करायची जरूरी नाही. जरी मी स्वत: शिकारी असलो तरीसुद्धा मला असं वाटत नाही.'

'अगदी बरोबर आहे,' मी म्हटलं.

कुझ्मा पेट्रोविचनं आपली बैठक बदलली आणि आपली दाढी हलवत तो म्हणाला,

'यात काही अर्थ नाही असं मला वाटतं हं!'

यावर स्टोमुखोवनं त्याच्यात जरा सुधारणा केली. तो म्हणाला,

'याला काही अर्थ नाही असं नव्हे. परंतु आता काळ बदललाय व तसंच आपणही बदललं पाहिजे.'

मोठ्या गंभीरतेने कालिना म्हणाला, 'काळ हा बदलतच असतो. परंतु काही लोकांची मनं मात्र तशीच अंधारात वावरत असतात. त्यांना नव्या गोष्टीची चाहूल नको असते. म्हणून काही तरी खुळचट वादळ, चंद्र, काळं मांजर वगैरेबद्दल कल्पना उराशी बाळगून ते स्वत: अज्ञानात राहतात व दुसऱ्यांनाही अज्ञानात ठेवायचा प्रयत्न करतात. परंतु आता आपल्याकडे सोविएत सरकार आहे व म्हणून आपल्याला असल्या गोष्टींना घाबरायचं कारणच नाही. प्रगतीचा मार्ग खुंटला तरची गोष्ट निराळी.'

आपण काही तात्विक चर्चेसाठी इथे जमलो नाही ही आठवण कालिनाला करून देण्यासाठी स्टोमुखोव म्हणाला,

'हे बघा, आम्ही एकदम विषयाला हात घालतो. पावेल इव्हानोविच निकालायेन्को व त्याची बायको येवडोकिया स्टेपोनोवना यांचा मुलगा पावेल पावलोविच सध्या आपल्या गाव सोविएतचा अध्यक्ष आहे हे तुम्हाला माहीतच आहे. तुम्ही या कॉलनीतल्या मुलांचे तसे वडीलच आहात. तुमच्याच कॉलनीतली एक मुलगी ओल्या व्हेरोनोव्हा हिला मागणी घालण्यासाठी आम्ही आलो आहोत.'

त्यावर कुझ्मा म्हणाला, 'तुमचं मत तुम्ही सांगावं अशी आम्ही विनंती करतो. हा संबंध जर तुम्हाला मान्य असेल तर आपल्या रिवाजाप्रमाणे टॉवेल्स व पाव आणा. तुम्हाला जर हे संमत नसेल तर आम्ही तुम्हाला थोडासा त्रास दिल्याबद्दल राग मानू नका.'

'अहो, एवढंच नाही तुमच्या त्या आचरट पद्धतीप्रमाणे जर संबंध जुळला नाही तर तुम्ही भोपळा घरी घेऊन जायला पाहिजे,' असं कालिना मध्येच म्हणाला.

ओसिपनं हसून उत्तर दिलं, 'महाशय, एकतर हा भोपळ्याचा मौसम नाही म्हणून ते घेऊन जाण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.'

कालिना म्हणाला, 'ते खरं नव्हे. पण पूर्वीच्या काळी म्हणे असल्या मूर्ख चालीरीतींवर विश्वास असल्याने मुली खूपसे भोपळे आपल्या घरी जमवून ठेवत व कोणीच मागणी घालायला आलं नाही तर त्या भोपळ्याची छानपैकी खीर बनवत. भाकरीबरोबर ही खीर चांगली लागते हे तुम्हाला माहीत आहे ना?'

हे विषयांतर संपल्यावर ओसिप म्हणाला, 'आता तुमचं काय मत आहे ते सांगा पाहू.'

मी इतका वेळ गप्प बसून ऐकत होतो. मी म्हटलं, 'पावेल इव्हानोविच व येवडोकिया स्टेपोनोवना यांनी आम्हाला दाखविलेल्या आदराबद्दल मी त्यांचा आभारी आहे. मी काही मुलीचा बापही नाही किंवा मला वडिलकीचा अधिकारही नाही. तुम्ही प्रत्यक्ष ओल्यालाच हे विचारावं. तिची संमती असेल तर हा प्रश्न बाकीच्या तपशीलासाठी कमांडर कौन्सिलपुढे ठेवण्यात येईल.'

'तुम्ही काय करावं हे सांगण्याचा आमचा अधिकार नाही. तुमच्या नियमांप्रमाणे व पद्धतीप्रमाणे तुम्ही जरूर वागावं,' असं ओसिप म्हणाला.

मी ऑफिसमधून शेजारच्या खोलीत गेलो व कॉलनी मॉनिटरला बिगुल वाजवून कमांडर कौन्सिलची तातडीची सभा बोलवायला सांगितली. संबंध कॉलनीत एकदम खळबळ माजली. नात्स्या गडबडीने माझ्याकडे आली व हसत हसत म्हणाली,

'आन्तोन, टॉवेल काय आम्ही इथं ऑफिसात आणायचे?'

'टॉवेल आणायची एवढ्यात घाई करू नकोस. अजून काही सर्व गोष्टी

ठरल्या नाहीत. तू इथेच आजूबाजूला रहा व जरूर पडल्यास मी तुला हाका मारीन.'

'बरं! पण टॉवेल बांधणार कोण ?'

'ते कशासाठी बांधायचे ?'

'अहो, ते टॉवेल बांधायचे असतात. मागणी घालायला आलेल्याला त्या टॉवेलांनी बांधून ठेवायचं असतं.'

माझ्या बाजूला पावाची मोठी लादी व एका हातात मिठाची बाटली घेऊन टोस्का सोलोविए उभा होता. तो एकीकडे त्या मिठाच्या बाटलीशी चाळा करी. एवढ्यात सिलँटी तेथे येऊन टपकला.

'अरे, तू तो पाव आणि मीठ हातात धरून काय करतो आहेस ? ते दोन्ही तू एका बशीत ठेव,' असं म्हणून तो खाली वाकला व हसू लपवायचा त्यानं प्रयत्न केला.

'ओ हो, ही सगळी लहानलहान पोरं काय ? काय खाण्याची तयारी करायची आहे ?'

एकातेरिना ग्रीगोर्येवना त्याचवेळी आत आली व मला एकदम हायसं वाटलं, मी तिला म्हटलं,

'बाई गं, आता यात काय काय करायचं ते तूच आम्हाला सांग.'

'मी तर कित्येक वर्षांपासून हे सारं पहाते आहे. ही सारी पोरं पावाची ही लादी घेऊन आज सकाळपासून सारखी फिरताहेत. तुम्ही माझ्याबरोबर या. काही काळजी करू नका. आम्ही मुलींच्या डॉरमिटरीत आहोत. आम्हाला केव्हाही बोलावणं पाठवा.'

आमचे सारे कमांडर अनवाणीच धावत ऑफिसमध्ये आले. त्यावेळी कोण कोण कमांडर होते ते अजूनही मला चांगलं आठवतं.

पहिली तुकडी (मोची काम) कमांडर–गुड.

दुसरी तुकडी (घोड्यांची पागा सांभाळणारी) कमांडर–ब्रातचिन्को.

तिसरी तुकडी (गाईचा गोठा सांभाळणारी) कमांडर–ऑप्रिश्को.

चौथी तुकडी (सुतार काम) कमांडर–तारानेट.

पाचवी तुकडी (मुलींची) कमांडर–नोचेवनया.

सहावी तुकडी (लोहार काम) कमांडर–बेलुखिन.

सातव्या तुकडीचा कमांडर–व्हेटस्कोव्हकी.

आठव्या तुकडीचा कमांडर–काराबानोव.

नववी तुकडी (दळणाची चक्की) कमांडर–असादची.

दहावी तुकडी (डुकरांची राखण) कमांडर–स्टुपिदसिन.

अकरावी तुकडी (लहान मुलांचा सांभाळ) कमांडर–जॉर्जियोव्हस्की.

कमांडर कौन्सिलची चिटणीस–ओल्या व्हेर्शनेव.

भांडाराचा प्रमुख– आल्योश्का व्होल्कोव.

दुय्यम शेतकीतज्ञ– ओल्या व्होरोनोवा

खरं तर यापेक्षाही कमांडर कौन्सिलमध्ये अनेकजण होते. याच्या जोडीला कोम्सोमोल संघटनेचे झादारोव, झोर्का व्होल्कोव्ह, व्होलोकोव्ह, बुरून हे सर्वजण व याशिवाय काही इतर प्रमुख, विशेषतः प्रिखादकोव्ह, सोरोका, गोलोस, चोबोट, ओव्हचोरन्को, फेडरेन्को, कोटर्चो, हे सर्वजण. याशिवाय आमची छोटीछोटी अनेक उत्सुक मंडळी मिटका, व्हिटका, टोस्का, बांका, शेल्यापुतीन वगैरे. याशिवाय आमच्या शिक्षकांचं व कार्यकर्त्यांचं मंडळ, याच्या जोडीला कालिना इव्हानोविच व सिलँटी सेमियानोविच हेही असत. हे असे सारेजण जमले म्हणजे सर्वांना पुरतील एवढ्या खुर्च्या आमच्याकडे नसत. मग अशावेळी काहीजण खिडक्यावर चढून बसले होते किंवा व्हरांड्यात माना उंच करून डोकावत होते.

ओल्या व्हेर्शनेवनं सभेच्या मुख्य कामकाजाला सुरुवात केली. लग्न ठरविण्यासाठी आलेल्या मंडळींच्या भोवती आमच्या १०–१२ पोरांनी गराडा घातला. आमची ती उघड्या दंडाची व अनवाणी मुलं पाहून त्या मंडळींचं गांभीर्य कुठल्याकुठे नाहीसं झालं.

मी कमांडर्सना, ही मंडळी लग्न ठरवायला आलेली आहेत, असं सांगितलं. खरं तर आमच्या कमांडर कौन्सिलला ही बातमी काही नवीन नव्हती. कारण अनेकदा पावेल पावलोविच आणि ओल्या यांच्या दोस्तीबद्दल चर्चा झालेली होती. पण व्हेर्शनेवनं औपचारिकपणे ओल्याला विचारलं, ‘ काय गं, तुला पावेलशी लग्न करायचंय का?’

यावर किंचित लाजून ओल्या म्हणाली, ‘ अर्थातच.’

लापोट मध्येच म्हणाला, ‘ हा वेडे, असं नसतं काही म्हणायचं. प्रथम तू नाही म्हणायचं, मग आम्ही तुझी समजूत घालायला लागू. त्याशिवाय मजा येत नाही.’

‘ अरे, त्यात कसली मजा? आपल्याला मुद्द्याला हात घालायचाय. तुम्ही आम्हाला तुमच्या मिळकत–बिळकतीची माहिती स्वच्छपणे सांगा,’ कालिनानं म्हटलं.

ओसिप इव्हानोविचनं आपल्या मिशा सारख्या करत बोलायला सुरुवात केली.

‘ हे पहा. तुमची जर या लग्नाला संमती असेल तर मेजवानी देण्याचं आणि लग्न समारंभ करण्याचं काम आम्ही आमच्यावर घेतो. आणि मग हे नवदांपत्य पावेलच्या आईवडिलांजवळ राहील. मग मिळकतीची वाटणी सगळ्यांना सारखीच होईल.’

'मग ती नवीन झोपडी जी बांधली आहे ती कुणासाठी ?' काराबानोवनं विचारलं.

'ती होय? ती आहे मिखाईलसाठी.'

'अहो, पावेल सगळ्यात मोठा आहे ना?'

'आहे ना. नाही कोण म्हणतंय ? परंतु ही व्यवस्था त्याच्या वडिलांनीच ठरवली आहे. असं पहा, पावेलनं आपली बायको कॉलनीतल्या मुलीतनं पसंत केलीय.'

यावर कोव्हलनं जरा घुश्श्यातच विचारलं, 'काय हो, ती कॉलनीतली आहे म्हणजे काय? याचा अर्थ काय?'

ओसिपला यावर काय उत्तर द्यावं ते समजेना. कुझ्मा पेट्रोविचनं त्याच्या करडचा आवाजात बोलायला सुरुवात केली.

'मी सांगतो तुम्हाला. पावेलचं म्हणणं असं की, बायकोनं नवऱ्याच्या घरी जायचं. कारण की पावेलचे वडिल जिवंत आहेत म्हणजेच ओल्याचा सासरा आहे. उलट मिखाईल हा सर्जी ग्रेच्यानीच्या मुलीबरोबर लग्न करणार. याउलट तुमची मुलगी पावेल पावलोविचबरोबर सून म्हणून येणार व पावेलची या गोष्टीला संमती आहे.'

'अशामुळे शेवटी मला वाटतं, आपल्याला भोपळ्याचीच देवाणघेवाण करावी लागेल,' असं काराबानोव जोराने म्हणाला, 'पावेल पावलोविचच्या मताला काहीच अर्थ नाही. म्हणून आम्हाला त्याची पर्वा करायचं काहीच कारण नाही. कमांडर कौन्सिल असल्या गोष्टीला मान्यता देऊन ओल्याचं लग्न करून द्यायला तयार नाही. म्हणजे याचा अर्थ असा की, त्या म्हाताऱ्याला तुमच्या शेतात राबायला एका माणसाची गरज आहे आणि ओल्याला सून करून घेऊन ती गरज तुम्ही भागवणार.'

कोल्या रागाने काराबानोववर ओरडला,

'सांभाळून बोल.'

'बरं बरं ! मी माझा तो शब्द मागे घेतो. ते सोडा, पण हा लग्न समारंभ असं जे तुम्ही म्हणालात त्याचा अर्थ काय ?'

'ते बरोबर आहे. लग्न समारंभ झालाच पाहिजे. आमच्या गावात पाळका-शिवाय (प्रिस्ट) कोणाचंही लग्न झालं नाही. आमच्या गावात असं लग्न अद्याप-पर्यंत कधीही झालं नाही.'

'परंतु आता इथून पुढे मात्र तसं होणार आहे,' असं कोव्हलनं सांगितलं.

कुझ्मा पेट्रोविच आपली दाढी खाजवू लागला. जराशानं तो म्हणाला, 'काय घडेल आणि काय घडणार नाही हे कोण सांगू शकेल ? पण आमच्या दृष्टीने मात्र ते योग्य नाही. असं करणं पाप आहे असं आम्ही समजतो.'

थोडावेळ एकदम शांतता पसरली. सारे कमांडर विचार करत होते. हे

लग्न मोडणार असंच आम्हाला वाटलं. मला माझ्या पोरांचीच भीती वाटत होती. हे आलेले मध्यस्थ जरा काही वेडंवाकडं बोलले तर कदाचित ही आमची पोरं त्यांना सरळ परत पाठवून देतील.

इतक्यात कोल्याला काहीतरी सुचलं. कोल्यानं ओल्याकडं वळून विचारलं, ' काय गं, तुला भटजीकडून लग्न लावून घ्यायचंय का ? '

' अरे कोल्या, तुला झालंय काय ? तुझा नाश्ता बरोबर झाला होता ना ? मी कोम्सोमोल आहे हे तू विसरतोस काय ?'

मीच मध्ये पडलो आणि त्या मध्यस्थांना सांगितलं, ' अहो, ते भटजी वगैरे तुम्ही विसरा. दुसरा काही तरी लग्नप्रकार शोधून काढा. तुम्ही कुठे मागणी घालायला आलात हे विसरलेले दिसता. अहो देवळात लग्न करायला आम्ही संमती तरी कशी द्यावी बरं? '

सिलँटी आपल्या जागेवर उभा राहिला व हात वर करून त्यानं बोलायची परवानगी मागितली.

' सिलँटी, तुला काय सांगायचंय ? ' कोल्यानं त्याला विचारलं.

' अरे, मला काही सुचवायचंय. '

' बोल पाहू तुला काय बोलायचंय ते.'

' अहो, हा कुझ्मा आहे ना ? हा काहीतरी कल्पना लढवत असतो. तुम्ही ओसिप इव्हानोविचला विचारा बरं. भटजी कशाला पाहिजे ? त्यापेक्षा एखाद्या डुकराला चांगलं खायला प्यायला घाला. '

' हा ते जाऊ दे, ' स्टोमुखोव हसून म्हणाला, ' मला जर असा लठ्ठ डुक्कर (भटजी) दिसला तर मी त्याच्याकडे पाठ फिरवतो आणि शिकारीला जात नाही. म्हणजे याचा अर्थ असा की, त्या कुझ्मालाच या साऱ्या गोष्टी हव्या आहेत. '

कुझ्मा खदखदून हसला. ' त्याचं असं आहे, आमचे बापजादे, वाडवडिल यांनी त्याच पद्धतीने लग्न केलं. म्हणून पावेल इव्हानोविच म्हणाला की, आम्ही बोलूनचालून गरीबाची मुलगी करत आहोत. म्हणजे काहीएक हुंडा वगैरे न घेता. '

कालिनानं जोरानं टेबलावर मूठ आपटली व तो रागारागाने म्हणाला ' काय तमाशा चालवलाय तुम्ही लोकांनी ? असली बोलणी करायचा तुम्हाला काय अधिकार आहे ? तुम्ही काय मोठे श्रीमंत लागून गेलात आम्हाला माहीत आहे. एक मातीची झोपडी बांधली म्हणजे तुमचा पावेल इव्हानोविच काय श्रीमंत झाला ? की त्याच्या घरात एखादं टेबल व चारदोन खुर्च्या आहेत ? जर एखादा चामड्याचा कोट कपाटात त्याने लपवून ठेवलेला आहे म्हणून काय तो स्वत:ला लखपती समजतो ? चोर लेकाचे. '

कुझ्मा पेट्रोविच हे ऐकून चपापला, 'अहो, आम्ही श्रीमंत आहोत असं कधी म्हटलं ? ओघानंच आलं म्हणून आम्ही फक्त हुंड्याचा उल्लेख केला.'

'अहो महाशय, तुम्ही कुठे रहाता, कुठल्या जगात रहाता, याची तुम्हाला कल्पना आहे का ? आता हे सोविएत सरकार आहे. तुम्हाला अजून सोविएत सरकारची खरीखुरी कल्पना आलेली दिसत नाही. सोविएत सरकार तुम्हाला जरूर हुंडा देईल. हे तुमच्या बापजाद्यांची कुजलेली कलेवरं चांगली थडग्यातून उकरून काढील. काय समजलात ?'

कुझ्मानं पुन्हा एकदा बोलायचा प्रयत्न केला. मुलांनी टाळ्या वाजवून व मोठ्याने हसून कालिनाच्या भाषणाला पुष्टी दिली.

कालिना पुन्हा एकदा बोलला, 'आमचे हे कमांडर कौन्सिल आहे. हे सगळ्या गोष्टींचा विचार करतात. ऐका रे पोरांनो. हे आपल्याकडे लग्न ठरवायला आलेत. आपण आपली मुलगी व्होल्गा यांच्यासारख्या गरीबाच्या घरी द्यायची की नाही ते आपल्याला ठरवायचंय. कारण हा जो निकोलायेन्को आहे ना, त्यानं कांद्याबटाट्याशिवाय कधीच काही चाखलं नाही. हे रायच्या ऐवजी रानटी गवत शेतात पिकवतात. पण आपण श्रीमंत लोक आहोत. म्हणून आपल्याला नीट विचार करून आपली मुलगी द्यायची की नाही ते ठरवायचंय.'

कमांडर कौन्सिलच्या या सगळ्या संभाषणाने खूप मौज वाटली व आता लग्न समारंभाच्या बाबतीत काही कटकटी निर्माण होणार नाहीत याबद्दल शंका उरली नाही. आलेल्या त्या मध्यस्थांना जरा बाहेर जाण्यास सांगण्यात आलं व कमांडर कौन्सिलनं ओल्गाला हुंड्यापोटी काय द्यायचं त्या चर्चेला सुरुवात केली.

पोरांनी सगळं संभाषण प्रथमपासून ऐकलेलं होतंच आणि म्हणून ओल्गाला काहीतरी चांगलं व्यवस्थित द्यायचं ठरवलं. शेरेला बाहेर जायला सांगावं असं त्यांना वाटलं कारण कदाचित शेरे हे देण्यास हरकती घेईल.

'ठीक आहे. कितीही जरी आपल्याला स्वार्थत्याग करावा लागला तरी चालेल. पण व्हेरोनोव्हाचं आपण झकासपैकी लग्न करून देऊ. आपल्या सबंध जिल्ह्यानं असं लग्न कधीही यापूर्वी पाहिलं नसेल. त्या साऱ्या श्रीमंत शेतकऱ्यांना आपण काय करू शकतो ते दाखवूनच देऊ.'

यानंतर हुंड्यात काय काय द्यायचं त्याबद्दल चर्चा सुरू झाली आणि त्यानं कुणाचंही दुमत झालं नाही. 'खेचर देऊ या का ? नको निदान एक घोडा देऊ,' असं ठरलं.

एका तासाभरात लग्न ठरवायला आलेले मध्यस्थ इतका वेळ उघड्यावर हवा खात बसले होते. त्यांना कमांडर कौन्सिलपुढे बोलावण्यात आले. आमचा कोल्या व्हेर्शनेव्ह टेबलाच्या पाठीमागे उभा राहिला व चाचरत त्यानं खालील प्रकारे भाषण केलं :

कमांडर कौन्सिलने ओल्याचं लग्न पावेलबरोबर करून द्यायचं असं ठरवलं आहे. पावेलने दुसऱ्या झोपडीत आपलं घर करावं व त्याच्या वडिलांनी त्याला शेतातला वाटा द्यावा. लग्न पाळकातर्फे देवळात (चर्च) न होता ते नोंदणी-पद्धतीने व्हावं. लग्नाच्या पहिल्या दिवशी आमच्या इथे म्हणजे कॉलनीत समारंभ होईल. त्यानंतर आणखी समारंभ करावयाचे असल्यास ते तुमचे तुम्ही नंतर करू शकता. ओल्याला आपलं घर करण्यासाठी खालील गोष्टी दिल्या जातील.

एक गाय आणि घोडा, एक घोडी आणि खेचर, पाच बकऱ्या, पेरणीची साधनं व शेतीची अवजारं, बियाणं, खत, गुरांचं खाद्य, कपडे, चादरी वगैरे फर्निचर, शिवाय शिवणाचे मशीन इतक्या गोष्टी हुंड्यापोटी दिल्या जातील.

ही सर्व यादी वाचता वाचता कोल्याचा आवाज घोगरा व्हायला लागला. यादी वाचून झाल्याबरोबर तो म्हणाला,

'ओल्याला जेव्हा जेव्हा जरुरी वाटेल त्या त्या वेळी आम्ही तिला मदत करायला तयार आहोत. तसंच आम्हाला जेव्हा मदत लागेल त्यावेळी ओल्या व पावेल यांनी पण आम्हाला मदत दिली पाहिजे. यापुढे पावेलला 'कॉलनीस्ट' असा किताब आम्ही बहाल करू.'

लग्न ठरवायला आलेले मध्यस्थ हे सर्व ऐकून एकमेकाकडे आश्चर्यचकित नजरेनं पाहू लागले. आपल्याला काहीच बोलायला जागा नाही याची त्यांना जाणीव झाली. आमच्या मुली एवढा वेळ हसत उभ्या होत्या. त्यांना यातलं काय बरोबर आणि काय चूक याची कल्पना नव्हती. त्यांनी भराभर टॉवेल्स आणून ते मध्यस्थांच्या हाताला बांधले व टोस्काला पुढे घालून आमच्या छोट्या मंडळींनी एका बशीमध्ये पाव व मीठ रूमालाखाली झाकून आणलं. मध्यस्थांना काय करावं ते समजेना. त्यांनी मुकाट्याने पाव घेतला. परंतु त्याचं काय करावं हे त्यांना माहीत नव्हतं. टोस्कानं तो पाव घालून आणलेली बशी हळूच कुझ्माच्या हातातून घेतली व तो हसत हसत म्हणाला, 'अहो, ती बशी द्या ना. कारण मला ती आमच्या मिलरला परत द्यायची आहे.' याला तुम्ही बशीच म्हणता ना ? असं त्यानं शेवटी विचारलं.

आमच्या मुलींनी माझ्या टेबलावर रुमाल पसरला व त्यावर वाईनच्या बाटल्या आणून ठेवल्या व एक डझनभर पेले त्यावर ठेवले. कालिनानं सर्वांचे पेले भरले व आपला पेला उंच धरून तो म्हणाला, 'ओल्गा मोठी होऊ दे आणि मान देऊ दे.'

आसिपने विचारलं, 'मान ? पण कुणाचा ?'

'अहो, हे काय विचारणं झालं ? अर्थातच कमांडर कौन्सिलचा व सोविएत सरकारचा मान.'

आम्ही सर्वांनी पेले किंचित एकमेकावर टेकवले आणि झटदिशी आपले पेले संपवले. त्याबरोबरच सॉसेजेसच्या सँडविचेस आणल्या होत्या त्याही आम्ही खाल्ल्या.

हे सर्व झाल्यावर कुझ्मा पेट्रोविच अभिवादन करून म्हणाला, 'तुम्ही सर्व किती शिस्तीत पार पाडलंत. आम्ही जाऊन आता पावेल इव्हानोविच व सेम्योनोव्हना यांचं मनःपूर्वक अभिनंदन करतो.'

'खरोखरच त्याचं अभिनंदन करा,' कालिनानं ठासून सांगितलं.

आसिपने आमचे हात दाबले व तो म्हणाला, 'तुम्ही खरोखर वेगळेच लोक आहात. तुमची बरोबरी या भागात कोणी करू शकणार नाही.'

मध्यस्थ लोक आमच्या पाहुणचाराने अगदी भारावून गेले व शाळकरी मुलींच्याप्रमाणे खाली मान घालून मुकाट्याने आमच्या ऑफिस बाहेर पडले ते गावाच्या रस्त्याने चालू लागले. आम्ही त्यांच्या जाणाऱ्या पाठमोऱ्या आकृत्यांकडे बघत होतो. एकाएकी कालिना डोळे बारीक करून खांदे उडवून जरा उपरोधाने म्हणाला.

'अरे, आपण त्यांना पोटभर खायला घालून तसंच पायी पाठवणं बरं नव्हे. पेट्या त्यांच्यामागे धावत जा. आणि माझ्या खोलीवर घेऊन ये. ब्रातचिन्को आपली गाडी जुंप आणि त्यांना आपण आपल्या गाडीतून पोचवून देऊ.'

एका तासाभराने हसत खिदळत आमच्या पोरट्यांनी त्या हाताला बांधलेल्या टॉवेलसकट आमच्या त्या मध्यस्थ पाहुण्यांना इतर काही गोष्टींची फारशी तमा न बाळगता गाडीत घातलं.

कुझ्मानं आम्ही दिलेला पाव आपल्या छातीशी घट्ट धरून ठेवला होता. आमचा मोलोडेट ती एवढी भरलेली गाडी अगदी सहजरित्या घेऊन गेला.

गाडी थोडी पुढे गेल्यावर कालिना एकदम थांबला व म्हणाला, 'त्या साल्या पावेलच्या बापानं भुक्कड लोकांना जाणून बुजून आमच्याकडे मध्यस्थ म्हणून पाठवलं. असं त्यानं का बरं केलं नसेल ? सांगतो ऐका. त्याला असं दाखवायचं असेल की बोलूनचालून तुमची मुलगी एका कॉलनीतली. तर अशा गरीब मुलीचं लग्न ठरविण्यासाठी तसलेच मध्यस्थ गृहस्थ पाठविलेले बरे.'

नेहमीप्रमाणे आमचा सिलँटी मध्येच म्हणाला, 'नाही. त्याचं असं आहे की, पाळकाशिवाय लग्न करणार म्हणून इतर कोणी जायला तयार झाले नसतील, आणि ही दोघं तसा काही हट्ट धरतील अशी खात्री असेल. तो लुच्चा म्हातारा, मी कोणाला म्हणतो ते तुम्हाला समजलंच असेल, त्यानं यांना सांगितलंच असेल की, जर आम्ही पाळकासमोर लग्न करायला नकार दिला तर ते मोडून टाका असंही सांगितलं असेल.'

लग्न ऑगस्टच्या मध्यावर करायचं ठरलं. त्यासाठी तयारीपण जोरात सुरू झाली. खूप कटकटी व त्रास होत होता व खर्चही बराच होणार होता. आमचे कालिनासाहेब तर अगदी खर्चाला घाबरूनच गेले होते. एके दिवशी ते म्हणाले,

'आपण जर आपल्या सगळ्या मुलींची लग्नं अशा तऱ्हेने करून दिली तर

आपलं काय होईल बरं ? हे बघ अँटन, तू आपली मुलं बरोबर घे व माझ्यासारख्या म्हाताऱ्याला बरोबर घे आणि आपण घरोघर जाऊन मदत गोळा करू या. त्याशिवाय काही हे सगळं जमणार नाही.'

लग्नाच्या दिवशी सगळ्या कॉलनीच्या भोवती आम्ही पहारेदार ठेवले होते. आमच्या दोन तुकड्या हे काम करण्यासाठी देण्यात आल्या होत्या. लग्नाची निमंत्रण पत्रिका आम्ही अगदी छापून घेऊन पाठवल्या होत्या. फक्त सत्तर लोकांनाच आम्ही लग्नाचं निमंत्रण दिलं होतं. आमची निमंत्रण पत्रिका खालीलप्रमाणे होती.

'आमच्या कॉलनीतली व्होल्गा व्हेरोनोव्हा हिचं लग्न कॉमरेड पावेल पावलोविच निकोलायेन्को याच्याबरोबर होणार आहे. त्यानिमित्ताने मॅक्झिम गॉर्की लेबर कॉलनीचं कमांडर कौन्सिल आपल्याला रात्रीच्या जेवणाचं निमंत्रण देत आहे. जेवणानंतर नाटकाचा कार्यक्रम होणार आहे. तरी आपण अगत्य या समारंभाला उपस्थित रहावे. —कमांडर कौन्सिल.'

दुपारी दोन वाजता सारी तयारी झाली. आमच्या बगीचाच्या मध्यभागी असलेल्या कारंज्याभोवती जेवणाची टेबलं मांडण्यात आली. समारंभाच्या रोषणाईचं काम झिनोव्ही कलामंडळानं केलं होतं. बारीक खांबावरून बर्फाच्या झुबक्यांचे हार लावले होते. या कामाला किती त्रास पडला असेल याची बारकाईने पहाणाऱ्याच्या सुद्धा कल्पना आली नसेल. टेबलावरील फुलदाणीत शेरेने 'स्नोक्वीन' जातीचे पांढरे गुलाब ठेवले होते.

आजच्या एकंदर सगळ्या थाटमाटावरून पहाणाऱ्याला आमच्या कॉलनीत किती सुधारणा व किती नवीन नवीन गोष्टी झाल्या आहेत त्या न सांगतासुद्धा दिसून येत होत्या. आमच्या बगीचातल्या वाळूच्या पाऊलवाटा आजूबाजूच्या हिरवळीची व फळबागांची ताटव्यांची शोभा वाढवत होत्या. यातलं प्रत्येक झाड, फुलांचा प्रत्येक ताटवा, झुडुपांचे प्रत्येक वाफे यांची आमच्या संमिश्र तुकड्यांनी रात्री आखणी केली होती. पाणी व घाम गाळून त्यांचं सौंदर्य वाढवलं होतं. त्यांची काळजी घेतली होती व साऱ्या सामुदायिकानं त्या सर्वांवर प्रेमाचा वर्षाव केला होता. आमच्या नदीकिनाऱ्यावरचे उंचसखल भाग प्रेमळ परंतु शिस्तप्रिय हातांनी बांधलेले होते. लाकडी जिने, झाडाच्या फांद्यांनी बनवलेला रेल्वे फाटा, आयताकृती फुलांचा गालिचा, बारीक चिंचोळ्या पायवाटा, नदीकाठी बांधलेल्या वाळूच्या थराचा छोटासा बंधारा या सर्व गोष्टी साधनसामुग्रीची कमतरता असलेल्या आमच्यासारख्या माणसांनीसुद्धा निसर्गावर मात केलेली दर्शवित होत्या. आमच्या या विस्तीर्ण परिसराचे हे अनवाणी मालक म्हणजेसुद्धा जुन्या जमान्यातल्या माणुसकीची जणूकाही संपन्न मुलं व तरीसुद्धा झालेला सर्व अन्याय विसरून कसलेल्या कलाकाराप्रमाणे त्यांनी जुन्या जखमा बुजवून टाकल्या होत्या. हिवाळ्याच्या सुरुवातीला आमच्या मुलांनी गुलाबाची जवळजवळ २०० रोपे या ठिकाणी लावली

होती. याशिवाय ॲस्टर्स, कार्नेशन्स, स्टाक, व्हर्मिलीयन, जिरॅलियन, निळी कॅन्टरबरी बेल, अशी फुलझाडं त्याचबरोबर लावली होती. त्याची तर मोजदादच करता आली नसती. ह्या आमच्या साऱ्या परिसराभोवती पक्का रस्ता बांधून काढलेला होता व हा रस्ता सर्व इमारतींना जोडलेलाही होता. ज्या ज्या ठिकाणी फुलझाडं नव्हती अशा मोकळचा जागी चौकोन, त्रिकोण पाडून तिथे गवत लावण्यात आलं होतं व त्यावर बसण्यासाठी बाके ठेवण्यात आली होती.

खरोखरच आमच्या कॉलनीमध्ये एकंदर सर्व वातावरण अतिशय सुखकारक सुंदर, तर्कशुद्ध आणि अगदी घरच्यासारखं होतं. व हे सर्व पाहून हे घडवण्यातला माझा होता जो सहभाग त्याबद्दल मला अभिमान वाटला. परंतु असं असूनही सौंदर्याच्या माझ्या काही लहरी होत्या. फुलं, झाडं, आखलेल्या पायवाटा, ठिकठिकाणी असलेल्या सावलीच्या जागा, या सर्व गोष्टी माझ्या निळी चड्डी व पांढरा शर्ट घातलेल्या मुलांवरचं लक्ष खेचून घेऊ शकल्या नाहीत. आत्ताच पहा ना, ते इकडून तिकडे धावत होते. पाहुण्यांच्या मधून इकडेतिकडे फिरत होते, सर्वांना काय हवं–नको ते बघत होते व हे विचित्र पद्धतीनं लागलेलं लग्न बघण्यासाठी आलेली काही बाजारबुणगे मंडळी आमच्या मुलांकडे अगदी कौतुकाने बघत होती. असे माझे गॉर्काईट्स तरतरीत, व्यवस्थित चांगल्या शरीरयष्टीचे, हसऱ्या चेहऱ्याचे, भरदार बांध्याचे असून त्यांना खरोखरच औषधपाण्याची कधी जरुरी भासली नाही. आज दिसणारे हे चेहरे प्रथमच रस्त्यावरून कॉलनीत आणले गेले तेव्हा असे नव्हते. परंतु आज मात्र ते चेहरे सतेज आपल्याला दिसतात. चेहऱ्यावर हा सतेजपणा येण्यामागं सारी करामत कॉलनीची आहे.

प्रत्येकाला आपापला मार्ग ठरवायचा आहे व गॉर्की कॉलनीलाही एक ठरलेला मार्ग आहे. या मार्गाची सुरुवात जरी मी ठरवून दिली असली तरी भविष्यात हा मार्ग कुठली दिशा घेईल व त्याचा शेवट कुठे होईल हे सांगणं कठीणच आहे. मानवानं निसर्गातल्या कित्येक गोष्टी अजूनही हस्तगत केलेल्या नाहीत तसंच गणित व योजना यात अजूनही मनुष्य धुक्यात वावरतो आहे. या योजनांमध्ये आमची प्रगती होत असताना आमच्या काही सौंदर्यदृष्टी ठरल्या आहेत. त्यामुळे फुलं, पानं, बगीचे, हिरवळ वगैरे सर्वसामान्य सौंदर्य मला जास्त वेळ खेचून ठेवू शकत नाही.

याला दुसरं आणखी एक कारण असू शकेल की याचवेळी मारिया माझ्याकडे आली व म्हणाली,

'काय हो पिताजी, तुम्ही अगदी असे दुःखी अंतःकरणाने का उभे आहात ? '

मी म्हटलं ' सारेजण व तूसुद्धा मला एकट्याला सोडून गंमतजंमत करत आहात मग मी का बरं हिरमुसला होऊ नये ? '

' बरं, तुमची समजून काढायला मला आवडेल. मी तर मघापासून तुम्हाला शोधते आहे. ओल्गाला मिळालेल्या भेटवस्तू तुमच्याबरोबरच आपण बघायच्या असं मी ठरवलं होतं. चला बरं आपण जाऊ या. '

ओल्गाला मिळालेल्या भेटवस्तू दोन खोल्यात मांडून ठेवण्यात आल्या होत्या. आलेली पाहुणेमंडळी त्या वस्तू पहाण्यासाठी गर्दी करून राहिली होती. त्यांच्यात काहीजणांच्या चेहऱ्यावर असूया, राग दिसत होता. कारण काहीजणी आपले ओठ दातांनी आवळून माझ्याकडे रागाने बघत होत्या. त्यांनी काहीतरी खुळचट कल्पना मनात धरून आमच्या मुलींना डावलून सुखवस्तू शेतकऱ्यांच्या मुलांशी आपली लग्नं लावली होती. आणि आता त्यांना समजून आलं की, खऱ्याखुऱ्या श्रीमंत पोरी आमच्या कॉलनीत आहेत. म्हणून त्यांना वाटणारा विषाद मी समजू शकलो.

मारियाने पुन: विचारलं, ' अशी लग्नाची सूचना घेऊन मध्यस्थ तुमच्याकडे गर्दी करायला लागले तर तुम्ही काय कराल ?'

' मला काही भीती वाटणार नाही. माझ्या मुली भलतीसलती पसंदी करणार नाहीत याबद्दल माझी खात्री आहे.' एक छोटा मुलगा धावतधावत माझ्याकडे आला व मला मला म्हणाला, ' अँटन ते आले बरं का!'

सर्वसाधारण सभेची वेळ झाल्याचा बिगुल नुकताच वाजला होता. चबुतऱ्या-वर आमचे कॉलनीस्ट ओळीने उभे होते. व आमचे ढोल वाजवणारे बावटयाच्या जवळ केव्हाच उभे राहिले होते. ओल्गा व पावेल आमच्या गाडीत बसून चक्कीच्या बाजूने येताना दिसले. घोडयांना लाल रिबीनी बांधून सजविण्यात आलं होतं. तसंच ब्रातचिन्को कोचमनच्या जागी बसला होता. त्यानंही आज लाल फीत डोक्यावर गुंडाळली होती. गाडी आमच्याजवळ आल्यावर आम्ही सर्वांनी नवदांपत्याला अभि-वादन केलं. ब्रातचिन्कोनं लगाम खेचून गाडी थांबवली. ओल्गानं गाडीतनं एकदम उडी घेऊन माझ्या गळयाला मिठी मारली. ती एकीकडे हसत होती व एकीकडे रडतही होती. तशाच परिस्थितीत ती मला म्हणाली,

'अँटन, मी गेले तर मला विसरणार नाही ना? मला फार फार भीती वाटते.'

आमची छोटीशी सभा झाली. मारियाबाईनं मला एक गोडसा आश्चर्याचा धक्का दिला. नवदांपत्याला सार्वजनिक शिक्षणखात्यातर्फे शेतकी व्यवसायवरची खूपशी पुस्तकं भेट म्हणून दिली होती. आमची दोन मुलं सजवलेल्या फळयांवर ते पुस्तकांचे ढीग घेऊन उभी होती.

आमची सभा संपल्यानंतर नवदांपत्याला आम्ही आमच्या बावटयाखाली उभं केलं व तो धरून त्यांना मेजवानीच्या टेबलाकडे शिस्तीत घेऊन गेलो. त्यांच्यासाठी खास टेबल तयार करण्यात आलं होतं व त्यांना हवं–नको पहाण्यासाठी एक खास मुलगा त्यांच्यामागं उभा होता. इतक्यात आमची दुसरी तुकडी हजर झाली. पांढऱ्या

शुभ्र कपड्यात आमच्या मुलांनी पदार्थ वाढायला सुरुवात केली. तारानेटच्या खास संमिश्र तुकडीनं पाहुण्यांच्या हळूहळू भरत जाणाऱ्या खिशांवर लक्ष ठेवलं. तसंच त्यांनी पेयाच्या कित्येक बाटल्या फस्त केल्या. हे पेय खास या समारंभासाठीच तयार केलं होतं.

नववधू-वराच्या एका बाजूला मी बसलो होतो व दुसऱ्या बाजूला पावेलचे आईवडिल बसले होते. पावेलचा बाप, पावेल इव्हानोविच हा कडक चेहऱ्याचा मनुष्य वाटत होता. त्याची दाढी सेंट निकोलायसारखी होती. तो एकसारखा जोरजोराने निःश्वास सोडत होता आपला मुलगा स्वतंत्र झाला किंवा समोर दिसणाऱ्या बीयरच्या बाटल्यांकडे बघवत नसावं म्हणून तो त्रासलेला दिसत होता. तारानेटने त्याच्याकडून नुकतीच सेमियाँनची बाटली काढून घेतली होती.

आमचे कॉलनीस्ट आज अगदी खरोखरच काही वेगळेच दिसत होते. त्यांच्याकडे बघता बघता मला जराही कंटाळा येत नसे. ते अगदी धांदलीत, गडबडीत, अधूनमधून हास्यविनोद करत, मधेच सभ्यपणाचा आव आणत व मध्येच एखादा टोमणा फेकत इकडून तिकडे वावरत होते. आमच्या अकराव्या तुकडीनं काही चारपाच पाहुण्यांना मोठ्या लंब्याचवड्या संभाषणात गुंतवून ठेवलं होतं. ते काही भलतंसलतं तर बोलत नसतील ना अशी मला सारखी चुटपूट लागून राहिली होती. शेवटी मी ते काय बोलतात ते पहाण्यासाठी गेलो. आमचा शेल्यापुतीन अजूनही तसाच बालिश होता. कोझीरच्या पेल्यात बीयर ओतत तो म्हणाला,

'बघ लेका, तुझं लग्न देवळात लागलं होतं आणि त्याचा शेवट काय झाला.'

टोस्का मध्येच म्हणाला, 'मला वाटतं, तुम्हा सर्वांची पुन्हा एकदा लग्नं लावून द्यावीत.'

यावर कोझीर हसला व म्हणाला, 'मी पुन्हा लग्न करायच्या भानगडीत पडायचं ? नको रे बाबा. आता फार उशीर झालाय.'

त्यानं क्रूसाचं चिन्ह केलं व ग्लासातली उरलेली बीयर एका घोटात पिऊन टाकली. टोस्का मोठ्याने हसला व म्हणाला,

'तुमच्या पोटात आज नक्कीच पोटदुखी होणार कोझीर'

'का रे बाबा, असं का म्हणतोस ?'

'तुम्ही हे क्रूसाचं चिन्ह पुन्हा पुन्हा कशासाठी करता बरं ?'

त्याच्या पलीकडे एक गावकरी बसला होता. त्याची दाढी अगदी निव्वळ गवताच्या रंगाची होती व तिचं टोक त्यानं वळवलं होतं. तो पावेल इव्हानोविचच्या बाजूने लग्नाला हजर राहिला होता. त्यानं आमची कॉलनी यापूर्वी कधीच पाहिलेली नव्हती व आमच्या कॉलनीतला हा सगळा रंग बघून तो अगदी भांबावून गेला होता. त्यानं विचारलं,

'काय रे पोरांनो, तुम्हीच इथले मालक आहात काय?'

शूर्कानं उत्तर दिलं, 'अर्थातच, आम्हीच. आम्हीच हे सर्व काही पिकवतो, श्रम करतो.

'तुम्ही शेती कशासाठी करता रे?'

टोस्का त्याच्या बाजूला गेला व त्याच्या डोळ्याला डोळा भिडवत म्हणाला, 'तुम्हाला माहीत नाही? मी सांगतो ते नीट ऐका. आम्हाला शेतमजूर म्हणून राबावं लागलं असतं. परंतु आता तशी परिस्थिती नाही. तुम्हाला अजून काहीच कळलेलं दिसत नाहीय.'

'पुढे तुम्ही काय करायचं ठरवलंय ? सांगा पाहू.'

'मी काय होणार आहे, सांगू ? मटनाचा तुकडा तोंडात टाकत टोस्का म्हणाला, 'मी इंजिनियर होणार आहे समजलात ? आमचे अँटन पण असंच म्हणतात की, मी इंजिनियर होणार आणि आमचा हा शेल्यापुतीन आहे ना ? हा पायलट होणार आहे.' असं म्हणून टोस्कानं शेल्यापुतीनकडे जरा विचित्र नजरेनं पाहिलं शेल्यापुतीन पायलट होणार आहे ही गोष्ट अजून कॉलनीत कोणीही मानायला तयार नव्हतं त्यामुळे टोस्कानं त्या गोष्टीचा उच्चार केला म्हणून शेल्यापुतीन मनातल्या मनात खूष झाला व म्हणाला,

'हो, हो. मी खरोखर पायलट होणार.'

'मग शेतावर कोण काम करणार रे? तुमच्यापैकी शेती कोण कोण करणार?'

'अर्थातच आम्ही शेती करतोच सध्या पण आम्ही मोठेपणी तुमच्यापेक्षा वेगळ्या प्रकारचे शेतकरी होऊ.' असं प्रश्न विचारणाऱ्यांकडे बघत टोस्कानं ठासून म्हटलं.

'अरे, पण वेगळ्या प्रकारचे म्हणजे कशा प्रकारचे होणार आहात तुम्ही ते नाही सांगितलंस.'

'हो. मी म्हटलं तसंच. वेगळ्या प्रकारचेच होणार. तुम्ही ट्रॅक्टर पाहिलात का? मग इथून पुढे शेती ट्रॅक्टरने केली जाईल.'

'नाही रे बाबा, मी कुठे पहाणार ट्रॅक्टर?'

'होय, पण आम्ही पाहिलाय हं. तिकडे सोलकोझ म्हणून आहे ना ? तिथे आम्ही एकदा काही बियाणं घेऊन गेलो होतो. आणि त्यांच्याकडे असा ट्रॅक्टर होता. ट्रॅक्टर म्हणजे एक प्रचंड यंत्र असतं.

पाहुण्यांच्या रांगेत मधूनमधून आमच्या निरनिराळ्या तुकड्यांतली मुलं मिसळली होती. तरीसुद्धा त्यांच्या आवाजावरून कुठली तुकडी कुठल्या पाहुण्यांच्या मध्ये मिसळली आहे ते मी सांगू शकत होतो. एका ठिकाणाहून खूपसा हास्यविनोदाचा आवाज जोरजोरात येत होता. त्या ठिकाणी आमचा लापोट आपल्या नवव्या तुकडीसकट तिथे होता. शिवाय त्याच्या जोडीला तारानेटपण नक्कीच असला पाहिजे.

त्या ठिकाणी नवव्या तुकडीकरवी चक्कीच्या लोकांची गंमत करण्यासाठी खास टेबल सजवलेलं होतं. तिथे आमचा जाडजूड चक्कीवाला तसंच हडकुळा हिशोब लिहिणारा आमचा बावळट मेकॅनिक होता. एकेकाळी तारानेट हा अट्टल खिसेकापू होता आणि त्यामुळे चक्कीवाल्याच्या खिशातून सॅमेगॉनची बाटली काढून दाखवणं व त्याबद्दल दुसरी कोलोमॅकच्या पाण्याने भरलेली बाटली खिशात ठेवणं हा त्याच्या हातचा मळ होता.

बराच वेळ आमचा चक्कीवाला आणि हिशोब लिहिणारा मुकाटयाने चुळबूळ करत टेबलाजवळ बसले होते व मधूनमधून तारानेटच्या संमिश्र तुकडीकडे बघत होते. लापोटच्या हे लक्षात आल्यावर त्याने त्यांना डोळयांनी खुणावलं,

'अरे, तुम्ही घरचेच लोक आहात. तुमचा समाचार मी नंतर घेतो.'

खाली वाकून जवळून जाणाऱ्या तारानेटच्या कानात तो कुजबुजला व तारानेटनं संमतीदर्शक मान हलवली.

'हे पहा, तू टेबलाच्या खाली ग्लास धर आणि तो पाण्याने भर व त्यात थोडीशी बीयर टाक म्हणजे सर्व काही ठीक होईल.'

या त्यांच्या टेबलाखाली होणाऱ्या जादूच्या प्रयोगामुळे अगदी फिक्की बीयर काही लोकांच्या पुढयात ठेवली गेली आणि ते बिचारे खाण्याच्या बशा समोर घेऊन बसले. आमच्या नवव्या तुकडीची पोरं हा सर्व प्रकार अगदी तटस्थपणाने पहात होती. अशी एकंदर सर्व तयारी झाल्यावर चक्कीवाल्यानं लापोटला डोळा मारला व आपला ग्लास हातात उंच धरला. आमचा हिशोब तपासनीस व मेकॅनिक हे दोघे सगळीकडे पहात होते. पण त्यांच्या सभोवती सर्व काही थंडथंडच होतं. तारानेट पॉपलरच्या झाडाला टेकून उभा होता. लापोटनं त्याच्या डोळयात आलेली मिश्कीलपणाची झाक लपवण्यासाठी त्याने आपली नजर खाली वळवली. चक्कीवाल्यानं वरती केलेला हात तसाच वर धरून त्याने सर्वांना शुभेच्छा व्यक्त केल्या.

आमची नववी तुकडी खाली मान घालून आपल्या या पाहुण्यांचे रिकामे होणारे पेले बघत होते. शेवटचा घोट घेतल्यावर त्यांना नक्कीच काहीतरी विचित्र वाटलं असेल. चक्कीवाल्यानं आपला रिकामा ग्लास टेबलावर ठेवला व लापोटकडे सावकाशपणे बघत राहिला. पण लापोट काहीतरी खात होता. परंतु त्याचं मन कुठेतरी दूरवर भरकटत असावं असं त्यांच्या चेहऱ्यावरून वाटत होतं. हिशोब तपासनीस व मेकॅनिक यांनी जणू काही विशेष घडलंय असं न दाखवता आपले काटे बशीतल्या पदार्थात खुपसले.

आमच्या तशा अनुभवी चक्कीवाल्यानं टेबलाखाली असलेली आपली बाटली पाहिली. पण तेवढयात कोणीतरी सावकाशपणे त्याचा दंड दाबला. त्यानं मान वर करून पाहिलं. त्यावेळी तारानेटचा सुरकुतलेला चेहरा त्याला दिसला.

तारानेटच्या चेहऱ्यात त्याला लालसरपणा दिसला. 'तू अगदी निर्लज्ज आहेस.

कोणीही सॅमेगॉन आणायची नाही असं बजावलं असतानाही, तू आमच्यातला एक जण आणि तू ती प्यायलास, खरं ना? आणखी कोणकोण त्या बाटलीत प्यायले, सांग पाहू ?'

'कोणास ठाऊक ? पण आम्ही सॅमेगॉन घेतली असेल की नाही याबद्दल मला शंका वाटते,' असं चक्कीवाला भांबावून म्हणाला.

'तुला अजून शंका वाटते ? मग इकडे ये पाहू. श्वास सोड. मग मी तुला सांगतो. म्हणे सांगता येत नाही. तुझ्या तोंडाला एक पींपभर सॅमेगॉन रिचवाल्याचा वास येतोय. छी ! छी ! ही असली घाण घेऊन तुम्ही कॉलनीत येता ?'

'काय गडबड आहे रे ?' असं विचारत कालिना तेथे जाऊन पोचला.

त्यांना बाटली दाखवत तारानेट म्हणाला, 'अहो, यानं सॅमेगॉन आणली होती.'

कालिना त्रासलेल्या चेहऱ्याने चक्कीवाल्याकडे बघत होता. एकीकडे लापोट गॅलॅटेन्कोच्या गमतीजमती सांगून नवव्या तुकडीला इतका हसवत होता की ते अगदी हसून हसून खाली पडायला आले होते. त्यांनी आपली डोकी हसता हसता टेबलावर टेकली. आणखी काही विनोद ऐकण्याच्या मन:स्थितीत ते नव्हते.

अशा तऱ्हेने जेवताना खूप गंमतजंमत चालली होती. थोडचा थोडचा वेळाने लापोट चक्कीवाल्याला विचारत होता, 'काय, पुरेशी झाली की नाही ? आता सगळी संपली म्हणतोस ? फार वाईट झालं. चांगली होती का रे ? फारशी चांगली नव्हती ? बरं.'

इतक्यात फ्रेडोर मध्येच बोलला, 'काय रे त्याला सतावतोस उगाच ? शेवटी ती आपलीच माणसं आहेत ना ?'

'तू गप्प बस रे,' 'तारानेट गंभीरपणे त्याला म्हणाला, 'त्यांच्याकडे बघ जरा. त्यांना आपल्या जागेवर बसणंदेखील कठीण झालंय.'

लापोटला अजूनही गंमतजंमत करायची होती. त्यानं चक्कीवाल्याला सावकाशपणे खुर्चीवरून उठवलं व त्याच्या कानात कुजबुजला 'चल बाबा, मी तुला बागेतून फिरवून आणतो. कारण तू झिंगलेला आहेस हे लोकांच्या लक्षात येऊ लागलंय.'

काराबानोवची आठवी तुकडी त्या दिवशी पहाऱ्यावर होती. असं असलं तरी स्वत: काराबानोव अधूनमधून जेवणाच्या टेबलाजवळ डोकावत होता. कारण या नव्या प्रकारच्या लग्नाबद्दल आमच्या पाहुण्यांमधे तर बरीच तात्त्विक चर्चा चालू होती. या ठिकाणी कोव्हल, स्पिरिडॉन, कालिना इव्हानोविच, झादारोव, व्हेर्शनेव्ह, व्होल्कोव्ह, व नूनाचार्स्की सामुदायिकाचा डायरेक्टर नेस्टेरेन्को हाही होता.

सामुदायिक नदीच्या पलिकडे होतं व तिथली एकंदर परिस्थिती फारशी

समाधानकारक नव्हती. त्यांना शेती करायला जमत नव्हते. त्यांना त्यांच्यातल्या काही बंडखोर बायकांना वळण व शिस्त लावणं कठीण झालं होतं. चांगल्या भविष्य-काळावर विश्वास ठेवून तात्कालिक अडचणींना व त्रासाला धीमेपणाने तोंड दिलं पाहिजे हे त्यांना सामुदायिकातल्या लोकांना समजावता येत नसे. नेस्टेरेन्कोने केविलवाणेपणे मला सांगितलं,

'आम्हाला या सर्वांना काबूत ठेवायचं आहे. परंतु त्यांना काबूत ठेवणारा आम्हाला भेटत नाही.'

कालिना जरा उत्साहानेच म्हणाला, 'कॉम्रेड नेस्टेरेन्को, हे बोलणं तुम्हाला शोभत नाही बरं का? नवीन लोकांना कसं वळवायचं यापेक्षा खरं तर या जुन्या लोकांना नवीन गोष्टी कशा समजावून द्यायच्या हे जास्त अवघड आहे.'

टेबलावर जोरजोरात चर्चा चालू होत्या. आमच्या बगीचातून सफरचंद व पेअर फळे आणण्यात आली तसंच आईस्क्रीमने भरलेली भली मोठी भांडी टेबला-वरून आणण्यात आली. आमच्या मॉनिटरनी त्या दिवशी संबंध दिवसभर राबून हे तयार केलं होतं. आणि त्याचा त्यांना अगदी मनापासून अभिमान वाटत होता.

इतक्यात पाठीमागून एकाएकी अकॉर्डियनचा आवाज व काही गावकरी बायकांच्या तोंडून लग्नसमयी म्हटल्या जाणाऱ्या गाण्यांच्या वेडेवाकड्या सुरांनी सगळं वातावरण भरून गेलं. पाचसहा गावकरी बायका गोलगोल फिरत व तालावर पावलं टाकत पुढेपुढे येत होत्या. त्यांच्याबरोबर चांगलाच प्यायलेला एक अकॉर्डि-यन वाजवणाराही होता. त्यांना बघून तारानेट म्हणाला,

'अहो, ते हुंडा मागायला आलेत.'

त्यातली एक बाई खाली वाकून जोरजोरात पाय आपटत माझ्या बाजूने येऊ लागली. आपली कोपरं हलवत व पायातल्या जाड जाड बुटांनी वाळूत रेघोट्या ओढत ती मला म्हणाली,

'अहो बाबा, प्रिय बाबा, तुमची मुलगी पेयाच्या बदल्यात द्या. तुमच्या मुलीला छान कपडे करा.'

इतक्यात तिच्या हातात एक बाटली व कसला तरी पेला एकाएकी दिसला. पिऊन बेहोष होऊन तिनं तो पेला बाटलीतल्या पेयानं भरला. ते पेय तिच्या कपड्यांवर व जमिनीवरही सांडलं. तारानेट पुढे येऊन तिच्या व माझ्यामध्ये उभा राहिला व मला म्हणाला,

'मी पाहून घेतो.'

त्यानं तिच्या हातातली बाटली व पेला सावकाशपणे काढून घेतला. एवढ्या वेळात ती मला विसरून गेलीसं वाटलं व पिऊन तर्रर्र अवस्थेत तिनं आपला मोर्चा ओल्गाकडे वळवला. ती ओल्गाला म्हणाली,

'ओल्गा पेट्रोवना, किती गोड आहेस गं तू? किती छान दिसतेस? पण

तुला आपल्या वेण्या आता पाठीवर सोडता येणार नाहीत. उद्यापासून तुझं डोकं रुमालानं बांधलं जाईल. लग्नानंतर सर्वजणींनाच असं करावं लागतं.'

'मी माझं डोकं कधीही रुमालाने बांधणार नाही,' असं ओल्गा रागारागाने म्हणाली.

'काय, तू डोकं झाकणार नाहीस म्हणतेस? तुझ्या वेण्या तशाच पाठीवर सोडणार आहेस?'

'होय. मी आता आहे अशीच रहाणार आहे.'

त्या सर्व प्यायलेल्या बायका काहीतरी बरळतच राहिल्या व पुन्हापुन्हा ओल्गाच्या समोर येऊ लागल्या. या सर्व प्रकारचा व्होल्कोव्हला फारच राग आला. त्यांना हाताने ढकलत तो म्हणाला,

'तिनं डोकं नाही झाकलं तर तुमचं काय जातं?'

'बरं बाबा! नको झाकू दे तिला. तुम्हाला आणि आम्हाला चांगलं माहीत आहे की हे लग्न काही खऱ्या अर्थाने लग्न नव्हे,' असं त्या धरळायला लागल्या.

काही पोक्त मंडळी पुढं आली आणि त्यांनी त्या झिंगलेल्या बायकांना तिथून हाकलून काढलं. मी व ओल्गा तिथून निघून जरा दूर गेलो. पुढे गेल्यावर ओल्गा मला म्हणाली,

'अँन्टन, मला या बायकांची भीती नाही वाटत. पण एकंदरीत मला बराच त्रास होणार असं दिसतंय.'

आमच्या बाजूने आमची मुलं जात येत होती. त्यांच्या हातात कपडे व फर्निचरचे पुडके होते. 'गोगोलचं लग्न' हा प्रयोग आज दाखवायचा होता व त्या-आधी निरनिराळ्या देशातल्या लग्नपद्धतीवर झुबिनचं भाषण होणार होतं. लग्नसोहळ्याचा समारंभ अजून संपला नव्हता.

□

# ११

## ‘छोटंसं मध्यंतर’

ओल्गाच्या लग्नानंतर आमच्यावर एक छोटीसी आपत्ती आली. अर्थात ही आपत्ती अपेक्षितच होती. आमचे राबफॅक्टला जाणारे विद्यार्थी आम्हाला लवकरच सोडून जाणार होते. खरं तर रायसाच्या वेळेपासूनच आम्ही विद्यार्थांचा राबफॅक्टला जाण्याची ईर्षा ठेवली होती व त्यादृष्टीने प्रयत्नही चालू ठेवले होते. आम्ही खरो-खरी आमच्याच कॉलनीतले विद्यार्थी राबफॅक्टला पाठविण्यात धन्यता मानत होतो. आणि ही संधी आमच्या विद्यार्थ्यांना मिळणार होती म्हणून आम्हाला एक प्रका-रचा असीम आनंद व अभिमान वाटत होता. परंतु प्रत्यक्ष जेव्हा हा क्षण जवळ आला त्यावेळेस प्रत्येकाच गळा भरून आला व डोळ्यावाटे अश्रूही ओघळले. एकमेकांना सोडून जाणं किती अवघड होतं याची कल्पना आली. तरीही आल्या-प्रसंगाला तोंड देणं अगदी भाग होतं. आमची सारी कॉलनी–मुलं– एकत्र राहिली, एकत्र कामं केली आणि एकत्र हसली खेळली व एकाएकी त्यातले काहीजण आज सोडून जात होते. हा प्रसंग कधीकाळी येईल असं आम्हाला कधीही वाटलं नव्हतं.

सकाळची न्याहारी झाल्यानंतर सगळ्यांनी आपापले चांगले कपडे परिधान केले व जेवणाची टेबलं बगीचात मांडली. आमच्यातल्या काहीजणांनी माझ्या खोलीतल्या बावटयावरचं कव्हर काढलं, तसंच ड्रम वाजवणाऱ्यांनी आपापले ड्रम गळयात अडकवले. त्या ड्रमच्या आनंददायी आवाजानेसुद्धा आमच्या मनातली विषण्णता लपू शकली नाही. लिडोचकाने तर सकाळपासून रडूनरडून आपले निळे

डोळे लालभडक करून टाकले होते. साऱ्या मुली आपापल्या बिछान्यावर उशीत डोके खुपसून हुंदके देत होत्या. बिचारी एकातेरीना, स्वतःच्या भावना तर तिला सावरता येत नव्हत्याच, पण बाकीच्यांची समजूत काढायचा निष्फळ प्रयत्न करत होती. मुलं मात्र कमालीची गंभीर आणि शांत होती. लापोट त्याची विनोदबुद्धी कोठेतरी सपशेल विसरून गेला होता. आमची छोटी मंडळी एखाद्या टेलिग्राफच्या तारेवर चिमण्या बसाव्यात त्याप्रमाणे अगदी ओळीनं ताठ उभी राहिली होती. बाकावरून आणि कुंपणांच्या तारांवरून हाताच्या घड्या घालून ती एकटक नजरेनं इमारतींची छपरे, झाडांचे शेंडे व आभाळ अशा निरनिराळ्या वस्तूंवर नजर खिळवून राहिली होती. यापूर्वी कधीही इतकी नाकं पुसताना आम्ही पाहिली किंवा ऐकली नव्हती.

मी त्यांचा बालिश खेद व दुःख यांच्यात सहभागी होतो. हे दुःख साधंसुधं नव्हतं तर त्याच्यामध्ये न्यायाला कमालीचा आदर होता. टोस्का सोलोव्हाय विचार करत होता की उद्यापासून माटवई बेलुखीन कॉलनीत का बरं नसणार ? मी पण त्याच्या या विचारांशी सहमत होतो. समजा, माटवईला कॉलनीबाहेर पाठवला नाही तर ? टोस्काला एवढ्या मोठ्या धक्क्यातून व निराशेतून वाचवता आलं नसतं का ? पण माटवई काही एकट्या टोस्कालाच सोडून जात नव्हता. किंवा माटवई पण काही एकटाच कॉलनी सोडून जात नव्हता. बुरुन, काराबोनाव, झादारोव, क्रायनीक, व्हेर्शनेव्ह, गोलोस, नात्स्या नोचेवनया, हे सारेजण सोडून जात होते आणि प्रत्येकाचे कमीत कमी डझन डझन तरी छोटे दोस्त होते. माटवई, काराबानोव आणि बुरुन ही खरीखुरी माणसं होती आणि त्यांचं अनुकरण इतरांनीही करावं अशा दर्जाची ही मंडळी होती. तसंच त्यांची गैरहजेरी म्हणजे त्यांच्या अनुयायांना फारच जाणवणारी होती.

या भावनेमुळेच साऱ्या कॉलनीभर एक प्रकारचं सावट आलं होतं असं नव्हे तर हे आता निर्दशनाला येत होतं की या आव्हानाला तोंड द्यायला सारी कॉलनी तयार झाली होती आणि त्या आव्हानाची कुऱ्हाड कॉलनीच्या डोक्यावर केव्हाही येऊ शकत होती.

राबफॅक्टचे विद्यार्थी जणूकाही अगणित देवदेवतांपुढे बळी दिले जाणार आहेत असे वावरत होते. काराबानोवनं माझी पाठ सोडली नाही. तो उगीचच हसत होता व बोलत होता.

'आयुष्य हे असंच आहे. कुठंतरी चुकतंच. राबफॅक्टला जाणं म्हणजे खरोखर अगदी नशीबवान. तसं म्हटलं तर ते आपलं अनेक दिवसांचं स्वप्न होतं. सर्वजण त्याच्या दिशेने वाटचाल करत होते. पण प्रत्यक्षात ते खरोखर काय आहे हे कोणालाच माहीत नाही. प्रत्यक्ष जेव्हा ते समोर येऊन ठाकलं त्यावेळेला ते काही मोठं आहे असं नाही. खरं तर आज आपण एका मोठ्या

आनंदाला मुकत आहोत. कॉलनी सोडून जाणं याचा कमालीचा खेद होतो आहे. मला असं वाटतंय की आपण मोठ्यांदा ओरडावं. आजूबाजूला लोक बघत नसत तर मी खचितच मोठ्यांदा ओरडलो असतो. आणि त्यामुळे मला बरंही वाटेल. या जगात खरं सत्य नाहीच.'

व्हेर्शनेव्ह रागीट डोळ्यांनी ऑफिसच्या कोपऱ्यात बसून आमच्याकडे बघत होता.

'खरं सांगू का, माणूस हेच खरं सत्य आहे.' यावर काराबानोव हसला आणि म्हणाला, 'तू म्हणतोस ते बरोबर आहे, तर मग इतके दिवस तू काय मांजराच्या डोळ्यात सत्य शोधायचा प्रयत्न करत होतास काय ?'

'तसं नाही रे, मला असं म्हणायचंय की लोकांनी चांगलं राहिलं पाहिजे नाहीतर सत्य हे चांगलं आहे हे कसं बरं सिद्ध होईल. एखादा मनुष्य गुंड असला तर साम्यवादी राजवटीत आपल्याला त्रासच नाही का होणार ? आणि तेच आज मी खऱ्या अर्थाने शिकलो.'

मी व्हेर्शनेव्हकडे न्याहाळून बघत त्याला विचारलं, 'हे तुला आजच का एकदम पटलं ?'

'कारण आज तुम्ही प्रत्येकाला आरशात बघितल्यासारखं बघता आहात. मला समजत नाही. परंतु इतके दिवस प्रत्येक दिवस हा कामाचा दिवस असायचा आणि आज एकाएकी स्वच्छ व शांत. गॉर्कीनं सत्य लिहिलं आहे. पण मला यापूर्वी ते समजलं नव्हतं, किंवा ते जाणवलं नव्हतं असं म्हणलंत तरी चालेल व ते इतकं महत्वाचं आहे हेही आकलन झालं नव्हतं. माणूस हा काही अनेक प्राण्यांपैकी एक असं नव्हे. काही माणसं ही अगदी सामान्य असतात व दुसरी काही खऱ्याखुऱ्या अर्थानं माणूस असतात.'

या अशा तऱ्हेच्या गप्पाछप्पा करून आमची राबफॅक्टला जाणारी मुले कॉलनी सोडण्याचे दुःख विसरायचा प्रयत्न करत होती. परंतु त्यांचे प्रयत्न त्या मानाने कमी कष्टाचे होते. कारण राबफॅक्टच्या यशानंतर त्यांच्यापुढे उज्वल भविष्य-काळ होता. याउलट आमच्यापुढे आजतरी काहीही भलमोठं नव्हतं.

आदल्या रात्री आमची शिक्षकमंडळी माझ्या खोलीच्या पुढच्या चौथऱ्यावर जमली होती. काहीजण बसले होते, काहीजण उभे होते. काहीजण विचार करत होते. काहीजणांचे मनातल्या मनात तर्कवितर्क चालू होते. सगळी कॉलनी अगदी गाढ झोपेत होती. रात्रही शांत असून आकाशात चांदण्या चमचमत होत्या व हवा जरा उबदार होती. मला एकंदरीत सारं जग गुंतागुंतीचं परंतु एकसूत्री असून पृथ्वी हा त्या जगाचा एक वैचित्र्यपूर्ण तरीही लोभस व हवाहवासा वाटणारा भाग वाटे. परंतु त्याची उकल करून व त्याचे निरनिराळे भाग केले तरीसुद्धा कडवटपणा

त्याच्यात कुठे सामावलेला आहे ते सांगणं कठीण झालं असतं. अशावेळी माणूस अनाकलनीय गोष्टी जाणून घेण्यासाठी तात्त्विक तर्क करत बसतो. समजा, उगवणारा उद्याचा दिवस आपण खूपसे कष्ट घेऊन व विस्कळित वातावरणातून काही व्यक्तींना व्यवस्थित समाजरचनेत आपले मित्र म्हणून आणल्यावर ते कायमचे सोडून जाणार असं वाटल्यानंतर माणूस अबोलपणे शांत अशा आकाशाकडे याचे कारण शोधायचा प्रयत्न करत असतो किंवा कधीकधी आजुबाजूचे वृक्ष, झाडंझुडपं याचं उत्तर आपल्या कानात कुजबुजतायंत असाही आपल्याला भास होत रहातो.

आम्ही या नश्वर जगातली माणसं आपापल्या परीनं किंवा सर्वजण मिळूनही शांत बसून आपल्याच विचारात गर्क रहातो. क्वचित प्रसंगी झाडाच्या पानांची सळसळ ऐकत बसतो. किंवा आकाशातील ताऱ्यांकडे बघत बसतो. आदिमानव शिकार हरल्यानंतर असाच बसत असावा.

आणि इथे मी असा विचार करत होतो. अशा त्या रात्री माझी पहिली तुकडी राबफॅक्टला पाठवली व खूपशा फालतु गोष्टी मनामध्ये चाळवीत बसलो होतो. मी माझी ही अवस्था त्यावेळी कुणालाही सांगितली नाही. माझे सहकारी स्वत: खचलेत पण मी मात्र निश्चल अशा ओक वृक्षासारखा अगदी घट्ट राहिलो. त्यांना आपलं धैर्य गळालं याचं माझ्यासमोर प्रदर्शन झाल्याबद्दल खेदही वाटला असेल.

माझं आयुष्य किती खडतर व त्यावर केवढे अन्याय झालेत असा विचार माझ्या मनात आला. अर्ध्या डझन उनाड व गुन्हेगार पोरांनी राबफॅक्टच्या परीक्षेपर्यंत जाऊन पोचावं म्हणून माझ्या आयुष्यातला सर्वात उत्तम वेळ देण्याचा मी स्वार्थत्याग केला. आता ते मोठ्या शहरात जाणार. तिथे त्यांच्यावर काय काय प्रसंग येतील व कोणकोणती दडपणं येतील त्यांना मी काही रोकू शकणार नाही. या सर्वाचा काय शेवट होईल कोणास ठाऊक ? माझे कष्ट, माझा स्वार्थत्याग व माझी शक्ती ही भलत्याच ठिकाणा खर्ची पडली असं तर नाही ना होणार ?

मी आणखीही बराच वेळ विचार करत होतो. अन्याय झाला असा विचार का बरं माझ्या मनात यावा ? मी चांगलं कामच नाही का केलं ? एखाद्या मंडळात (क्लब) गाणी गात बसण्यापेक्षा किंवा मास्को थिएटरमध्ये नाटकात भाग घेण्यापेक्षा माझं काम शतपट मोलाचं झालं नाही का ? नटयांच्या कामाचा टाळया वाजवून सत्कार होतो व नाटक संपल्यावर ते घरी जाऊन आपल्याला मिळालेल्या लोकांच्या कौतुकाची जाण घेऊन स्वस्थ झोपी जातात आणि मी मात्र अंधाऱ्या रात्रीच्या रात्री एका अप्रसिद्ध कॉलनीत माझा वेळ का घालवतो ? कोणीसुद्धा इतकंच काय पण गोन्चारोवका गावातले लोकसुद्धा चुकूनही माझी वाहवा का करत नाहीत ? याउलट मी हजार रुबल राबफॅक्टच्या विद्यार्थ्यांना तयार करण्यासाठी खर्च केले व अंदाजपत्रकात न बसणारी ही रक्कम खर्च केली म्हणून अर्थखात्यानं करड्या नजरेनं व टीकास्त्रानं मला कसं भंडावून सोडलं याची मी

खंत का करत बसतो ? त्यांनी अनेकदा बजावलं की तुम्ही ही रक्कम खर्च करा परंतु उद्या तुमच्या अंदाजपत्रकात तूट पडली तर ती भर तुमच्या पगारातून कापली जाऊन पुरी केली जाईल ?

हा विचार करत असताना माझं मलाच हसू आलं मी अशी कल्पना केली की माझ्याच डोक्यात एक अजब खातं तयार झालंय. त्यातल्या एका भागात एक-जण हिरीरीनं इन्स्पेक्टरविरूद्ध जोरजोराने बोलत होता. दुसऱ्या भागात एकजण जोरजोराने काय गडबड आहे ? असं विचारत होता. त्याच्या पलिकडे तिसरा एकजण हजार रूबलची झालेली अंदाजपत्रकातील तूट माझ्या पगारातून कापून भरून काढायला किती महिने लागतील याचा हिशोब करत होता. हे खातं माझ्या डोक्यात सतत घोळत होतं. याशिवाय दुसरीही खाती माझ्या डोक्यात काम करत होती. शेजारच्या इमारतीत एक सभा चालू होती. आमची सर्व शिक्षकमंडळी व राबफॅक्टला जाणारे विद्यार्थी उच्चासनावर बसले होते आणि शंभर माणसांचा ताफा मोठ्या आवाजात आंतरराष्ट्रीय गीत वाजवत होता. व एक शिक्षणतज्ञ दुसरीकडे भाषण देत होता. असे विचार डोक्यात येत होते.

पुन्हा एकदा मी माझ्याशीच हसले. तो विद्वान शिक्षणतज्ञ बोलणार होता त्याचा काही उपयोग होणार होता का ? त्यानं काराबानोवसारखा हातात पिस्तुल घेऊन मोठ्या रस्त्यावर लूटमार करणारा पाहिला होता का ? किंवा कुठल्याही इमारतीत घुसून दरोडेखोरी करत असताना बाकीचे साथीदार मारले गेल्यानंतर खिडकीतून जीव बचावून निसटलेला बुरुनसारखा एखादा पाहिला होता ? छे ! त्याने काय पाहिलं होतं ? यापैकी त्याने काहीच पाहिलं नव्हतं. एकाएकी एका-तेरिनाने मला विचारलं,

'तुम्ही एवढ्या कसल्या विचारात गढले आहात ? विचार करत आहात व एकीकडे स्वतःशी हसत पण आहात.'

मी सांगितलं, 'मी एक गंभीर सभा भरवली आहे.'

'हो. ते तुमच्याकडे पाहिल्यावर दिसतंच आहे. पण मला असं सांगा, आपण आता कुठचा केंद्रबिंदू धरणार आहोत ?'

'हो, भविष्यकाळातल्या शिक्षणतज्ञांना एक नवीन दालन—केंद्रबिंदू शोधायचं-उघडेल.'

'कसलं दालन म्हणालात ?'

'मी म्हणतोय की एक केंद्रबिंदू पाहिजे. म्हणजे कुठेही सामुदायिक असलं तर त्याला एक केंद्रबिंदू असलाच पाहिजे.'

'पण कोणत्या प्रकारचा केंद्रबिंदू असला पाहिजे ?'

'आपली गरज भागेल असा. एकातेरिना, आपल्या सामुदायिकाबद्दल आपलं मत चांगलं असलं पाहिजे. आपण केंद्रबिंदू कसा काय मिळवायचा म्हणून विचार

करत बसलो आहोत. परंतु आमच्या सामुदायिकानं आपल्या लक्षात येण्यापूर्वीच एक केंद्रबिंदू तयार केला आणि चांगला केंद्रबिंदू असतो तो भागाकाराने वाढत जातो. हे मी सांगतोय ना, हे भविष्यकाळातल्या शिक्षणतंत्रासाठी तुझ्या वहीत लिहून ठेव.'

'बरं, मी लिहून ठेवते हं.' असं अगदी आज्ञाधारकतेने एकातेरीनाने सांगितलं.

दुसऱ्या दिवशी आमची शिक्षकमंडळी अगदी पार गळून गेली होती. व जाणाऱ्या मुलांसाठी आखलेला निरोपसमारंभ जरा गंभीर वातावरणातच पार पडला. मी मात्र आधीच गंभीर असलेल्या वातावरणात भर पडू नये म्हणून निश्चयाने जराही उदासवाणं रहायचं नाही असं ठरवलं होतं. मी एखाद्या कसलेल्या नटाप्रमाणे जास्तीत जास्त प्रफुल्लित व आनंदी रहायचा प्रयत्न केला. कोणालाही असं वाटावं की याची फार दिवसांची अपेक्षा आज पूर्ण झालेली दिसते.

आमची जेवणं संपून दुपारच्या वेळेला एकाएकी वातावरणात आश्चर्यकारक बदल झाला व पुन: एकदा हास्यविनोदाला भरती आली. लापोटचा विनोदी स्वभाव परत आला व त्यानं ७–८ वर्षांनी राबफॅक्टचे विद्यार्थी कसे होतील त्याची थोडीशी चुणूक दाखवली. त्यानं दाखविलं की झादारोव इंजिनिअर झालाय तो क्षयासारख्या असाध्य रोगाने मरणाच्या पंथाला लागलाय. बुरून व व्हेर्शनेव्ह हे त्याना लागणाऱ्या डॉक्टरांची फी पाळीपाळीने भरत होते व आमचा वादनपटू क्रायनिक यानं अंत्यविधीसाठी बँड वाजवायला पैसे आगाऊ मिळाल्याशिवाय यायचे नाकबूल केलं. परंतु आमचं हास्य व लापोटचा विनोद यांच्यात तसा काही दम नव्हता. फक्त वेळकाढूपणा चालला होता.

तीन वाजता आम्ही सगळे ओळीत उभे राहिलो व बावटा मध्यभागी धरला. राबफॅक्टचे विद्यार्थी उजव्या बाजूला उभे राहिले. ब्रातचिन्को मोलोडेटस्ची गाडी जोडून घेऊन आला. छोट्या मंडळींनी जाणाऱ्या विद्यार्थ्यांचं सामान गाडीत चढवलं. हुकमाबरोबर ड्रम वाजायला लागले आणि आमची मिरवणूक स्टेशनकडे निघाली. अर्ध्या तासाने आम्ही कोलोमॅकच्या खोऱ्यातनं बाहेर पडलो व एका गवताआड रस्त्याला लागलो. हा रस्ता पूर्वी हमरस्ता म्हणून ओळखला जाई. हा रस्ता तातार व कोसॅक लोक वापरत असत व तो त्यांनीच बनविलेला होता. आमच्या ड्रम वाजविणाऱ्यांनी आपले खांदे ताठ केले व काठी धरलेले हात उंच करून सावकाश परंतु धीमेपणाने वाजवायला सुरुवात केली.

'रांगेत उभे रहा, मान ताठ करा,' मी मुलांना हुकूम दिला.

काराबानोवनं मान फिरवली आणि पाय न चुकता, न थांबता तो चालत राहिला. त्याच्या चालण्याच्या ढंगात, स्वत:च्या साध्या हास्यात त्याचा अभिमान,

त्याचा आनंद, त्याला वाटणारी ओढ, त्याच्या भावना, त्याच्या ताकदीबद्दलचा त्याचा जबर आत्मविश्वास व उज्वल भवितव्य दर्शविण्याचा तो जणू प्रयत्न करत होता. त्याच्या शेजारून झादारोव पावलं टाकत चालला होता. त्यानं काराबानोवच्या हालचाली ताबडतोब जाणल्या. परंतु स्वतः मात्र नेहमीप्रमाणे आपल्या भावना झाकण्याचा प्रयत्न करत होता. त्यानं एकदा डोळे भरून आमच्या बावटयाकडे पाहिलं व आपली नजर क्षितिजावर स्थिर केली. एकाएकी काराबानोव मोठ्या आवाजात गाऊ लागला व बाकीच्यांनीही उत्साहाने त्याचा सूर पकडला. मला पण आपण जणू काही मे दिनाच्या परेडमध्ये चाललो आहोत असं वाटू लागलं. बाकीची मुलंही जणू काही माझ्या मनातल्या भावनांशी सहमत झाली. आम्हाला जणू एकदम साक्षात्कार झाला की गॉर्की कॉलनीच्या पहिल्या व उत्तम मुलांना निरोप द्यायला आम्ही आलो आहोत व आमचा बावटा वाऱ्यावर डोलत होता. जणू काही त्यांना मानवंदना देण्यासाठीच. आमचे ढोलके जोरजोराने वाजत होते. आमच्या मुलांच्या तुकडया एका लयीत चालल्या होत्या. सूर्य मावळतीकडे झुकलेला परंतु तो आनंदीत दिसत होता. जणू काही आम्हाला वाट करून देण्यासाठी खुषीनं बाजूला झाला. जाता जाता एखाद्या प्रेमवेडया कोसॅकसाठी आमच्याबरोबर तो जणू गोड गाणी आळवत असावा. परंतु ते गाणं त्याच्यासाठी नसून ते राबफॅक्टच्या विद्यार्थ्यांसाठी होतं. आमचे राबफॅक्टचे विद्यार्थी, म्हणजेच अलेक्झांडर झादारोवची सातवी संमिश्र तुकडी खार्कोव्हकडे काल झालेल्या कमांडर कौन्सिलच्या हुकुमांप्रमाणे निघाली होती. मुलं गाणी गात व मध्येच माझ्याकडे तिरकी नजर लावून बघत. मी सुद्धा त्यांच्या इतकाच आनंदाने फुललेला आहे याचा त्यांना अभिमान वाटला.

एकाएकी दूरवर धुळीचे लोट उठताना दिसले व त्यात एक घोडेस्वार अस्पष्टपणे दिसू लागला. जवळ आल्यावर पाहिलं तर दुसरंतिसरं कोणी नसून आमची ओल्या व्हेरोनोव्हा घोडा उडवत येत होती. तिनं चटकन खाली उडी मारून मला घोडयावर बसण्याची विनंती केली.

ती म्हणाली, 'अॅन्टन, वर बसा ना. खोगीर चांगलं आहे आणि अगदी खरंखुरं कोसॅक पद्धतीचं आहे. मला खरं तर यायला जरा उशीरच झाला नाही का ?'

'हे बघ, मी काही सेनाधिकारी नाही. तेव्हा हा लापोट त्याच्यावर बसेल. कारण तो आता कमांडर कौन्सिलचा चिटणीस झाला आहे.'

लापोट उत्साहाने म्हणाला, 'बरोबर आहे. तो माझाच मान आहे.' असं म्हणून तो चटकन घोडयावर स्वार झाला व त्यानं घोडा नेऊन एकदम सर्वांच्या पुढे घातला व आपल्या नसलेल्या मिशीवर पीळ दिला.

'जरा सावकाश चाला,' असा हुकूम आम्हाला द्यावा लागला. कारण ओल्गाला आमच्याबरोबर चालता यावं. लापोटच्या माकडचेष्टांचाही आमच्या मुलांना थोडा वेळ उबग आला.

स्टेशनवर पोचल्यावर एकाएकी एकदम गंभीर असा किंचित उच्छृंखलपणा आमच्या मुलांच्यात दिसला. आमचे जाणारे विद्यार्थी गाडीमध्ये सामान चढवून उभे राहिले. ते गाडीतून अभिमानाने आमच्या फलाटावरील ओळींकडे बघत होते. दुसरेही इतर प्रवासी आमच्या या सगळ्या समुदायाकडे विस्मयाने बघत होते.

दुसरी शिट्टी झाल्यानंतर लापोटनं खालीलप्रमाणे छोटंसं भाषण केलं :

'पोरांनो, तुम्ही आपलं नाव उज्वल ठेवा. शुर्का, तू सगळ्यांना शिस्तीत ठेव. आणि हा डबा म्युझियममध्ये पाठवायला विसरू नकोस व त्यावर असं लिही की, या गाडीच्या बोगीतून सेमियॉन काराबानोव राबफॅक्टची परीक्षा देण्यासाठी गेला होता.'

गाडी निघून गेली. आम्ही परत फिरलो. येताना आम्ही झाडीतून रस्ता पकडला. जागोजाग छोटेछोटे ओहोळ व खड्डे होते, त्यावरून फळ्या टाकलेल्या होत्या. त्यामुळे आम्ही उड्या मारत चालत होतो. रस्ता लहान असल्यामुळे आम्हाला लहान लहान गट करून जावं लागत होतं. संध्याकाळ झाली होती. आमची मनंही तशी उदासच होती. गुडनं कुठच्याही तऱ्हेचा आडपडदा न ठेवता सांगून टाकलं,

'मी काही बुवा या राबफॅक्टच्या भानगडीत पडणार नाही. मी आपला मोचीकाम करणार. मी चांगल्यापैकी पायताणं बनवीन. मोचीकाम करणं वाईट नाही ना अँन्टन ? कारण हे असं सोडून जाणं फार वाईट.'

यावर कुडल्टीनं गुडला रागारागानं उत्तर दिलं, 'तुला बूटसुद्धा चांगले बनवता येणार नाहीत समजलास ? मागच्या आठवड्यात तू माझ्या बुटाला ठिगळ लावून दिलंस. अरे, ते संध्याकाळपर्यंतसुद्धा टिकलं नाही. अशा तऱ्हेचा मोची डॉक्टरपेक्षाही वाईट. तुला माहीत आहे ? कधीकधी चांगला मोची हा डॉक्टरपेक्षासुद्धा चांगला ठरतो.'

एक प्रकारची विषण्ण छाया साऱ्या कॉलनीभर त्या संध्याकाळी पसरली होती. दहा वाजता झोपी जाण्याचा बिगुल वाजला त्यावेळी रात्रपाळीचा कमांडर असादची गुडला घेऊन आला. गुड प्यालेला होता. तसा तो फारसा प्यायला नव्हता पण आज तो जास्त भावनाप्रधान झालेला होता. एकंदर सर्वांनी त्याची निर्भत्सना केली. त्याच्याकडे दुर्लक्ष करून तो माझ्या टेबलापुढे येऊन उभा राहिला. माझ्या टेबलावरच्या दौतीकडे बघत तो हळू आवाजात बोलत होता.

'होय. मी प्यायलेलो आहे आणि मला वाटतं मी पिण्यात काही चूक केली नाही. मी मोची असलो तरीही मला पण अंतःकरण व मन नाही का ? आहे. मलाही मन आहे. झादारोव व इतर मुलं आपल्यातून निघून गेली. कोठे गेली कुणास ठाऊक? हा धक्का मी मुकाट्यानं कसा पचवू? मला ते सहनच होईना, म्हणून मी बाहेर गेलो व थोडीशी प्यायलो. पण ती माझ्या कमाईतूनच प्यायलो. मी चक्कीवाल्याच्या बुटाला टाच नाही का मारून दिली? मी पुन्हा एकदा सांगतो की, मी माझ्या

कमाईच्या पैशातूनच प्यायलो. मी काय कुणाचा गळा कापला का? मी कुणाचा अपमान केला का? एखाद्या मुलीचा विनयभंग नाही ना केला? यातलं काहीही मी केलं नसताना हा कमांडर मला धमकावतो, 'चल, अँटनकडे चल.' कोण हो हा अँटन? तुम्हीच का ते अँटन सेमियानोविच ? कोण हा ? जंगली जनावर ? नाही. जंगली जनावर नाही. मग हा कसल्या प्रकारचा मनुष्य आहे ? कदाचित हा अगदी नालायक कशावरून नसेल? नाही. हा नालायक मनुष्य नाही. ठीक आहे. मग? मी आता आलो. हा पहा मी तुमच्यासमोर उभा आहे. तुमच्यासमोर हा एक साधारण मोची उभा आहे.'

'मी काय म्हणतो ते ऐकण्याच्या मन स्थितीत तू आहेस का?'

'हो सांगा. मी तुम्ही काय सांगाल ते ऐकायला तयार आहे.'

'ठीक आहे. ऐक तर. बूट बनवणं आपल्याला आवश्यक आहेच. तू एक चांगला मोची होशील आणि चांगला मोची झालास तर एखाद्या कारखान्याचा कार्यवाह होशील. पण तू पिणं सोडलं पाहिजेस.'

'पण हे कसं शक्य आहे? एवढे लोक आपल्याला सोडून जाताहेत ?'

'होय. तरीसुद्धा आपल्याला शक्य आहे.'

'म्हणजे तुमच्या म्हणण्याप्रमाणे मी प्यायलो ही चूक झाली.'

'होय. तुझी फार मोठी चूक झालीय.'

'पण आता त्याला काही उपाय नाही,' असं बोलत असतानाच गुडने मान टेबलावर टेकली.

'मग मला तुम्ही शिक्षा करा,' असं तो म्हणाला.

'मी तुला आज शिक्षा करणार नाही. मात्र तू ताबडतोब झोपायला जा.'

'मी सांगितलं होतं काय तुम्हाला?' असं त्याने जमलेल्या मुलांच्याकडे पाहून म्हटलं व पुन्हा एकदा सर्वांच्याकडे रागीट नजरेनं बघत आमच्या कॉलनीच्या पद्धतीप्रमाणे त्यानं सलाम केला. 'ठीक आहे, मित्रांनो.'

लापोटनं त्याला हाताला धरून सावकाशपणे डॉरमिटरीकडे नेलं. जणू काही त्याच्या रूपानं साऱ्या कॉलनीनं आपलं दुःख प्रदर्शित केलं असावं.

अर्ध्याएक तासानं कुडल्टी माझ्या ऑफिसात आला व हिवाळ्यात वापरावयाच्या बुटासंबंधी चर्चा करू लागला. हळुवारपणानं त्यानं खोक्यातून बुटांचे जोड काढले व प्रत्येक तुकडीसाठी व्यवस्थितपणे यादी बनवली.

'आम्हाला बूट कधी देणार ? हे सगळे अगदी घट्ट होतात,' अशी कायमची ओरड चाललेली असे.

कुडल्टी त्यांना उत्तर देऊन देऊन अगदी कंटाळून गेला होता. तो जोराने ओरडला,

' मी तुम्हाला आज बूट बदलून देणार नाही. मी उद्या योग्य वेळी ते बदलून देईन. मूर्ख लेकाचे.'

माझ्या टेबलाजवळ बसून थकला भागलेला लापोट डोळे बारीक करत कुडल्टीला म्हणाला,

' हे बघ, विकणारे व विकत घेणारे या दोघांनीही एकमेकांशी सौजन्याने वागलं पाहिजे, समजलास मित्रा?'



# १२

## हिवाळा

हिवाळा सुरू झाला. ऑक्टोबरच्या अखेरीस बीट साठवण्याकरता आम्ही लांबलचक असे चर खणले होते व त्यातून एक थर बीटचा व एक थर गवताचा अशा तऱ्हेने मांडणी केली होती. हे झाल्यानंतर कमांडर कौन्सिलचा मुख्य लापोट म्हणाला,

'आपल्याला आता जरा उसंत घ्यायला हरकत नाही.'

बर्टी म्हणजे खोल खणलेल्या खंदकासारखे खोल खड्डे. बरेचसे खोल व वीस मीटर लांब. शेरेनं असे डझनाच्यावर खंदक कडक हिवाळ्याच्या वेळात खोदून ठेवले होते. शिवाय त्याच्या म्हणण्याप्रमाणे ते पुरेसे नव्हतेच. आणि आम्हाला त्यामुळे बीट त्यामध्ये कसेबसे लावून ठेवावे लागले.

प्रत्येक बीट अतिशय काळजीपूर्वक त्या खड्ड्यातून लावून ठेवावी लागली होती. जणू काही एखादी यंत्रसामुग्री काळजीपूर्वक खोक्यातून भरावी तद्वतच. शेरे संमिश्र तुकडीवर सकाळपासून रात्रीपर्यंत या कामावर देखरेख करत असे व कधीकधी पोरांना खूप सतावत असे.

'अरे, असे फेकू नका. कृपा करून नीट काळजीपूर्वक ठेवा. तुम्ही एखादंही फळ जरी जोरात आपटलंत तर त्याला इजा होईल व ते खराब व्हायला लागेल. शेवटी ते कुजेल व त्याबरोबर इतर फळंही नासून जातील. म्हणून मित्रांनो, कृपा करून फार काळजीपूर्वक हे काम करा.'

शेरेच्या या दिवसभराच्या कटकटीला मुलं साहजिकच कंटाळत व सारखं बीट करावं लागे, त्याचाही त्यांना कंटाळा येई. त्यामुळे ते शेरेच्या सारख्या सारख्या कटकटीमधून सुटका करून घेण्यासाठी आपसात काहीतरी गंमत करत. मिटका किंवा विटका संमिश्र तुकडीच्या पोरांना जमा करून एखादं परिपक्व झालेलं बीट हातात धरत, हात उंच करत व म्हणत,

' अरे, याच्याजवळ कोणी येऊ नका. हं तुमचा श्वास अगदी रोखून धरा, हात स्वच्छ धुतलेले आहेत का ?' अशा तऱ्हेने मस्करी करत.

करंडी भरभरून बीटची फळं आणली जात व एखाद्या मुलानं त्यातलं एखादं फळ हातात धरून हात उंच केला की सगळी पोरं एकदम मोठ्यानं ओरडत,

' अरे, हे तू काय करतोस ?'

सारी पोरं एकदम जागच्या जागी उभी रहात व नुसत्या माना हलवत. तो आवाज त्यांच्या ओळखीचा झालेला होता. तो आवाज पुन्हा ऐकू येई,

' तुम्हाला किती वेळा सांगितलं, काळजीपूर्वक ठेवा. '

प्रथम प्रथम काढलेली फळं अगदी हळुवार हाताने त्या गवतावर ठेवली जात. लालचुटूक दिसणारी, गवतावर ठेवलेली ती बीटची फळं फारच छान दिसायची. शेरे त्याला होणारा आनंद व येणारं हसू दाबण्यासाठी एखादी गवताची काडी तोंडात धरून चावण्याचा बहाणा करी. ते करंडे अगदी हळुवार हाताने जमिनीवरून उचलले जात. त्यावेळी मिटका हळूच म्हणे,

' मित्रांनो, अगदी हळू उचला हं. लक्षात ठेवा, थोडे जरी चुकलात तरी फळं नासायला वेळ लागणार नाही. '

शेरेच्या व मिटकाच्या आवाजात अगदी थोडं साम्य होतं व आपली नक्कल ऐकताना शेरे तोंडातली गवताची काडी चावण्याचं नाटकच करत राही.

हिवाळ्यातलं नांगरणीचं काम संपलं. आम्ही ट्रॅक्टर मिळवण्याची स्वप्नं बघत होतो. कारण घोडे नांगराला जुंपून रोजच्या रोज एक बिघा जमीन कशी-बशी नांगरली जात असे. शेरे पहिल्या व दुसऱ्या तुकडीचं काम अगदी नेटाने व धीमेपणाने करून घेत होता.

आमच्या या तुकडीमध्ये आमची अतिशय वाकबगार मुलं फ्रेडरेन्को, कोटर्चा आणि चोबोट यांच्या बरोबरीनं काम करत असत. या तिघांच्या अंगात खूप ताकद होती व त्यामुळे नांगरणीला ते जराही कमी पडत नसत. याशिवाय त्यांना जमीन-नांगरणीची चांगलीच माहिती होती. परंतु त्यांनी तीच नांगरणीची पद्धत इतर ठिकाणी पण वापरायचा शहाणपणा केला. आमच्या सामुदायिकात मैत्रीचे संबंध होते आणि इतर खाजगी जीवनातही ते जशी नांगराच्या फाळाने माती उकरावी तशाच तऱ्हेने इतर बाबतीतही ते वागत. त्यांच्या मेंदूचं काम त्यांच्या डोक्यात रहात नसे, तर ते त्यांचे लोखंडासारखे बळकट हात, स्नायू, त्यांच्या चिलखतासारख्या भरदार

छात्या व एखाद्या दगडी खांबासारखे त्यांचे पाय यामध्ये वावरत असे. कॉलनी-मध्ये ते हळूहळू राबफॅक्टच्या अभ्यासक्रमापासून दूर जात होते. इतकेच नव्हे तर पुस्तकी ज्ञानाविषयी त्यांच्या मनात नकळत एक प्रकारची नावड उत्पन्न झाली होती. त्यांची ही समजूत कोणत्याही तऱ्हेने बदलणे शक्य नव्हते. कुठल्याही इतर मुलांच्या अंगात त्यांच्यासारखी चालणूक किंवा मोजकी भाषणशैली नव्हती.

पहिल्या व दुसऱ्या संमिश्र तुकड्यांचे क्रियाशील उमेदवार म्हणून त्यांच्या-बद्दल इतर उमेदवारांना खूप आदरभाव होता. तरीही कधीकधी त्यांना कोट्या करून हिणवण्याचा मोह पोरांना आवरत नसे.

या हिवाळ्यात पहिल्या व दुसऱ्या संमिश्र तुकड्यात एका स्पर्धेपायी काही-तरी गोंधळ झाला. यावेळी बरोबरी करण्याबद्दल सोविएत युनियनचं प्रतिक तयार झालं नव्हतं. त्यामुळे मलासुद्धा सार्वजनिक शिक्षणखात्याच्या ' टॉर्चर-चेंबर ' मध्ये हाल सोसावे लागले. माझं याबद्दल बरोबरी करण्याच्या गुणाबद्दल स्पष्टीकरण आपोआपच निघालं होतं. मी त्यासाठी खरोखर काहीही परिश्रम घेतले नव्हते.

आमची पहिली संमिश्र तुकडी सकाळी सहा वाजल्यापासून दुपारपर्यंत काम करत असते व दुसरी दुपारपासून संध्याकाळी सहा वाजेपर्यंत काम करत असे. या संमिश्र तुकड्या एक आठवड्यापुरत्याच बनवल्या होत्या. दुसऱ्या आठवड्यात आम्ही या तुकड्यांमधील मुलांच्यात थोडासा फरक करत असू. परंतु हे करत असताना जास्त वाकबगार मुलांची भरती करायला विसरत नसू.

प्रत्येक दिवशी संमिश्र तुकड्या आपलं काम संपवत असत. आल्योश्का व्होल्कोव्ह, आमचा नं. दोनचा शेतीतज्ञ आपली मोजपट्टी घेऊन जाऊन किती जमीन संमिश्र तुकडीकडून नांगरली गेली आहे याची मोजदाद करी.

आमची संमिश्र तुकडी नांगरणीचं काम व्यवस्थित करत असे. परंतु ही नांगरणी जमिनीची प्रत, घोडे, जमिनीला असलेला उतार, हवामान इत्यादी सर्व गोष्टीवर अवलंबून राही. फळ्यावरती निरनिराळ्या घोषणा आल्योश्का व्होल्कोव्ह लिहून ठेवत असे.

ऑक्टोबर १९. कोरीटोची पहिली संमिश्र तुकडी : २८५० स्क्वे. मी., व्हेट-कोव्हस्कीची पहिली संमिश्र तुकडी : २३०० स्क्वे. मी., फ्रेडरेन्कोची दुसरी संमिश्र तुकडी : २४१० स्क्वे. मी., नेचीटायलोची दुसरी संमिश्र तुकडी : २२७० स्क्वे. मी.

आपोआपच मुलं हा निकाल पाहून प्रत्येकाच्या झालेल्या कामाची तुलना करायला लागले. प्रत्येक संमिश्र तुकडी आपल्या आधीच्या तुकडीला हरवायचा प्रयत्न करत असे. या सगळ्यावरून असं निदर्शनाला आलं की, फ्रेडरेन्को व कोरीटो हे उत्तम कमांडर आहेत व ते पहिला नंबर पटकावणार. ते दोघेही पूर्वीपासूनच दोस्त होते. असं असूनही कामाच्या बाबतीत मात्र ते एकमेकांना हरवायचा सतत प्रयत्न करत. व एकमेकांच्या कामातील दोष काढायलाही मागेपुढे पहात नसत.

इकडे फ्रेडरेन्कोला एक विचित्र अनुभव झाला व त्यायोगे आपल्या अंगात बरीच ताकद आहे हे निदर्शनाला आलं. काही दिवस प्रत्येक दिवशी त्याच्या तुकडीचे निकाल दिन प्रतिदिन वाढत गेलेले आल्योश्का व्होल्कोव्हच्या फळ्यावर दिसून येत. त्याची मजल २५०० वरून २६०० वर जाऊन पोचली. कोरीटोच्या तुकडीनं पण त्याची मजल गाठण्याचा प्रयत्न केला परंतु नेहमी ४० ते ५० स्क्वे. मी. तो मागेच रहात असे. फ्रेडरेन्को अशा वेळी त्याची खूपशी टवाळी करी व त्याला म्हणे,

'हे बघ मित्रा, तू माझी बरोबरी करण्याचं सोडून दे. कारण तू अजून नवीनच नांगरट करायला लागला आहेस, हे कोणीही सांगू शकेल.'

ऑक्टोबरच्या अखेरीस आमचा डॉन घोडा एकाएकी आजारी पडला. शेरेनं एकच जोडी नांगरणीला पाठवायचं ठरवलं. कमांडर कौन्सिलला त्यांनी विनंती केली की, 'कोरीटोच्या तुकडीत फ्रेडरेन्कोला सामील करून टाका, त्यायोगे त्यांच्या तुकडीचं काम भराभरा वाढू लागेल.'

प्रथम फ्रेडरेन्कोला या नवीन बदल केलेल्या परिस्थितीचा बोध झाला नाही. त्याला डॉनच्या आजारीपणाची फारच काळजी वाटत होती. शिवाय एकाच घोड्याच्या जोडीवर एवढी नांगरट कशी होणार ही पण चिंता लागून राहिली होती. त्यानं काम अतिशय वेगाने सुरू केलं. एक दिवस आल्योश्का व्होल्कोव्हनं फळ्यावर लिहिलेलं त्याने वाचलं ते खालीलप्रमाणे :

'२४ ऑक्टोबरला कोरीटोची दुसरी संमिश्र तुकडी : २७३० स्क्वे. मी.

कोरीटोला त्याच्या तुकडीच्या एवढ्या मोठ्या कर्तृत्वाचा फार अभिमान वाटला व लापोट सगळ्या कॉलनीभर सगळ्यांना सांगत सुटला की, 'फ्रेडरेन्को कोरीटोची कशी बरोबरी करू शकेल? कोरीटो हा जातिवंत शेतकीतज्ञ आहे. फ्रेडरेन्को व कोरीटोची तुलना करणं योग्य नाही.'

मुलांनी कोरीटोला आनंदाने हवेत उडवला व त्याचा जयजयकार केला. बिचारा फ्रेडरेन्को हे सारं पहात होता. त्याचे हात त्याच्या विजारीच्या खिशात घालून तो उभा होता. या प्रकाराने त्याचा चेहरा एकदम उतरला.

'अच्छा, कोरीटो हा शेतकीतज्ञ झाला काय? याच्यासारखा शेतकीतज्ञ मी अद्याप पाहिला नव्हता.'

फ्रेडरेन्कोला सारेजण सारखे प्रश्न विचारून भंडावू लागले,

'कोरीटोनं तुझ्यावर मात केली असं तुला वाटतं काय?'

फ्रेडरेन्कोनं खूप विचार केला व कमांडर कौन्सिलकडे त्यानं मागणी केली.

'कोरीटो एवढा कशाबद्दल नाचतोय तेच मी पहातो. या आठवड्यात एकच तुकडी काम करील. कोरीटोला माझ्या पहिल्या संमिश्र तुकडीत घाला आणि मी तुम्हाला ३००० स्क्वे. मी. जमीन नांगरून दाखवतो.'

कमांडर कौन्सिलला फ्रेडरेन्कोच्या या निश्चयामुळे व त्याच्या कामसूपणाच्या

स्वभावामुळे फार आनंद झाला. त्यांनी त्याची मागणी तत्काळ मान्य केली. कोरीटोनं जोरात मान हलवली व आपला नकार दर्शवला.

'का म्हणून मी फ्रेडरेन्कोच्या तुकडीत जायचं ? तो पक्का लुच्चा आहे.'

फ्रेडरेन्कोनं त्याला जबाब दिला, 'हे बघ, मला तुझ्या तुकडीत घातलं तेव्हा मी अगदी मन लावून काम केलेलं आहे. तू मात्र आता जराही हयगय करायचा प्रयत्न करू नकोस.'

काम सुरू व्हायच्या आधी कोरीटोला हे कबूल करावं लागलं की त्याची परिस्थिती जरा चमत्कारिकच आहे.

तो विचार करत होता, 'काय करावे ? हा फ्रेडरेन्को असा विक्षिप्त आहे आणि जमीन नांगरणं तर झालं पाहिजे. उद्या एखादवेळेस ते नीटपणे झालं नाही तर सर्व मुलं मला म्हणतील की फ्रेडरेन्कोचा विजय होऊ नये म्हणून मी मुद्दामच कामचुकारपणा केला व हे आमच्या दोघांच्याही दृष्टीने योग्य होणार नाही.'

दुसऱ्या दिवशी सकाळी कामावर जाताना कोरीटो व फ्रेडरेन्को खूप खूप हसले. फ्रेडरेन्कोनं एक भली मोठी काठी मधोमध ठेवली आणि आपल्या मित्राचं लक्ष त्या काठीवर केंद्रीत करायला सांगून तो म्हणाला,

'हे बघ, या इथं कामाच्या ठिकाणी मी तुझे काहीही चोचले चालू देणार नाही.'

कोरीटो प्रथम परिस्थितीच्या गंभीरपणामुळे व नंतर हसू दाबता न आल्याने एकदम लालीलाल झाला.

आल्योश्का शेतावरून परत आल्यावर तो स्वतःच्या खिशात खडूसाठी चाचपात साऱ्या पोरांनी त्याला भंडावून सोडलं व उत्सुकतेने विचारलं,

'काय रे, आजचं काम कां काय झालं ?'

आल्योश्कानं फळ्यावर सावकाश व अगदी मुकाट्यानं लिहून ठेवलं, 'ऑक्टोबर २६: फ्रेडरेन्कोची पहिली संमिश्र तुकडी – ३०१० स्क्वेअर मीटर.'

'अरे बाप रे. फ्रेडरेन्को आणि ३००० स्क्वे. मी. नांगरणी ?'

संध्याकाळी फ्रेडरेन्को व कोरीटो शेतावरून परत आले. मुलांनी फ्रेडरेन्कोचे जंगी स्वागत केलं. लापोट म्हणाला,

'मी तुम्हाला सांगितलं नव्हतं का की, फ्रेडरेन्को कोरीटोची बरोबरी करू शकणार नाही? फ्रेडरेन्को हाच खराखुरा शेतीतज्ञ आहे.'

फ्रेडरेन्कोला हे ऐकून अचंबाच वाटला. या मिश्किल लापोटला काय म्हणावं तेच त्याला समजेना. कारण जे काही झालं ते शेतावर झालं. त्यामुळे इथं मुलांच्या समोर काय करावं ते फ्रेडरेन्कोला समजेना. तिथे शेतामध्ये नांगराचा दांडा धरलेला असताना त्याला स्वतःबद्दल पक्का विश्वास वाटत होता. तो विश्वास त्याला इथे वाटेना.

'कोरीटो, तुला फ्रेडरेन्कोनं कसं काय मागं टाकलं रे?'

'त्याचं असं आहे. काय झालं ते मी सांगतो. फ्रेडरेन्कोनं आपल्याबरोबर एक भली मोठी काठी शेतावर नेली होती व हा सगळा त्याचा परिणाम आहे.'

'हो, मी बरोबर काठी घेऊन गेलो होती ही गोष्ट बरोबर आहे,' फ्रेडरेन्को म्हणाला, 'नांगराचा फाळ वरचेवर स्वच्छ करण्यासाठी काठीची जरुर पडतेच ?'

'मी तुझे काहीही लाड चालू देणार नाही असंही फ्रेडरेन्को मला म्हणाला होता.'

'बरोबर आहे. मी काय म्हणून तुझे लाड करीन. मी आत्तासुद्धा तेच सांगतो. कशासाठी तुझे चोचले करायचे? तू काय मुलगी आहेस ?'

'तुला त्या फ्रेडरेन्कोनं किती वेळा काठीनं मारलं रे ?' असं सगळ्या मुलांनी विचारलं.

कोरीटो बोलला, 'मी त्या काठीची धास्ती घेतली आणि अगदी जिवापाड मेहनत केली त्यामुळे त्याला काठीचा काही उपयोग करावा लागला नाही. खरं सांगू का तुम्हाला ? नांगर साफ करायलासुद्धा या फ्रेडरेन्कोनं काठीचा उपयोग केला नाही.'

यावर फ्रेडरेन्को म्हणाला, 'अरे, अशीच एक काठी मला जाताना सापडली व त्या काठीचा शेतात काहीतरी उपयोग करू असा विचार माझ्या मनात आला म्हणून मी ती उचलून बरोबर घेऊन गेलो.'

'त्यानं एकदाही जर काठीचा उपयोग केला नसेल तर कोरीटो, तुला तक्रार करायला काहीही जागा नाही,' असं लापोटनं बजावलं, 'पण कोरीटो, तू मात्र प्रथमपासून चुकीचं धोरण ठेवलंस. तू खरं म्हणजे अगदी सावकाश काम करायला पाहिजे होतं व तुला फ्रेडरेन्कोच्या तुकडीत घातलं म्हणून तू कमांडर कौन्सिलकडे तक्रार करायला पाहिजे होती. त्यानं त्या काठीनं एखादवेळेस इजासुद्धा केली असती. मग गोष्टी फार वेगळ्या थराला गेल्या असत्या. कमांडर कौन्सिल, कोम्सोमोल, सार्वजनिक सभा या सगळ्याला त्याला तोंड द्यावं लागलं असतं.'

'अरे, हे माझ्या लक्षातच आलं नाही हं !'

'परंतु फ्रेडरेन्को सर्वात जास्त मार्क मिळवणारा म्हणून ओळखला गेला. त्याचं श्रेय त्याचा निर्धार व परिश्रम याला दिलं पाहिजे.

समृद्ध व भरघोस शाश्वती देणारा हिंवाळा संपत आला. खार्कोव्हला गेलेल्या आमच्या मुलांची गैरहजेरी आम्ही विसरू शकत नव्हतो. परंतु आम्ही बाकीची माणसं दिवसभर परिश्रम करून रात्रीच्या वेळी मिळणाऱ्या थोड्या वेळात उत्साह व हसू चालू ठेवून त्या वातावरणाचा जिवंतपणा कायम ठेवत होतो. आमच्या एकातेरिनाबाईंनी एके दिवशी कबूल केलं की, 'खरं सांगू का? आपलं सामुदायिक अगदी वेगळ्याच प्रकारचं आहे. जणू काही काही झालंच नाही असं वाटतंय.'

मलासुद्धा आता असं वाटतं व चांगल्या तऱ्हेने पटलंय की खरोखरी तसं काही विशेष घडलं नव्हतं. आमच्या राबफॅक्टला गेलेल्या मुलांचं परीक्षेतलं यश याचा विचार सतत घोळत असे. ती मुलं जरी दुसऱ्या शहरात, आमच्यापासून लांब असली तरी अजूनही ती आमच्या कॉलनीतील इतर मुलांच्या आशाआकांक्षा उंचावल्या आहेत. झादारोव, सातव्या संमिश्र तुकडीचा कमांडर, आम्हाला नियमितपणे तिथली बातमी पत्राने कळवत असे व त्याचं सामुदायिकरित्या वाचन केलं जाई. आणि मुलंही त्या बातम्या अधिरतेनं ऐकत. झादारोव अगदी तपशीलवार लिहित असे. त्यामध्ये कोण किती मेहनत करतो आहे याबरोबरच तो स्वतःचा काही इतर खुसखुशीत मजकूर घालत असे. उदा०

'काराबानोव हा चेर्निगोव्हच्या एका मुलीच्या प्रेमात पडण्याच्या विचारात आहे. त्याला ताबडतोब हे चाळे बंद करायला सांगा. तसंच इथं वैद्यकशास्त्र शिकवलं जात नाही व व्याकरणाचा आपल्याला कंटाळा आला आहे असे व्हेर्शनेव्ह कुरकुरतो. तेव्हा त्याला उगाच शिष्टपणा करू नकोस असं फर्मावा.'

दुसऱ्या एकावेळी झादारोवने लिहिलं होतं,

'ओक्साना आणि राखील आम्हाला अधूनमधून भेटायला येतात. आम्ही त्यांना आमच्याजवळचा खाऊ देतो व त्या आम्हाला पुष्कळ बाबतीत मदत करतात. विशेषतः कोल्या व्याकरणात मागे पडत होता व मोलोस गणितात मागे पडत होता. ते त्या दोघींनी भरून काढलं म्हणून कमांडर कौन्सिलला आम्ही विनंती करतो की ओक्साना व राखील यांना सातव्या संमिश्र तुकडीचे सभासद करून घ्यावे. त्या दोघीही नियम बरोबर पाळतात.

नंतर एकदा त्याने लिहिलं, 'ओक्साना व राखील यांच्याजवळ बूट नाहीत व ते घेण्यासाठी त्यांच्याजवळ पैसेही नाहीत. तसंच आमचेही बूट आम्हाला दुरुस्त करून घ्यायचे आहेत. आम्ही दररोज खूपसा फेरफटका करतो. अॅन्टनने पाठवलेले पैसे संपून गेले. आम्हाला आमची पाठ्यपुस्तकं अजून घ्यायची आहेत व आमच्याकडे तर अजिबात पैसे नाहीत. मला स्वतःला ड्राफ्टिंगला लागणारी सामुग्री विकत घ्यायची आहे. ओक्साना व राखील यांना बूट घ्यायचे आहेत. बुटाच्या एका जोडीला बाजारात ७ रु. पडतात. या वसतिगृहात जेवण चांगलं देतात परंतु ते एकच वेळ मिळतं आणि संध्याकाळी भूक लागते. तुम्ही पाठवलेला खाऊ संपून गेला. काराबानोव चिक्कार खातो. तुम्ही पुन्हा पाठवाल त्यावेळी त्याला सक्त ताकीद द्या की इतकं खाणं चांगलं नाही.'

आमच्या सार्वजनिक सभेत सर्व मुलांनी सर्वानुमते पुढील गोष्टी मंजूर केल्या :

'ओक्साना व राखील यांना सातव्या संमिश्र तुकडीचे सभासद करून घ्यायचं व त्यांना आपले कॉलनीचे बिल्ले पाठवून द्यायचे. तसंच सातव्या संमिश्र तुकडीला

काही पैसे पाठवायचे व खाऊही पाठवायचा. काराबानोव जास्त खातो त्याबद्दल तसं करू नको हे सांगायचं आपलं काम नव्हे. सातव्या संमिश्र तुकडीचा कमांडर झादारोव तिथं आहे, त्यानं ते समजावून सांगावं. व्हेर्शनेव्हला लिहायचं की उगाच कोणत्याही गोष्टीचा बाऊ करू नकोस. काराबानोवला इशारा द्यायचा की, त्या चेर्निगोव्हच्या मुलीपासून सावध रहा. उगाच भावनाप्रधान होऊ नकोस. तुला सध्या अभ्यास करुन पास व्हायचं आहे. जरुर पडल्यास त्या चेर्निगोव्हच्या मुलीला लिहायचं की तुझं काय म्हणणं असेल ते आमच्या कमांडर कौन्सिलला कळव.'

लापोट आमची सर्वसाधारण खास कामाची सभा नेहमी थोडक्यात परंतु उत्साही वातावरणात घेत असे. त्याचबरोबर आमच्या राबफॅक्टच्या विद्यार्थ्यांना कशा तऱ्हेने उत्तर पाठवावं त्याचा आराखडा पण तयार करत असे. पण चेर्निगोव्हच्या मुलीनं कमांडर कौन्सिलला प्रत्यक्ष लिहावं ही लापोटची कल्पना सर्वांना फार आवडली व भविष्यात या अशा प्रकारच्या प्रसंगाची एक प्रथा पडून गेली.

खार्कोव्हला असलेल्या सातव्या संमिश्र तुकडीच्या एकंदर आयुष्यक्रमामुळे आमच्या मुलांच्या शिक्षणाला वेगळं वळण लागलं. राबफॅक्ट ही नुसती कल्पना नसून ती एक खरीखुरी वस्तुस्थिती आहे, ही कल्पना आमच्या मुलांच्या मनावर प्रतिबिंबित झाली. जो कोणी इच्छा दर्शविल त्याला त्या शिक्षणक्रमाला जायची संधी मिळू शकेल. याचा परिणाम म्हणजे हिवाळ्यापासून आमच्या मुलांचा शाळेच्या अभ्यासाबद्दलचा उत्साह खरोखर द्विगुणीत झाला. ब्रातचिन्को, जॉर्जिव्हस्की, असादची, स्कैनिडर, ग्लायसर व मारूस्त्या लेवचेन्को यांनी राबफॅक्टला जाण्याची तयारी जोरात सुरु केली.

मधूनमधून येणारे विक्षिप्तपणाचे झटके मारुस्त्याने सोडून दिले. तिनं आपलं लक्ष एकातेरिनाबाईंच्या केंद्रित केलं. त्या जिथे जिथे जात तिथे तिथे ही त्यांच्याबरोबर जाऊ लागली. त्यांच्या कामात त्यांना मदत करू लागली. इतकंच नव्हे तर सारखी त्यांच्या मागे मागे राहू लागली. मारूस्त्यामधील हा बदल पाहून मला खरोखरीच आनंद झाला. तिच्या एकंदर कपड्यांच्या बाबतीत वगैरे कमालीचा व्यवस्थितपणा आला. अलिकडे ती आपल्या ब्लाऊजची कॉलर अगदी कडक व शानदार तऱ्हेने बनवू लागली. तिचं सौंदर्य हळुवारपणे फुलत होतं.

आमच्या छोट्या मंडळींच्यातसुद्धा या राबफॅक्ट अभ्यासक्रमाबद्दलची कल्पना हळूहळू आकार घेऊ लागली. ती आमची छोटी मंडळी चांगला अभ्यासक्रम कोणता व त्यांनी कुठला अभ्यासक्रम स्वीकारावा याबद्दल चर्चा करू लागली

नताशा पेट्रेन्कोनं अभ्यासावर अगदी जोर दिला. तिचा उत्साह व उरक वाखाणण्यासारखा होता. ती सोळा वर्षांची होईपर्यंत अगदीच निरक्षर होती. आमच्या शाळेत ती दाखल झाल्यानंतर पहिल्याच दिवशी तिनं शालेय शिक्षणात कमालीचा उत्साह दाखवला. तिनं आपला पहिल्या व दुसऱ्या वर्षाचा अभ्यास-

क्रम पावसाळ्याच्या आरंभी पुरा केला. नताशानं डोळ्यांची उघडझाप करत माझे आभार मानले. कशासाठी म्हणून विचारताच ती मला म्हणाली,

'हा काय तुमचा प्रश्न झाला ?'

तिनं आता मला काका म्हणायचं सोडून दिलं होतं व आमच्या सामुदायिकात ती संपूर्णपणे मिसळून गेली होती. सर्वांची ती आवडती होती. तिचं असाधारण सौंदर्य व तिचं स्मितहास्य मनातला आशय तिच्या चेहऱ्यावर दर्शवत असे. तिची चोबोटबरोबरची दोस्ती अजूनही तशीच कायम होती. चोबोटसुद्धा तिची कुठल्याही संभाव्य शत्रूपासून शांत व धीमपणाने जपणूक करी. चोबोटची परिस्थिती दिवसेंदिवस जरा चमत्कारिक होऊ लागली. कारण तिच्याभोवती तसे कोणी शत्रू नव्हतेच. याउलट ती बाकीची मुलं व मुली यांच्याशीपण अगदी मित्रत्वाच्या नात्याने वागू लागली. खुद्द लापोटनं नताशाच्या बाबतीत एक वेगळीच भूमिका घेतली. त्यामध्ये कोणत्याही तऱ्हेचा उपरोधिकपणा नसून उलट तो तिची अतिशय प्रेमळपणे व लक्षपूर्वक काळजी घेऊ लागला. चोबोटला त्यामुळे एकटच्या नताशाला गाठण्यासाठी किंवा तिच्याशी स्वस्थपणे बोलण्यासाठी किंबहुना खाजगी संभाषण करण्यासाठी दीर्घकाळ वाट पहावी लागे.

चोबोटच्या एकंदर वागण्यात मला काळजीची चिन्हं दिसू लागली. एके दिवशी तो माझ्याकडे येऊन मला म्हणाला,

'अॅन्टन, मला माझ्या भावाला जाऊन भेटायचंय.'

हे ऐकून मला आश्चर्य वाटलं.

'पण तुला भाऊ आहे हे मला कधीच माहिती नव्हतं.'

'हो, मला भाऊ आहे व त्याचं स्वतःचं शेत बोगोडूखोव्हच्या जवळ आहे. मला त्याच्याकडून नुकतंच पत्र आलंय.'

असं म्हणून त्यानं माझ्या हातात पत्र दिलं. त्यात पुढील प्रकारचा मजकूर होता :

'प्रिय बंधू मायकोला फेड्रोविच यास,

तू पत्रात वर्णन केलेल्या परिस्थितीवरून मला वाटतं की तू माझ्याजवळ येऊन रहावंस. माझं घर तसं काही अगदीच लहान नाही व माझ्यासारखं शेत फारच थोड्या लोकांच्या जवळ आहे. तू माझ्याकडे येऊन राहिलास तर माझा हरवलेला भाऊ परत मिळाला म्हणून मला फार आनंद होईल. तसंच तुझी ती आवडती मुलगी आहे तिलासुद्धा तू बरोबर घेऊन ये.'

'म्हणून मला असं वाटतं की मी जावं आणि तिथे काय परिस्थिती आहे ती पहावी,' चोबोट म्हणाला.

तू काही नताशाजवळ याबद्दल बोलला आहेस का ?'

'हो, मी बोललोय.'

'मग तिचं काय म्हणणं आहे?'

'तिला काय समजतंय ? मला स्वतःलाच तिथे जाऊन पाहिलं पाहिजे. मी घर सोडल्यापासून माझ्या भावाला भेटलोच नाही.'

'मग तू एकटाच भावाकडे जाऊन बघून ये. तुझा भाऊ श्रीमंत शेतकरी असावा असं मला वाटतं.'

'तो श्रीमंत शेतकरी आहे असं काही मी म्हणू शकणार नाही.'

त्यानंतर चोबोट डिसेंबरच्या सुरुवातीला एकटाच भावाकडे गेला व बरेच दिवस तिकडे राहिला.

नताशाच्या वागणुकीवरून चोबोटची गैरहजेरी तिला फारशी जाणवलेली दिसत नव्हती. तिनं आपलं सारं लक्ष अभ्यासावर केंद्रित केलं होतं. हिवाळ्याच्या सुरुवातीला ही मुलगी तिसरी इयत्ता पास होईल असा मला विश्वास वाटू लागला.

आमच्या मुलांनी अभ्यासात जास्त जास्त गोडी घेतल्यामुळे आमच्या कॉलनीचं स्वरुप झपाट्यानं पालटलं. आमची कॉलनी खरोखरच चांगली सुधारली व इतर सर्वसाधारण शाळांच्यापेक्षा फारशी मागं राहिली नाही. कॉलनीतल्या कोणत्याही मुलांना शिक्षणाचं महत्व पटलं नाही अशी शंका व्यक्त करणं चुकीचं होतं. याचं पर्यवसान मॅक्झिम गॉर्कीबद्दल आमच्या मुलांना जास्तच जवळिक व आदर वाटण्यात झालं. गॉर्कीच्या नियमितपणे येणाऱ्या एका पत्रात त्यांनी एक इच्छा प्रदर्शित केली.

'माझ्या पुस्तकातल्या माझ्या बालपणाचा वृत्तांत कॉलनीतल्या मुलांनी हिवाळ्याच्या दिवसात दररोज संध्याकाळी वाचावा. मी पण एकेकाळी त्यांच्यासारखाच होतो. परंतु अगदी लहानपणापासून मी एकाच गोष्टीला अगदी चिकटून राहिलो होतो—ती म्हणजे खूप अभ्यास करणे व कामाचा कधीही कंटाळा न करणे. माझा अगदी पूर्ण विश्वास आहे की निर्धार असेल तिथे यश नक्कीच मिळेल.'

आमचा व मॅक्झिम गॉर्कीचा पत्रव्यवहार खूप दिवसांपासून चालू होता. आम्ही त्यांना पाठवलेल्या पहिल्या पत्रावर सोरेटो मॅक्झिम गॉर्की एवढाच पत्ता लिहिला होता व आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते पत्र त्यांना अगदी बरोबर मिळालं व त्यांनी त्याचं उत्तरही ताबडतोब पाठवलं. ते उत्तर अतिशय मित्रत्वाच्या भावनेतून लिहिलेलं होतं. आणि आम्ही त्याचं अनेकदा सामुदायिकरित्या वाचन केलेलं होतं. तेव्हापासून आमच्यात व त्यांच्यात नियमितपणे पत्रव्यवहार चालू झाला. मुलं आपापल्या तुकड्यांच्या वतीनं ती पत्रं लिहित व दुरूस्तीकरता ती माझ्याकडे आणून देत. परंतु त्यात काही दुरुस्ती करावी असं मला कधीही वाटलं नाही. ती जितक्या सहजतेने लिहिली असतील तितकी चांगली होतील व गॉर्कीला ती पत्र मनापासून आवडतील याची मला खात्री होती. म्हणून माझं संपादकत्वाचं काम फारसं नसेच. फक्त मला कधीकधी पत्राला वापरलेल्या कागदाबद्दल विचारावं लागे.

' काय रे, तुम्हाला याच्यापेक्षा चांगला कागद मिळाला नाही का ? यावर सगळ्यांच्या सह्या कशा नाहीत?' या पलिकडे फारसं विचारावं लागत नसे.

इटालीहून पत्रं आलं की ते प्रत्येक मुलाला हातात धरून बघायचा मोह आवरत नसे. गॉर्कीनं आपल्या हाताने पत्ता लिहिलेला आहे गोष्टीचं त्यांना एक तर कौतुक वाटे तसंच पत्राला लावलेल्या तिकीटावरील राजाच्या छबीकडे पाहून त्यांना आश्चर्य वाटे. ते विचारत,

' हे इटालियन लोक या राजाची ही गुलामगिरी किती दिवस सहन करणार ? त्या त्यांच्या राजाला काही अर्थ आहे का?'

पत्र फोडण्याचा व ते एकदोन वेळा वाचून दाखवायचा मान माझा होता. त्यानंतर ते कमांडर कौन्सिलच्या चिटणीसकडे दिलं जाई. कोणत्याही मुलाला त्यानंतर त्या पत्रावर वाटेल तितकी पारायणं करायला परवानगी असे. लापोटला मधूनमधून त्यांना, ' अरे, त्या ओळींच्यावरून बोटं फिरवू नका. तुमचे डोळे चांगले आहेत व बोटांचा उपयोग न करता तुम्ही ते वाचू शकता ' असं सांगावं लागे.

मुलांनी गॉर्कीच्या पत्रातल्या प्रत्येक ओळीतून जीवनाचं तत्त्वज्ञान समजावून घेतलं होतं. कारण ते शब्द असा अर्थ सांगून जात की मनात कोणत्याही प्रकारे किंतु रहात नसे. पुस्तके वाचून हे इतक्या प्रभावीपणाने समजलं नसतं. कारण पुस्तकातला मजकूर बरोबर नाही म्हणून टाकून देता येतो किंवा काही मजकुरा-वर दीर्घ चर्चाही करता येते. पण हे पुस्तक नव्हतं तर मॅक्झिम गॉर्कीनं स्वत: आपल्या हाताने लिहिलेलं जिवंत पत्र होतं.

प्रथम मुलं गॉर्कीला एक अतुलनीय व्यक्ती मानत असत. किंबहुना ते त्याला देवासारखाच मान देत व त्याची नक्कल करणं हे अगदी कल्पनेबाहेरचंच समजलं जात असे. त्याच्या आयुष्यातील लहानपणीच्या वर्णन केलेल्या गोष्टी त्याने पुस्तकात लिहिल्या असतील यावर त्यांचा विश्वासच बसत नसे.

त्याच्यासारखा लेखक असेल का ? त्यानं किती आयुष्य पाहिले आहे ? पाहिलंच नाही तर त्याबद्दल लिहिलंसुद्धा आहे. त्याच्या लहानपणीसुद्धा तो वेगळाच आहे. इतरांच्यासारखा नाहीच.

मला त्यांना पटवून देताना खूपच कष्ट पडले. गॉर्कीनं त्याच्या पत्रात लिहिलेला प्रत्येक शब्द व प्रत्येक वाक्य हे एक निखालस सत्य आहे व त्याच्या-सारख्या विद्वान माणसाला शिक्षण मिळविण्यासाठी किती कष्ट पडले ते पहा. एका जिवंत माणसाच्या आयुष्यातले जिवंत चित्र, तोच आल्योषा (गॉर्की) ज्याचं आयुष्य आमच्या कॉलनीतल्या कुठच्याही एका मुलासारखं असेल त्याच गॉकीला त्याच्या लिखाणातनं आम्ही अगदी अतिशय जवळिकीनं समजू शकलो. आमच्या मुलांना अशा त्या अद्वितीय अलेक्सी गॉर्कीला बघायची उत्कंठा लागली. तो आज ना उद्या

कधी तरी कॉलनीत येईल अशी स्वप्नं आमची मुलं बघू लागली. परंतु हे स्वप्न कधीतरी प्रत्यक्षात उतरेल या गोष्टीबद्दलही त्यांना विश्वास नव्हता.

'गॉर्की आमच्या कॉलनीत येणार ? तुम्हाला असं वाटतं का की इतरांच्या पेक्षा तुम्ही चांगले, वेगळे आहात ? तुमच्यासारखे हजारो गॉर्कीचे चाहते आहेत. इतकंच काय लाखो असतील.'

'हो, म्हणून काय झालं ? गॉर्की काय बाकीच्यांना थोडंच पत्र लिहितात?'

'तुम्हाला काय वाटतं ते पत्र लिहित नाहीत ? अरे दिवसाकाठी ते वीसएक पत्रं तरी लिहितात. जरा हिशोब करा बरं महिन्याला किती झाली ती ? सहाशे पत्रं झाली बरं ! आलं आता लक्षात ?'

या बाबतीत मुलांनी अगदी पक्की माहिती मिळवायचं ठरवलं. काही मुलं माझ्याकडे येऊन प्रश्न विचारू लागली,

'गॉर्की दिवसाला प्रत्यक्ष किती पत्रं लिहित असतील ? '

त्यांनी केलेल्या कल्पनेच्या भरारीची मला जाणीव नसल्याने मी त्यांना सांगितलं, 'मला वाटतं एखाददुसरं पत्र लिहित असतील. आणि ते सुद्धा रोजच लिहित असतील असं नाही. मधून मधून केव्हा तरी.'

'हे शक्यच नाही. ते नक्कीच जास्त लिहित असले पाहिजेत.'

'अरे वेडयांनो, तसं नाही रे. ते पत्रं लिहित बसत नाहीत. ते पुस्तकं लिहितात. त्यांना रोज किती माणसं भेटायला जातात असं तुम्हाला वाटतं ? त्यांना दिवसाकाठी काही विश्रांतीची जरुरी नको का ?'

'मग अँन्टन, तुमच्या म्हणण्याप्रमाणे ते फक्त आपल्यालाच लिहितात. म्हणजे ते आपल्या खरेखुरे मित्र आहेत. आम्ही गॉर्कीचे मित्र आहोत.'

'नाही. तुम्ही त्यांचे मित्र नव्हेत. तर तुम्ही त्यांचे चेले आहात. गॉर्की आपल्या संस्थेचे मुख्य आहेत. आपण जर त्यांना नेहमी पत्र लिहित राहिलो व कधीकधी आपण त्यांना भेटू शकलो तर आपण त्यांचे खरेखुरे मित्र बनू. गॉर्कीना अशा तऱ्हेचे मित्र नाहीत हं.'

अशा तऱ्हेने आमच्या कॉलनीतल्या नव्या सामुदायिकात गॉर्कीच्या व्यक्तिचित्राकडे सहजपणे पहाण्याची मुलांना सवय झाली. याचा परिणाम म्हणजे कुठच्याही मोठ्या व्यक्तिबद्दल मनात भीती न वाटता आदराची भावना निर्माण झाली. हा आदर गॉर्की केवळ एक लेखक म्हणून त्यांच्याबद्दल न वाटता एक प्रकारची आंतरीक ममता मुलांना वाटू लागली. अॅलेक्सी मॅक्झिमोविच आमच्या मुलांच्यापासून शेकडो मैल दूर असूनही त्याच्याबद्दल एक श्रद्धा मुलांच्या मनात निर्माण झाली. ही श्रद्धा मुख्यत्वेकरून गॉर्कीमधल्या माणुसकीबद्दलची श्रद्धा होती.

परंतु हे आपले प्रेम व आदरभाव प्रगट करण्याची मुलांना संधी मिळणं कठीण होतं. आपल्या पत्रातून ती भावना कशी प्रगट करावी ते त्यांना जमत

नव्हतं. आमच्या मुलांच्या एकंदर साध्यासुध्या सवयीमुळे व रहाणीमुळे भावनाप्रधान होणे त्यांना जमतच नसे. एके दिवशी गुड व त्याच्या तुकडीतील मुलांनी आपली भावना प्रगट करावयाचा एक मार्ग शोधून काढला. त्यांनी आपल्या पत्रात गॉर्कीना त्यांच्या पायाचं माप पाठवून द्यायला सांगितलं. उद्देश असा की ते त्यांच्यासाठी बुटाची एक सुंदरशी जोडी बनवून पाठवू शकतील. आमच्या पहिल्या तुकडीला आपण केलेली विनंती गॉर्की नक्कीच मान्य करतील असा विश्वास होता. आमच्या मुलांना बूट, पायताणं ही एक अपूर्व चीज वाटत असे. फारच थोडे लोक आमच्या मोचीकामाच्या दुकानातून बुटाची मागणी करत. चुकूनमाकून कोणी केलीच तर योग्य त्या प्रकारचं चामडे व सामान मिळवण्याची आम्हाला खूपच धडपड करावी लागे. बुटाचे तळवे व शिवणीसाठी सामान मिळणंही मुश्कील होई. न चावणारा व दिसण्यात आकर्षक असणारा बूट बनवण्यास मोची पण उत्तम कारागीर असावा लागतो. गॉर्कीला चांगल्या बुटांची जोडी फारच उपयोगी पडेल व ही बुटांची जोडी एखाद्या इटालियन कारागिराने न बनवता खुद्द त्यांच्या गॉर्कीतल्या कारागिरानं बनवली आहे याचा त्यांना खचितच आनंद व अभिमान वाटेल.

आमच्या चक्कीवर शहरातला एक मोची धान्य दळून घेण्यासाठी येई. त्याच्याशी आमच्या मुलांची ओळख झाली होती. तो आपल्या कामात वाकबगार होता अशी मुलांची पण खात्री होती. त्यानं बुटांबद्दल खालीलप्रमाणे मत मुलांना सांगितलं :

' इटालियन व फ्रेंच लोक आपल्यासारखे मोठे बूट वापरत नाहीत. तुम्ही कोणत्या प्रकारचे बूट गॉर्कीसाठी करणार आहात ? त्यांना कसले बूट आवडतात त्याची चौकशी तुम्ही केली आहे का ? त्यांना एकाच चामड्यात बनविलेले आवडतील की दोन तुकड्यांनी बनविलेले आवडतील ? तसंच त्याची टाच कशा प्रकारची असावी ? त्याचा वरचा भाग कसा असावा याची तुम्हाला कल्पना आहे का ? ते अगदी नरम असायला पाहिजेत ही तर अगदी महत्वाची गोष्ट आहे. काही लोकांना वरचा भाग अतिशय कडक असावा लागतो. तसंच चामडं कशा प्रकारचं वापरणार आहात तुम्हाला? ते चांगलं कमावून घ्यावं लागेल. लांबी किती घ्यायची तो तर प्रश्न आहेच.'

या इतक्या सगळ्या भानगडींनी चक्रावून गेल्यामुळे ती मुलं मसलतीसाठी माझ्याकडे आली.

मी त्यांना सांगितलं, 'समजा, आपण बूट करून पाठवून ते जर खराब निघाले तर ? मोठंच नुकसान होईल. आपण ते चालू (पेटन्ट) चामड्याचे करणार. बरं, हे चामडं तरी कोण आणणार ? मी किंवा कालिना इव्हानोविच. कालिना म्हणेल ! मोठे आले शहाणे, गॉर्कीला बूट करून पाठविणारे. गॉर्कीला इटालीच्या राजाचा

मोची बूट बनवून देतो, माहीत आहे ?' कालिनाने खरोखरच मी वर म्हटल्याप्रमाणे इशारा मारला.

'मी तुम्हाला खरं सांगू का ? गुड आणि कंपनी अशा नावाचं एखादं दुकान आहे का ? अजून तुम्हाला चांगले बूट बनवता येत नाहीत. गॉर्कीला मोज्यावर बूट घालायचे असतात व त्या तुमच्या बुटांमुळे त्यांच्या पायांना भोवऱ्या होता कामा नयेत. तुमचं काम अजून काही चांगलं होत नाही. तीन तीन पट्ट्या एकावर एक पायाला बांधल्या आणि तुम्ही बनविलेले बूट घातले तरी पायाला भोवऱ्या येतात. तुम्ही बूट बनवून वर त्या भोवऱ्याही गॉर्कीना बहाल कराल.'

हे सर्व ऐकून गुडला अतिशय वाईट वाटलं. इतक्या भानगडी असतील या विचाराने तो खरोखरच बारीक झाला. परंतु त्याच्या पत्राला एक महिन्यानंतर उत्तर आलं. गॉर्कीनं लिहिलं होतं,

'बाळांनो, मला काही बुटांची जरूरी नाही. मी सध्या जिथे रहातो आहे तो प्रदेश असा आहे की जिथे तुम्ही बुटाशिवाय अनवाणी चालू शकता.'

कालिना इव्हानोविचला आपल्या वक्तव्याचा अभिमान वाटला. आपल्या पाईपचे झुरके घेत घेत ते म्हणाले, 'पाहिलंत, तो खरोखरीच हुशार माणूस आहे. तुम्ही बनविलेले बूट घालून पायाला दुखापत करून घेण्यापेक्षा बूट न घातलेलेच बरे असा त्यांनी विचार केला असेल. अरे, आपला सिलँटी जेव्हा जेव्हा तुम्ही बनवलेले बूट घालतो तेव्हा तेव्हा हा जन्म कुठून घेतला व तुम्ही बनविलेले बूट घालण्याचं दुर्दैव आपल्यावर ओढवले असं त्याला वाटतं.'

गुडनी यावर आपला अभिप्राय दिला; 'बरोबर आहे. बूट वापरणारा इटालियन व बूट बनविणारा इथं असं असेल तर ती बुटाची जोडी कधीच चांगली नाही होणार. ठीक आहे कालिनासाहेब, अजून पुष्कळ वेळ आहे. गॉर्की केव्हाही जरी आमच्या कॉलनीत आले तर आम्ही त्यांना उत्तमपैकी बुटाची जोडी बनवून देऊ.'

हिवाळा तर अशा तऱ्हेने संपून गेला.

ट्युबोवा सॉवलेवना झुरिन्स्काया या शिक्षणखात्याच्या इन्स्पेक्टरबाईनी आमच्या कॉलनीला भेट दिली. या बाई खार्कोव्हहून मुद्दाम आमची कॉलनी पहाण्यासाठी आल्या होत्या. एखादा सराईत लांडगा जसा शिकाऱ्याला बेमालूम झुकांडी देईल तद्वतच इतर इन्स्पेक्टर लोकांचं जसं मी स्वागत करत असे तसंच मी याही बाईंचं स्वागत केलं. अर्थात नेहमी हसतमुख असणारी मारिया कोंड्रायेवना, त्यांच्याबरोबर आली होतीच.

'या विक्षिप्त प्राण्याशी मी तुझी ओळख करून देते,' असं मारिया म्हणाली, 'मला हा माणूस फार चांगला आहे असं वाटत असे. पण हा म्हणजे एक साधू-

पुरुष आहे. मला तर त्याला पाहून भीतीच वाटते. माझ्या सदसद्विवेकबुद्धीची टोचणी लागते.'

झुरिन्स्कायाने बोकोवाचे खांदे धरून तिला हळूच बाजूला केलं व म्हणाली,

'तू जा पाहू इथून. तुझा पोरकटपणा तुझ्याजवळ राहू दे. आम्ही आमची ओळख करून घेऊ.'

'वा! फारच छान. आनंद झाला.' मारियानं अगदी प्रेमळपणानं असं म्हटलं व हसली. त्याबरोबर तिच्या गालावरच्या खळ्या उठून दिसल्या. 'हे पहा माझा पोरकटपणा आवडून घेणारी पुष्कळ मंडळी इथं आहेत. तुमची पोरं कुठे गेली. बहुधा नदीकाठी गेली असतील नाही?

'मारिया!' अशी शेलापुतीनची आरोळी नदीकाठावरूनच ऐकू आली. 'मारिया, मारिया इकडे या. आमच्याजवळ एक सुंदरगाडी—बर्फावरून चालणारी गाडी—आहे.'

'आम्हाला दोघांना त्यावर जागा होईल का?' असं नदीच्या दिशेने जाता जाता मारियानं विचारलं.

'पुष्कळ जागा आहे. आणि कोल्या पण येतो आहे. पण तुम्ही तर झगा घातलाय आणि जर का पडलात तर तुमची परिस्थिती फार चमत्कारिक होईल.'

'काही हरकत नाही. कसं पडायचं ते मला माहीत आहे,' असं मारियानं ओरडून सांगितलं. त्याचवेळी तिनं सहेतुकपणे झुरिन्स्कायाकडे पाहिलं.

ती भराभर कोलोमॅककडे जाणाऱ्या बर्फानं आच्छादलेल्या उताराकडे गेली. तिच्याकडे निर्मळ कटाक्ष टाकून तिच्यापाठोपाठ झुरिन्स्काया पण गेली. जाता जाता ती म्हणाली,

'विक्षिप्त बाई आहे नाही? तुमच्या कॉलनीत तिला अगदी आपल्या घरासारखे वाटतं.'

'त्यापेक्षाही वाईट' असं मी उत्तर दिलं, 'फार आवाज करण्याबद्दल मला एखाददिवशी तिला सक्तीचं काम करण्याची शिक्षा द्यावी लागेल.'

'बरी आठवण केलीत तुम्ही माझ्या कामाची. मी खरं म्हणजे तुमच्याकडे आज शिस्तीबद्दलच बोलायला आले आहे. तुम्ही शिक्षा देता हे एकंदर तुम्ही मान्य करता तर! ही सक्तीच्या कामाची शिक्षा. याशिवाय तुम्ही अटक वगैरे सुद्धा करून ठेवता असं आम्ही ऐकलंय. व अटक केल्यावेळी फक्त भाकरी व पाणीच देता हे सारं खरं आहे तर!'

झुरिन्स्काया ही चांगलीच उंच व दमदार बाई होती. तिचे डोळे मोठे होते. तिच्याकडे पाहून मनात विचार आला की, 'मी या बाईना व्यवस्थितपणे समजावून वाटेला लावू शकेन.'

मी उघडपणे म्हटलं, 'मी त्यांना नुसत्या पाव-पाण्यावर ठेवत नाही. याउलट

त्यांना कधीकधी रात्रीचं जेवणच देत नाही. सक्तीच्या कामाची शिक्षा देतोच. त्यांना कधीकधी अटक करून ठेवतो. पण ते पोलीस चौकीत नव्हे, तर माझ्या ऑफीसात. माझ्याबद्दल तुम्हाला मिळालेली सर्व माहिती अगदी खरी आहे.'

'अहो, या सगळ्या गोष्टींना आता बंदी घातली आहे हे तुम्हाला माहीत नाही काय?'

'हो, परंतु कायद्याने याच्यावर बंदी घातलेली नाही. मी कुठल्यातरी लोकांनी काहीतरी लिहून ठेवललं वाचत नाही.'

'म्हणजे तुम्ही शिक्षणशास्त्राची पुस्तक वाचत नाही असं तुमचं म्हणणं आहे?'

'होय, मी तीन वर्षांपूर्वीच हे सर्व वाचायचं सोडून दिलेलं आहे.'

'तुम्हाला हे सांगताना खरोखरी लाज वाटली पाहिजे. पण तुम्ही एकंदरीने तरी काही वाचता का?'

'मला त्याबद्दल बिलकुल लाज वाटत नाही. लक्षात ठेवा मी भरपूर वाचन करतो. व जे लोक शिक्षणशास्त्राची पुस्तके वाचतात त्यांची मला खरोखरी कीव येते.'

'मग मला तुम्हाला खरोखरीच बदलायला पाहिजे. मी ते करीनच. आपल्याला सोविएत शिक्षणशास्त्रज्ञांची अतिशय जरूरी आहे.'

हे सर्व संभाषण इथंच थांबवावं असं मी ठरवलं व त्या बाईंना मी अगदी निक्षून सांगितले,

'हे पहा, मला यावर चर्चा करायची नाही. माझ्या कॉलनीत खरंखुरं सोविएत शिक्षणतंत्र मी वापरतो. याबद्दल माझी संपूर्ण खात्री आहे. शिवाय आमचं हे समाजसत्तावादी शिक्षण आहे. तुम्हाला प्रत्यक्ष अनुभवाने किंवा संशोधन करूनच या विषयावर काम करावं लागेल. अशा गोष्टी नुसती चर्चा करून ठरवता येत नसतात. तुम्ही इथे किती दिवस रहाणार आहात, सांगा पाहू?'

'दोन दिवस'.

'ठीक आहे. तुमच्या हाताशी सगळ्या पद्धती आहेत. तुमच्या अवतीभोवती डोळसपणानं बघा. आमच्या मुलांशी बोला. त्यांच्याबरोबर जेवा, काम करा व त्यांच्या बरोबरच विश्रांती घ्या. यावरुन तुम्हाला काही तर्क काढायचे असतील ते काढा. आणि तुम्हाला वाटत असेल तर मला या जागेवरून खुशाल काढून टाका. तुम्ही तुमची निदाने लिहून काढा. व मला काय हुकूम करायचा आहे तो खुशाल करा. तो तुमचा हक्क आहे. परंतु मी मात्र माझ्या मनाप्रमाणे व मला जरूरी वाटते त्याप्रमाणे जास्तीत जास्त चांगल्या तऱ्हेने शिक्षण द्यायचा प्रयत्न करीन. शिक्षा न देता मुलांना कसं शिकता येतं ते अजूनही मला समजत नाही. ती कला मला अजून हस्तगत करायची आहे.'

टयुबोवा सॉवलेबना दोनच दिवस काय पण चांगली चार दिवस आमच्या-

बरोबर राहिली. या चार दिवसात मी तिला क्वचितच भेटलो. पण मुलं मात्र कुरकुरताना मी ऐकली,

'अरे, कसली खट बाई आहे ही. तिला वाटतं आपल्याला सर्व काही कळतं.'

तिच्या चार दिवसांच्या मुक्कामात व्हेटकोव्हस्की माझ्याकडे आला व म्हणाला 'आन्तोन, मी कॉलनी सोडून जात आहे. मला परवानगी द्या.'

'अरे पण तू कुठे जाणार?'

'मी जाईन कुठेतरी. इथे मला आता कंटाळा आलाय. मला राबफॅक्टला जायची पण इच्छा नाही. व सुतारकामात प्राविण्य मिळविण्याचीही मला इच्छा नाही. मी असाच भटकत राहीन व जग पाहून येईन.'

'मग, त्यानंतर काय करशील तू ?'

'ते मी नंतर पाहीन. तुम्ही माझी कागदपत्रं मला परत द्या.'

'ठीक आहे. कमांडर कौन्सिलची सभा आज संध्याकाळी आपण बोलावू. व तुला सोडायचं की नाही ते तेच ठरवतील.'

कमांडर कौन्सिलमध्ये व्हेटकोव्हस्कीनं फार विक्षिप्त भूमिका घेतली. विचारलेल्या प्रश्नांची त्यानं अगदी औपचारिक उत्तरं दिली.

'मला इथे आता आवडत नाही असं मी तुम्हाला सांगितलं. तुम्ही कोण मला ठेवून घेणार ? मला वाटेल तिकडे मी जाईन. मी काय करावं व काय करू नये हा प्रश्न माझा आहे. वेळ पडल्यास मी चोऱ्याही करीन.'

कुडल्टी यावर चिक्कार संतापला, 'तुझं म्हणणं काय त्याच्याशी आम्हाला काय जरुरी नाही ? तू चोऱ्या करणार व आम्ही गप्प बसून बघायचं ? समज मी उठलो व असं बोलण्याबद्दल तुझ्या एक सणसणीत थोबाडीत दिली तर काय होईल ? तुझ्या या वागण्याचा आमच्याशी काहीही संबंध नाही हे तू कशाच्या आधारावर म्हणतोस ?'

टयुबोवा सॉवलेवना हे सारं ऐकून स्तिमित झाली. तिचा चेहरा एकदम पडला. तिला काही बोलायचं होतं पण आता उशीर झाला होता. आमची सारी चिडलेली मुलं व्हेटकोव्हस्कीवर एकदम ओरडली. व्होल्कोव्ह तर त्याच्या पुढयात जाऊन उभा राहिला व म्हणाला, 'तुला एखाद्या दवाखान्यातच पाठवलं पाहिजे. देऊन टाका रे त्याचे कागदपत्र त्याला. पण खरोखर काय आहे ते सांगायला तुला काय धाड झालीय ? तुला कुठेतरी काम मिळतंय खरं ना ?'

गुड तर सर्वात भयंकर चिडला, 'आपल्याकडे काही कुंपण घातलेलं नाही. खरं ना ? तू असा गाढव आहेस. तू गेल्यास तर आम्हाला मुळीच वाईट वाटणार नाही. तुला काय वाटल मोलोडेटची गाडी जुंपून आम्ही तुला शोधत फिरू? मुळीच नाही. तुला पाहिजे तिकडे जा. तू खरं तर इथे आलासच कशासाठी ?'

'ठीक आहे. आता तुमचं सर्वांचं मतप्रदर्शन झालेलं आहे. पण आम्ही तुला स्वच्छ सांगतो कोत्स्या की आम्ही तुझं कागदपत्रं तुला देणार नाही.'

कोत्स्यानं आपली मान खाली घातली व म्हणाला, 'ठीक आहे. मला कागदपत्रं नकोतच. मी तसाच जाईन. पण मला दहा रुबल वाटखर्चासाठी द्या.'

'आपण द्यायचे का?' सेक्रेटरी या नात्यानं लापोटनं विचारलं. सर्वजण गप्प बसले होते. झुरिन्स्कायानं आपले कान टवकारले होते. डोळे मिटून घेऊन ती कोचावर मागे रेलली होती. कोव्हल म्हणाला, 'कोत्स्यानं कोम्सोमोल संघटनेला याच प्रश्नावर विनंती केली होती. आम्ही त्याला कोम्सोमोलमधून काढून टाकला. पण मला वाटतं आपण त्याला दहा रुबल देऊन टाकू.'

'ठीक आहे,' कुठून तरी आवाज आला, 'त्याला दहा रुबल द्यायला आमची काहीच हरकत नाही.'

मी माझी पैशांची पिशवी बाहेर काढली.

'मी त्याला वीस रुबल द्यायला तयार आहे. कोत्स्या, पैसे मिळाल्याची पावती लिहून दे.'

अशा त्या सगळ्या शांततेत कोत्स्यानं मुकाट्यानं वीस रुबल मिळाल्याची पावती दिली, पैसे खिशात घातले व आपल्या डोक्यावर टोपी ठेवून,

'मित्रांनो, मी येतो,' असं म्हणून तो निघाला.

त्याला कोणीही प्रत्युत्तर दिलं नाही. लापोट आपल्या जागेवर उभा राहिला. कोत्स्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघून तो ओरडला,

'ठीक आहे. हे वीस रुबल संपले की पुन्हा परत ये. लाज वाटू देऊ नकोस. काम करून तू ते फेडू शकतोस.'

कमांडर कौन्सिलची सभा संपली. साऱ्यांनाच विचित्र वाटत होतं. टयुबोवाबाई आपल्या विचारातून जाग्या झाल्या व म्हणाल्या,

'बाप रे, किती विचित्र आहे हे सारं. कोणीतरी त्या पोराची समजूत घालायला हवी होती,' क्षणभर थांबून त्या परत म्हणाल्या, 'पण हे तुमचं कमांडर कौन्सिल भलतंच जबरदस्त दिसतंय.'

दुसऱ्या दिवशी टयुबोवाबाई जायला निघाल्या. ब्रातचिन्को गाडी घेऊन आला. गाडीमध्ये घाणेरड्या गवताच्या काड्या व काही कपटे पडलेले होते. टयुबोवाबाई गाडीत जाऊन बसल्या. गाडीतली घाण पाहून मी ब्रातचिन्कोला विचारलं.

'गाडीमध्ये ही घाण कशी पडली आहे?'

'मला साफ करायला वेळ मिळाला नाही,' असं जरा घुश्शातच ब्रातचिन्को पुटपुटला.

'मी परत येईपर्यंत तू स्वतःला अटक करून घे.'

'ठीक आहे' असे म्हणून ब्रातचिन्को जरा बाजूला झाला. 'तुमच्या ऑफिस-मध्येच ना ?' असं त्यानं मला विचारलं.

'होय ऑफिसमध्येच.'

एवढ्या कडक शिक्षेबद्दल राग दर्शवत ब्रातचिन्को ऑफिसमध्ये गेला. आम्ही स्टेशनवर पोचेपर्यंत टयुबोवा काहीएक बोलल्या नाहीत. तिथे पोचल्यावर माझा दंड धरून त्या म्हणाल्या,

'एवढी कडक शिक्षा का दिलीत ? तरीही तुमचं सामुदायिक खरोखरच फार छान आहे. तुम्ही खरोखर जणू अगदी जादू केली आहे. तुमच्या कॉलनीतलं सारं आयुष्य पाहून मी भारावून गेले आहे. पण खरोखरच सांगा. या ब्रातचिन्कोला तुमच्या ऑफिसमध्ये अटक करून ठेवली आहे का ?'

मी विस्मयाने बाईकडे पाहिलं व त्यांना म्हटलं. 'होय, ब्रातचिन्को हा अतिशय नेमस्त माणूस आहे. व तो खरोखरीच आता माझ्या ऑफिसात अटकेत आहे. पण खरं सांगू, ती सारीजण पक्की बनेल पोरं आहे.'

'असं म्हणू नका. तुमच्या त्या कोल्स्याचं जरा वाईट वाटलं. पण माझी खात्री आहे तो परत येईल. तुम्ही अगदी खरोखर मस्त आहोत. तुम्ही हे सर्व काही छानपैकी चालवलंय व तुमच्या कोल्स्या तर सर्वात छान आहे.'

मी फक्त एक निश्वास सोडला. पण उत्तर मात्र काही दिलं नाही.

□

# १३

## ' प्रीती आणि काव्य यांचा संगम '

१९२५ साल उजाडलं. पण सुरुवातीपासूनच अपशकुनाला सुरुवात झाली. कमांडर कौन्सिलच्या सभेत ऑप्रिश्कोनं आपल्याला मारूस्त्याबरोबर लग्न करायचं आहे अशी घोषणा केली. म्हातारा लुकाशेन्को कॉलनीनं हुंडा दिल्याशिवाय लग्नाला संमती देत नव्हता. त्याचं म्हणणं असं की, व्होल्गा व्हेरोनोव्हाला जेवढ्या भेटी दिल्या तेवढ्या दिल्या तरच तो ऑप्रिश्कोला जावई म्हणून आपल्या घरात प्रवेश द्यायला तयार होता. व आपली जमीन दोघं मिळून कसू असं त्याचं म्हणणं होतं.

कमांडर कौन्सिलच्या सभेमध्ये ऑप्रिश्कोनं असा पवित्रा घेतला की, ' लुकाशेन्को हा सभ्य माणूस आहे व तो आपल्याला त्याच्या जमिनीचा वारस करणार आहे.'

हे ऐकून सारे कमांडर एकदम स्तब्ध बसले. लापोट हातातल्या पेन्सिलीच्या टोकावरून ऑप्रिश्कोकडे बघत थंडपणे त्याला म्हणाला,

' डिमिट्रो, ठीक आहे. तू स्वतःला कोण समजतोस? लुकाशेन्कोच्या घरात तू जावई म्हणून गेलास की तुला ते गावकरी म्हणून समजणार आहेत का?'

लापोटकडे बघत ऑप्रिश्को उपरोधिकपणाने हसला व म्हणाला, ' तुला काय म्हणायचं असेल ते म्हण. मी गावकरी होणार.'

' मग तुझी गणना कशा तऱ्हेने होणार? '

'वेळ येईल त्यावेळेला त्याचा विचार करता येईल. ठीक आहे. कोणाला यावर बोलायचंय का?' असं लापोटने विचारलं.

यावर सहाव्या तुकडीचा कमांडर व्होल्कोव्ह उभा राहिला व म्हणाला 'प्रत्येक मुलाला आपल्या आयुष्याबद्दल विचार करायचा आहे हे आपल्याला मान्य आहे. जन्मभर कॉलनीतच चिकटून कुणाला रहायचं नाही. तसं पाहिलं तर आपल्याजवळ काय पात्रता आहे? सहाव्या, चौथ्या किंवा नवव्या तुकडीच्याबद्दल काहीतरी बोलता येईल. कारण त्यातले काही सुतारकाम, लोहारकाम किंवा आपली चक्की चालवणं ही कामं करू शकतात. परंतु ज्या तुकड्या शेतामध्ये काम करत आहेत, त्यांच्याजवळ कसली पात्रता आहे? म्हणून ऑप्रिश्कोला शेतकरी व्हायचं असेल तर त्याला आमची मुळीच हरकत नाही. परंतु या सर्व बनावात विचित्रपणा दिसतोय. ऑप्रिश्को, तू कोम्सोमोल आहेस का?'

'होय, मी कोम्सोमोल आहे. पुढे काय?'

व्होल्कोव्हनं आपलं बोलणं पुढे चालू ठेवलं, 'ही सगळी चर्चा आपण कोम्सोमोल संघटनेमध्ये प्रथम करावी असं मला वाटतं. कमांडर कौन्सिलला कोम्सोमोलचं काय म्हणणं आहे ते कळणं आवश्यक आहे असं मला वाटतं.'

'कोम्सोमोल संघटनेचं म्हणणं असं की गॉर्की कॉलनी ही सुखवस्तू शेतकरी तयार करण्यासाठी निघाली नाही. लुकाशेन्को हा एक सुखवस्तू शेतकरी आहे,' मला कोव्हलनं उठून सांगितलं.

'तुम्ही त्याला सधन शेतकरी का म्हणून म्हणता? असं त्याला म्हणायला माझी हरकत आहे. त्याच्या घरावर छप्पर आहे म्हणून काही तो लगेच बडा होऊ शकत नाही.'

'त्याच्याकडे दोन घोडे आहेत त्याचं काय? शिवाय त्याच्याकडे एक नोकर आहे त्याचं काय?'

'मुळीच नाही. त्याच्याकडे नोकर वगैरे काही नाही.'

'तो सर्जी आहे तो कोण आहे?'

'शिक्षणखात्याने अनाथालयातून सर्जी त्याला दत्तक दिला आहे.'

'माहीत आहे आम्हाला. तो शिक्षणखात्याकडून आला तरी त्याचा कसा उपयोग केला जातो हे आम्ही चांगलं जाणून आहोत,' कोव्हलनं बजावलं.

'हो, पण समजा, त्यांनी त्याला दत्तक दिला असला तर?'

'कोणताही सभ्य मनुष्य असा उगाच दत्तक घेणार नाही.'

अशा तऱ्हेने बाजू आपल्यावर उलटेल अशी कल्पना ऑप्रिश्कोला नव्हती. म्हणून तो जरा घुश्श्यातच म्हणाला, 'तुम्ही हे सारं कशासाठी काढता, सांगा पाहू? ओलगाला मात्र तुम्ही.........'

कोव्हलनं त्याला मध्येच अडवून उत्तर दिलं, 'हे बघ, ओल्गाची गोष्टच निराळी होती. पहिली गोष्ट म्हणजे तिनं आपल्यातल्याच एकाशी लग्न केलं. ती आणि पावेल आपल्या सामुदायिकात येऊन रहाणार आहेत व आपण तिला दिलेल्या सर्व गोष्टींचा आपल्यालाच उपयोग होणार आहे. शिवाय कॉलनीतली एक घटक म्हणून ओल्गा खरोखरीच एक वेगळीच आहे. तिसरे म्हणजे आपण सुखवस्तू शेतकरी तयार करणं हे काही आपलं ध्येय नाही.'

'मग मी काय करावं असं तुमचं म्हणणं आहे?'

'तुला काय हवं ते तू कर.'

'असं नाही चालणार हं!' मध्येच स्तुपिदसीन म्हणाला, 'त्या दोघांचं जर खरोखरच प्रेम असेल तर त्या दोघांना खुशाल लग्न करू दे. ओल्गाला जेवढा हुंडा व जेवढचा वस्तू आम्ही दिल्या तेवढचाच याला पण आम्ही देऊ. पण एका अटीवर. ऑप्रिश्कोनं लुकाशेन्कोच्या घरी जाऊन रहाणं आम्हाला प्रशस्त वाटत नाही. त्यांनी दोघांनी आपल्या सामुदायिकात येऊन मिसळावं. ओल्गा इथं प्रमुख म्हणून राहील.'

'मारूस्त्याचा बाप तिला घर सोडून जायला परवानगी देत नाही.'

'मारूस्त्याचा बाप जाऊ दे खड्डचात. आम्हाला त्याच्याशी काही कर्तव्य नाही.'

'ती तशी एकटी राहू शकणार नाही.'

'यावरून हे उघड आहे की तिचं तुझ्यावर खरोखर प्रेम नाही. बोलून-चालून ती सुखवस्तू शेतकऱ्याचीच मुलगी.'

'ती माझ्यावर प्रेम करते की नाही याच्याशी तुम्हाला काय करायचंय?

'अर्थात आम्हाला त्याच्याशी जरुर कर्तव्य आहे. ती मनात काहीतरी हेतू धरूनच तुझ्याबरोबर लग्न करायला तयार झालेली आहे. तिचं तुझ्यावर खरोखरच प्रेम असतं....'

'हो, पण तिचं प्रेम माझ्यावर आहेच. त्याचबरोबर तिला आपल्या वडिलांचं घरही सोडायचं नाही. ती आपल्या सामुदायिकातही रहायला येणार नाही.'

'असं काय? ठीक आहे. मग कमांडर कौन्सिलला तिच्याशी काही कर्तव्य नाही' असा कुडल्टीनं टोला हाणला. 'तुला एका सुखवस्तू शेतकऱ्याच्या घरी जायचंय व लुकाशेन्कोला सुखवस्तू जावई हवा आहे. पण या साऱ्याची आम्ही का म्हणून पर्वा करावी? चला रे, कमांडर कौन्सिलची सभा संपली.'

लापोटला मनापासून अगदी आनंद झाला व तो अगदी दात विचकून हसला. वर त्यानं भाष्य केलं की, 'मारूत्स्याच्या नरमगरम प्रकृतीमुळे कोणताही निर्णय न घेता कमांडर कौन्सिलची सभा संपली असं समजा.'

कमांडर कौन्सिलच्या सभेनंतर ऑप्रिश्को दुसऱ्या दिवसापासून एकदम

गप्प झाला. तो साऱ्या कॉलनीभर एखाद्या वेड्यापिशासारखा वागू लागला. उगीचच कोणालाही दमदाटी करू लागला. एके दिवशी तर त्यानं कळसच केला. तो दारू पिऊन आला व साऱ्या कॉलनीभर त्यानं गोंधळ घातला.

कमांडर कौन्सिलची तातडीची सभा ऑप्रिश्कोला जाब विचारण्यासाठी बोलावण्यात आली. एकंदर सर्वांचे चेहरे दुःखी दिसत होते. ऑप्रिश्को स्वतःही मान खाली घालून हिरमुसलेल्या स्थितीत भिंतीला टेकून उभा होता. लापोट त्याला म्हणाला, 'हे बघ तू स्वतःच कमांडर आहेस, हे तर खरं ? आणि तू आता गुन्हेगार आहेस. तेव्हा तू भिंतीला टेकून उभा न रहाता मध्ये उभा रहा.'

कोणत्याही गुन्हेगारानं नेहमी कमांडर कौन्सिलच्या सभेत मधोमध उभं रहायचं असा आमचा रिवाज होता.

ऑप्रिश्कोनं एक दीनवाणा कटाक्ष सगळीकडे फेकून आपली नजर अध्यक्षाच्या चेहऱ्यावर रोखली आणि विचारलं, 'मी काय चोरी केली आहे ? मी मुळीच मध्ये उभा रहाणार नाही जा.'

'नाही कसं? तुला मध्ये उभं रहावंच लागेल,' असं लापोटनं निर्धारितपणे सांगितलं.

ऑप्रिश्कोनं पुन्हा एकदा सबंध सभेवर नजर फिरवली व तो मनातल्या मनात समजला की ते आपल्याला ठरल्याप्रमाणे मधोमध उभं रहायला लावतीलच. नाईलाजाने तो भिंतीपासून सरकला व हळूहळू खोलीच्या मध्यावर येऊन उभा राहिला.

'हं बोला, आता काय?' तो म्हणाला.

'सरळ उभा राहा,' लापोटनं हुकूम केला.

ऑप्रिश्कोनं खांदे उडवले व उपहासाने हसला. परंतु त्याचबरोबर तो शक्य तितका ताठ उभा राहिला.

'आता तू सर्वांना सांग की, तुला दारू प्यायचं धैर्य कसं झालं ? शिवाय झोपण्याच्या खोलीत तू दंगामस्ती का केलीस? तू एक कोम्सोमोल आहेस. तू कॉलनीतला एक सभासद आहेस व सर्वात मुख्य म्हणजे तू आमच्यासारखाच एक कमांडर आहेस. आता सांग.'

ऑप्रिश्कोच्या वागण्याच्या दोन तऱ्हा होत्या. तो आपण कुणीतरी विशेष आहोत अशा थाटात बेफिकीरपणे वागत असे. किंवा कधीकधी अतिशय काळजीपूर्वक धूर्तपणाने वागत असे. ऑप्रिश्कोचे हे दोन स्वभावधर्म सर्व मुलांना माहीत होते. आणि त्यामुळे त्याचा आजचा मवाळपणा पाहून सर्वांना जरा आश्चर्य वाटलं. सातव्या तुकडीचा कमांडर व्हेटकोव्हस्की गेल्यानंतर त्याच्या जागी झोर्काव्होल्कोव्ह याचीही नव्यानंच नेमणूक झाली होती. त्यानं ऑप्रिश्कोला उद्देशून म्हटलं,

'आता तुम्ही पाहिलंत का? एकाएकी हा अगदी सुधारून गेलाय. तो अगदी

एखाद्या कोकरासारखा झालाय. आणि उद्या हाच पुन्हा शिष्टपणाचा आव आणून सगळीकडे फिरेल.'

'थांब रे, त्याला बोलू दे तरी.' असादची गुरगुरला, 'मी काय म्हणावं असं तुमचं म्हणणं आहे? मी चूक केली बस्. यापेक्षा जास्त काय म्हणायचं आहे?'

'नाही. तुला ही हिंमत कशी झाली ते आम्हाला सांग.'

ऑप्रिश्कोचे डोळे लकाकले. व त्याने जणू सहानुभूती मिळवण्यासाठी आपले हात सर्वांच्यासमोर पसरले व म्हणाला,

'त्यात धैर्य कसलं घेऊन बसलात ? मी माझं दुःख विसरण्यासाठी प्यायलो. माणूस जेव्हा प्यायलेला असतो, तेव्हा त्याच्या हातून झालेल्या चुकांबद्दल तो काय जाब देऊ शकणार?

'ओ हो ! असं आहे काय तुझं म्हणणं ? पण तुला तो जाब द्यावा लागेल. जाब द्यावा लागणार नाही अशी जर तुझी कल्पना असेल तर ती चुकीची आहे. त्याला कॉलनीतून हाकलून द्या व यापुढे जो कोणी पिणार असेल त्या प्रत्येकाला इथून काढून लावा. असल्या लोकांना इथे जागा नाही.'

डोळे विस्फारत जॉर्जेव्हस्की म्हणाला, 'अरे याला जर आपण हाकलून दिला तर तो अजिबात वाया जाईल.'

'जाऊ दे'

'हे केवळ त्याच्यावर पडलेल्या दुःखामुळे घडलं. तुम्ही सगळे त्याच्यावर तुटून का पडता ? अरे त्याला केवढं दुःख झालंय. तुम्ही सारे त्याला उगाच का छळता ?' असं ऑप्रिश्कोच्या दीनवाण्या चेहऱ्याकडे बघून असादची उपहासानं म्हणाला.

'लुकाशेन्को त्याला फुकटफाकट जावई करून घ्यायला तयार नाही,' तारानेटने पुस्ती जोडली.

'आपल्याला त्याच्याशी काय करायचंय ? लुकाशेन्को त्याला जावई म्हणून पत्करणार नसेल तर ऑप्रिश्कोनं दुसरा एखादा सुखवस्तू शेतकरी शोधावा,' ब्रात-चिन्को गरजला.

'अरे, त्याला कशासाठी हाकलून देता ?' जॉर्जेव्हस्कीनं जर दबकत दबकत सुरुवात केली, 'तो आपला जुना सहकारी आहे. त्यानं चूक केली आहे हे कबूल आहे. पण त्याला सुधारायची आपण संधी दिली पाहिजे. शिवाय त्याचं व मारुत्स्याचं एकमेकांवर प्रेम आहे हे तुम्ही कसं विसरता? म्हणूनच आपल्याला त्यांना मदत केलीच पाहिजे.'

'अरे, पण तो काय एखादा उनाड पोरगा आहे ?' लापोटनं आश्चर्यानं विचारलं 'त्याला सुधारायचं म्हणजे काय? अरे, तो एक आपल्यातलाच आहे ना?'

आता स्कॅनडर पुढे आला. काराबानोवच्या गौरवशाली आठव्या तुकडीचा हा कमांडर. काराबानोव गेल्यावर त्याची जागा स्कॅनडरने घेतली. या आठव्या तुकडीत फ्रेडरेन्को, कोटर्चो वगैरेसारखी ताकदवान मुलं होती. व त्यांना आपल्या ताकदीचा व तुकडीचा फार अभिमान वाटत असे. काराबानोव त्यांच्या तुकडीचा नायक होता. ते आपसातली कुरबुर किंवा कामाच्या बाबतीतला कमीजास्तपणा आपापसात सांभाळून घेत. आणि त्यामुळे काराबानोव कोणतंही अवघड काम एखाद्या कोसॅकच्या कामाच्या जलदगतीप्रमाणे केव्हाच त्यांच्याकडून करून घेई. त्यामुळे कॉलनीचा मान आणखी वाढे. प्रथम हा स्कॅनडर या तुकडीत बसतच नसे. तो तसा बुटका, हडकुळा व शरीराने कसासाच होता. सुरुवाती सुरुवातीला असादचीच्या कॉलनीतील यहुदी विरोधानं अद्याप डोकं वर काढलं नव्हतं. तरीसुद्धा स्कॅनडरबद्दलच्या इतरांच्या भावना थोड्या प्रमाणात विचित्र होत्याच. कित्येकदा या मुलाचं रशियन भाषेतले शब्द व उच्चार फार विचित्र असत. व त्याला शेती-कामामध्ये फारशी प्रगती पण करता आली नव्हती. पण थोड्याच अवधीत हळूहळू आठव्या तुकडीत नवे संबंध जुळू लागले. स्कॅनडर हा त्या तुकडीमध्ये सर्वांचा आवडता झाला व काराबानोवच्या सगळ्या चेल्यांमध्ये तो सर्वांना आवडू लागला. स्कॅनडरनं आपली अंगची हुषारी दाखवली तसंच त्याच्यातली नैसर्गिक संवेदनक्षमताही सर्वांच्या नजरेत भरली. त्याचे डोळे मोठे व काळेभोर होते. तो आपल्या नजरेतच त्यांच्या तुकडीत उद्‌भवणारे प्रश्न चांगल्या तऱ्हेने हाताळून ते मिटवून टाकत असे. कॉलनीत असेपर्यंत त्याच्या उंचीत इंचाचीही वाढ झाली नाही. परंतु तो शरीराने मात्र चांगला धष्टपुष्ट झाला. त्याचे स्नायू चांगले तयार झाले. व त्याला बिनहाताचा बनियन घालून साऱ्या कॉलनीभर फिरायला संकोच वाटत नसे. तसंच त्याच्या त्या वयस्कर हातात धरलेला नांगर शेतात फिरू लागला की नांगरणी संपायची काहीही काळजी पडत नसे. या त्याच्या अंगच्या गुणांमुळे काराबानोव राबफॅक्टला गेल्यानंतर त्याच्या आठव्या तुकडीच्या मुलांनी स्कॅनडरला त्यांचा कमांडर व्हायचा मान बहाल केला. हे ज्यावेळी झालं त्यावेळी माझ्या व कोव्हलच्या मनात एकच विचार आला की, आठवी तुकडी काराबानोव गेल्यावरसुद्धा आपण तशीच ठेवू शकू व स्कॅनडर जर त्याचा कमांडर झाला तर ते त्या तुकडीला भूषणावह ठरेल.

ज्या दिवशी स्कॅनडरची कमांडर म्हणून नियुक्ती झाली त्याच दिवशी त्यानं काराबानोवच्या हाताखाली आपण कसे तयार झालो आहोत ते दर्शवून दिलं. इतकंच नव्हे तर आपली ती जागा – कमांडरची – आपण नुसतीच राखून ठेवू असं नव्हे तर तिचा मानही वाढवू याबद्दल खात्री दिली. काराबानोवच्या आरडाओरडचाला सरावलेला फ्रेडरेन्को स्कॅनडरच्या शांत व मित्रत्वाच्या नात्याला लवकरच सरावून गेला.

असा हा स्कैनडर आता बोलायला उभा राहिला : ‘ ऑप्रिश्को जर नवीन मुलगा असता तर आपण त्याला खरोखर क्षमा केली असती. परंतु आता मात्र कोणत्याही परिस्थितीत त्याला क्षमा केली जाणार नाही. ऑप्रिश्कोनं सामुदायिका-बद्दल त्याला जराही फिकीर वाटत नाही हे आपल्या वागण्यानं दाखवून दिलंय. ऑप्रिश्को पुन्हा कसलाही गुन्हा करणार नाही यावर तुमचा विश्वास बसतो का ? नाही ना ? त्याला दुःख व्हावं असं मला वाटत नाही. त्यामुळे काय आपल्याला समाधान मिळणार आहे ? त्याला आपल्या सामुदायिकातून दूर राहून बघू दे म्हणजे त्याला खरी किंमत कळेल. असल्या शेतकऱ्यांना शोभणाऱ्या चेष्टा आपल्या सामुदायिकात चालणार नाहीत आणि म्हणून आमची आठवी तुकडी ऑप्रिश्कोला खुशाल काढून टाकावं अशी मागणी करते. ’

आठव्या तुकडीची मागणी म्हणजे तो पक्का निर्णयच. व आठव्या तुकडीत कोणीही नवीन सभासद झालेला नव्हता. सर्व कमांडर्सनी अनुमतीसाठी माझ्या-कडे बघितलं व लापोटनं मला पुढं होऊन माझं मत प्रदर्शित करायला मला विनंती केली,

‘ अॅन्टन, हा अगदी सरळसरळ निर्णय आहे. यावर तुम्हाला काय वाटतं ?’

‘ मग त्याला काढून टाका, ’ मी थोडक्यात उत्तर दिलं.

आपल्याला आता कुणाचीही मदत मिळणार नाही याबद्दल ऑप्रिश्कोची खात्री झाली व त्यानं आपला इतका वेळ ओढून धरलेला शिष्टपणाचा आव टाकून दिला व सर्वांना उद्देशून म्हणाला,

‘ मला तुम्ही हाकलून देणार ? मग मी कुठे जाऊ सांगा पाहू ? मी काय चोऱ्या करू ? तुमच्यावर तुम्हाला विचारणारं कोणी नाही अशी तुमची कल्पना आहे काय ? मग बघाच तर ! मी काराबानोवकडे जाईन. ’

हे ऐकून सगळी मुलं मोठ्यांदा हसली.

‘ खरंच रे खरंच. तू जरूर काराबानोवकडे जा. ही छान कल्पना आहे. ते सर्वजण तुला एक चिठ्ठी लिहून देतील व तू परत कॉलनीमध्ये येऊन कॉलनीचा सभासद म्हणून राहशील. छान मजा येईल हं ! ’

ऑप्रिश्कोला स्वतःच्या मूर्खपणाच्या बडबडीची जाणीव झाली, व तो एकदम चूपचाप बसला.

‘ एकटा जॉर्जव्हस्कीच या आमच्या निर्णयाविरूद्ध आहे असं समजायचं ना?’ असं म्हणून लापोटनं सर्वांवरून नजर फिरवली. ‘ आज ड्युटीवरचा कमांडर कोण आहे ?’

‘ मी आहे ’ असं म्हणून जॉर्जव्हस्की पुढे झाला व सलाम ठोकून तो उभा राहिला.

' अरे याला कॉलनीच्या बाहेर हाकलून दे '

' ठीक आहे, ' असं म्हणून त्यानं परत सलाम केला व ऑप्रिश्कोला मानेनं खूण करुन आपल्या मागून दाराकडे यायला सांगितले.

दुसऱ्या दिवसानंतर ऑप्रिश्को लुकाशेन्कोच्या झोपडीत रहायला गेला असं आम्ही ऐकलं. त्यांच्यात काय तडजोड झाली ते काही आम्हाला कळलं नाही. परंतु काही दिवसांनी मुलांनी बातमी आणली की या बाबतीत मारूत्स्या जो निर्णय देईल तोच खरा.

हिवाळा संपत आला. मार्च महिन्यात छोटी मुलं कोलोमॅकमध्ये तयार झालेल्या बर्फाच्या तुकड्यांवरून पाण्यात सूर मारून वर यायचा खेळ खेळत. हे सर्व ऋतुचक्र चालत असलं तरीसुद्धा कठड्यावरून सूर मारायचे, किंवा तरंगणाऱ्या बर्फाच्या तुकड्यांवरून उड्या मारायच्या, किंवा झाडाच्या फांद्यावरून तरंगणाऱ्या बर्फा-वर उड्या मारायच्या या सर्व खेळांचं त्यांना कौतुक वाटे. या सर्वांचा परिणाम म्हणजे दरवर्षीप्रमाणे बरीच मुलं आजारी पडली.

इंफ्लूएंझा बरा होऊन गेला. धुक्याचे दिवसही गेले. कुद्ल्टीला जिकडेतिकडे हिवाळ्यात वापरायचे उबदार कपडे सुकत घातलेले दिसले. उन्हाळ्यात घालायचे पातळ कपडे व लांड्या चड्ड्या नेहमीच्या वेळापत्रकापेक्षा यंदा पंधरा दिवस लवकर दिसू लागल्या.

□

१४

# ' नस्ती कुरबुर नको '

एप्रिलच्या मध्यावर आमचे राबफॅक्टचे विद्यार्थी वसंतऋतूच्या सुट्टीसाठी परत आले.

ते सर्वजण अतिशय बारीक व अशक्त दिसत होते. लापोटनं त्यांना प्रकृती सुधारण्यासाठी दहाव्या तुकडीच्या हवाली करण्याचं ठरवलं. त्यांनी कॉलनीत परत आल्यावर राबफॅक्टचे विद्यार्थी म्हणून कोणापुढेही तोरा मिरवला नाही याबद्दल मला फार बरं वाटलं. काराबानोवनं तर आल्याबरोबर सर्वांना कसंबसं भेटून घेऊन आमचे वर्कशॉप्स व शेते याकडे धाव घेतली. आमची छोटीछोटी मंडळी एकदम बेलुखिनच्या भोवती जमा झाली. व तिथल्या आम्हाला खार्कोव्हच्या गोष्टी व तिथल्या गंमतीजमती सांगा असं आर्जवू लागली.

संध्याकाळी नेहमीप्रमाणे आम्ही मोकळ्या जागेत बसलो होतो व ते कॉलनीतून गेल्यापासून झालेल्या सर्व घडामोडींची आम्ही चर्चा केली. कॉलनीत घडलेल्या एकदोन गोष्टींच्याबद्दल काराबानोवला एकदम वाईट वाटलं. तो म्हणाला,

' तुम्ही केलंत ते अगदी बरोबर केलंत. कोस्टयाला जर इथं रहाणं आवडत नव्हतं तर जबरदस्ती करून ठेवून घेणं चूकच होतं. जाऊ द्या. याच्यापेक्षा चांगली जागा त्याला शोधून काढू द्या नाहीतर खड्ड्यात जाऊ द्या. ऑप्रिश्को हा मध्यम शेतकरीच होता. त्याबद्दल शंकाच नाही. त्याची जागा तसल्याच लोकांच्यामध्ये होती. असं असलं तरी झालं ते बरं झालं नाही असं वाटल्यावाचून रहात नाही व

याबद्दल आपल्याला काहीतरी विचार करायलाच पाहिजे. खार्कोव्हला वेगळ्याच प्रकारचं वातावरण आहे. तिथे वातावरण तर निराळे आहेच शिवाय तिथले लोकही वेगळे आहेत.'

'आपल्या या कॉलनीत काय माणसं वाईट आहेत ?'

'तसं नाही. आपल्या कॉलनीतले लोक फार चांगले आहेत,' असं काराबानोव म्हणाला. तो पुढे बोलला, 'फारच चांगले आहेत आपले लोक. पण तुम्ही सभोवार दृष्टी टाकलीत तर तुम्हाला या भागात दररोज नवीन नवीन मध्यम शेतकऱ्यांची वाढ झालेली दिसेल आणि अशा या वातावरणात आपली कॉलनी टिकवून ठेवायची तर तुम्हाला सतत लोकांवर आरडाओरडा करावा लागेल व त्यांना धाकात ठेवावं लागेल.'

'हा एकच मुद्दा नाही रे,' असं बुरुनचं म्हणणं पडलं. तो पुढे म्हणाला, 'आपण या सर्व मध्यम शेतकऱ्यांशी सामना दिला पाहिजे व हे एक वेगळेच काम आहे. पण हा एवढाच प्रश्न आपल्यापुढे नाही. मुख्य गोष्ट अशी आहे की कॉलनीत तसं पाहिलं तर काहीही काम नाही. आपल्याकडे १२० मुलं आहेत म्हणजे आपल्याकडे मनुष्यशक्ती त्यामानाने पुष्कळ आहे. आणि काम काय तर फक्त जमीन नांगरायची व पीक काढायचं. थोड्याशा कामासाठी खूपसा घाम गाळायचा. हे खरं तसं वाईटच आहे आणि एकाद वर्षजर हेच—जमीन नांगरायची, पिके काढायची—करण्यात केलं तर मुलांना नक्कीच काहीतरी नवीन करायची ओढ लागेल.'

बेलुखिन माझ्याजवळ सरकून बसला व म्हणाला, 'बुरुन म्हणतो ते बरोबर आहे. आपली मुलं, म्हणजे आम्हीच, तशी उनाडच. परंतु आम्ही हाडाचे कामगार व आम्हाला यांत्रिक शिक्षण घ्यायची जरुरी आहे. ठीक आहे. शेतात काम करायला आनंद आहे हे काही आम्ही नाकारत नाही पण शेवटी आम्हाला मिळतं काय ? आम्ही जर खेडेगावात गेलो तर आम्ही त्या मध्यम शेतकऱ्यांच्यातच जाऊन मिळू. तसं काही बरोबर वाटत नाही. बरं आम्ही रिकाम्या हातांनीही त्यांच्याकडे जाऊ शकत नाही. त्यांच्यात आम्हाला मिसळायला जायचं तर आम्हाला आमची उत्पादन-साधने पाहिजेत. ती कोणती तर घर, घोडा, नांगर वगैरे वगैरे. ऑप्रिश्कोसारखं आपल्याला प्रत्येकाला काही मध्यमवर्गीय शेतकऱ्याच्या कुटुंबात शिरता येणार नाही. मग आम्ही जायचं कुठे ? काय करायचं ? इथं जवळच एक आगगाडीच्या इंजिनचं वर्कशॉप आहे व त्या तिथल्या कामगारांनाही आपल्या मुलांचं भवितव्य काय होईल ते माहीत नाही.'

आमच्या राबफॅक्टच्या विद्यार्थ्यांनी अगदी उत्साहानं शेतात राबायला सुरुवात केली. व आमच्या कमांडर कौन्सिलनं त्यांना संमिश्र तुकड्यांचे कमांडर नेमून

त्यांच्यावर मेहेर नजर दाखवली. काराबानोव एकेदिवशी शेतावरून आला. तो अगदी कमालीचा उल्हसित दिसत होता.

'मला या शेतीकामाचा खरोखर इतका आनंद वाटतो! शेतीकामात अर्थ नाही असं हे लोक का म्हणतात मला समजत नाही. वेडे आहेत झालं. खरोखर, आपण शेतात काम करून खुरपणी केली असताना त्यातून आपल्याला कापड, मशीन, ट्रॅक्टर्स, अकॉर्डियन, चष्मे, घड्याळं, सिगारेट वगैरे वगैरे काढता आलं असतं तर किती मजा आली असती! या साल्यांनी जेव्हा जग निर्माण केलं त्यावेळी माझा सल्ला का बरं घेतला नाही?'

राबफॅक्ट विद्यार्थी मे दिन आमच्याबरोबर साजरा करणार होते. त्यामुळे आमचा सुट्टीचा आनंद आणखी द्विगुणित झाला.

दुसऱ्या दिवशी बिगुलाच्या आवाजाने सारी मुलं उठली. संमिश्र तुकड्या शेतावर अगदी शिस्तीत कामासाठी निघून गेल्या. त्यांनी जराही मागे वळून पाहिलं नाही किंवा शेतीकामात आपलं आयुष्य फुकट जातंय अशी वायफळ चर्चाही केली नाही. आमचे अगदी सर्वात मागासलेले रहिवाशी, उदा. एवजेन्येव, नाझारेन्को, पेरेपेल्याटचेन्को व इतर काही यांनी आमच्या बरोबरीनं यायला सुरुवात केली होती.

अशा तऱ्हेने १९२५ च्या उन्हाळ्यापर्यंत आमची कॉलनी म्हणजे एक नमुनेदार सामुदायिक बनलं होतं. इतकंच काय परंतु एकमेकांचे संबंध व बाहेरच्यांशी संबंधसुद्धा अतिशय चांगल्या प्रकारे होत होते. या सर्वात फक्त एकटा चोबोट तेवढा आमच्या सामुदायिकात एक मोठी अडचण होऊन बसला होता. मला त्याची काही केल्या समजूत घालता येईना.

मार्च महिन्यात आपल्या भावाकडे जाऊन आल्यावर त्याच्या बोलण्यावरून त्याचा भाऊ चांगलाच सुखवस्तू असावा. परंतु त्याच्याकडे काम करायला माणसं नव्हती. चोबोटनं एके दिवशी कुणालाही काहीही न विचारता नताशाचा प्रश्न माझ्याकडे काढला.

'अरे तू माझ्याकडे बोलून काय उपयोग आहे? नताशाने ही गोष्ट स्वतःच ठरवली पाहिजे,' मी म्हणालो.

आणखी एक आठवड्यानंतर एके दिवशी तो अगदी बिथरलेल्या मनःस्थितीत माझ्याकडे आला व म्हणाला, 'आंतोन, मी आता नताशाशिवाय राहू शकत नाही. तुम्ही तिच्याशी बोला व कृपा करून तुम्ही तिला माझ्याबरोबर यायला सांगा.'

'एक चोबोट, तू अगदी विक्षिप्त मुलगा आहेस. अरे तूच तिच्याशी बोलायला पाहिजे. मी नव्हे.'

' तुम्ही जर तिला सांगितलंत, तरच ती माझ्याबरोबर यईल. पण मी जर तिला सांगितलं तर त्यातून काहीच निष्पन्न होत नाही.'

' ती काय म्हणाली तुला ?'

' ती काहीच बोलत नाही. नुसतीच हसते.'

चोबोट माझ्याकडे अगदी टक लावून बघत होता. त्याच्या त्या सगळ्या बोलण्याचा माझ्यावर काय परिणाम होतोय ते त्याच्या दृष्टीनं महत्वाचे होतं. या सगळ्याच प्रकाराचं मला फार वाईट वाटलं, हे मी त्याच्यापासून चोरून ठेवायचा प्रयत्न केला नाही. ' बरं हे एकंदरीत काही बरं नव्हे. ठीक आहे. मी तिच्याशी बोलेनच.'

चोबोट माझ्याकडे रडून लाल झालेल्या डोळ्यांनी बघत होता. जणू काही तो माझ्या मनात खोल डोकावून बघायचा प्रयत्न करत होता. तो एकदम म्हणाला, ' तुम्ही तिच्याशी बोलावं. पण लक्षात ठेवा. ती जर माझ्याबरोबर आली नाही तर मी माझ्या जीवाचं काही तरी बरंवाईट करून घेईन.'

' हे काय तुझं मूर्खपणाचं बोलणं ?' मी त्याच्यावर ओरडलो, ' तू चांगला तगडा आहेस की नेभळट आहेस ? तुला तुझी स्वत:चीच लाज वाटली पाहिजे.'

चोबोटनं मला काय म्हणायचं होतं ते ऐकूनच घेतलं नाही. तो तिथेच बाकावर आडवा झाला आणि आसवं गाळत राहिला. त्याला कमालीचं दु:ख झालं होतं. मी त्याच्या तापलेल्या डोक्यावर हात ठेवला व नुसताच उभा राहिलो. एकाएकी तो उठून बसला. त्यानं माझे दोन्ही हात धरले व गोंधळलेल्या मनस्थितीत तो भराभर बोलू लागला,

' मला क्षमा करा. मी तुम्हाला त्रास देतोय ते मला समजतंय पण काय करावं ते मला समजत नाही. मी कशा प्रकारचा आहे ते तुम्हाला माहीत आहे ना? तुम्ही मला अगदी चांगल्या प्रकारे जाणता. मी पाया पडेन, पदर पसरीन. पण तिच्यावाचून मी राहू शकत नाही हे खरं आहे.'

मी संबंध रात्र त्याच्याशी बोलण्यात घालवली. पण माझ्या त्या बोलण्याचा निरुपयोगीपणा मला चांगला समजत होता. मी त्याला आयुष्य किती मोठं आहे, तसंच आयुष्यात पुढे किती तरी नवीन नवीन संधी मिळतील व मनुष्याच्या आयुष्यात किती तरी आनंदाचे दिवस येतील या गोष्टीबद्दल त्याच्याशी चर्चा केली. त्यानं व्यवस्थित राहिलं पाहिजे, आयुष्याची काही तरी एक दिशा ठेवली पाहिजे, नताशालासुद्धा शिकणं किती आवश्यक आहे व तिच्याजवळ खरोखरच चांगली बुद्धिमत्ता आहे आणि ती शिकली तर त्यांनाच पुढल्या आयुष्यात त्याचा उपयोग होईल. तिच्यासारख्या बुद्धिमान मुलीला बोगोडुखोवसारख्या खेड्यात नेऊन ठेवणं म्हणजे

तुमच्याच साऱ्या आयुष्याचा नाश करण्यासारखं आहे. व ती बिचारी मरूनच जाईल. असे मी सांगितले. परंतु या कशाचाही चोबोटच्या मनावर जराही परिणाम झालेला दिसला नाही. त्यानं माझं म्हणणं ऐकून घेतलं व तो फक्त पुटपुटला,

'ठीक आहे. मी आता काय करायचं ते ठरवीन. पण मी पुन्हा एकदा सांगतो की ती जर माझ्याबरोबर आली तर तिच्यासाठी काय वाटेल ते करायची माझी तयारी आहे.'

मी त्याला त्याच्या तशाच गोंधळलेल्या स्थितीत सोडून दिला. कारण एखाद्या माणसानं पटवून घ्यायचं नाही ठरविलं तर त्याला समजावण्यात काही अर्थ नाही. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी मी नशाशाला माझ्याकडे बोलावलं. मी फक्त डोळ्यांनी तिला खुणावलं होतं. परंतु ती एवढी चाणाक्ष होती की मी तिला काय विचारणार आहे याबद्दल तिला कल्पना आली असावी. तिने आपले मोठे डोळे माझ्यावर रोखून अतिशय शांत, स्वच्छ स्वरात व कोणत्याही तऱ्हेची भीडभाड न बाळगता मला म्हणाली,

'चोबोटनं मला वाचवलं ही गोष्ट खरी आहे. पण मला खरोखरच आता संधी मिळाली आहे तर शिकायची इच्छा आहे.'

'मग तुला त्याच्याशी लग्न करून त्याच्याबरोबर जायचं नाही तर ?'

यावर ती म्हणाली, 'मला शिकायची इच्छा आहे असं मी तुम्हाला आधीच सांगितलंय. पण तुम्ही सांगत असलात तर आधीच मी त्याच्याबरोबर जायला तयार आहे.'

मी पुन्हा एकदा तिच्या त्या टपोऱ्या, बालीश डोळ्यात पाहिलं. चोबोटची वृत्ती कशी झाली आहे हे तिला सांगावं असं एकदा माझ्या मनात येऊन गेलं पण प्रत्यक्षात मात्र मी तिला काहीच सांगितलं नाही. त्याऐवजी मी फक्त 'ठीक आहे. आता जाऊन झोप' असं म्हटलं.

आपली मान किंचित कलती करून माझ्याकडे बघत खऱ्याखुऱ्या समाधानाने तिनं मला विचारलं,

'मग खरंच मला नाही ना पाठवणार ?'

'नाही. तुला नाही पाठवणार. तुला शिकायचंय ना ?' असं मी तंद्रीत उत्तर दिलं व मी माझ्या विचारात गढून गेलो. ती माझ्याजवळून कधी निघून गेली तेही मला समजलं नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी चोबोटला पाहिलं. तो आमच्या 'व्हाईट हाऊस'च्या मुख्य दरवाजात उभा असावा. मी त्याला मानेने खूण करून ऑफिसात यायला सांगितलं. तो माझ्यामागून मुकाटयाने ऑफिसात आला. मी माझ्या हातातल्या किल्ल्या टेबलाच्या खणाला लावून तो उघडायचा प्रयत्न करत होतो. एकाएकी चोबोटनं मला विचारलं,

' नताशा माझ्याबरोबर येणार नाही तर !'

मी त्याच्याकडे पाहिलं. आपलं खरोखरच मोठं नुकसान होतं आहे हे त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतं. तो एका बाजूला दाराला रेलून उभा होता व त्यानं आपली नजर कुठेशी लावली होती. तो काहीतरी पुटपुटला, पण काय ते नीट समजलं नाही.

मी त्याच्यावर खेकसलो. माझं बोलणं त्याच्या कानापर्यंत पोचलंच नाही असं मला वाटलं. तो उठला व मागे वळून न बघताही शांतपणे अगदी चोरपावलाने दाराबाहेर पळून गेला.

मी त्याच्यावर नजर ठेवून होतो. जेवणानंतर त्यानं नेहमीप्रमाणे कामाला जाणाऱ्या आपल्या तुकडीत जागा घेतली. त्याच दिवशी संध्याकाळी त्याच्या तुकडीचा कमांडर स्कॅनडर याला बोलावून त्याला, ' चोबोट कसा आहे ?' म्हणून विचारलं.

' काही नाही. तो कोणाशी बोलतच नाही,' असं मला उत्तर मिळालं.

' तो काम कसं काय करतोय ?'

यावर संमिश्र तुकडीचा नेचिटायलोनं सांगितलं की ' तो अतिशय सुंदर काम करतो.'

' पुढचे काही दिवस त्याच्यावर जरा नजर ठेवून रहा. तुम्हाला जराही वेडंवाकडं दिसलं तरी मला ताबडतोब कळवा.'

' ठीक आहे. मला सर्व गोष्टींची कल्पना आहे,' असं स्कॅनडर म्हणाला.

पुष्कळ दिवसपर्यंत चोबोट गप्पगप्पच असे. तो आपलं काम बरोबर करी. फक्त जेवणाच्या वेळी तो दिसे. मला तर तो सारखा टाळतच असे. मे दिनाच्या सुट्टीच्या आदल्या दिवशी मी मुद्दामच त्याला बोलावून घेऊन काही घोषणा–फलक ठिकठिकाणी लावायला सांगितले. त्याने ' ठीक आहे ' म्हणून शिडी आणली व तो त्यावर चढला. परत खाली उतरून तो मला म्हणाला,

' मला खिळे लागतील ना !'

' किती हवेत ?'

त्यानं वरती इकडेतिकडे पाहिलं. काहीतरी बोटं मोजली व म्हणाला, ' एक किलो पुरे होतील.'

त्यानं केलेलं काम मी पाहिलं. ते अगदी व्यवस्थित व मनापासून केलेलं दिसलं. मधूनमधून दुसऱ्या शिडीवर उभ्या असलेल्या आपल्या मित्रांना घोषणा-फलक लावताना सूचना देतानाही मी ऐकलं.

आमची मुलं सुट्टीच्या तयारीला लागलेली होती. एक ' मे ' दिवस म्हणजे वसंतऋतूचा पहिला दिवस. ती सुट्टी मुलांना फारच आवडायची. पण यावर्षी

मे दिनाचा दिवस अगदी वाईट रितीने उजाडला. दोन दिवसांपासून सतत पाऊस लागून राहिला होता. व आजही सकाळी तो थांबला नव्हता. अधूनमधून थोडावेळ थांबे व पुन्हा झिमझिम सुरु होई. जणू काही पावसाळ्याचेच दिवस असावेत अशा रितीने पाऊस थांबण्यालाच मागत नव्हता. संध्याकाळी जरा आभाळात चांदण्या चमकायला लागल्या. नाही म्हणायला फक्त एका ठिकाणी, पश्चिमेच्या बाजूला मात्र एकुलता एकच ढग व्रणासारखा दिसत होता. तो ढग जणू आमच्या कॉलनीवर एक प्रकारचं विचित्र सावट घालत असल्यासारखा वाटत होता. आमची मुलं इकडून तिकडे धांदल उडवत होती. त्यांना मेळाव्यात जाण्यापूर्वी आंघोळ, कपडे, केस वगैरे जामानिशा उरकून घ्यायचा होता. नुकत्याच सुकायला लागलेल्या आमच्या व्हरांड्यात आमची ड्रम वाजवणारी मुलं त्याच्या पितळी कड्या घासूनपुसून चुना लावून स्वच्छ करत होती. हे सारेजण उद्याचे म्होरके होते.

आमचे ड्रम वाजवणारे जरा वेगळ्याच प्रकारचे होते. ते काही अर्धवट शिकून काही तरी वेडेवाकडे आवाज काढणारे नव्हते. आमच्या गॉर्की कॉलनीच्या ड्रम वाजवणाऱ्यांना खास सैन्याच्या बँडवाल्यांच्याकडून सहा महिन्याचं शिक्षण दिलेलं होतं व आमच्या इव्हान इव्हानोविचनं त्याबद्दल तक्रारसुद्धा केली होती. तो म्हणाला,

'अहो, या लोकांची शिकवायची पद्धत काय भयंकर आहे? खरोखरच भयानक आहे.'

इव्हाननं माझ्यावर त्याची भेदरलेली नजर रोखून ड्रमच्या आवाजाच्या पद्धतीची मला कल्पना दिली की 'घुंगुरांचा मंजुळ नाद, त्यातच भसाडा आवाज, तंबाखूचा खकाणा व चीजचा खारटपणा आणि डांबराचा कुबट व कोंबट वास या सर्वांच्या मिश्रणाने निर्माण होणारा संमिश्र आवाज' अशी ही भयानक पद्धती होती. परंतु अशी ती असली तरीही आम्हाला जे पाहिजे होतं ते त्यातून मिळालं. आमच्या ड्रम वाजवणाऱ्यांच्या कवायती अतिशय सुरेख व भावनिदर्शक व उठून दिसणाऱ्या होत्या. पुष्कळ प्रकारच्या कवायती होत्या. उदा. साधी कवायत, सैनिकी कवायत, सलामीची कवायत, परीक्षण कवायत व एक लढाऊ कवायत अशा होत्या. व प्रत्येक कवायतीच्या ड्रमच्या आवाजाची विशिष्ट धार त्याचा तीक्ष्ण परंतु मधूनच चढउताराचा मुलायम स्वर तर कधी एकदम स्फोट झाल्यासारखा कर्कश आवाज तर कधीकधी नृत्याच्या ठेक्याचा ताल अशा निरनिराळ्या गती असत. आमचे ड्रम वाजवणारे इतके तरबेज झालेले होते की सार्वजनिक शिक्षणखात्याच्या निरीक्षकांनी ते वाजवणं ऐकल्यावर कबूल करून टाकलं की या वाजवण्यात खऱ्या-खुऱ्या सामाजिक शिक्षणाची झलक आहे.

संध्याकाळी आमच्या सर्व मुलांची सभा झाली. व सुट्टीचा दिवस घालवायची आमची कितपत तयारी आहे याची चांचणी झाली. पण एक प्रश्न मात्र तसाच अनिर्णित राहिला. तो म्हणजे, 'उद्या नक्की पाऊस पडले का ?'

कोणीकोणी सांगितलं की 'वेधशाळेचा अंदाज आहे की उद्या चांगली हवा पडेल.' मला वाटत होतं की उद्या नक्की पाऊस पडेल. कालिना, सिलँटी वगैरे स्वतःला यातले जाणकार समजणारे, त्यांचेही मत माझ्याप्रमाणे होतं. पण पोरं मात्र म्हणाली, 'यात काही अर्थ नाही. आणि समजा पाऊस पडलाच तर काय होणार आहे ?'

'काही नाही. तुम्ही सारेजण भिजाल.'

'हो. पण म्हणून आम्ही काही साखरेचे बनवलेले आहोत का की लगेच विरघळून जाऊ ?'

शेवटी मला हा प्रश्न मत घेऊन ठरवावा लागला, की उद्या सकाळपासून पाऊस पडला तर शहरात जायचं की नाही ?

फक्त तीन हात विरुद्ध बाजूला वर आले. त्यात माझा स्वतःचा एक हात होता. सारी मुलं विजयाने हसली. कोणीतरी मध्येच ओरडलं, 'आम्ही जिंकलो'.

मग मी म्हटलं, 'लक्षात ठेवा. आता सर्वानुमते निर्णय घेतला आहे. खडकांचा जरी पाऊस पडला तरीसुद्धा जायचं !'

यावर लापोट म्हणाला, 'होय जायचंच.'

'आज तुम्ही कुरकुरणार नाही, शूरपणाच्या गप्पा माराल व पण उद्या शेपटी घालाल, व म्हणाल बापरे ! आम्ही भिजलो व आम्हाला थंडी वाजते.'

'आम्ही कधी कुरकुर करतो का ?'

'मग ठरलं. कुरकुर करायची नाही.'

'ठीक आहे. कुरकुर करायची नाही,' असा सर्वांनी आवाज दिला.

सकाळी आभाळ भरून आलेलं होतं आणि मधूनच पावसाची झिमझिम सतत चालूच होती. मध्येच मोठाल्या सरी येत. व मध्येच परत झिमझिम सुरू होई. ऊन दिसण्याचं यत्किंचितही लक्षण दिसत नव्हतं.

व्हाईट हाऊसमध्ये मुलं कवायतीला जाण्याच्या तयारीत उभी होती. ती माझ्याकडे कुतुहलाने बघत होती. पण मी मात्र माझ्या चेहऱ्यावरची रेषसुद्धा बदलायची नाही असं ठरवलं होतं. त्यांच्यात आपापसातच 'कुरकुर बंद, कुरकुर बंद' असं चाललं होतं. त्यांच्यातल्या एकाला अंदाज घेण्यासाठी माझ्याकडे पाठवण्यात आलं.

'आपण बावटा घेऊन जायचं का ?' असं त्यांनी मला विचारलं.

'आपण बावटा न घेता कसे जाणार, सांगा पाहू ?'

'हो पण पाऊस पडतोय ना. मग ?'

'हा काय पाऊस आहे ? बरं, शहरात पोचेपर्यंत बावटा झाकून ठेवा.'

'ठीक आहे,' असं बावटा धरणारा जराशा मवाळपणानं म्हणाला.

बरोबर सात वाजता बिगुल वाजला. ठरल्याप्रमाणे वेळेवर आमची मुलं

शिस्तीत निघाली. आमच्यापासून शहरातल्या विशिष्ट चौकाचं अंतर दहा किलोमीटर होतं व प्रत्येक कि.मी.ला पावसाचं प्रमाण वाढतच जात होतं. आम्ही पोचलो त्यावेळी चौकात चिटपाखरूही नव्हतं. आजचं निदर्शन पावसामुळे स्थगित केलेलं होतं. परत येताना मुसळधार पाऊस कोसळू लागला. आम्ही काही पर्वा केली नाही. आमच्यापैकी सगळेजण भिजून चिंब झाले होते. माझ्या बुटातून पाणी भरून बाहेर वाहू लागलं होतं. मी मुलांना जरा थांबायला सांगितलं व म्हटलं 'आपले ड्रम ओले झाले असतील. तेव्हा आपण काहीतरी गाणी म्हणू या. दुसरी गोष्ट म्हणजे अशी की तुमच्या रांगा वेडयावाकडया झाल्या आहेत व त्यामुळे आपली चाल बरोबर होत नाही. तेव्हा त्याकडे लक्ष द्या व मान ताठ करून चाल.'

मुलं मजेनं मोठमोठयानं हसायला लागली. त्यांच्या चेहऱ्यावरून पाण्याचे ओघळ वहात होते. कोणीतरी ओरडलं, 'आगे कूच.' काराबानोवनं गाणं म्हणायला सुरुवात केली. ते गाणं त्यावेळच्या परिस्थितीला अगदी अनुकूल होतं. त्यातच मुलांच्या हसण्याचे आवाज मिसळले होते. गाण्याचा आशय असा होता,

'परिस्थिती दिवसेंदिवस बिघडत चालली आहे. पण आम्ही त्याला ठिगळ लावण्याचा वेडेपणा करणार नाही.'

दुसऱ्या गाण्याच्या वेळी सर्वच मुलांनी सूर धरला. पावसामुळे रस्त्यात पाणीच पाणी झालं होतं व आमच्याशिवाय चिटपाखरूही दिसत नव्हतं. त्या कुंद वातावरणात आमचा आवाज लांबवर जात होता. चोबोट पहिल्या ओळीत माझ्या शेजारून चालला होता. तो गाणं म्हणण्यात भाग घेत नव्हता. वरून कोसळणाऱ्या पावसाकडेही त्याचं लक्ष नव्हतं. तो त्याच्यासमोर ड्रम वाजवणाऱ्याच्या पलिकडे कुठल्या तरी एका बिंदूवर मख्खपणे बघत होता. त्याच्या हालचालींकडे माझी बारीक नजर होती. त्याचीही त्याला दखल नव्हती.

आम्ही स्टेशन सोडून पुढे आलो. मी मुलांना रांगा मोडण्याची मुभा दिली. कोणाजवळही सुकी सिगरेट राहिली नव्हती किंवा तंबाखूही शिल्लक नव्हती. सर्वजण माझ्याजवळ असलेल्या सिगरेटस्‌वर तुटून पडले. माझ्याभोवती जमा होऊन म्हणाले,

'काय, आम्ही नाही ना कुरकुर केली ?'

'थांबा जरा, आपण हा कोपरा ओलांडून पलिकडे गेलो की खरोखरच खडकासारखा पाऊस पडायला लागेल. मग तुमचं काय म्हणणं आहे ?'

'अर्थात खडकासारखा पाऊस पडणं काही चांगलं नाही. पण त्याच्यापेक्षा वाईट प्रकारचा पाऊस. उदा. मशीनगनमधून गोळयांचा मारा फारच वाईट', असं लापोट म्हणाला.

कॉलनीत शिरण्यापूर्वी आम्ही आमच्या रांगा परत नीट केल्या व आमचं गाणं म्हणायला पुन्हा सुरवात केली. मुसळधार पावसाच्या आवाजात आमचा

गाण्याचा आवाज बुडून जात होता. आश्चर्याची गोष्ट म्हणजे आम्ही कॉलनीत परतल्याबरोबर जणू आम्हाला सलामी देण्यासाठीच तो गडगडणारा पाऊस अचानक थांबला. आम्ही ताठ मानेनं व 'डावा–उजवा' करत कॉलनीत शिरलो. नेहमीप्रमाणे आम्ही बावट्याला सलामी दिली व सगळेजण कपडे बदलण्यासाठी आपापल्या खोल्यातून पळालो. एवढ्यात मी मोठ्याने ओरडलो,

'मे दिन चिरायू होवो.'

मुलं जागच्या जागी थांबली व त्यांनी आपल्या गोळ्या हवेत उडवल्या. सर्वजण माझ्याकडे धावत आले व त्यांनी मला उचलून वर उडवलं. त्यावेळी माझ्या बुटात साठलेलं पाणी माझ्या तोंडाकडे ओघळत आलं.

एक तासानंतर आमच्या खेळण्याच्या खोलीमध्ये एक नवीन घोषणा लटकावलेली दिसली. एका मोठ्या कागदावर भल्यामोठ्या अक्षरात दोनच शब्द लिहिलेले होते–'कुरबुर नाही.'

□

# १५

## ‘कठीण दिवस’

मेच्या ३ तारखेला संध्याकाळी चोबोटेनं गळफास लावून घेतला.

सकाळी लवकर पहारा करणाऱ्या तुकडीच्या मुलांनी माझ्या खोलीच्या खिडकीवर टक्टक् केलं व काय झालं असेल याची अंधुकशी कल्पना मला आली. मुलांनी चोबोटच्या गळ्याचा गळफास काढून त्याला घोड्याच्या पागेजवळ आणून ठेवलं होतं व दिव्याच्या उजेडात ते त्याला शुद्धीवर आणण्याची पराकाष्ठा करत होते. बऱ्याचशा खटपटीनंतर एकातेरीना व आमची बाकीची मुलं यांना थोडंसं यश आलं. त्याचा श्वासोच्छवास मंदपणे सुरू झाला होता. परंतु तो शेवटपर्यंत शुद्धीवर आलाच नाही व संध्याकाळच्या सुमारास त्याची प्राणज्योत मालवली. शहरातून आम्ही डॉक्टरना बोलावलं होतं. परंतु त्यांनी सांगितलं,

‘त्याला वाचवणं कठीणच होतं.’ त्यांनी असं निदान केलं की, ‘त्यानं स्वत:ला तबेल्याच्या वरच्या जागेवर चढून तिथं गळ्याला फास अडकवून घेऊन वरून उडी मारली असली पाहिजे व त्या उडीच्या धक्क्यामुळे त्याचा पाठीचा कणा मानेकडं मोडला असला पाहिजे.’

चोबोटच्या आत्महत्येच्या कारणाबद्दल मुलांनी फारशी उत्सुकता दाखवली नाही. त्याबद्दल कोणी विशेष दु:खही व्यक्त केलं नाही. एकटा फ्रेडरेन्को तेवढा म्हणाला,

‘बिचारा कोसाक, एक उत्तमपैकी सैनिक झाला असता नाही का ?’

यावर लापोटनं त्याला उत्तर दिलं, ' तो उत्तम सैनिक कधीच झाला नसता. तो एखाद्या सुखवस्तू शेतकऱ्याप्रमाणे जगला आणि मेला. त्याचा हावरटपणाच त्याच्या मृत्यूला कारणीभूत झाला.'

कोव्हलनं अगदी तुच्छतेनं क्लबकडे दृष्टी फेकली. चोबोटची शवपेटी तिथे ठेवलेली होती. चोपोटला शेवटची मानवंदना द्यायलासुद्धा तो तयार नव्हता. इतकंच काय पण अंत्ययात्रेलासुद्धा यायचं त्यानं नाकारलं. शिवाय वरती तो म्हणाला,

' चोबोटसारख्या लोकांना मीच फाशी देईन. कारण असले लोक स्वतःच्या मूर्खपणाने दुसऱ्यांचा विनाकारण घात करतात.'

मुली मात्र थोडय़ाबहुत तरी रडल्या. पण मारूत्स्या लेवचेन्को आपले डोळे कोरडे करून चिडलेल्या आवाजात म्हणाली,

' हा अगदी महामूर्ख मनुष्य होता.' ती नताशाकडे वळून बोलली. ' तू याच्यावर प्रेम करून कसा संसार करणार होतीस ते तुझे तुलाच माहीत. बरं झालं. तू खरोखरच नशीबवान आहेस. तू त्याच्याबरोबर गेली नाहीस हे फार उत्तम झालं. जगात असे अनेक चोबोट आहेत. म्हणून तू त्या सर्वांना सुखी करू शकणार आहेस का ? तेव्हा असल्या मूर्खांना म्हणावं तुम्ही खुशाल गळफास लावून घ्या.'

नताशाला पण काही रडू येत नव्हतं. पण ती कमालीची घाबरून व गोंधळून गेली होती. मी जेव्हा मुलींच्या खोलीत त्यांना बघायला गेलो त्यावेळेस तिनं आपले डोळे माझ्यावर रोखून अगदी हळू आवाजात मला विचारलं,

' आंतोन, मी आता काय करावे ते तुम्ही मला सांगा.'

तिच्या या प्रश्नाला मारूस्त्यानं उत्तर दिलं.

' मला वाटतं तुलाही आता गळफास लावून घ्यावासा वाटत नाही ना ? तो तुझ्या मार्गातून दूर झाला हे फार उत्तम झालं. त्याबद्दल धन्यवाद. तो जर जगला असता तर जन्मभर त्यानं तुला छळलं असतं. तुला आता काय करायचंय ? तू आता राबफॅकमध्ये जाशील. आपल्याला यावर विचार करायला पुष्कळ वेळ आहे.'

नताशानं आपले डोळे चिडलेल्या मारुत्स्याकडे वळवले व तिला हलकेच मिठी मारली.

' ठीक आहे.' एवढेच ती म्हणाली.

मारुत्त्या माझ्याकडे रागारागाने बघत म्हणाली,

' आजपासून मी नताशाची पालक समजा.' मी मान हलवून तिच्या म्हणण्याला दुजोरा दिला. तिला सांगितलं की, ' कॉमरेड लेवचेन्को, मी पण तुझ्या पालकपणात सामील होऊ काय ?'

' हो, पण तुम्ही स्वतःला गळफास लावून न घेण्याचं कबूल करत असलात तर माझी हरकत नाही. कारण काहीकाही पालक अगदी नालायक असतात व काही पालक कटकटे असतात. होय की नाही ?'

'ठीक आहे,' मी जरा तिला सलाम करून सांगितलं, 'मी गळफास लावून घेण्याचा प्रयत्न नक्कीच करणार नाही.' नताशानं मारुत्स्याच्या गळ्याभोवतालचे हात काढले व तिनं आपल्या नव्या पालक मंडळींच्याकडे पाहून स्मितहास्य केलं. इतकंच काय ती जरा लाजली पण.

'बरं, चला. आपण आता नाश्ता करू या.' असं मारूत्स्या सहजपणाने म्हणाली.

या सर्व प्रकारामुळे माझ्या मनावरचं ओझं एकदम उतरलं.

त्या दिवशी संध्याकाळी कारोनर व मारीयाबाई आमच्याकडे आले. मी त्या कारोनरला नताशाची जबरनी घेऊ नको म्हणून विनंती केली. त्यानंही खरोखर समजुतदारपणा दाखवून ते टाळलं. त्यानं एक छोटेसं निवेदन तयार केलं व जेवण करून तो निघून गेला. मारीयाबाई मात्र मागे शोकप्रदर्शन करण्यासाठी थांबून राहिल्या. रात्री सगळी निजानीज झाल्यावर ती कालिनाला घेऊन माझ्या ऑफिसात आली व थकूनभागून तिथल्या कोचावर आडवी झाली.

'तुझी पोरं म्हणजे अगदी कमालीची निर्दय आहेत. त्यांचा एक सहाध्यायी मरतो व हे खुशाल खिदळत बसले आहेत. आणि तुझा तो लापोट तर नेहमी सारखाच आचरटपणा करत फिरतोय.'

दुसऱ्या दिवशी राबफॅकच्या विद्यार्थ्यांना सुट्टी संपल्यामुळे आम्ही पोचवून आलो. जाताना स्टेशनच्या वाटेवर व्हेर्शनेव्हनं आपले विचार व भावना बोलून दाखविल्या,

'आपल्या मुलांना काय होतंय हे समजत नाहीय. एखादा मनुष्य मरायचं ठरवतो कारण आयुष्यात काही राम नाही म्हणून. काही जणांना वाटतं की नताशाच्यासाठीच चोबोटनं जीव दिला असेल. खरं तर तो त्याचा जीव. त्याला सहन करण्याची शक्ती नव्हती म्हणून त्यानं तो घालवून टाकला.'

यावर बेलुखिननं आपली मान जोरजोरानं हलवली व तो म्हणाला, 'ते काही बरोबर नाही. चोबोटनं कधी चांगलं आयुष्य जगण्याचा प्रयत्नच केला नव्हता. तो माणूस नव्हता तर गुलाम होता गुलाम. पण आता आपल्या देशात मालकही नाहीत व म्हणून गुलामही नाहीत. म्हणून त्यानं नताशाला देव मानलं व तो तिचा सेवक (गुलाम) होऊ पहात होता.'

काराबानोव म्हणाला, तू फारच पराकोटीला नेतोस. हे मला नाही आवडत. एखादा माणूस गळफास लावून घेतो. ठीक आहे. त्याचं नाव आपल्या हजेरीपटावरून काढून टाका. परंतु आपल्याला उद्याचा विचार करावा लागेल. मला असं वाटतं की आपल्या मुलांना म्हणजेच कॉलनीला इथून काढलंच पाहिजे. नाही तर उद्या तुम्ही सारेजण गळफास लावून घ्याल.'

परत येताना मी आमच्या मुलांना काय काय मार्ग काढता येतील त्याचा विचार करत होतो. एक जबरदस्त आघात आमच्यामध्येच निर्माण होत आहे असं मला वाटलं. ज्या ज्या अनेक गोष्टींची मी आतापर्यंत जपणूक केली होती, त्यातल्या

अनेक गोष्टी अतिशय चांगल्या होत्या व त्यात जिवंतपणा होता. गेल्या पाच वर्षांच्या परिश्रमात मी उभारलेलं हे सामुदायिक धुळीला मिळतंय असं मला वाटायला लागलं. अगदी कमालीच्या नम्र माणसानंसुद्धा त्याचं मोल नाकबूल केलं नसतं.

अशा सामुदायिकात वैयक्तिक मार्गामुळे धोका निर्माण होतो असं म्हणता येणार नाही कारण वैयक्तिक मार्ग काय याची व्याख्या करणं कठीणच आहे. वैयक्तिक मार्ग अवलंबायचा कसा हे पण कोणी सांगू शकणार नाही. त्यामुळे सामुदायिकातनं बाजूला होणे म्हणजे एकाकी पडणे. म्हणजे सगळ्याच गोष्टींची जबाबदारी एकाच माणसावर. उदा. जुन्या जमान्यातल्याप्रमाणे उद्याचा दिवस कसा घालवायचा, उदा. भाकरी कशी मिळवायची, म्हणजे कायम उद्याचा विचार करत जगायचं. जवळ पात्रता काय, तर कोणी सुतार झाला, कोणी मोची झाला व कोणी चक्कीवाला झाला या पलीकडे मजल जाणार नाही...नाही नाही मी हे असे कधीही घडू देणार नाही. माझी पक्की खात्री झाली की सोळा वर्षांच्या मुलाला सोविएतच्या नव्या समाजरचनेत एका चांगल्या पात्रतेची जरुरी आहे व ती पात्रता म्हणजे प्रत्येक मुलगा खराखुरा एक निष्णात माणूस झाला पाहिजे.

मी माझ्या मनाशी आमच्या सामुदायिकांच्या संख्येचा आणि त्यांच्या एकंदर ताकदीचा आढावा घेतला असता काय चुकतंय ते माझ्या लक्षात आलं. मला माझा स्वतःचाच राग आला, की मला हे ह्याच्याआधी का सुचलं नाही? हे सर्व काही ध्यानात यायचं कारण म्हणजे आम्ही एका विशिष्ट मर्यादेला येऊन पोचलो होतो व सामुदायिकांत अशा तऱ्हेची मर्यादा घालून घेणं तसं थोडं नुकसान-कारकच असतं.

मला हा उलगडा झाल्यामुळे एखाद्या लहान मुलासारखा मी आनंदित झालो. किती छान आणि नाविन्यपूर्ण सर्वगामी विरोधविकासवाद! या सत्य गोष्टीचा सर्व बाजूंनी माझ्या मनात उलगडा झाला. सामुदायिकांत कुठल्याही घटकांना मर्यादा घालता येत नाही. कोणतंही अनिर्बंध क्रियाशील सामुदायिक एकाच जागी स्थिर राहू शकत नाही. सार्वत्रिक विकासाचा मूलभूत नियम याच्या खऱ्या सामर्थ्याचा, खऱ्या ताकदीचा आत्ताच कुठे आम्हाला प्रत्यय येऊ लागला होता. कोणत्याही मुक्त मानवी सामुदायिकाचं अस्तित्व व त्याच्या गतीचे नियम प्रगतीच्या दिशेकडेच नेणारे असले पाहिजेत. याउलट प्रगती थांबविणारे ते झाले तर त्या सामुदायिकांचा ऱ्हास झाला असं समजावं.

हो. खरोखर गेली दोन वर्षं आम्ही एकाच जागी स्थिर राहिलो होतो— ते म्हणजे तीच शेतं, तेच फुलांचे ताटवे, तेच सुतारकाम व तेच तेच वर्षभर चक्र चालू होतं.

मी गडबडीत कॉलनीत परत आलो. मला झालेल्या या नव्या साक्षात्का-राचा पडताळा मला मुलांच्या डोळ्यात बघावयाचा होता.

आमच्या व्हाईट हाऊसच्या पुढच्या कमानीत दोन मोटारगाड्या उभ्या दिसल्या व लापोटनं मला येऊन सांगितलं की खार्कोवहून एक मंडळ आलेलं आहे.

ठीक आहे. आपल्या डोक्यात आलेल्या विचारांसंबंधी आपण त्यांच्याशी चर्चा करू, मी विचार केला.

तीन माणसं माझ्या ऑफिसात माझी वाट पहात बसली होती. त्यापैकी एक सावलेयेव्हना झोरीन्स्काया, दुसरी बाई जरा धष्टपुष्ट परंतु मध्यमवयाची, पाणीदार डोळयांची असून तिनं लाल रंगाचा किंचित चुरगाळलेला पोषाख केला होता. तिसरा पुरुष असून तो अगदी बुटका, हडकुळा व त्याला फारशी दाढी नव्हतीच किंवा थोडीशी होती असं म्हटलं तरी चालेल. त्याच्या हातात चामड्याची बॅग होती. त्यानं त्याचा चष्मा डोळयांतून बऱ्याचशा दूर अंतरावर बाकावर ठेवलेला होता व एका हाताने तो सारखा वरचेवर सरकवित होता.

लिबोवाबाईंनी औपचारिक हसू आणून माझी बाकीच्या लोकांशी ओळख करून दिली.

'हे कॉमरेड माकारेन्को आणि या व्हारव्हेरा व्हिक्टोरोयचना ब्रेगेल व हे सर्जी व्हसिलीएविच चायकीन.'

व्हारव्हेराबाईंनी आमच्या कॉलनीत दिलेल्या भेटीबद्दल माझं काहीच म्हणणं नव्हतं कारण त्या माझ्या वरीष्ठ होत्या. पण हा सर्जी चायकीन मध्येच कुठून उपटला ? हा म्हणे शिक्षणशास्त्राचा मोठा प्रेक्षक होता. तो कुठल्यातरी एखाद्या बालगृहाचा अधीक्षक होता असं मी ऐकलं.

ब्रेगेल म्हणाली, 'आम्ही खास तुमची ही शिक्षणपद्धती समजून घेण्यासाठी आलो आहोत.'

'या विधानाला मी विरोध करतो,' मी म्हणालो, 'माझी शिक्षणपद्धती असा काही एक प्रकार नाही.'

'मग तुम्ही कुठली शिक्षणपद्धती वापरता ?'

'मी सोविएत शिक्षणपद्धतीचा वापर करतो.'

हे ऐकून ब्रेगेलबाईंनी तोंड लांबट केलं.

'सोविएत पद्धती असेल, परंतु ती काही नेहमीचीच असेल असं मला वाटत नाही. तरीसुद्धा मला ती समजावून घ्यायची आहे.'

मग न आवडणाऱ्या चर्चेला सुरुवात झाली. असल्या चर्चेमध्ये सर्वसाधारण लोक जाडयाजाडया शब्दांचा व विधानांचा वापर करतात. पण त्याच्यामुळे खरी वस्तुस्थिती कधीच समजत नाही. अर्थात हे सगळं तिथंच थांबण्यासाठी म्हणून मी म्हणालो, 'असली वायफळ चर्चा करत बसायला मला वेळ नाही व माझा त्यावर विश्वासही नाही. तुम्हाला पाहिजे असेल तर मी एक अहवाल तयार करून देतो. परंतु हा अहवाल तयार करायला मला तीन तास तरी नक्कीच लागतील.'

ब्रेगेलनं याला कबुली दिली. आम्ही तिथेच माझ्या ऑफिसमध्ये बसलो. बसलो म्हणण्यापेक्षा आम्ही तिथे स्वतःला कोंडून घेतलं म्हणणंच जास्त रास्त होईल. गेल्या पाच वर्षांच्या काळात मी जे जे काही प्रयोग केले त्याबद्दलच्या माझ्या शंका, माझे काही ठोकताळे, त्याबद्दलची प्रतिमा, त्याबद्दलची माझी मते हे शब्दांकीत करुन त्यांना समजावून देण्याची मी जास्तीत जास्त धडपड केली. मला असं वाटतं की, मी त्यावेळी अतिशय अस्खलित भाषण केलं. त्या भाषणात काही अगदी सामान्य कल्पनांना उत्तम तऱ्हेनं उठाव देण्याचा प्रयत्न केला. जणू काही एखादी व्यक्ती सुरी घेऊन तिच्या पुढ्यात असलेला प्राणी कापून त्याच्या आत्ता-पर्यंत गूढ असलेल्या अशा प्रत्येक भागाचं अवलोकन करत असते. मी हे करत असताना भविष्यकाळातील पद्धती व उद्या आमच्यापुढे उभ्या रहाणाऱ्या अडचणी यांचा जाताजाता उल्लेख केला. काही असले तरी मी अतिशय प्रांजळपणे कोण-त्याही गैरसमजाची पर्वा न करता किंवा कशालाही न घाबरता 'तज्ञ' हे माझ्या दृष्टीने बरेचसे निरुपयोगी व परकीय कसे आहेत हे दाखविण्याचा प्रयत्न केला.

झुरिन्स्काया माझं म्हणणं ऐकून अतिशय आनंदीत व प्रफुल्लीत झालेली दिसली पण ब्रेगेलबाई मात्र मख्खपणे बसलेल्या दिसल्या. चायकीनला काय वाटलं त्याबद्दल मी फारशी काही पर्वा केली नाही. माझे बोलणं संपल्यावर ब्रेगेलबाईनं आपल्या हाताची लठ्ठ बोटं टेबलावर वाजवित अशा काही पद्धतीनं ती बोलली की ते तिचं बोलणं मनापासून होतं की उपरोधिक होतं हे समजायला जरा कठीण गेलं.

'वा, वा! हे फारच चांगलं असं तुम्हाला नाही वाटत सर्जी व्हसी-लिएवीच?' असं ती चायकीनकडे पाहून म्हणाली.

चायकीननं आपल्या नाकावरचा चष्मा सारखा केला व त्यानं आपल्या वही-वर घेतलेल्या टिपणाकडे एखाद्या गाढ्या विद्वानाप्रमाणे आदराचा नुसता भाव निर्माण करत पुढील मोठं भाषण केलं :

'अर्थात या सगळ्याचे अगदी उत्तम प्रकारे स्पष्टीकरण करण्याची जरुरी आहे. वरवर पहाता माझ्या मनात काही शंका आहेत. तुम्ही अतिशय उत्साहाने व तुमचा प्रामाणिकपणा सिद्ध करून देतील अशा रितीने या सिद्धांताची आम्हाला उकल करून द्यावी. ठीक आहे. एक गोष्ट आमच्या ध्यानात आलेली आहे व त्याची छाननी करण्याचं तुमच्या नजरेतून सुटलं असेल. उदा. चुरस. तुमच्या मुलांच्यामध्ये जो जास्तीत जास्त काम करेल त्याची तुम्ही स्तुती करता व जो कमी काम करेल त्याला तुम्ही दोष देता. तुम्ही तुमची जमीन नांगरून घेता. होय ना? त्यावेळेला तुम्ही मुलांच्यात चुरस लावता हे खरं आहे की नाही? याबद्दल तुमच्या बोलण्यात तुम्ही मुळीच उल्लेख केलेला नाही. अर्थात त्या उल्लेख न करण्यात तुमचा काही हेतू असेल असं मला म्हणायचं नाही. पण मला तुम्हाला एका गोष्टीची आठवण करून द्यावीशी वाटते की चुरस लावण्याचा प्रकार म्हणजे

अगदी मध्यमवर्गीय प्रकार आहे. किंवा प्रत्यक्षरीत्या न म्हणता अप्रत्यक्षरीत्या तरी मध्यमवर्गीय दृष्टिकोनच त्यात दिसतो. याबद्दल तुमचं काय म्हणणं आहे ते तुम्ही मला सांगा. ही एक गोष्ट झाली. दुसरं म्हणजे तुम्ही सर्व मुलांना हातखर्चाला थोडे पैसे देता. एखाद्या राष्ट्रीय सणाच्या दिवशी किंवा एखाद्या विशिष्ट समारंभाच्या दिवशी हे पैसे तुम्ही देता. ते पैसे देतानासुद्धा काही मुलांना तुम्ही जास्त देता व काहींना कमी देता. अशा तऱ्हेने तुम्ही त्यांच्यात भेदभाव करता. यावरून असं दिसत नाही का की तुम्ही मुलांच्यातील उत्तेजनाच्या सुप्त भावनेला प्रत्यक्ष कृतीने वाव देता ? हा शुद्ध भौतिकवाद झाला असं तुम्हाला वाटत नाही का ? तुम्ही शिक्षा देता असं कबूल केलंत. या शिक्षा देण्याच्या तंत्रामुळे गुलामी वृत्ती वाढते. आपल्याला तर मोकळं व्यक्तित्व तयार व्हायला पाहिजे आहे. एखाद्याची वर्तणूक काठीच्या भीतीनं किंवा कोणत्याही शारीरिक पीडेच्या भीतीनं न सुधारता ती त्याच्या आंतरीक इच्छा व राजकीय जाण या गोष्टींनी सुधारावी.'

चायकीन असं बरंचसं काही तरी बडबडला. त्याची ती बडबड ऐकताना मला चेकावच्या गोष्टीची आठवण झाली. एका माणसानं पेपरवेटनं एका अस्वलाला ठार मारण्याची कथा आहे. मी मनाशी ठरवलं की चायकीनला तसं ठार मारण्याची मला काही जरुरी वाटली नाही. या चायकीनला एकाद्या बाभळीच्या काठीनं मारावं असं मला वाटलं. नाही पण ते आता जुनं शस्त्र झालं. कामगार विजार घट्ट बांधण्यासाठी ज्या पट्टयाचा उपयोग करतात त्या चामडयाच्या पट्टयानं त्याला चांगला बदडून काढावा असं वाटलं. तेच त्याचं डोकं ताळयावर आणायला उपयोगी पडेल. चायकीनला मध्येच थांबवून ब्रेगेल माझ्याकडे पाहून म्हणाली,

'तुम्ही का हसता बरं ? कॉमरेड चायकीन बोलले त्याच्यामध्ये तुम्हाला काही विनोदी आढळतं का ?'

'छे छे ! त्यात विनोद तर बिलकुल नव्हता,' असं मी उत्तर दिलं.

'मग तुम्हाला वाईट वाटलं का ?' असं ती प्रथमच हसून बोलली.

'नाही नाही ! दुःखदायक असं काहीच नाही. ते अगदीच सामान्य आहे.'

माझ्याकडे तीक्ष्ण नजरेने पहात ब्रेगेलनं दीर्घ निःश्वास सोडला.

'आम्ही तुम्हाला खूपच त्रास देतोय होय ना ?' असं ती विनोदानं म्हणाली.

'मुळीच नाही. मी असल्या टीकेला अगदीच सरावून गेलो आहे. कित्येकदा यापेक्षाही वाईट टीका माझ्यावर केली जाते.'

ब्रेगेल एकाएकी मोठमोठयानं हसू लागली व हसता हसता म्हणाली, 'कॉमरेड माकारेन्को, तुम्ही सगळयाच गोष्टी कशा हो थट्टेवारी नेता ?' हसू जरासं आवरून ती म्हणाली, 'तुम्ही चायकीनच्या प्रश्नांना काही उत्तर देणार नाही का ?'

मी जरा धुश्श्यातच ब्रेगेलकडे पाहून म्हटलं, 'मला वाटतं, शास्त्रीय शिक्षण-

तंत्राची कमिटी हे प्रश्न चांगल्या प्रकारे हाताळेल. ते लोक नेहमी बरोबर उत्तरे शोधून काढतात, होय की नाही ? ठीक आहे. आता आपण जेवू या बरं!'

ब्रेगेल किंचित दुखावलेल्या आवाजात, ' ठीक आहे ' असं म्हणाली, ' हो खरंच. तुम्ही तुमचा एक ऑप्रिश्को नावाचा विद्यार्थी होता त्याला काढून टाकलंत ते का म्हणून ?'

'तो दारू पिऊन आला होता म्हणून आम्ही त्याला काढून टाकला.'

' सध्या तो कुठे आहे ?'

' तो एका जवळच्या शेतकऱ्याजवळ रहातो.'

' म्हणजे तुम्ही त्याला तिथे पाठवलंय असं समजायचं का ?'

' तसं म्हणा पाहिजे तर, ' असं मी हसून म्हटलं.

' पण तो तिथेच रहातो याबद्दल तुमची खात्री आहे ना ?'

' हो. माझी खात्री आहे आणि त्या शेतकऱ्याचं नाव आहे लूकाचेन्को. त्या शेतकऱ्याजवळ त्याच्याशिवाय आणखी अशीच मुलं आश्रीत आहेत.'

' मग आपल्याला ह्याच्यात लक्ष घालायला पाहिजे तर.'

' जरूर घाला.'

आम्ही जेवायला गेलो. जेवण झाल्यानंतर ब्रेगेल व चायकीन यांना स्वत: आमची कॉलनी बघायची होती. मी माझी टोपी चढवली व ब्रेगेलना म्हणालो,

' बाईसाहेब, शिक्षणक्षेत्रातले अधिकारी, जे काही आमच्या हातून होईल ते आम्ही केलं आहे. आणखी सहा महिने आम्ही इथेच राहिलो तर आमची डोकी फिरून जातील. आता आम्हाला काहीतरी नवीन पाहिजे आहे. असं काम हवं की ज्यायोगे आमच्या मनाला व शरीराला सतत गुंतून ठेवील. आमच्याकडे खूप गोष्टी आहेत. तत्व एवढंच काही तुमच्याकडे नाही.'

ब्रेगेल हसली व म्हणाली, ' मला सर्व काही समजतं आणि त्याची लवकरच व्यवस्था होईल. आपण त्याबद्दल आत्ताच चर्चा करू या. तुम्ही नेहमी भविष्य-काळाबद्दलच बोलत असता. बरं मला सांगा. आमच्या आजच्या इन्स्पेक्शनचा राग नाही ना आला ?'

' छे ! मुळीच नाही. याहून वेगळं काय असणार आहे ?'

' मग तुमचं तात्पर्य काय ?'

' चायकीननी केलेल्या प्रश्नामुळे तुम्हाला काही काळजी तर वाटत नाही ना ?'

' नाही ! बिलकुल नाही. शास्त्रीय शिक्षण समिती त्याचा विचार करील. बरोबर आहे का नाही ? कारण ती त्यांचीच अंत्ययात्रा आहे.'

त्या रात्री ब्रेगेलनं झोपण्यापूर्वी कॉलनीबद्दल तिची काय मतं होती ती मला सांगितली.

'तुमचं सामुदायिक खरोखर नमुनेदार आहे पण तुमच्या पद्धती मात्र जरा भयानकच आहेत हं !'

मला अगदी मनापासून कमालीचा आनंद झाला. आमच्या ड्रम वाजविणाऱ्यांना कशा तऱ्हेने मी तयार केलं होतं हे तिनं पाहिलं नाही हे फार बरं झालं.

'गुड नाईट' असं ब्रेगेलनं म्हटलं.

'हो. खरोखरच मला आठवण झाली. चोबोटच्या मृत्यूबद्दल तुम्हाला कोणीही दोष दिला नाही.'

मी अगदी समाधानानं मान हलवून तिच्या बोलण्याचं स्वागत केलं.

□

## १६

# ' निपीरचे सरदार '

आणखीन एक उन्हाळा आला व गेला. त्या कालचक्राबरोबर नेहमीप्रमाणे आमच्या संमिश्र तुकड्या शेतीकाम करायला गेल्या. आमची चौथी संमिश्र तुकडी व ' रेड बॅनर्स ' तुकडी–बुरुन त्याचा नायक होता–कामासाठी जुंपली होती.

राबफॅकचे विद्यार्थी सुट्टीसाठी जूनच्या मध्यावर कॉलनीत परत आले. त्यांनी येताना आपल्याबरोबर आणखीन दोन नवे सभासद–ओक्साना व राखील–कॉलनी-मध्ये आणले. त्या दोघींना सुट्टीवर जायला कुठेच जागा नव्हती. म्हणून आमची मुलं त्यांना आपल्याबरोबर कॉलनीत घेऊन आली. त्याशिवाय काळ्याभोर डोळ्यांची व काळ्याभोर भिवया असलेली चेर्निगोची मुलगीसुद्धा कॉलनीत आली. तिचं संपूर्ण नाव गाल्या पॉटगॉर्नाया असं होतं. काराबानोव तिला कॉलनीच्या सर्व-साधारण सभेत तिची ओळख करून घेण्यासाठी निघून गेला, ' शुरांनी तुम्हाला पत्रात लिहिलं होतं की मी या मुलीकडे आकर्षित झालो आहे. पण त्यात काही अर्थ नाही हं. अगदी शपथेवर सांगतो हं तसं काही नव्हतं. त्याचं असं आहे की या गाल्याला सुट्टीवर जाण्यासाठी कुठेही जागा नाही. म्हणून मी तिला इथे घेऊन आलो. तेव्हा कॉमरेडस् याच्यात माझं काही चुकलं की बरोबर केलं ते तुम्हीच ठरवा.'

काराबानोव आपलं भाषण संपल्यावर जमिनीवर बसला. त्यादिवशीची सभा आमच्या पार्कमध्ये आम्ही भरविली होती.

ती चेर्निगोवला आश्चर्यानं आमच्या या सामुदायिकाकडे बघत होती. त्यातले काहीजण अनवाणी होते. काहीजणाचे सदरेही बरोबर नव्हते. काहीजण तर नुसतेच उघडे होते म्हटलं तरी चालेल. लापोटनं आपला ओठ दाताखाली दाबून डोळे बारीक करून आणि मग जरा एक डोळा मारून आपल्या भसाड्या आवाजात चेर्निगोवला विचारलं, 'कॉ. चेर्निगोवला, कृपा करून, काय बरं म्हणायचंय मला...'

ती चेर्निगोवला व बाकीची सगळी मुलं कान टवकारुन ऐकू लागली.

लापोट पुढे म्हणाला, 'मी असं विचारतो की तुम्हाला आमचे वडिल माहीत आहेत का ?'

चेर्निगोवलानं हसून गोंधळून व किंचितसं लाजून घाईघाईनं उत्तर दिलं, 'नाही बुवा.'

'नाही वा माहिती ? बरं !'

लापोटनं पुन्हा आपला ओठ चावला व डोळा मिचकावत तो म्हणाला, 'बरोबर आहे. तुला माहीत नाही. पण आमचा कशावर विश्वास आहे ते तरी तुला माहीत आहे का ?'

'नाही ते पण माहीत नाही.'

'बरं, तुला डायनिपीर पोहून जाता येईल का ?'

चेर्निगोवलानं दूरवर कुठे तरी पहात किंचित गोंधळून सांगितलं, 'मला नाही सांगता येणार. मी काही उत्तम पोहणारी नव्हे. पण मला वाटतं मी कदाचित पोहू शकेन.'

लापोटनं सर्वांकडे तोंड फिरवलं व एखाद्या जोकरसारखा चेहरा करून डोळे मिचकावत, तोंड उघडं ठेवून, एक बोट वरती करून व नाक उडवत, हसण्याचा जराही प्रयत्न न करता तो बोलला,

'मग आपण असं समजू या की, आपले वडिल तिला माहीत नाहीत. आपण कशावर विश्वास ठेवतो तेही तिला माहीत नाही व ती डायनिपीर पोहून जाऊ शकते किंवा पोहून जाऊ शकत नाही.'

यावर सर्व मुलं ओरडली, 'नाही नाही. ती पोहून जाऊ शकते.'

'ठीक आहे. ती जर डायनिपीर पोहून जाऊ शकत नसली तरी कमीत कमी ती कोलोमॅक तरी पोहू शकते ना ?'

पुन्हा एकदा सर्व पोरं ओरडली, 'ती ते करू शकेल. करू शकेल.'

'त्याचा अर्थ असा की, आपल्या कॉलनीचे डायनिपीर सरदार यांच्यात ती सामावू शकते.

'ठीक आहे. ठीक आहे.'

'मग तिला कोणत्या तुकडीत घालू या ?'

'तिला पाचव्या तुकडीत घाला.'

'बरं. मग तिच्या डोक्यावर वाळू ठेवा व तिला तिच्या तुकडीमध्ये पोचती करा.'

यावर काराबानोव ओरडून म्हणाला, 'फक्त दरोडेखोरांच्या डोक्यावरच वाळू ठेवली जात असे.'

लापोट काराबानोवला उद्देशून म्हणाला, 'कोसॅक, आयुष्यात काही प्रगती होते की होत नाही?'

'हो नक्कीच होते. त्याचा काय संबंध?'

'अरे, पूर्वी लुटारूंच्या सरदारांच्या डोक्यावरच वाळू टाकत असत पण आता सर्वांच्याच डोक्यावर टाकतात.'

झोप्रोत्झे प्रदेशात आम्ही जावं अशी झुरिन्स्कायाची कल्पना होती. त्याप्रमाणे तिचं पत्रंही आम्हाला नुकतंच आलं होतं. ह्या पत्रात तिनं लिहिलं की, 'शिक्षण-खात्याकडून अशी एक बातमी तिनं ऐकली आहे की हॉर्टिस्टा बेटावर मोठ्या प्रमाणावर एक मुलांची कॉलनी सुरू करावी, व त्यासाठी गॉर्की कॉलनी हा त्याचा केंद्रबिंदू व्हावा.'

ही योजना कशा तऱ्हेची असावी याचा तपशील काही अजून तयार झाला नव्हता. म्हणून मी झुरिन्स्कायाला त्याबद्दल विचारणा केली होती. त्या योजनेचा संपूर्ण आराखडा तयार व्हायला जरा वेळ लागेल. सर्व गोष्टी डायनेप्रॉस्ट्रायवर अवलंबून होत्या.

खार्कोव्हमध्ये या विषयावर काय चाललंय याची आम्हाला काही कल्पना नव्हती पण आमच्या कॉलनीत मात्र दररोज काथ्याकूट चालला होता. आमची मुलं डायनिपीर नदी, त्यातलं ते बेट, मोठी मोठी शेते किंवा एखादा कारखाना वगैरे-पैकी काही तरी आपल्याला मिळेल अशी स्वप्नं पहात होती. आपलं स्वतःचं जहाज असावं अशी एक कल्पना डोक्यात घेऊन काही मुलं बसली होती. लापोट तर मुलींना चिडवत असे,

'हॉर्टीस्टा बरोबर स्त्रियांना जायला मनाई आहे अशी आपली जुनी समजूत आहे. म्हणून त्या मुलींना डायनिपीरच्या तीरावरच सोडून दिलं जाईल. असं असलं तरी काही वाईट वाटून घेऊ नका हं. आम्ही स्वतः तिथं सारखे येऊन-जाऊन राहू. व तुम्हाला भंडावून सोडू. एक प्रकारे ते तुम्हाला आवडेलसुद्धा. हो की नाही?' असं लापोट पुढे म्हणाला.

आमचे राबफॅकचे विद्यार्थी या असल्या स्वप्नात व थट्टामस्करीत भाग घेत असत. डायनिपीर नदीतलं एक संबंध बेट आपण व्यापणार या कल्पनेत ते अगदी हुरळून गेले होते. आमच्या कॉलनीतली पोरं चिक्कार हसली. अगदी रडू येई-पर्यंत हसली. आमच्या मुलांनी तारसबुल्वा या पुस्तकाची पारायणं केली. डाय-निपीर नदीच्या खोऱ्यात रहाणाऱ्या लोकांच्या आयुष्यातल्या घडामोडी या

पुस्तकात वर्णिलेल्या होत्या. त्या पुस्तकातल्या व्यक्तिरेखांचं अनुकरण फावल्या वेळात आमची मुलं मोकळ्या जागेत करायचा प्रयत्न करत. अनुकरण करण्याची आमच्या मुलांची प्रवृत्ती अगदी चिवट होती. काराबानोव रंगमंचाच्या पड्यापासून बनवलेली विजार घालून बगीचात येई व एक भलंमोठं व्याख्यान देई. त्यानं घातल्यासारखी विजार बनवायची असेल तर मला शंभर गज कपडा तरी लागेल. दुसऱ्या वेळी चोरीचा आळ आलेल्या एखाद्या अपराधी कोसॅकची नक्कल करून त्याच्यावर मुकादमाचा फार्स करण्यात येई. परंपरागत रूढी व चालीरिती चालू ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न केला जाई व त्याप्रमाणे अपराध्याला काठीने मारण्याची शिक्षा दिली जाई. ज्यानं प्रथम चषक भरून व्होडका प्यायली असेल त्यालाच न्यायदान करण्याचा अधिकार असे. आमच्याकडे अर्थातच व्होडका नसल्यामुळे त्याच्या बदली आम्ही चरवीभर पाणी पित असू व जास्तीत जास्त त्याला तो मान दिला जाई. कधीकधी आमची चौथी संमिश्र तुकडी कामावर निघताना एका हातात गदा व दुसऱ्या हातात गोंड्याची काठी बुरुनकडे देत असे. ती गदा झाडाच्या फांद्यांची वगैरे बनविलेली असे. गोंड्याची काठी गवतापासून केलेली असे. चवथ्या संमिश्र तुकडीचा बुरुन प्रमुख असल्याने त्याला या दोन्ही वस्तू जणू काही त्याचा मान म्हणून स्वीकाराव्या लागत व त्या हातात धरुन साऱ्या आवारात दिसेल त्याला अभिवादन करावं लागे.

अशा तऱ्हेने उन्हाळा संपून गेला. डायनिपीरचा प्रकल्प अजूनही प्रकल्पाच्याच स्थितीत राहिला. डायनिपीर कोसॅकचे खेळ खेळून मुलंही शेवटी कंटाळून गेली. ऑगस्टमध्ये आमचे राबफॅकचे विद्यार्थी गेले व जाताना आणखी पाच लोकांना ते आपल्याबरोबर घेऊन गेले. एकूण आमचे पाच प्रमुख आपल्या तुकड्यातून गेले. आत्तापर्यंत गेलेल्यांपैकी कोणीही मागे वाईट आठवणी ठेवून गेला नाही. पण माझा अगदी जवळचा दोस्त व दुसऱ्या तुकडीचा प्रमुख कॉलनीच्या सुरुवातीपासून आमच्याकडे असलेला म्हणजे आमचा ब्रातचिन्को यावेळी राबफॅकला गेला. असादची, ज्याच्यावर मला खूप परिश्रम घ्यावे लागले होते, तोसुद्धा यावेळी पुढे गेला. हाच असादची एकेकाळी अट्टल दरोडेखोर होता. तो खार्कोव्हच्या तांत्रिक शिक्षणसंस्थेत दाखल झाला. असादची सडपातळ परंतु बळकट उंच व खरोखरीचाच देखणा तरूण होता. तसाच तो थोडा अंतर्मुख पण ताकदवान पुरुष होता. कोव्हल एकदा त्याच्याबद्दल म्हणाला होता की 'असादची एक उत्तमपैकी कोम्सोमोल आहे व या कोम्सोमोलला सोडताना खरोखरच फार वाईट वाटतंय.' आणि कोव्हलचे हे उद्गार अगदी बरोबर होते. अलिकडची दोन वर्षे असादचीनं आमच्या चक्कीच्या तुकडीचा प्रमुख म्हणून खूपशा जबाबदाऱ्या उत्तम तऱ्हेने पार पाडल्या होत्या. या चक्कीच्या कामात अतिशय काळजी घ्यावी लागे व आजूबाजूच्या गावकऱ्यांशी व गरीब शेतकऱ्यांशी सतत संबंध ठेवावा लागे.

आमचा जॉर्जव्हस्की हासुद्धा यावेळी गेला. गमतीनं इर्कुटस्कच्या गव्हर्नरचा मुलगा म्हणून त्याला मुलं म्हणत असत व ही गोष्ट कोणीही विसरले नाही. खरं तर त्याच्याबरोबर आलेल्या कागदातील हकीगतीप्रमाणे 'त्याच्या आईबापांचा ठावठिकाणाही माहीत नाही' असे विधान केलेलं होतं.

स्कॅनडर आमच्या आठव्या भाग्यशाली तुकडीचा प्रमुख व मारुत्स्या लेबचेन्को ही पाचव्या तुकडीची प्रमुख, हेही यावेळी आम्हाला सोडून गेले.

हे राबफॅकचे सारे विद्यार्थी गेल्यानंतर गॉर्की कॉलनीत पाहिलं असता अगदी छोटीछोटी मंडळी शिल्लक राहिली. कमांडर कौन्सिलमध्ये आता गणना होणारे प्रमुख म्हणून नेमले गेले. दुसऱ्या तुकडीचा व्हिट्का बोगोयावलेन्स्की तिसऱ्या तुकडीत ऑप्रिश्कोच्या जागी कोल्स्या शारोव्हस्की, पाचव्या तुकडीत नताशा पेट्रेन्को, व नवव्या तुकडीत मिट्काझेल्वी. तसाच आमचा अवाढव्य फेडरेन्को एकदा आठव्या तुकडीचा प्रमुख बनला. जॉर्जव्हस्कीनं छोट्यांच्या तुकडीचं नेतृत्व सतत तीन वर्ष केलं व टोस्का सोलोवियोच्या हातात त्याच्या तुकडीची जबाबदारी टाकली.

फिरून एकदा आम्ही पेरलेले बटाटे, बीट उकरून काढलं. तबेल्यात गवत पसरून त्यावर ते ठेवून दिलं. हिवाळ्यात पेरण्यासाठी बियाणं राखून ठेवलं. नेहमीप्रमाणेच पहिल्या व दुसऱ्या संमिश्र तुकडीनं नांगरणी केली पण यावेळेला आम्ही कोणत्याही तऱ्हेची शर्यत ठेवली नाही. हे सर्व झाल्यानंतर एके दिवशी खार्कोव्हच्या शिक्षणखात्याच्या प्रमुखाकडून आम्हाला डायनिपीरच्या काठावरची पोपोव मालमत्ता बघून येण्याचा आदेश मिळाला.

आमच्या सर्वसाधारण सभेमध्ये या पत्रव्यवहारासंबंधी चर्चा झाली व आता मात्र खरोखरीच आपल्याला काहीतरी नवीन मिळणार अशी किंचितशी आशा आमच्या मनात डोकावली. दुसऱ्या एका पत्राद्वारे शिक्षणखात्याच्या प्रमुखाकडून झोप्रोझेच्या प्रादेशिक कमिटीचाही पोपोव मालमत्ता आमच्या ताब्यात देण्याचा आदेश आला होता.

आता मात्र आम्हाला आमच्या प्रश्नाला नक्की काहीतरी चालना मिळेल असं या पत्रावरून वाटायला लागलं. आता आम्हाला शांतपणे निःश्वास सोडता आले. आतापर्यंत आमच्या निरनिराळ्या ओसाड पडलेल्या मालमत्ता, अयशस्वी झालेल्या मुलांच्या कॉलनी, धर्मगुरूंच्या मोडकळीला आलेल्या संस्था, जुन्या जगात वावरत असलेल्या श्रीमंत लोकांच्या मोठमोठ्या इमारती याची चर्चा थांबली. आता आम्ही हॉर्टिस्टा बेटाची दंतकथा नुसती ऐकत न रहाता सामानसुमानासकट तिथं जाऊन तळ ठोकण्याबद्दलचे विचार करायला लागलो.

आमच्या सर्वसाधारण सभेनं पोपोवची मालमत्ता पाहून येण्यासाठी माझ्याबरोबर जाण्यासाठी मिट्काझ्वेल्वीची नियुक्ती केली. मिटका आमच्या सगळ्या

छोटया मंडळीत त्यातल्या त्यात उंच होता व त्यानं आमच्या संमिश्र तुकड्यांचे प्रमुखपद पण वेळोवेळी उत्तम तऱ्हेनं पार पाडलं होतं. तसंच तो एक वर्षापासून कोम्सोमोल संघटनेमध्ये पण होता. या साऱ्या कर्तबगारीमुळे त्याची नवव्या तुकडीचा म्हणजेच आमच्या चक्कीवर काम करणाऱ्यांच्या तुकडीचा प्रमुख होण्याचा मान त्यानं मिळविला होता. मिट्का हा आमच्या नव्यानं आलेल्या गॉर्काइट्सचा प्रतिनिधी म्हणायला पाहिजे. वयानं तो १५ वर्षांचा असूनही, व्यवहारी लवचिक संघटनाचतुर व जुन्या लढाऊ वृत्तीचे अनेक गुण त्याच्यात एकवटलेले होते. पहिल्या दिवसापासूनच मिट्का काराबानोवच्या पाठीमागे असे व त्यानं जणू काही काराबानोवचे काळेभोर पाणीदार डोळे व सतेज शरीरयष्टी घेतली होती. या दोघात फरक एवढाच की मिट्का १५ व्या वर्षी पाचव्या इयत्तेत होता.

मिट्का आणि मी नोव्हेंबरच्या शेवटी शेवटी एके दिवशी झोप्रोझेवोएल्‌ जायला निघालो. त्यादिवशी वादळ नसून हवा चांगली होती. बर्फही फारसं कुठ पडत नव्हतं. आम्ही तिथे निघाल्यापासून बरोबर चोवीस तासांनी पोचलो. गॉर्की कॉलनीचं नवे स्थित्यंतर करायचं होतं. आम्ही अशी कल्पना मनात केली होती की प्रादेशिक समितीचा कार्यकारी प्रमुख करारी परंतु सस्मित चेहऱ्यानं म्हणेल :

' पोपोव मालमत्ता गॉर्की कॉलनीसाठी तुम्हाला बघायची आहे ना ? अगदी बरोबर. मला सर्व काही माहीत आहे. हा त्या कराराचा हुकूम. तिथे जा आणि ते सर्व ताब्यात घ्या. '

आम्हाला प्रत्यक्ष ती जागा कुठे आहे ते पाहून, कॉलनीला परत जाऊन आमच्या मुलांना झटपट सामानाची बांधाबांध करायला सांगून तिथे जाऊन पडायचं अशी आमची कल्पनेची भरारी गेली होती.

' पोपोव ' मालमत्ता आम्हाला आवडणार नाही असं चुकूनही आमच्या मनात आलं नाही. सरकारी शिक्षणखात्याच्या प्रमुख ब्रेगेलबाई यांना मी व मिटका खार्कोव्हला भेटायला गेलो. त्यावेळी त्या म्हणाल्या,

' अरे वा ! पोपोव वाडी ? छान ! मॅकॅरेन्कोला अगदी योग्य ते मिळालं. ती वाडी एखादवेळेस एकदम चांगल्या स्थितीत नसेल. पण तरीसुद्धा तुम्ही प्रत्यक्षच पहा. चांगली वाडी आहे व ती तुम्हाला नक्कीच आवडेल. '

झुरिन्स्कायापण अगदी त्याच शब्दात म्हणाली, ' अरे वा ! अगदी मस्त. ती वाडी इतकी छान आहे आणि संस्था चालवायला योग्य अशीच ती जागा आहे.

मारियाबाई म्हणाली, ' वा वा ! छान मस्तच आहे हं ती जागा. '

या तिघी बायांनी त्याचं इतकं चांगलं वर्णन केल्यामुळे तो आमच्यायोग्य असलीच पाहिजे अशी माझी खात्री झाली. मी व मिटका दैवावर हवाला सोडून त्या ठिकाणी जाऊन पोचलो. ती जागा खरोखरच गॉर्की कॉलनीच्या योग्य अशीच ऐसपैस व समृद्ध होती.

आमच्या अनेक अपेक्षांपैकी फक्त एकच अपेक्षा खरी ठरली. ती म्हणजे प्रादेशिक समितीच्या कार्यकर्त्याचा चेहरा खरोखरच करारी परंतु सस्मित होता व त्यानं आमचं मनापासून स्वागत केलं. बाकी सर्व आमच्या कल्पनेच्या अगदी उलट निघालं.

सरकारी शिक्षणखात्याच्या प्रमुखानं आमच्या हातात दिलेला कागद वाचून तिथला प्राचार्य म्हणाला,

'अहो, हे तर शेतकऱ्यांचं सामुदायिक आहे. ही गॉर्की कॉलनी म्हणजे काय प्रकार आहे बुवा ?'

तो मिटकाकडे एकाग्र नजरेनं पहातच राहिला. एकंदरीने मिटका त्याच्या मनात भरला असावा असं दिसलं. त्याच्या काळ्या डोळ्यांकडे बघून कुतुहलानं तो म्हणाला,

'तुमची सगळी याच वयाची मुलं या वास्तूमध्ये काम करणार काय ?'

मिट्का जरासा लाजला, परंतु ऐटीत म्हणाला :

'आमच्यासारख्या मुलांच्यामध्ये काय कमी आहे हो ? तुमच्या गावंढळ शेतकऱ्यांच्यापेक्षा आम्ही मुलं चांगल्या तऱ्हेने याची जोपासना नक्कीच करून दाखवू.'

हे बोललं असताना मिट्काचा चेहरा जरा आणखीनच लाल झाला. ते प्राचार्य त्याच्याकडे आणखी कौतुकाने बघत म्हणाले,

'वा रे वा ! आमच्या शेतकऱ्यांना तू काय गावंढळ म्हणतोस काय ?'

पण लगेच दुसऱ्याच क्षणी जरा हळू आवाजात म्हणाले, 'हे बाकी खरं हं. ते खरोखर अगदी आस्थेनं करत नाहीत. पण करणार काय ? इथं १५०० एकर-पेक्षा जास्त जमीन आहे व प्रादेशिक कमिटीच्या कार्यकर्त्यांना एवढं प्रचंड काम हाताळणं कठीणच जातं. तुम्हालासुद्धा सरकारी शेतकी खात्याची मदत घ्यावी लागेल.'

मिट्काने कपाळाला किंचित् आठ्या घालून विचित्र नजरेनं त्या प्राचार्यां-कडे पाहिलं आणि तो म्हणाला,

'तुमच्या शक्तीबाहेर आवाक्याबाहेर हे काम आहे असं तुम्ही म्हणालात ? म्हणजे याचा अर्थ मला नीट समजला नाही.'

'हे बघ बाळ, तू काय बोलतोस ते मला नीट समजलंय. पण मी काय म्हणतोय ते तुला इतक्यात समजणार नाही. काही हरकत नाही. तुझे प्राध्यापक या शब्दाचा अर्थ तुला समजावून देतील. मी आता काय करू ? मी तुम्हाला मोटार गाडी देतो ती घेऊन तुम्ही प्रत्यक्ष जागेवर जाऊनच बघा. त्या सामुदायिकातल्या सभासदांशी पण बोला. प्रत्यक्ष बोलून काय समझोता करता येईल ते पाहू शकाल. असं असलं तरीसुद्धा शेवटचा निर्णय खार्कोव्हमधल्या सरकारी शेतकी खात्याकडूनच घेतला जाईल.' असं म्हणून त्या प्राचार्यांनी मिटकाबरोबर हस्तांदोलन केलं. व

माझ्याकडे बघून म्हणाले. 'या मुलासारखी जर तुमची सारी मुलं असली तर नक्कीच तुम्ही या प्रकल्पाला उत्तम रुप देऊ शकाल.'

मी व मिटका पोपोव वाडी सगळीकडे फिरून बघितली व तिच्या सौंदर्याने दिपून गेलो.

त्या प्रसिद्ध दरीच्या टोकाला त्याच जागेला तारास बुल्बाची झोपडी उभी असली पाहिजे. डायनिपीर नदीचा कोपरा व काराचेक्राक या टेकड्यांची रांग गवताळ प्रदेशातून एकदम उभारलेली दिसत होती. काराचेक्राक टेकड्यांमधूनच एक ओहोळ जणू काही बाणासारखा निघून डायनिपीर नदीला मिळाला होता. त्याच्या अरुंद काठावर जणू काही एक गूढ असावं असा भास होत होता. या टेकड्यांची रांग जणू एखाद्या भिंतीप्रमाणे दिसत असून त्या भिंतीपलिकडे अनेक मोठमोठ्या प्रासादांची छपरं व कमानी एकमेकात मिसळलेल्या दिसत होत्या. या प्रासादांच्यावर असलेल्या मनोऱ्यावर अजूनही वातकुक्कुट शिल्लक राहिलेले दिसत होते. परंतु खालच्या भागातल्या दालनांच्या छिन्नविछिन्न उघड्या खिडक्या मोरीश किंवा अरेबिक सौंदर्याकडे भकासपणे पहात असाव्यात असं वाटत होतं.

एका मोठ्या प्रवेशद्वारातून आम्ही एका मोकळ्या मैदानात गेलो. त्या प्रवेशद्वाराच्या बाजूला बुरुज असून खिडक्यांच्या एकावर एक अशा दोन रांगा होत्या. मोकळा भाग चौकोनी गुळगुळीत फरशांनी बनविलेला होता. युक्रेनियन गवत फरशांच्या भेगातून वेडंवाकडं वाढलेलं होतं व गाई, डुकरं किंवा शेळ्यामेंढ्या यांचे चिखलाचे पाय त्या फरशांवर जागजागी उमटलेले दिसत होते. आम्ही या पहिल्याच प्रासादात गेलो. त्या ठिकाणी भिंतीच्या गिलाव्याशिवाय काहीही शिल्लक राहिलेले नव्हतं. त्या ठिकाणी एक व्हीनसचा हातपाय तुटलेला चिकण मातीचा पुतळा भिंतीच्या बाजूला पडलेला होता. बाकीच्या इमारतीही अशाच भव्य असून आतमध्ये बरीचशी पडझड झालेली व घाण साचलेली होती. त्या सर्वांवर नजर टाकून साधारणपणे याच्या दुरुस्तीला कितीसा खर्च येईल त्याचा मी विचार केला. त्यावेळी असं दिसून आलं की सगळ्या इमारतींचे दरवाजे व खिडक्या नवीन बसवायला हव्या होत्या. तसेच जमीनही व्यवस्थित करायला हवी होती. त्या व्हीनसचा पुतळा दुरुस्त करून घ्यायची जरुरी काही आम्हाला वाटली नाही. परंतु जिने, छप्पर व स्वयंपाकाचे कट्टे याची दुरुस्ती करणे जरुरीचे होतं.

'मिट्का काही माझ्यासारखा अरसिक नव्हता. त्या एवढ्या पडझडीमध्येही त्याची उत्साही सौंदर्यदृष्टी कायम होती. तो निरनिराळे भव्य दिवाणखाने, मनोरे व चौक या सगळ्यांमधून फिरला व आनंदीत मनाने म्हणाला :

अँटन, काय छान जागा आहे नाही ? केवढी भव्य ! आपली मुलं ही जागा पाहून कितीतरी खूष होतील नाही का ? ही खरोखरच छान जागा आहे. किती मुलं राहू शकतील इथं ? एक हजारापर्यंत ?'

'माझ्या हिशोबाप्रमाणे आठशे मुलं इथं सहज राहू शकतील असं मला वाटतं.'

मिट्कानं पुन्हा एकदा तितक्याच उत्सुकतेनं विचारलं, 'आठशे मुलं तुम्ही म्हणता ? आणि त्यांना आपण शिस्त कशी लावायची ? बहुतेक सारी रस्त्यावरची उनाड मुलं येतील नाही का ? आपले सारे कमांडर तर राबफॅकला गेलेले.'

इतकी मुलं तिथं राहू शकतील की नाही किंवा त्यांना चांगली शिस्त आम्ही लावू शकू की नाही याचा विचार करायला आम्हाला वेळ नव्हताच. आम्ही सरळ पुढे गेलो. एका इमारतीचं मागचं अंगण एका सामुदायिकाच्या ताब्यात असलेलं आढळलं व त्यांनी तिथे खूपच गोंधळ व घाण केलेली दिसत होती. तिथल्या गोठ्यामध्ये खताचा भलामोठा ढीग पडलेला होता व त्या खताच्या अवतीभोवती काही खेचरं अगदी घाणीनं भरलेली अशी उभी होती. ती कमालीची बारीक असून त्यांचे केस जागजागी गळून गेलेले दिसत होते. भलंमोठं डुकरांचं घर होतं. परंतु त्याला जागजागी बिळं पडलेली होती व त्यात फारच थोडी डुकरं शिल्लक होती. ती डुकरंही त्या खेचरांप्रमाणेच अर्धपोटी व घाणीनं भरलेली दिसत होती. शेवाळाने भरलेल्या अंगणात अर्धवट मोडलेल्या गाड्या, कापणीची यंत्रे, चाके, गाड्यांचे सुटे भाग वगैरे वस्तू इतस्तत: विखुरलेल्या होत्या व त्यावर एक प्रकारची भयाण शांतता पसरली होती. डुकरांच्या घरात आम्हाला आता प्रथमच एक टोकदार दाढी असलेला गावंढळ म्हातारा मनुष्य दिसला. आम्हाला उद्देशून तो म्हणाला,

'तुम्हाला ऑफिसमध्ये जायचं आहे का ? ते त्या तिकडच्या झोपडीत आहे बघा.'

'तुम्ही तुमची डुकरं कुठे ठेवता ?' मिटकाने त्याला विचारलं.

'काय म्हणालात ? डुकरं ?'

त्या माणसाने जरा इकडे पाहिलं. आपल्या हाडकुळ्या हातांनी मिशांवर हात फिरवला व दूरवर कुठेतरी नजर लावली. तो मिटकाच्या प्रश्नाने गोंधळलेला दिसला. त्याने आपला एक हात जोरात हलवून तो आमच्याकडे पहात म्हणाला,

'त्या ऐतखाऊ चोरांनी ती सगळी खाऊन टाकली.'

'कोणी खाल्ली म्हणालात ?'

'कोणी म्हणजे ? आमच्या लोकांनी. या सामुदायिकातल्याच लोकांनी.'

'तुम्ही या सामुदायिकाचे सभासद नाही का आजोबा ?' असं मिट्कानं विचारलं.

त्यावर तो म्हातारा फिदीफिदी हसत म्हणाला, 'अरे बेटा, मी या सगळ्या मेंढरांमध्ये वाट चुकलेलं वासरू आहे. इथे जे सर्वात मोठ्याने ओरडू शकतील ते सर्वात

मोठे समजले जातात. माझ्यासारखा एकाद्या म्हाताऱ्याला इथे जागा नाही आणि त्याला खायला मिळण्याचीही भ्रांत आहे. चोर लेकाचे ! पण बाळ तू कोण आहेस?'

'आम्ही काही कामासाठी इथं आलो आहोत.'

'अस्सं. कामासाठी आला आहात तर त्या ऑफिसमध्ये जा. तिथे त्यांची आत्ताच एक सभा चालली आहे. ते नेहमी अशा सभा घेत असतात. त्यांना ना उद्योग ना धंदा.'

तो म्हातारा आता अगदी मोकळेपणाने बोलू लागला होता. परंतु आम्हाला त्याच्याशी गप्पा मारायला वेळ नव्हता.

आम्ही त्या खचून भरलेल्या ऑफिसमध्ये शिरलो. त्या म्हाताऱ्यानं सांगितल्याप्रमाणे तिथे खरोखरच सभा चालू होती. जुन्या जमान्यातल्या त्या खुर्च्या–बाकांवर ती मंडळी दाटीवाटीनं बसली होती. सारेजण तिथे विड्या ओढत होते व सारं वातावरण धुरानं भरुन गेलं होतं. त्यामुळे तिथं किती माणसं बसली होती त्याचा अंदाज करता येत नव्हता. मात्र तिथे खूपसा आरडाओरडा व हमरीतुमरी चालू होती. दुर्दैवानं त्यांच्यापुढे कोणत्या कार्यक्रमाची चर्चा चालू होती हे काही आम्ही समजू शकलो नाही. आम्ही आत शिरल्यावर एक कुरळ्या केसांचा, काळी दाढी असलेला, किंचित बायकी चेहऱ्याचा पुरुष आमच्यासमोर आला व आम्ही कोण असं विचारू लागला.

आमच्या संभाषणाला सुरवात झाली ती प्रथम अधिकृत परंतु तिरस्कारयुक्त व कमालीची घृणास्पद; परंतु शेवटी शेवटी दोन तासांच्या चर्चेनंतर प्रत्यक्ष कामाबद्दल मला असं वाटतं की माझं काहीतरी चुकलं असावं. ते सामुदायिक अगदीच भिकार अवस्थेत चालत असलं तरीही त्यातली मंडळी ते भूत सोडायला तयार नव्हती. व आम्ही कोण उपटसुंभे त्यांना उखडून काढायला आलो अशा विचारानं ते सारेजण त्यांची उरलीसुरली ताकद पणाला लावून ते सामुदायिक टिकविण्यासाठी धडपडत असावेत आणि म्हणून ते सगळे आमच्यावर खवळून उठले.

एक गोष्ट स्पष्ट होती की १५०० एकर जमीन त्या सामुदायिकाला न पेलणारीच होती. त्या सामुदायिकाच्या दारिद्र्याचं कारण त्याच्या वरवरच्या दिखाऊ समृद्धीतच होतं. त्या वाडीची वाटणी करावी याबद्दल आमच्यात करार होण्याची चिन्हे दिसू लागली. ती मंडळी त्या इमारती, त्याचा कोट, तो व्हीनसचा पुतळा हे सर्व काही आम्हाला द्यायला तयार झाले. परंतु शेतजमीन विभागायची वेळ आली तेव्हा मात्र ते चिडलेले दिसले. मिटकाला काही व्यवस्थित तऱ्हेनं चर्चेत प्रश्न मांडता येईनात. एकाएकी तो वैयक्तिक प्रश्नावर येऊन टेपला.

'तुमचं बीट अजूनही शेतातच कसं राहून गेलंय हो ?'

'तुझ्यासारख्या मुलानं मला हा प्रश्न विचारावा. हे तुला शोभतं का ?'

असं तो प्राचार्य चिडून म्हणाला. संध्याकाळ पडेपर्यंत आम्ही तिथेच चर्चा करत राहिलो व शेतजमिनीच्या विभागणीबद्दलचा करार कसाबसा तयार झाला.

'आपण एखाद्या वेडयासारखे काय उगाचच चर्चा करत बसलो आहोत? एक भिंत घालून आपण शेतजमिनीची विभागणी करू शकू.'

'आम्ही तेवढयावरच मिटवलं व पुन्हा माघारी फिरलो.

कुठच्या तऱ्हेच्या वाहनाने आम्ही माघारी आलो हे काही मला आता नक्की आठवत नाही. परंतु आम्ही जणू काही पंख लावूनच परत आलो असू. आम्ही आमच्या सगळ्या कामगिरीचा अहवाल सर्वसाधारण सभेमध्ये दिला व सर्व मुलांनी अतिशय उत्साहाने त्याचं स्वागत केलं. मला व मिट्काला सर्वांनी मिळून आनंद अतिशयाने हवेत उडवलं. या साऱ्या गडबडीत माझा चष्मा मात्र मोडला व मिट्काच्या नाकाला की कपाळाला कुठेतरी चांगलंच खरचटलं.

यानंतरचे काही दिवस खरोखर अतिशय आनंदात व उत्साहात गेले. आम्ही सतत तीन महिने निरनिराळे आराखडे करण्यात घालवले. या मधल्या अवकाशात ब्रेगेलबाई एकदोनदा येऊन गेल्या. आमच्या कल्पना व आमची स्वप्नं पाहून त्या जरा चिडूनच म्हणाल्या :

'कॉ. माकारेन्को, तुम्ही कसली मुलं तयार करता? की सारावेळ नुसती स्वप्नंच पहात असता?'

समजा स्वप्नं पहाणाऱ्यात काही चूक आहे का? स्वप्नं पहाणं मला स्वतःला फारसं आवडत नाही. सर्वसाधारणपणे मुली स्वप्नं पहातात. पण स्वप्नास्वप्नातही पुष्कळ फरक असतो. पांढऱ्या स्वच्छ घोडयावर बसून आपण कुणी सरदार आहोत असं स्वप्न पहाणं आणि आठशे मुलंमुली यांची एक वसाहत रंगरुपाला आणणं यात फार मोठा फरक आहे. आम्ही जेव्हा साध्या बराकीत रहात होतो त्यावेळेस मोकळ्या व ऐसपैस खोल्यांची स्वप्नं आम्ही पाहिली. थंडीपासून बचावण्यासाठी पायाला कसल्या कसल्यातरी पट्टया बांधताना खरेखुरे बूट मिळावेत अशी स्वप्नं आम्ही पाहिली. आम्ही राबफॅकचं स्वप्न पाहिलं. कोम्सोमोल संघटनेचं स्वप्न पाहिलं. मोलोडेटसारखे घोडे मिळावेत म्हणूनही स्वप्नं पाहिली. किंबहुना, चांगल्या प्रतीच्या इंग्लिश गाई मिळाव्या म्हणूनही स्वप्नं पाहिली. आमच्याकडे मी जेव्हा प्रथम एका इंग्लिश जातीच्या डुकरांची जोडी आणली त्यावेळेस चपटया डोक्याचा आमचा वान्या एका उंच स्टुलावर बसलेला होता. तो आढयाकडे बघून म्हणाला,

'आता आमच्याकडे एकच जोडी आहे. आणखी काही दिवसांनी आमच्याकडे बरीच डुकरं होतील. वाढता वाढता एके दिवशी आमच्याकडे शंभर डुकरं होतील. टोस्का, तू ऐकलंस का? आमच्याकडे शंभर डुकरं होतील.'

हे बोलणारा वान्या व ऐकणारा टोस्का खूपखूप हसले होते. त्यांच्या हसण्याच्या आवाजाने त्यावेळी माझ्या ऑफिसमधल्या कामात देखील व्यत्यय आला होता.

आजमितीस आमच्याकडे तीनशे डुकरं आहेत. वाऱ्या शेल्यापुतीनचं स्वप्न कोणीही आता लक्षात ठेवलेलं नाही.

आमच्या शिक्षणपद्धतीत व मध्यमवर्गाच्या शिक्षणपद्धतीत कदाचित हाच मोठा फरक असला पाहिजे. तो म्हणजे आमची मुलं ही सामुदायिकात वाढतात. नुसतीच वाढत नाहीत तर ती भरभराटीला येतात व उद्याच्या उज्वल भवितव्याचं स्वरुप आज बघतात व ते मिळविण्यासाठी जरुर ती धडपड करतात. त्या धडपडीमध्ये सर्वांचे परिश्रम, आनंद व एक निश्चित दृष्टिकोन असतो. आणि हेच आमच्या खऱ्याखुऱ्या शिक्षणाचं मर्म समजायला हरकत नाही.

या सगळ्या विचारांनीच मी माझी मुलं पहात असलेली स्वप्नं व त्यापासून त्यांना मिळणारा आनंद हिरावून घ्यायचा प्रयत्न केला नाही. खरोखरी हे दिवस कॉलनीत अतिशय आनंदाचे गेले होते. माझी कित्येक मित्रमंडळी अजूनही त्या गोष्टीची आठवण करतात. ॲलेक्सी मॅक्झिमोविच हा सुद्धा अगदी आपल्यासारखाच आमच्या स्वप्नात भागीदार झाला होता व रंगून गेला होता.

तरीसुद्धा कॉलनीमध्ये काही लोक आनंदात नव्हते व ते आमच्या स्वप्नामध्येही भाग घेत नसत. आमचे कालिनासाहेब पण त्यापैकीच एक होते. कालिनासाहेबांचं मन अजूनही अगदी तरुण होतं. पण स्वप्नं पहायला नुसतं मनच तरुण असून चालत नाही तर त्याबरोबर शरीरही बळकट असावं लागतं. म्हणून कालिना एकेदिवशी म्हणाले,

'तुला माहीत आहे का, एखादा चांगला उत्तम घोडा मोटारीपुढे उभा केल्यास नक्कीच घाबरून जाईल. कारण त्याला जिवंत रहायचं आहे. पण तेच जर एखाद्या खेचराची व मोटारगाडीची टक्कर होण्याची वेळ आली तर तो त्याच्यात भाग घेईल. कारण त्याला मागचापुढचा विचार फारसा करता येत नाही, म्हणजेच परिणामांची कल्पना नसते. अशी रशियन भाषेत म्हण आहे.'

कालिनांना आमच्याबरोबर येण्याचा मी खूप आग्रह केला. मुलांनीही त्यांना पुष्कळ आग्रह केला. परंतु त्यांनी त्याबाबतीत आम्हाला दाद दिली नाही. ते म्हणाले,

'हे पहा, मी आत्तापर्यंत तुमच्याबरोबर राहिलो परंतु आता माझी मर्यादा संपली. आता यापुढे मला काही रेटणार नाही. तेव्हा माझ्यासारख्या बाजारबुणग्याला बरोबर न नेण्यातच शहाणपण आहे. मला आता सोविएत सरकार जे निवृत्तीवेतन (पेन्शन) देईल त्यावरच मी संतुष्ट रहायचं ठरवलं आहे. सोविएत सरकार माझ्यासारख्या म्हाताऱ्यांची फार उत्तम काळजी घेतं.'

ऑसिपोव्ह मंडळींनी आमच्याबरोबर न येण्याचं जाहीर केलं. या कॉलनीत राहून त्यांना अनेक भलेबुरे अनुभव आले. आणखी काही अनुभव घ्यायची त्यांना इच्छा नव्हती.

नाताल्या मॉर्कोव्हना म्हणाली, 'आम्ही आपली साधीसुधी माणसं आहोत. आठशे मुलं घेऊन तुम्ही काय मिळवणार आहात ते काही आम्हाला समजत नाही. अॅन्टन, तुम्ही आपले हात मात्र या भानगडीत पोळून घ्याल.'

यावर मी त्यांना उत्तर दिलं, ते म्हणजे 'शूर माणसाच्या वेडेपणाची गाथा आम्ही गाऊ.'

हे वाक्य गॉर्कीच्या पुस्तकातलं आहे हे मुलांनी लगेच ओळखलं आणि आनंदातिशयाने टाळ्या वाजवल्या. परंतु ऑसिपोव्ह मंडळी अशीतशी बदलणारी नव्हती.

माझी समजूत काढण्यासाठी सिलँटी म्हणाला, 'राहू दे ना त्यांना इथेच. अॅन्टन, तुम्ही प्रत्येक घोडा शर्यतीच्या मैदानात कशासाठी आणता ? एखाद्या गाईला तुम्ही कितीही जरी तयार केलीत तरी ती काय घोडा होणार आहे ?'

'पण सिलँटी, तू येणार ना ?'

'मी ? कुठे ?'

'तेच रे. त्या शर्यतीला.'

'अर्थातच. तुम्ही मला कुठेही सोडा. मी खोगीराशिवायसुद्धा घोड्यावर बसेन व सांगाल तिथे जाईन. तुम्हाला माहीतच आहे. त्या पाजी लोकांनी मला कितीतरी राबवून घेतलं. त्यांना माझ्यातला चांगलेपणा दिसला नाही. मीही काही साधासुधा नाही याची जाणीव त्यांना कुठे होती ? हे असं आहे. समजलं ?'

असं म्हणून सिलँटीनं जोरानं आपली मान हलवली व पाय जोरात आपटले.

सिलँटी, कोझीर, एलिसो, मोडानोविच लोहार, स्वयंपाकी, चक्कीवर काम करणारी मंडळी, आमची सर्व शिक्षकमंडळी व बाकी सर्वजण आमच्याबरोबर जायला तयार झाली होती. हे अगदी सत्य होतं. ही सर्व योजना त्यांना खरोखरंच पटली होती. म्हणूनच ती आमच्याबरोबर यायला तयार झाली होती.

इकडे आमचे हे बेत चालले असताना खार्कोव्हमध्ये दुसऱ्याच काही गोष्टी घडत होत्या. मला मधूनमधून तिकडे जावंच लागे. सरकारी शिक्षणखात्याच्या प्रमुखानं आम्हाला पाठिंबा दिला होता. प्रत्यक्ष ब्रेगेलबाईसुद्धा नाही नाही म्हणताना आमच्या स्वप्नात सामील झाल्या होत्या. त्यांनी तर मला झोप्रोत्झेवोएचा डॉन क्विक्झोट म्हणायला सुरुवात केली होती.

सरकारी शेतकी खात्याचा अधिकारी जरा आढ्यतेनेच बोले. आमचं गॉर्की कॉलनी हे नाव विसरून कधीकधी आम्हाला कोरोलेन्को म्हणत. कधी शेवचेन्को कॉलनी वगैरे वगैरे नावांनी आमचा उच्चार करत. पण त्यांनीही एकेदिवशी 'आठशे एकर जमीन व पोपोव वाडी एकदाची घ्या व आमच्या डोक्याला ताप देऊ नका' असं सांगितलं.

असं जरी असलं तरी आमचे शत्रू समोरासमोर लढाईला न उभे रहाता

गनिमी काव्यानं आमच्यावर हल्ला करत. आम्ही मात्र निःशंकपणे त्यांचा मुकाबला करायला सारे निघालो होतो. आता हा शेवटचाच हल्ला करावा लागेल, अशी समजूत करून घेऊन मी पवित्रा टाकला. पण एक बुटकासा माणूस, एक लांडे जाकीट घालून माझ्या हल्ल्याचा प्रतिकार करायला माझ्यासमोर येऊन ठाकला व काही शब्द बोलला. त्यामुळे मी चारी मुंड्या चित झालो. माझी सारी अस्त्रं मी फेकून दिली. माझा बावटाही मी फेकून दिला, व माझ्यामागून येणाऱ्या माझ्या कॉलनीच्या पलटणीला यशस्वी माघार घ्यायला लावली.

तो बुटका म्हणाला, 'शासकीय अर्थखाते मोडकळीला आलेल्या प्रासादांसाठी तुम्हाला तीस हजार देऊन जुगार रुबल खेळायला तयार नाही. तुमची सध्याची बालकल्याण संस्था कुठे मोठीशी सुधारली आहे?'

यावर मी म्हणालो, 'ही रक्कम फक्त दुरुस्तीसाठीच नाही तर नवीन प्रकल्प व इथून ही गॉर्की कॉलनी हलविण्याचा खर्च या सगळ्यांचा मिळून हा आकडा आम्ही सांगितला आहे.'

'ठाऊक आहे आम्हाला. आठशे एकर जागा, आठशे उनाड पोरं, आठश गाई असला आतबट्ट्याचा व्यवहार करायला आम्हाला वेळ नाही. शिक्षणखात्यात आतापर्यंत लाखो रुपये आम्ही ओतले. निष्पन्न काहीच झालं नाही. त्यांच्या सामानाच्या चोऱ्या झाल्या, मोडतोड झाली व ते सारे पळून गेले.'

अशा तऱ्हेने त्या आकाराने लहान दिसणाऱ्या माणसाने आमच्या स्वप्नांचा भंग केला, आमच्या सुंदर कल्पनांवर अक्षरशः घाला घालून ती जमीनदोस्त करून टाकली. आमचंच नव्हे तर हे गॉर्कीचेही स्वप्न होतं असं अगदी डोळ्यात पाणी आणून आम्ही सांगूनसुद्धा काही उपयोग झाला नाही आमचं स्वप्न धुळीला मिळालं.

कॉलनीमध्ये परत येताना मला आठवण झाली की आमच्या अभ्यासक्रमात आम्ही असं घातलं होतं की आमचं झोप्रोत्झे विभागातलं मोठं शेत. बिचाऱ्या शेरेनंही पोपोव वाडीला दोन वेळा भेट दिली होती. त्या ठिकाणी शेती कशी करावयाची याचा आराखडा त्यानं तयार केला होता व तो आमच्या मुलांना समजावूनही सांगितला होता! तो आराखडा हिरे, पाचू, माणिक यांनी सुशोभित केला होता. त्यामध्ये ट्रॅक्टर्स, गाईंचे कळप, मेंढ्यांचे कळप, शेकडो कोंबड्या व बदकांचे खुराडे, या सगळ्यातून मिळणारे लोणी व अंडी इंग्लंडसारख्या दूर देशांना निर्यात, अंडी उबवायची यंत्रे, फळांच्या बागा अशा तऱ्हेने आमचा हा सगळा अभ्यासक्रम अगदी सुंदर, चकचकीत व डोळे दिपवून टाकणारा असा होता.

एक आठवड्यापूर्वीच मी खार्कोव्हहून परत येत असताना आमच्या छोट्या मुलांनी मला चक्क गाडीतून ओढूनच काढला व अतिशय आनंदाने 'आंतोन, आधी इकडे या, इकडे या,' असं म्हणत ओढतच नेलं. मी ज्यावेळी तबेल्यात गेलो

त्यावेळी अजूनही थरथर कापत असलेलं नुकतंच जन्माला आलेलं सोनेरी रंगाचं शिंगरू माझ्या नजरेला पडलं. सारी मुलं अगदी शांतपणे परंतु आनंदाने व कौतुकाने बघत होती. सगळेजण एकाच आवाजात म्हणाले,

'आंतोन, आम्ही याचं नाव झापोरोत्झेट ठेवलंय बरं का ?'

बिचारी माझी मुलं ! तुम्हाला त्या सुंदर दरीत शेती करायला मिळणार नाही. किंवा त्या परिमहालासारख्या प्रासादात रहायला मिळणार नाही. त्या मोठ्या मनोऱ्यावरून बिगुल वाजवता येणार नाही. तुम्ही फुकट या शिंगराचं नाव झापोरोत्झेट ठेवलंत !

☐

# १७

## ' हिशोबाचा धडा '

सरकारी अर्थखात्याच्या माणसानं आम्हाला असा धक्का दिला की त्यामुळे आम्ही अगदी पार कोलमडून गेलो. आमच्या मुलांच्या उत्साहावर एकदम विरजण पडलं. आमच्या शत्रूंना आम्हाला खिजवायला व चिडवायला वाव मिळाला. इतकंच नव्हे तर मी स्वत:सुद्धा अगदी दिग्मूढ झालो. पण असं असलं तरी त्या कोलोमॅकच्या तीरावर तसंच जीवन कंठत रहायला आमची कोणाचीच तयारी नव्हती. सरकारी शिक्षणखात्यातल्या लोकांनाही आमच्या तळमळीची अगदी जाणीव झाली होती. त्यामुळे आम्हाला कुठेतरी बदल द्यायचाच हे त्यांच्या मनात पक्कं रुजलं होतं. पण तो बदल कुठं द्यायचा हे कुणालाच समजत नव्हतं.

१९२६ च्या फेब्रुवारी व मार्चमध्ये एकंदर परिस्थिती फार गुंतागुंतीची झाली होती. झोपोरोत्झेच्या घटनेनंतर आमच्यातल्या कमाल आशावादाची ज्योत जवळजवळ विझली होती. असं असूनही आमचं सामुदायिक चिवटपणे बदल घडवून आणण्याची अंधुकशी आशा बाळगून होतं. युक्रेनच्या त्या गवताळ प्रदेशात अनेक जागा अजूनही उपलब्ध होण्यासारख्या होत्या. काही काही ठिकाणी शेती अजिबात होत नव्हती व मैलोगणती जमीन नुसतीच पडून होती. आणि जिथे-जिथे शेती होत होती तीसुद्धा अगदी कमी दर्जाची होती. सरकारी शिक्षण खात्यातल्या आमच्या मित्रांनी अशाचपैकी अनेक जागा आमच्या कोम्सोमोल संघटनेमधल्या किंवा आमच्या जुन्या शेतकरी मित्रांनी आम्हाला सुचविल्या होत्या. या

सगळ्या काळामध्ये शेरे, आमची मुलं आणि मी यांनी आगगाडीनं किंवा मोठ्या रस्त्यानं मोटारीनं, कधीकधी आमच्या मोलोडेटच्या गाडीतून साध्या रस्त्यावर प्रवास केला. तसंच कधीकधी जवळपासच्या ठिकाणावर पायीसुद्धा फिरलो.

हे सारं करूनही आम्ही स्वयंसेवक दमूनभागून परत येत होतो. त्यानंतर त्या पाहिलेल्या जागेसंबंधी आमच्या सर्वसाधारण सभेत थंडपणे चर्चा होई. आम्ही सारेजण एखाद्या धंदेवाईकासारखे चेहरा करून परत आपापल्या कामाला जात होतो. अशा प्रत्येक सभेमध्ये त्या वक्त्यावर पहिला प्रश्नाचा मारा होई तो असा,

'तुम्ही पाहिलेल्या जागी जास्तीत जास्त किती जणांची सोय होऊ शकते? फक्त १२० जणांचीच असेल तर विचार सोडून द्या.'

दुसरा प्रश्न असे, 'गावाचं नाव काय म्हणालात? पेर्याटीन. मग पुढे बोलूच नका.'

अशा आमच्या सर्वसाधारण सभेत वरीलसारखे सवालजवाब झाले की आमच्या सभासंचालकाला एकप्रकारे समाधानच वाटे. कारण चुकून एखाद्याने जागा पसंत केली तर जावं लागेल म्हणून त्यांना भितीचं वाटायची.

अशा तऱ्हेनं स्टारीलूकाय वाडी, पेर्याटीनचा आश्रम, लूबानीचा आश्रम, कोकष्काय घराण्याचा भव्य वाडा इत्यादी जागा आमच्यासमोर ठेवल्या होत्या. परंतु त्या साऱ्या कुचकामी म्हणून आम्ही सोडून दिल्या.

अनेक ठिकाणं आम्हाला सुचविण्यात आली व ती आम्ही तिथल्या तिथेच नाकारली. ती जाऊन पहाण्याची सुद्धा आम्हाला जरुर वाटली नाही. अशीच एक लहान मुलांची कॉलनी खार्कोव्हजवळ कुर्याझ या ठिकाणी होती व तिथं चारशे मुलं होती. त्यांची परिस्थिती कमालीची हलाखीची होती. अशा हलाखीच्या अवस्थेत असलेल्या संस्थेचं नाव ऐकून आम्हाला खरोखर धसकाच बसला. म्हणून प्रथम जेव्हा आम्ही नुसतीच मुलांची संस्था म्हणून ऐकलं होतं तेव्हा किंचितशा आशेचा तरंग मनात उद्‌भवला होता. पण मुलांची परिस्थिती हलाखीची आहे हे ऐकून आमच्या मनातला विचार आम्ही तसाच झटकून टाकला.

मी कामासाठी खार्कोव्हला गेलो असताना मी एका बालकल्याण समितीच्या सभेत अचानक सापडलो. त्या समितीपुढे त्यावेळी कुर्याझच्या कॉलनीबद्दल चर्चा चालू होती. कारण ती त्यांच्या अधिकारकक्षेत मोडत असे. सरकारी शिक्षणखात्यातले युरियेव्ह नावाचे एक निरीक्षक या कॉलनीबद्दल काहीशा कडवटपणाने बोलत होते. त्यांच्या मुद्देसूद व नियंत्रित भाषेतूनसुद्धा या संस्थेमध्ये चाललेल्या एकंदर परिस्थितीवर प्रकाश पडत होता. ऐकणाऱ्याला ही कुर्याझ कॉलनी म्हणजे जणूकाही ४०० मुलं व ४० शिक्षक यांचा एक मनोविकृत, रानटी असा अनियंत्रित जमाव असला पाहिजे असं वाटलं.

मला माझी मूठ टेबलावर आपटून मोठ्यांदा ओरडावं व ' ही निव्वळ थाप आहे, असं होऊच शकत नाही,' असं सांगावंसं वाटलं. परंतु युरियेव्हच्या चेहऱ्या-कडे पाहिल्यावर तो अशा काही थापा मारील असा विचार आणणंसुद्धा कसंतरीच वाटलं. त्याच्या बोलण्यात खऱ्याखुऱ्या शिक्षणतज्ञाची कळकळ दिसून येत होती. मला तिथे पाहून युरियेव्ह आधीच थोडा गांगरला होता व बोलताना तो सारखा माझ्याकडे बघत होता. जणूकाही त्याच्या पोषाखात काही विचित्रपणा असावा त्यामुळे तो संकोचला होता. सभा संपल्यावर तो माझ्याजवळ आला व माझा हात धरून म्हणाला,

' खरं सांगू का, तुझ्यासमोर त्या संस्थेच्या रानटीपणाचं वर्णन करताना मला कमालीची लाज वाटत होती. मी असं ऐकलंय की, तुझ्या कॉलनीत जेवणाच्या वेळेला एखाद्या मुलाला यायला पाच मिनिटं जरी उशीर लागला तरी त्याला शिक्षा होते व त्याला संबंध दिवसभर फक्त भाकरी आणि पाणी दिलं जातं. शिक्षा संपल्यावर तोच मुलगा हसून परत सांगतो की झाली ती शिक्षा योग्यच होती.'

' तुम्ही म्हणता असंच काही नाही. मी अशा तऱ्हेची शिक्षा देण्यात जर यशस्वी झालो तर कदाचित आमच्या गॉर्की कॉलनीबद्दलही आजच्या धर्तीवर तुम्ही अहवाल सादर केला असता.

मी व युरियेव्ह बराच वेळ चर्चा करत होतो. त्यानंतर त्यांनी मला रात्रीच्या जेवणाचे निमंत्रण दिलं. जेवता जेवता ते म्हणाले,

' काय हो, मी एक प्रश्न विचारू ? तुम्हीच ती कुर्याझची कॉलनी चाल-वायला का घेत नाही ?'

' ते कशासाठी ? आजच्या मितीलाच कॉलनीत भरपूर मुलं आहेत.'

' होय आहेत खरी, पण त्यातल्याच एकशे वीस मुलांना हलवून तुमच्या-साठी जागा करून देऊ.'

' नको बुवा ! मला ही कल्पनाच आवडत नाही. एकतर ही सगळी घाण काढावी लागेल, आणि तुम्ही लोक माझ्या पद्धतीने मला काम करू देणार नाही.'

' देऊ देऊ. तुम्ही एवढे घाबरता कशाला ? आम्ही तुम्हाला कोरा चेक, अगदी कोरा चेक देऊ. तुम्हाला जे काय हवं ते तुम्ही करा. कुर्याझ संस्था आज भयंकर अवस्थेत आहे. कल्पना करा की राजधानीच्याजवळ अशा तऱ्हेच्या चार भामट्यांना राहू व वाढू देणं योग्य वाटत नाही. काय सांगू ! ती पोरं रस्त्यावर लूटमार करतात. १८००० रूबल किंमतीची मालमत्ता या कॉलनीतल्या मुलांनी व कार्यकर्त्यांनी चार महिन्यांत धुळीला मिळविली.'

' असं जर असेल तर संबंध शिक्षकवर्ग बदलून टाकावा लागेल.'

' तसं नाही. तिथेसुद्धा काही चांगले लोक आहेतच.'

'नाही मला हे पटत नाही. मी सर्व वातावरण निर्जंतुक करण्याच्या मताचा आहे.'

'बरं बुवा. काढून टाका. सगळ्यांना काढून टाका.'

'नाही. मी कुर्याझची जबाबदारी घ्यायला तयार नाही.'

'पण तुम्ही हे आधीच का सांगताय ? तुम्ही ती कॉलनी पाहिली आहे का? '

'नाही. मी अद्याप पाहिलेली नाही.'

'मग कृपा करून उद्याचा दिवस तुम्ही इथेच रहा. तुम्ही, मी व खालाबुडा तिघेजण जाऊन प्रत्यक्षच बघून घेऊ.'

मी त्या प्रस्तावाला मान्यता दिली.

ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी आम्ही तिघेजण कुर्याझला गेलो. माझ्या गॉर्की कॉलनीचं जणूकाही थडगं बांधायलाच मी निघालो नाही ना अशी माझ्या मनात कल्पना आली.

सिडर कारपोविच खालाबुडा हे त्या बालकल्याण समितीचे अध्यक्ष होते. ते आमच्याबरोबर होते. ते बिचारे प्रामाणिकपणानं आपल्या खात्यामध्ये काम करत होते. त्या खात्यात खाद्यपदार्थांची दुकानं, मोडकळीस आलेलं फर्निचर व ओसाड पडलेल्या फळबागा, संस्थेचं ऑफिस व इतर अनेक गोष्टी यावर देखरेख करत असत. सिडर कारपोविचना सतत निरनिराळे छोटेमोठे धंदेवाईक, दलाल, सट्टेबाज, चोर, फसवाफसवी करणारे व लब्धप्रतिष्ठित वगैरे वगैरे लोकांनाही तोंड द्यावं लागे. त्यांना एक मोठी निर्जतुक द्रव्याची बाटली द्यावी असं मला मनापासून वाटू लागलं. त्यांनी या सगळ्या बाजूंनी येणाऱ्या सूचनांचा विचार करण्यामुळे त्यांचे कान जणू बधीर झाले होते; सूचना आर्थिक, शैक्षणिक, मानसिक वगैरे. त्यामुळे त्यांच्या देखरेखीखाली असलेल्या संस्थांमध्ये एवढं दारिद्र्य, चोऱ्या, दादागिरी, पलायन वगैरे का असावे हे त्यांना समजलं नव्हतं. आता त्यांना परत समजलं की अनाथ मूल म्हणजे साऱ्या अवगुणांचा व पापांचा एकवटलेला समुदाय असतो. पोटापाण्याचा प्रश्न सुटला तर त्या मुलांचं भवितव्य उज्वल आहे असा त्यांचा आशावाद होता.

हा त्यांचा स्वभावधर्म मला बऱ्याच उशीराने जाणवला. या घडीला त्यांच्याबरोबर गाडीत बसून मी त्यांचं सारं भाषण अगदी निःसंदेहपणे ऐकत होतो.

ते म्हणाले, 'लोकांना प्रथम पोटभर खायला मिळालं तर कशाचीही भीती उरत नाही. समजा जर त्याला पोटाला खायला नसेल त्याला गोगोलची पुस्तकं वाचायला देण्यात किंवा त्यातलं तत्त्वज्ञान शिकवण्यात काय अर्थ आहे ? म्हणून प्रथम तुम्ही त्यांच्या हातात खायला द्या व मग त्यांच्या हातात पुस्तक द्या. ते उडाण-

टप्पू चोऱ्या करतात व धान्य पेरायचं त्यांना माहीत नाही. त्यांना शेती करता येत नाही.'

'एकंदर वाईटच.'

'तुम्ही आता पहालच. नेहमी माझ्याकडे येऊन आम्हाला पैसे द्या, कुणी म्हणतो तंबाखू द्या, कोणी पाच रुबल मागतात. मी देतोही. पुन्हा एक आठवड्याने येऊन माझ्यापुढे हात पसरतात. पहिल्या पैशाचं काय केलं विचारलं तर सिगारेट ओढायला खर्च झाले. आता आम्हाला व्होडका घ्यायला पैसे द्या अशी चक्क मागणी करतात.'

सहा किलोमीटर कच्चा व कंटाळवाणा रस्ता संपवून आम्ही एका टेकडीवरून खाली उतरलो व एका मोडक्यातोडक्या मठाच्या तसल्याच दरवाजापुढं आमची गाडी उभी राहिली. आवाराच्या मध्यभागी एका वर्तुळाकार मोकळ्या जागेवर जुन्या वेड्यावाकड्या चर्चची इमारत उभी होती. त्याच्या पाठीमागे एक तीन मजली इमारत दिसत होती. त्या इमारतीच्या दोन्ही बाजूंना छोटीछोटी घरकुलं कशीबशी उभी होती. त्या घरकुलांच्या पडव्या अगदी मोडकळीस आलेल्या दिसत होत्या. लांबवर एका कोपऱ्यात एक दोन मजली इमारत अर्धवट बांधलेल्या अवस्थेतच दिसत होती. जिकडे पहावं तिकडे कोपऱ्याकोपऱ्यातून छोटी घरकुलं किंवा झोपड्या किंवा कधीकधी नुसताच आडोसा अत्यंत घाणेरड्या प्रकारे उभारलेला जागोजाग दिसत होता. त्याकडे पाहून असं वाटत होतं की गेल्या तीनशे वर्षांत या भागात काही नवीन सुधारणेचा लवलेशही नसावा, उलट साराच ओंगळवाणा प्रकार होता. प्रथम मला कोणती गोष्ट खटकली असेल तर ती ही की साऱ्या कॉलनीभर एक प्रकारची विचित्र दुर्गंधी पसरली होती. साफ न केलले संडास, कोबीच्या भाजीचा रस्सा, शेण, मलमूत्र या सगळ्यांचा मिळून एक वेगळाच दर्प साऱ्या वातावरणात भरून राहिला होता. चर्चच्या बाजूने विचित्र गाण्याचे सूर ऐकू येत होते. पुढे पाहिलं असताना असं दिसून आलं की काही म्हाताऱ्या बायका त्या चर्चच्या पायऱ्यांवर बसून विचार करत होत्या. जुन्या वैभवाच्या दिवसात त्याना तिथे भरपूर भीक मिळत असावी असा त्यांच्या मनात विचार येत असावा. अद्याप आम्हाला प्रत्यक्ष कॉलनीतला एकही माणूस नजरेला आला नव्हता.

कॉलनीचा अधिकारी खुजा व शक्य तितक्या गबाळ्या वेशात पुढे आला. तो आम्ही आलेल्या गाडीच्या बाजूवर हाताने थोपटत होता. मग तो आम्हाला कॉलनीत घेऊन गेला. एकंदर पहाता असं दिसून आलं की कुठचीही टीका टाळण्यासाठी तो कॉलनी पाहुण्यांना दाखविण्याच्या भरीस पडत नसावा. कारण त्याचं दुःख त्याला बिचाऱ्याला माहीत होतं.

एका ठिकाणी तो आम्हाला घेऊन गेला. त्या दालनाला दरवाजा नव्हता

फक्त दरवाजाची मोकळी जागा होती. दरवाजाचे सांधेसुद्धा काढून नेलेले होते. त्या दालनाकडे बोटे दाखवून तो म्हणाला,

'इथे आमचं पहिलं सामुदायिक स्थापन केलं होतं.'

ते ओलांडून आम्ही दुसऱ्या चौकात गेलो. तिथून एका चिंचोळ्या मार्गाने पुढे गेलो. तिथेही सगळं शांतशांतच होतं. खरं तर तो भाग तसा उघडा होता. उघडा असूनही तिथं कमालीचं कुबट वातावरण होतं. भिंतीच्या कडेनं बर्फ जमत असावं व आता त्यावर धुळीचे थर साठलेले होते.

'इथं दरवाजे नाहीत का ?' असं मी विचारलं.

त्यावर त्या कार्यकर्त्याने हसून काही तरी सांगायचा प्रयत्न केला. त्यावरून एवढंच समजलं की तो हसणे अद्याप विसरला नव्हता. माझ्या प्रश्नाला युरियेव्हनं उत्तर दिलं,

'एकेकाळी इथे दरवाजे होते. परंतु ते जाळून टाकण्यात आले. हे तर काहीच नाही. आता तर ते जमिनी खोदून त्याही जाळण्यासाठी उपयोग करतात. त्यांनी मोठे दरवाजे तर जाळलेच व काही माड्याही जाळून टाकल्या.'

'असं का बरं व्हावं ? त्यांना जळणासाठी लाकूडफाटा मिळत नाही का?'

'त्यांना जळाऊ लाकूड का मिळत नव्हतं हे एक परमेश्वरालाच माहीत ! जळाऊ लाकडासाठी त्यांना वेळोवेळी पैसे दिले जात होते.'

'कदाचित त्यांच्याकडे जळाऊ लाकूड असेलही,' जोराने नाक शिंकरत खालाबुडा म्हणाले, 'मला वाटतं ते लाकूड शोधायचा किंवा लाकूड तोडून आणायचा कधी प्रयत्नच करत नसावेत. नोकर ठेवून लाकूड आणायला त्यांच्याकडे पैसे नाहीत. त्यांच्याकडे लाकूड आहे. काय समजलात ? पण या कॉलनीतली मुलं अट्टल गुन्हेगार आहोत.'

शेवटी एकदाचे आम्ही एका बंद दरवाजापाशी येऊन उभे राहिलो. तो दरवाजा एका डॉरमिटरीचा होता. खालाबुडाने त्यावर पायाने धक्का मारताच तो उघडला. परंतु त्याला फक्त खालचेच सांधे शिल्लक राहिलेले होते. आमच्या डोक्यावर केव्हाही तो मोडून पडण्याची भीती होती. खालाबुडानी त्याला हाताने आधार दिला व हसून तो दरवाजाला उद्देशून म्हणाला,

'ए शहाण्या, आमच्या अंगावर पडू नकोस. तुझे वर्तन मी पक्कं ओळखून आहे.'

आम्ही त्या डॉरमिटरीत गेलो. मोडक्यातोडक्या खाटावर व रट्टयांच्या ढिगावर अस्सल उनाड पोरं दिमाखानं बसलेली दिसली. उब येण्यासाठी काही जणांनी आपले हातपाय त्या रट्टयाखाली झाकलेले होते. एका मोडकळीला आलेल्या शेगडीवर दोन मुलं एक चांगला लाकडाचा तक्ता कापून त्या शेगडीत भरत होते. तो तक्ता नुकताच रंगवलेला असावा असं त्याच्याकडे बघून वाटत होतं. सगळ्या

कोपऱ्या-कोपऱ्यातून व खाटांच्यामधून घाण पसरलेली दिसत होती. बाहेरच्या प्रमाणेच इथेही घाण येत होती. फक्त त्यात धुपाचा वास कमी होता.

आमच्याकडे सगळे जण टकामका पहात होते, पण कोणीही मान वळवून पाहिलं नाही. सर्व मुलं माझ्या अंदाजाप्रमाणे सोळा वर्षांवरची असावी.

'हीच मोठी मुलं आहेत का?' असं मी विचारलं.

'होय. हे नंबर एक सामुदायिक. यात सर्व मोठी मुलंच आहेत.' असं मोठ्या विनयानं मॅनेजरनं उत्तर दिलं.

एका कोपऱ्यातून अगदी खोल असा एक उद्गार आमच्या कानांवर आदळला.

'हे सारे खोटारडे आहेत. यांच्यावर विश्वास ठेवू नका.'

दुसऱ्या कोपऱ्यातून जास्त मोकळा आवाज आला. परंतु कुठल्याही शब्दावर जोर दिला गेला नव्हता.

'तुम्हाला काय दाखवायचं? दाखवण्यासारखं इथे काही शिल्लक आहे का? त्यांनी काय चोरलंय ते का नाही तुम्हाला दाखवत?'

या साऱ्या शब्दांकडे आम्ही लक्ष दिलं नाही. युरियेव्ह मात्र अगदी ओशाळल्या नजरेनं मधूनमधून माझ्याकडे बघत होता.

त्या दालनातून आम्ही बाहेर एका छोटया गल्लीत आलो. 'या इमारतीमध्ये सहा डॉरमिटरी आहेत. तुम्हाला सर्व डॉरमिटरी बघायच्या आहेत का?' असं त्यानं विचारलं.

'मला तुमच्या संस्थेत चालणारे छोटे कारखाने बघायचे आहेत,' असं मी म्हटलं.

खालाबुडा एकदम जणू काही जागे झाले. नुकतेच आपण नवीन आकार देणारं चरक यंत्र खरेदी केल्याचं जरा अभिमानानं सांगू लागले.

पुन्हा एकदा आम्ही आवारात फिरत होतो. एक लहानसा मुलगा, कसलं तरी जाकीट अंगात घातलेला. त्या छोटया छोटया चढावरनं उड्या मारत आमच्याकडे येताना दिसला. कुठल्याही तऱ्हेने पाय घसरून आपण एखाद्या डबक्यात पडू नये याची तो काळजी घेत होता. त्याचे पाय थंडीने अगदी गारठून गेले होते. मी त्याला थांबवला व तो कुठल्या ठिकाणाहून आलाय याची चौकशी केली.

'बाळ, तू कुठून आला आहेस?'

तो थांबला व त्याने मान वरती करून माझ्या चेहऱ्याकडे पाहिलं.

'आम्हाला ते कुठेतरी पाठवणार आहेत. ते कुठे पाठवणार आहेत त्याची चौकशी करायला निघालोय.' असं त्यानं उत्तर दिलं.

'कुठे पाठवणार?' असे मी विचारलं.

'हे लोक आम्हाला कुठेही पाठवणार आहेत असं सर्वजण म्हणतात.'

'का रे बाळ, तुला इथे आवडत नाही का?'

'अशा तऱ्हेने आम्ही इथे किती दिवस जगू शकू?'

माझं बोट धरून तो मुलगा चालत होता. एका हाताने तो जाकीटाच्या कोपऱ्याने आपले कान खाजवत होता.

पुन्हा आपले डोळे जाकीटाच्या कोपऱ्याने पुसत तो म्हणाला, 'अशा परिस्थितीत आम्ही गारठून मरून जाऊ. शिवाय आम्हाला इथे मारही चिकार मिळतो.'

'तुम्हाला कोण मारतं रे ?'

'सर्वजण मारतात.'

तो मुलगा छोटासा पण चांगला चुणचुणीत दिसत होता. त्याला रस्त्याबिस्त्यावर जाण्याचा काही अनुभव नसावा असं वाटतं. त्याचे डोळे निळे असून चांगले मोठे होते. अजूनही रस्त्यातल्या उनाडपणाचा स्पर्श त्याला झालेला दिसत नव्हता. त्याला जर अंग घासून घासून चांगला स्वच्छ केला तर सगळेजण त्याला ह्यांच्यातला आहे असं म्हणणारच नाहीत.

'ही मुलं तुला कशासाठी मारतात रे ?'

'कशाने पण मारतात. त्यांच्याजवळ नसलेली परंतु आपल्याजवळ असलेली वस्तू त्यांनी जर मागितली तर त्यांना नाही म्हणणं आपल्याला शक्य होत नाही. ते आमची जेवणं आमच्याकडून हिसकावून घेतात. काही वेळा ते आमची भाकरी पण चोरून नेतात. जर तुम्ही एखादी वस्तू चोरण्याचा प्रयत्न केलात व ती चोरताना तुम्हाला कोणी पकडलं तर.'

'बाळ, मला हे काहीच माहीत नाही रे ?' असं मी म्हणालो.

'ते असं म्हणतात की लवकरच उन्हाळा सुरू होईल.'

'उन्हाळा हा ऋतू तुला कशासाठी यायला पाहिजे आहे ?'

'म्हणजे मी इथून केव्हाही जाऊ शकेन.'

ते सर्वजण मला त्यांची वर्कशॉप पाहण्यासाठी बोलावत होते. पण त्या लहान मुलाला तिथेच सोडून जायला माझे मन होईना. त्याला काहीतरी मदत करावी अशी मला फार इच्छा झाली. तो त्या खड्ड्यावरून उड्या मारत आपल्या डॉरमिटरीकडे जात होता. बाहेरच्यापेक्षा आतल्या बाजूला थोडीतरी उब असेल.

आम्ही त्यांची ती वर्कशॉप काही पाहू शकलो नाही. कोणीतरी विचित्र माणसाजवळ म्हणे त्या दरवाजाच्या किल्ल्या होत्या व कितीही शोधून पाहिलं तरी त्या अधिकाऱ्याला ती व्यक्ती सापडेना. म्हणूनच आम्ही खिडक्याच्या भेगातून आत डोकावून आमचं समाधान करून घेतलं. आत भोकं पाडायचं एक यंत्र, जुळणीचं यंत्र व दोन चरक यंत्रे व इतर काही बारीकसारीक सामान दिसलं. मोचीकाम व दर्जीकाम हे दोन धंदेशिक्षणाचे वर्ग साधारणपणे कुठल्याही संस्थेत दिसणारे वेगवेगळ्या इमारतीत इथेही ठेवलेले आढळले.

'आज इथं सुट्टीचा दिवस आहे का ?'

यावर त्या संस्थेच्या अधिकाऱ्यानं काहीच उत्तर दिलं नाही. युरियेव्हनीच या अवघड प्रश्नाच्या उत्तराची फोड करण्याचं काम आपल्या स्वतःवर घेतलं.

'आंतोन, मला तुमचं खरोखर आश्चर्य वाटतं ! इथलं सारं वातावरण पाहून इथल्या एकंदर प्रकाराबद्दल एव्हाना तुम्हाला कल्पना यायला पाहिजे होती. इथं कोणीही काम करत नाही, अशी परिस्थिती आहे. हे लक्षात घ्या. याशिवाय जी काही हत्यारं आणि अवजारं दिली होती ती सर्व केव्हाच चोरीला गेलेली आहेत. त्यामुळे आता तिथे काही उत्पादन नाही, काम नाही, उत्साह नाही, शिस्त नाही. काही म्हणजे काहीच नाही. काम कसं करावं हे कुणालाही माहीत नाही.

या कॉलनीच्या जनित्राबद्दल खालाबुडा मोठ्या अभिमानानं बाता मारत होते. ते अजिबात चालत नव्हतं. कारण त्यातला कुठलातरी एक भाग मोडून गेलेला होता.

'बरं ! मग आता काय परिस्थिती आहे ?'

या प्रश्नाला मात्र स्वतः डायरेक्टरने उत्तर दिलं, 'शाळा आहे हो इथे, पण आम्हाला दुसऱ्या अनेक गोष्टींचा विचार करावा लागतो.'

खालाबुडानं आम्हाला त्यांच्या शेतावर चलण्याचा आग्रह केला. आम्ही जेव्हा चारी बाजूंनी जाड भिंतीचं कुंपण असलेल्या त्या इमारतीपासून बाहेर गेलो तेव्हा आमच्या डोळ्याला एक अतिशय उदासवाणं दृश्य दिसलं. एकेकाळी तिथे नक्कीच छोटासा तलाव असला पाहिजे परंतु आज मात्र तिथे काहीही नव्हतं. शेताच्या दुसऱ्या बाजूला जंगल सुरू होत होतं. व जागोजाग बर्फ पडलेलं दिसते होतं. खालाबुडानं नेपोलियनच्या धर्तीवर आपला हात लांब पसरला व मोठ्या अभिमानानं आम्हाला सांगितलं,

'एकशे वीस एकराची ही सारी जमीन आहे समजलात ?'

'तुम्ही याच्यात हिवाळी पीक कधी काढलंय का ?'

'अहो, नुसत्या तीस एकर जमिनीत आम्ही रागी पेरली. म्हणजे एकरी ३०० पौंड धान्य म्हणजे १२० एकरात ३००० पौंड धान्य निघेल. म्हणजे त्यांना भाकरीशिवाय काही उपाशी रहायची वेळ येणार नाही. मग काय नुसती रागी पेरली तरीसुद्धा दुसरं काही पेरण्याची जरूरी नाही. आम्हाला गव्हाच्या भाकरीची काय जरूरी आहे ? रायची भाकरी खाऊ. जर्मन लोक खात नाहीत. फ्रेंच लोकांना पण ती आवडत नाही. पण आमचे लोक मात्र अगदी आवडीने खातात हं. जोपर्यंत रागीची भाकरी मिळते तोपर्यंत आम्हाला काळजी करण्याचं काहीच कारण नाही.'

आता आम्ही गाडीपर्यंत येऊन पोचलो होतो. खालाबुडा अजूनही त्या रायच्या भाकरीचाच विचार करत होते. प्रथम आम्हाला त्याच्या त्या (रागी) राय पुराणाचा कंटाळा आला. पण जरा वेळाने त्याच्यात आम्हाला थोडा रस वाटू लागला. आता हे (राय) रागीबद्दल आणखी काय सांगणार याची आम्हाला उत्सुकता लागली.

आम्ही गाडीत बसलो व गाडी चालू झाली. तो बिचारा मॅनेजर दुःखीकष्टी असा एकटाच आम्हाला गाडीपर्यंत पोचवायला आला होता. खोलोडनाया टेकडी संपेपर्यंत कोणीच काही बोललं नाही. आमची गाडी बाजाराच्या नाक्यावर आली. एका उभ्या असलेल्या मुलांच्या घोळक्याकडे बघून युरियेव्ह म्हणाला,

'ही पाहिलीत का कुर्याझची मुलं ? तुम्ही त्यांना हाती घ्याल का ?'

'नाही. मी घेणार नाही.' मी म्हटलं.

'का बरं ? तुम्हाला कसली भीती वाटते ? तुमची गॉर्की कॉलनीसुद्धा उन्मार्गी मुलांचीच संस्था आहे ना ? युक्रेनचं एक मंडळ अजूनही तुमच्याकडे निर्-निराळ्या प्रकारच्या गुन्ह्यात सापडलेली मुलं पाठवतात. आम्ही तर ही खरं म्हणज अगदी सामान्य मुलं घ्या म्हणून तुम्हाला विनंती करत आहोत.'

हे ऐकून खालाबुडालाही खूप हसू आलं.

'वा ! छान ! काय योग्य शब्द वापरलात पण,' खालाबुडा म्हणाला.

युरियेव्हनं आपलं म्हणणं तसंच पुढं चालू ठेवलं. 'आपण असेच झुरिन्स्कायाकडे जाऊ व यावर चर्चा करु या. 'चिल्ड्रेन्स एड कमिटी' ही कॉलनी सरकारी शिक्षणखात्याच्या हातात देईल. खार्कोव्हला उन्मार्गी मुलं तुमच्याकडे पाठवायला आवडत नाहीत. शिवाय त्यांची स्वतःची अशी एकही वसाहत नाही. आणि वसाहत काय लहानसहान आहे ? ४०० मुलं आहेत ४००. शिवाय त्यांची छोटी छोटी वर्कशॉप्सही आहेत. खालाबुडाकडे वळून युरियेव्ह पुढं म्हणाला.

'सीडर कारपोविच, तुम्ही ही वसाहत यांच्या ताब्यात द्याल काय ?'

खालाबुडा जरा विचारात पडलेला दिसला.

'३० एकर रागीची जमीन,' पुन्हा एकदा त्याचं रागीपुराण सुरु झालं, 'म्हणजे २०० मण धान्य. शिवाय कामही. तुम्ही पैसे द्याल? आम्ही वसाहत तुम्हाला देऊ की. का नाही देणार ?'

'आपण झुरिन्स्कायाकडे जाऊयाच' असा युरियेव्हनं आग्रह धरला, 'आम्ही फार तर १२० लहान मुलं दुसरीकडे पाठवून देऊ. व २८० मुलं तुमच्या हातात देऊ. ती मूळची उन्मार्गी नसतील परंतु कुर्याझमधल्या या राहणीमुळे ती फारच बिघडून गेलेली आहेत.'

'या असल्या फंदात मी कशासाठी पडू ?' मी विचारलं. 'शिवाय तिथे सगळी साफसफाई करावी लागेल. व त्यासाठी मला २०००० रुबलची आवश्यकता आहे.'

'सीडर कारपोविच देईल की तुला एवढी रक्कम' असं युरियेव्ह म्हणाला.

खालाबुडा जणू तंद्रीतून जागा झाला आणि म्हणाला, 'काय म्हणालास ? २०,००० रुबल ? कशासाठी रे?'

'दुरुस्ती, दारं, अवजारं, खाटा, बिछाने, कपडे या सर्वांसाठी' असं मी म्हटलं.

'२०,००० ? वा, वा ! मग काय, हे सर्व आम्हीसुद्धा २०,००० रुबलमध्ये करू की.' असं खालाबुडा म्हणाला.

झुरिन्स्कायाच्या कचेरीत आम्ही पोचलो. युरियेव्हनं आपलं दुमणं तिथे चालूच ठेवलं होतं. ल्युबोव सावेलिएवना शांतपणे ऐकत होती. तिच्या चेहऱ्यावर स्मितहास्य झळकत होतं. उत्सुकतेनं ती मधूनमधून माझ्या तोंडाकडे बघत होती. 'एवढी रक्कम प्रयोगादाखल खर्च करायची आमची ऐपत नाही. शिवाय वसाहतीला अशा विचित्र अडचणीत टाकावं असंही आम्हाला वाटत नाही. आपण मुकाट्याने ती कुर्याझ वसाहत बंद करुन टाकू व तिथली मुलं निरनिराळ्या वसाहतीत थोडी थोडी पाठवून देऊ. कॉ. माकारेन्कोला कुर्याझला जायला आवडणार नाही.' असं ती म्हणाली.

'खरं आहे. मी नाहीच जाणार. मी म्हटलं.'

'हा तुमचा जबाब अखेरचा मानायचा काय?' असं युरियेव्हनं विचारलं.

'मला माझ्या मुलांबरोबर याबद्दल विचारविनिमय करावा लागेल. पण मला वाटतं माझी मुलं नक्कीच नकार देतील.'

खालाबुडानं एकदम माझ्याकडे पाहिलं. 'कोण नकार देतील म्हणालास?' असं खालाबुडानं विचारलं.

'अर्थात माझ्या वसाहतीतली मुलं.'

'म्हणजे तुझ्या ताब्यात असलेली ती कार्टी ?'

'होय. अर्थातच तीच.'

'अन् त्यांना काय कळतंय याच्यातलं ?'

झुरिन्स्कायानं खालाबुडाच्या खांद्यावर हात ठेवला व ती अगदी शांतपणाने म्हणाली. 'सिडर, खरं आहे ते. तुझ्या किंवा माझ्यापेक्षा याच्या त्या पोरांना खरोखरच जास्त समजतं. तुझं ते कुर्याझ पाहिल्यानंतर याच्या मुलांची काय प्रतिक्रिया होईल त्याची मला कल्पना येते.'

खालाबुडा एकदम चिडला, 'तू मघापासून माझं कुर्याझ, माझं कुर्याझ असं का बरं म्हणतोस? माझं एकट्याचंच का म्हणून ते? मी आतापर्यंत तुला ५०००० रुबल दिले. एक इंजिन दिलं. बारा लेथ (आकार देणारी) यंत्रं दिली. याशिवाय शिक्षकही दिले. आता त्यांना आपलं काम जर नीट करायला येत नसेल तर तो काय माझा दोष आहे?'

त्या साऱ्या समाज शास्त्रज्ञांना व समाज कार्यकर्त्यांना तेथेच सोडून मी गाडी पकडण्यासाठी स्टेशनवर गेलो. काराबानोव व झादारोव्ह मला स्टेशनवर पोचवायला आले होते. मी त्यांना थोडक्यात कुर्याझबद्दल माहिती सांगितली. ते दोघेही जण एकदम गंभीर झाले. गाडीच्या चाकाकडे नजर लावून ते बराच वेळ विचारात गढून गेले. शेवटी काराबानोव म्हणाला,

'गॉर्की वसाहतीला कुर्याझची साफसफाई करणं हे काही मोठं मानाचं काम नव्हे. पण कदाचित यावर अजूनही विचार करावा लागेल.'

यावर झादारोव्ह म्हणाला, 'आपण तर इथे जवळच आहोत ना? आपणही त्या कामात मदत करू आणि हे बघ, उद्या आपण ती कॉलनीच एकदा नजरेखाली घालून येऊ या ना? त्यात काय बिघडतं?'

आमची सर्वसाधारण सभा बोलावली गेली. आमच्या सर्व मुलांनी माझा अहवाल शांतपणाने ऐकून घेतला. माझा अहवाल देत असताना गंमतीची गोष्ट म्हणजे माझं अंतःकरणही मी ऐकत होतो. एकाएकी मी विषादानं स्मित केलं. काय झालंय मला? मी काय लहान मुल होतो का? चार महिन्यांपूर्वीच माझ्या या मुलांच्याबरोबर मी अतिशय आनंदानं उत्साहानं झापोत्झोवाएबद्दल केवढ्या अफाट कल्पना योजल्या होत्या. मी काय म्हातारा झालो? की माझा एकदम अवसानघात झाला? पण मला वाटतं की माझ्या आवाजात निरुत्साह व माझ्या स्वतःच्याच शब्दावर अविश्वास इतकंच नव्हे तर माझ्या आवाजातही व माझ्या चेहऱ्यावरचे भावही अविश्वास दर्शवित होते. गेलं सबंध वर्षभर आम्ही केवढ्या योजना आखल्या होत्या व आता कुर्याझसारखी वाया गेलेली वसाहत ताब्यात घेऊन त्या सर्वांवर काय कळस चढवायचा? माझ्या मुलांचं अनिश्चित भविष्य मी कसं काय चर्चा करत राहिलो? त्या कुर्याझमध्ये तसं पाहिलं तर काहीच आकर्षण नव्हतं. आमची कोलोमॅक नदी, आमचे फुलांचे ताटवे, फळबाग व आम्हीच आमच्या हातांनी दुरुस्त करून घेतलेली ही सर्व वाडी सोडून कुर्याझमध्ये जाण्यात तसा कोणताही लाभांश होता का?

तरीसुद्धा मला त्या एका कवितेची आठवण झाली. त्यामध्ये प्रामाणिकपणाबद्दल मुद्देसूद विवेचन असून एकही उत्साहवर्धक शब्द नव्हता व एक प्रकारचं फार मोठं आव्हान होतं. माझ्या मनाच्या कोपऱ्यात कुठंतरी त्या कवितेला साद मिळाली.

माझी मुलं माझा तो सगळा अहवाल ऐकताना मधूनमधून हसत होती. मधूनच काही प्रश्न विचारत होती. खरं तर त्या ठिकाणी त्यांना विचित्र वाटावं अशी माझी अपेक्षा होती. हसणं जरा कमी करून त्यांनी माझ्यावर प्रश्नांचा भडीमार केला. माझी उत्तरं ऐकून ते आणखी मोठमोठ्याने प्रत्येकवेळी हसत होते. ते हसणं हे आनंदाचं किंवा आशादायक नसून उपहासगर्भ होतं.

कोणीतरी विचारलं, 'ते चाळीस शिक्षक काय करतात?'

'मला माहित नाही.' मी सांगितलं.

त्यावर दुसरा प्रश्न आला. 'ॲन्टन, तुम्ही त्यातल्या एखाद्याच्या चांगली थोबाडीत का भडकवली नाहीत? मला तर बुवा रहावलं नसतं.'

पुन्हा एकदा हास्याचा कल्लोळ माजला.

'तिथे जेवणाची खोली आहे का ?'

'आहे, पण मुलांच्या पायात बूट नाहीत. म्हणून त्या रश्श्याची भांडी डॉरमिटरीतून नेली जातात व सारी मुलं तिथेच बसून खातात.'

पुन्हा एकदा हास्य.

'बरं ! ही भांडी डॉरमिटरीतून कोण घेऊन जातं ?'

'मी काही पाहिलं नाही. पण बहुधा ती मुलंच नेत असावीत.'

'बहुधा पाळीपाळीने नेत असतील ना ?'

'होय. मला वाटतं पाळीपाळीने नेत असावीत.'

'म्हणजे एकंदरीत ते संघटीत राहू शकतात.'

पुन्हा एकदा हास्य.

'त्यांच्याकडे कोम्सोमोल संघटना आहे का ?'

या प्रश्नानंतर माझ्या उत्तराची वाट न पाहता पुन्हा एकदा हास्याचा फवारा उडाला व माझा जेव्हा सर्व अहवाल पूर्ण झाला तेव्हा ते सारे माझ्याकडे गंभीर चेहऱ्याने पहात होते.

'तुमचं काय मत आहे ?' एक आवाज आला.

'तुम्ही जे ठरवाल ते करायचं मी ठरवलंय.'

लापोट माझ्याकडे अगदी निरखून पहात होता. परंतु माझ्या चेहऱ्यावरील हावभावावरून त्याला काही कल्पना आली नाही.

'बोला. भराभर तुमचं मत सांगा. काय ? तुम्ही बोलत का नाही काही ? तुमचा मूकपणा आपल्याला कुठे घेऊन जाईल सांगता येत नाही.'

कुडल्टीनं आपला हात वरती केला.

'वा ! वा ! डेनिस, तू काय म्हणणार आहेस त्याची मला काही कल्पना येत नाही.'

डेनिस एका हातानं आपलं डोकं खाजवू लागला. या त्याच्या सवयीमुळे कॉलनीत त्याची नेहमी थट्टा होत असे. शेवटी त्यानं आपला हात खाली केला. ज्या मुलांनी हे पाहिलं त्यांनी पुन्हा एकदा हसून त्याची टवाळी केली.

'असं पहा. मला काही विशेष सांगायचंय असं काही नाही. ते खार्कोव्हच्या जवळ आहे असं म्हणतात. परंतु एवढी मोठी जबाबदारी घ्यावी का नाही ? कारण आपली बरीचशी मुलं राबफॅकला गेलेली आहेत.' असं म्हणून त्यानं आपलं मस्तक हलवलं.

आतापर्यंत कुर्याझबद्दल जास्त काही बोलण्यासारखं नव्हतंच. आपण का तिथे जावं ? लक्षात ठेवा. तिथे २८० मुलं व आपण १२० जण आहोत. त्यातही आपल्यातले काहीजण अगदी नवीन आहेत. मोठे कोण राहिलेत आता ? टोस्का कमांडर, नताशो कमांडर, पेरेपल्याचेन्को, सुखायवन, गालाटेन्को हे आपले कमांडर.'

विचार करा. नीट मनापासून विचार करा. आणि हे करत असताना तुमचं कौतुक कोणीएक लूका सेमियानोविच किंवा एखादा सोम्यागोम्या माणूस करणार नाही तर खार्कोव्हची जनता तुमचं कौतुक करणार आहे. लेको, तुम्ही ते नाकारता ? हा मला माहित आहे. तुम्हाला हे तुमचे गुलाबाचे ताटवे सोडून जायचं जिवावर आलंय. तुम्ही भीता आहात की, आम्ही १२० व ते ३००. अॅन्टन सेमियानोविचनं व मी ही वसाहत कशी सुरु केली हे काय तुम्हाला माहित नाही ? आम्ही सभा भरवून काय भाषणं ठोकली होती ? अरे, या व्होल्कोव्ह, तारानेट व गुडला विचारा. हे एवढे मवाली असूनसुद्धा आम्ही त्यांना घाबरला का ? मुळीच नाही ? तुम्ही जे काम करणार आहात ते आपल्या देशासाठी करणार आहात. आपल्या सोविएत सरकार-साठी करणार आहात व सोविएत सरकारला त्याची खरोखरच फार जरुरी आहे. मी म्हणतो, 'तुम्ही जा आणि कामाला लागा.' मॅक्झिम गॉर्कीसुद्धा याबद्दल गौरव करतील व साऱ्यांना सांगतील. 'पहा, माझे गॉर्काईट पळपुटे नाहीत. भित्रे नाहीत तर ते खरोखर शूर आहेत व ते काम करतीलच याबद्दल आम्हाला खात्री आहे.'

कालिनासाहेबांचं भाषण जसजसं लांबत गेलं, तसतसा त्यांचा चेहरा लालबुंद होत गेला. तसंच काही मुलांच्या डोळ्यात वेगळी चमक दिसून यायला लागली. काही मुलं लांब जमिनीवर बसली होती. ती हळूहळू पुढे सरकली. तर काही जण शेजाऱ्याच्या खांद्यावर आपली मान ठेवून एकटक नजरेनं कुठे तरी दृष्टी लावून तल्लीनतेने ऐकत होते. कालिनानं जेव्हा मॅक्झिम गॉर्कीचा उल्लेख केला त्यावेळी सर्व मुलांचे डोळे एका वेगळ्याच तेजानं उजळून निघाले. काही मुलांनी उत्साहाने आवाज करून व टाळ्या वाजवून प्रतिसाद दिला. परंतु हे फार वेळ चाललं नाही. मिटका झ्वेल्वी आपल्या जागेवर उभा राहिला व मागच्या ओळीतल्या मुलांना उद्देशून म्हणाला,

'अरे, आम्ही सगळे नक्कीच जाणार.' मागच्या ओळीत बसलेली मुलं कदाचित आपल्याला विरोध करतील असं त्याला वाटलं असावं. परंतु मागच्या ओळीतल्या मुलांनी मिटकाकडे जळजळीत नजरेनं पाहिलं व त्यांच्या चेहऱ्यावर ते जाणार असल्याचं चिन्ह स्पष्टपणे दिसत होतं. मिटका कालिनाकडे वळला. त्याच्याबरोबर अनेक मुलं त्याच्या बाजूला वळली व साऱ्यांनी कालिनाला विचारलं,

'कालिनासाहेब असं जर आहे तर तुम्ही पण आमच्याबरोबर का येत नाही बरं ?'

यावर कालिना नुसताच कडवटपणानं हसला व एकीकडे आपल्या पाईपमध्ये तंबाखू भरण्याचं काम करत राहिला.

लापोटनं यावर उत्तर दिलं, 'वरती काय लिहिलंय ते वाचा पाहू.'

त्यावर सर्वजण एकदम ओरडले, 'कुरकुरायचं नाही.'

'पुन्हा एकदा सारे जण म्हणा पाहू.' लापोटनं आपली मूठ जोरात खाली आणून आपटली आणि सर्वजण मोठ्या पण निश्चयी आवाजात ओरडले, 'कुर-कुरायचं नाही.'

'तुम्ही सारखेच कुरकुरता. तुमचं अंकगणित तरी फारच सुंदर. तुम्ही ८० जण आहेत आणि ते ३२० आहेत. असं मोजतात काय लेको? गणित मांडण्याची ही रीत नव्हे. अरे, आपण खार्कोव्हची ४० मुलं घेतली त्यावेळी आपण मोजदाद केली? कुठं आहेत बरं ती आज?'

'अहो, आम्ही इथेच आहोत.' असं ते जोरात ओरडले.

ते पुन्हा एकदा आनंदाने सर्वजण 'वा, वा' म्हणून ओरडले.

'ही मोजदाद कशासाठी करायची? मी जर इव्हानच्या जागी असेन तर मी अशा तऱ्हेनं मोजीन. आमच्या डोक्यात उवा नाहीत आणि त्यांच्या डोक्यात १०,००० उवा आहेत म्हणून आम्ही त्याच्याकडे जायचं नाही.'

ती सगळी आनंदीत मुलं इव्हानकडे विचित्रपणे पाहू लागली. बिचारा इव्हान लाजेनं चूर झाला.

'याचा अर्थ असा होतो की आमच्या बाजूला गॉर्की कॉलनी आहे आणि त्यांना कोण आहे बरं? कोणी नाही.' असं लापोट म्हणाला.

लापोटनं भाषण संपवल्यावर सगळी मुलं एका सुरात ओरडली, 'लापोटचं म्हणणं बरोबर आहे. आम्ही जाणार. अगदी दगडावरची रेघ. सरकारी शिक्षण-खात्याला अॅन्टननी ताबडतोब लिहून कळवावं.'

'तुमचं बरोबर आहे. हे सारं ठीक झालं रे! आपण तर नक्की जाणारच. पण त्याची आखणी आपल्याला डोकं नीट ताळ्यावर ठेवून केली पाहिजे. उद्या मार्चची एक तारीख आहे व आपण थोडाही वेळ फुकट घालवू शकत नाही. आपण पत्र लिहीत बसण्यापेक्षा सरळ तार ठोकू या. दुसरं म्हणजे आपण पैशा-शिवाय काही करू शकत नाही. २०,००० किंवा किती जे असतील ते आपल्याला ताबडतोब मिळाले पाहिजेत.' असं कुडल्टीनं सांगितलं.

'आपण हे मताला टाकू या का?' असं लापोटनं माझ्याकडे बघून विचारलं.

त्यावर सगळी मुलं ओरडली, 'अॅन्टनचं म्हणणं काय आहे ते त्यांनी आता आम्हाला सांगावं.'

'तुम्हाला एवढ्यावरनं समजलं नाही का? ठीक आहे. तुमचा आग्रहच असला तर अॅन्टननी पुढे येऊन आपलं निवेदन करावं अशी मी त्यांना विनंती करतो.' लापोट म्हणाला.

मी उभा राहिलो व सगळ्या सभेला उद्देशून म्हणालो. 'थ्री चीअर्स फार दी गॉर्की कॉलनी.'

अर्ध्या तासानंतर मिटका बोगोवलेन्स्की, त्याला आम्ही नुकताच दुसऱ्या तुकडीचा कमांडर केलेला होता, तसंच तो आमच्या घोड्याच्या पागेचा प्रमुखही झाला होता, ताबडतोब माझी तार घेऊन शहराकडे निघाला. तारेतला मजकूर खालीलप्रमाणे होता :

खार्कोव्हच्या शिक्षणखात्याच्या प्रमुख झुरिन्स्काया यांना आम्ही विनंती करतो की शक्य तितक्या लवकर कुर्याझ वसाहत आमच्या ताब्यात द्यावी. आम्हाला पुढची तजवीज ताबडतोब करता येईल. आमच्या सर्वसाधारण सभेनं हा ठराव पास केला आहे.'

—माकारेन्को.

□

# १८

## प्राथमिक चाचणी

झुरिन्स्कायानं दुसऱ्याच दिवशी तार करून मला बोलावून घेतलं. आमच्या साध्यासुध्या मुलांना याचा एकदम गौरव वाटला. ते म्हणाले, ' किती झटपट काम होतं, नाही ?'

यापुढची कामं खरोखरच भराभरा झाली. कुर्याझ वसाहत आहे त्या स्थितीत राहू द्यायची नाही याबद्दल कुणाचंही दुमत नव्हतं. आजूबाजूच्या परिसरातल्या अशा संस्थांकडून तसंच आजूबाजूच्या गावातल्या रहिवाशांकडून या चोरांच्या संस्थेचं ताबडतोब विसर्जन करावं अशी मागणी येत होती. तरीही काहीकाही महाभाग कुर्याझ वसाहत आहे त्या स्थितीतच चालू रहावी या मागणीला चिकटून राहिले होते. कोणत्याही अटी न घालता ती वसाहत आमच्या स्वाधीन करावी याला फक्त झुरिन्स्काया व युरियेव्ह यांचाच फक्त पाठिंबा होता. युरियेव्हला ही गोष्ट अगदी मनापासून पटली होती. झुरिन्स्कायाचा माझ्यावर नितांत विश्वास असल्यामुळे तिचाही या प्रस्तावाला संपूर्ण पाठिंबा होता.

ती वरचेवर बोलायची, ' का कुणास ठाऊक, पण अँन्टन, मला मात्र पाहिजे तेवढा उत्साह वाटत नाही.'

ब्रेगेल कॉलनी आमच्या स्वाधीन करण्याच्या बाजूची होती. परंतु तिनं अशा काही अटी मांडल्या की त्याला मी कधीही कबुली दिली नसती. तिचं म्हणणं असं की, ' एक तीन लोकांची कमिटी नेमावी व त्यांनी हे काम आपल्या हातात घ्यावं.

गॉर्की कॉलनीत असलेल्या प्रथा हळूहळू नव्या कॉलनीत सुरु कराव्यात. तसंच खार्कोव्हच्या ५० कोम्सोमोल सभासदांना मदतीला घ्यावं.'

खालाबुडा याच्याभोवती काही बदमाष लोकांचं टोळकं असे व तो त्यांच्या बुद्धीनं चाले. २०,००० रुबल देण्यास तो बिलकुल तयार नव्हता. त्याचं म्हणणं असं की '२०,००० रुबलमध्ये आम्हीच त्याची पुनर्रचना करू शकतो.'

ट्रेड युनियन संघटनेतल्या काही लोकांनी आमच्यावर हल्ला केला. वास्तविक त्यांचा याच्याशी काहीही संबंध नव्हता. क्लॅमर म्हणून एक मोठा शहाणा पुढारी स्वतःलाच 'जनता मित्र' म्हणवत असे. तोही यात लुडबूड करत होता. गॉर्की कॉलनीमुळे त्याचा काय कपाळशूळ उठत होता ते मला कधीच कळलं नाही. केव्हाही गॉर्की कॉलनीचा उल्लेख आला की हा कपाळाला आठ्या घाली व आपली मूठ जोराने टेबलावर आपटून म्हणे,

'वा, सुधारणा करणारे तर सगळीकडेच आहेत. हा माकारेन्को कोण लागून गेला शहाणा? कुठल्यातरी माकारेन्कोसाठी आपण कामगारवर्गाच्या हिताकडे न बघता खुशाल आपले नीतिनियम धाब्यावर बसवावेत काय? या गॉर्की कॉलनीबद्दल आपल्याला काय माहिती आहे? ती कोणी पाहिली आहे? झुरिन्स्कायाने म्हणे पाहिली आहे. या झुरिन्स्कायाला काय सगळं समजतं थोडंच.'

माझ्या काही मागण्यांना क्लॅमरचा विरोध होता. पहिली मागणी म्हणजे सध्या असलेल्या कुर्याझ वसाहतीतल्या सर्व कर्मचाऱ्यांना कुठल्याही तऱ्हेची चर्चा न करता सरळ कामावरुन कमी करणे. गॉर्की कॉलनीत एकूण १५ शिक्षक असावेत. शिक्षकांना ४० रुबल ऐवजी ८० रुबल मासिक वेतन द्यावं. कर्मचाऱ्यांची नेमणूक फक्त माझ्या एकट्याच्याच मतावर सोपवून द्यावी. ट्रेड युनियन त्याला हरकत घेऊ शकते. या माझ्या साध्या मागण्यांनाच क्लॅमरचा फार विरोध होता.

तो म्हणे, 'असल्या या विक्षिप्त अटींवर कोण यांच्याशी चर्चा करायला धजावणार? यातला प्रत्येक शब्दन शब्द जणू काही सोविएत कार्याची टवाळीच आहे. यांना म्हणे फक्त पंधराच शिक्षक आहेत. मग २५ जणांना फेकून देऊन बेकार करायचं काय? यांच्या म्हणण्याप्रमाणे यांच्या शिक्षकांनी एखाद्या विकत घेतलेल्या गुलामाप्रमाणे काम केलं पाहिजे. असं असतानाही बाकीचे शिक्षक ठेवले तर ते मात्र त्यांच्याआड येतात'

मी मात्र क्लॅमरच्या बरोबर वादावादी करण्याच्या भानगडीत पडलोच नाही. कारण त्याला काय म्हणायचं होतं त्याची मला चांगलीच कल्पना आलेली होती.

मी शक्यतो कुठल्याही चर्चेपासून दूर रहाण्याच्या प्रयत्न करत होतो. कारण यामध्ये मी कितपत यशस्वी होईन याची मला शंका होती. म्हणून ही जबाबदारी घेण्यासाठी कुणावरही जबरदस्ती करण्याची माझी इच्छा नव्हती. माझं एकच

म्हणणं होतं: गॉर्की कॉलनी ही पुष्कळ लोकांनी पाहिलेली नाही. ती त्यांनी प्रत्यक्ष पहावी व आपलं मत तयार करावं.

अनेक व्यक्तींचे हितसंबंध, भावना ही संस्था आमच्या हातात देण्याच्या मार्गात अडकलेले होते. मी या सगळ्या जंजाळातून लवकर बाहेर पडण्याच्या प्रयत्नात होतो. मी खार्कोव्हमध्ये एका दिवसापेक्षा जास्त वेळ कधीही राहिलो नाही किंवा त्यांच्या कुठल्याही सभांना हजर राहिलो नाही. अर्थातच त्यामुळे बऱ्याच अडचणी निर्माण झाल्या. पण खरं म्हणजे माझ्या प्रतिस्पर्धांच्या प्रामाणिकपणावर माझा बिलकुल विश्वास नव्हता. किंबहुना त्यांच्या त्या विक्षिप्त चर्चेमुळे त्यांचा काय हेतू असेल याबद्दल माझ्या मनात दाट शंका होती.

मला एक खरीखुरी त्रयस्थ भूमिका घेणारी व तरीही माणुसकी जाणणारी व्यक्ती सरकारी शिक्षणखात्यात भेटली. व मी खरोखरच तिला मनापासून मानत होतो. ही व्यक्ती म्हणजे एक स्त्री होती. तिची एकंदर वेषभूषा पहाता तिच्यात स्त्रीत्व असं कुठेच दिसून येत नव्हतं. ती उंचीने लहान असून तिचा चेहरा बटबटीत होता. छाती सपाट व पाय जाडजूड होते. ती आपले लाललाल हात नेहमी पुढं करायची. कधी खूण करण्यासाठी किंवा कधी आपला मुद्दा समजवण्यासाठी. तिला सर्वजण कॉम्रेड झोया असं म्हणत. व ब्रेगेलच्या कचेरीत तिला चांगला मान होता.

ही कॉम्रेड झोया रागराग करत असे व ती तो उघडपणे दाखवित असे. माझं म्हणणं मी स्पष्टपणानं मांडावं अशी तिची अपेक्षा असे. म्हणून कधीकधी ती अतिशय तिखट भाषा वापरी.

'माकारेन्को, तू काही शिक्षणतज्ज्ञ नाहीस. तू एक शिस्तप्रिय माणूस आहेस. तू सैन्यामध्ये अधिकारी होतास असं मला कोणीतरी सांगितलं. तुझ्याकडे पहिल्यावर त्याची सत्यता पटेलच. तुझा या लोकांनी एवढा का बडेजाव ठेवला आहे हे मला पटत नाही. मी तर तुला मुलांच्याजवळसुद्धा जाऊ दिलं नसतं.'

आपलं मत प्रामाणिकपणानं मांडण्याच्या पद्धतीबद्दल कॉम्रेड झोया मला आवडली व मला तिच्याबद्दल काय वाटतं तेही मी तिला दिलखुलासपणे सांगून टाकलं.

'कॉम्रेड झोया, तुझं वागणं आपल्याला एकदम पसंत आहे. पण एक गोष्ट सांगतो की मी सैन्यामध्ये कधीच नव्हतो. तेव्हा कर्नल हा किताब मला लागू पडत नाही.'

ही कॉलनी एकाकडून दुसऱ्याकडे सोपविण्यामुळे एकंदर गोंधळ व नुकसान होणार आहे अशी झोयाची ठाम समजूत होती. आणि तसं तिनं ब्रेगेलच्या टेबलावर मुठी आपटून व ओरडून सांगितलं.

'तुम्हाला जणू काही भारावून टाकलेलं दिसतंय.' माझ्याकडे निर्देश करुन ती पुढं म्हणाली,' 'या माणसाने तुमच्यावर काय जादू केलीय मला काही समजत नाही.'

‘कर्नलनं, असं म्हणायचंय ना तुम्हाला ?’ मी तिला गंभीरपणाने विचारलं.

‘होय, होय. कर्नलनंच.’

‘या सगळ्याचा शेवट काय होईल माहित आहे. यादवी होईल, यादवी. हा आपली १२० पोरं घेऊन तिथे येईल. कॉम्रेड माकारेन्को, यावर तुला आणखी काय म्हणायचंय ?’

‘तुम्ही उपस्थित केलेल्या या मुद्यामुळे माझी मती गुंग झालीय. मला एवढंच विचारायचंय.यादवी होईल म्हणता, तर यात कोण कुणाला मारणार,तेवढं मला सांगा.’

ही आमची चर्चा ब्रेगेलनं मध्येच तोडली. ती रागारागानं म्हणाली, ‘झोया, हे असले शब्द वापरायला तुला खरोखरी लाज वाटली पाहिजे. यादवी कसली होणार ? अँन्टन माकारेन्को, तुला आपली सगळ्याच गोष्टींची टवाळी करायची सवय लागली आहे.’

आमच्या या शाब्दिक मारामारीची व मतभेदांची बातमी पक्षाच्या उच्च पदाधिकाऱ्यांच्या कानापर्यंत पोचली होती. मला त्याचं एक प्रकारचं समाधान वाटलं. त्याहीपेक्षा कुर्याझ कॉलनी, अगदी आतून बाहेरुन सडून तिची दुर्गंधी. हे ऐकून आणखीनच आनंद वाटला. ताबडतोब काहीतरी करायला पाहिजे ही जाणीव पक्की झाली. कुर्याझच्या कर्मचाऱ्यांनाही काहीतरी निश्चयाप्रत येणं अगदी निकडीचं झालं. कुर्याझच्या शिक्षकमंडळींनी ती कॉलनी माझ्या हाती देण्याविरुद्ध प्रात्यक्षिकं केली.

कुर्याझचे शिक्षकवर्ग अत्यंत सावधानतेनं लोकांच्यात प्रचार करत फिरत होते की कुर्याझमधल्या मुलांनी गॉर्की कॉलनीत येणाऱ्या मुलांना कापून टाकायचं ठरवलं आहे व तशी त्यांची जोरात तयारीपण चालू आहे. कॉम्रेड झोया पुन्हा एकदा माझ्याकडे पाहून रागारागाने उसळली व म्हणाली,

‘ऐकलंस का ?’

‘हो, चांगलंच ऐकलं व कोण कोणाला मारणार आहेत तेही चांगलं लक्षात आलं आहे. आता अगदी स्पष्ट झालं की कुर्याझमधली मुलं गॉर्की कॉलनीच्या मुलांचे गळे कापणार आहेत.’

‘होय, आता आम्हाला पण कळलं, व्हारव्हेरा. या सगळ्या प्रकाराबद्दल तुला जबाबदार धरलं जाईल. एवढं लक्षात ठेव. आत्तापर्यंत तुम्ही असं कधी ऐकलं होतं का ? एक मुलांचा गट दुसऱ्या गटाविरुद्ध चिथवायचा.’

अखेर एके दिवशी मला वरच्या अधिकाऱ्याकडून ताबडतोबीचं बोलावण आलं. एका अगदी गुळगुळीत दाढी असलेल्या माणसानं पुढ्यातल्या कागदावरील लक्ष काढून मला बसण्याची खूण केली. झुरिन्स्काया व क्लॅमर दोघेही तिथे हजर होते. मी पण एका खुर्चीवर जाऊन बसलो.

त्या माणसानं मला विचारलं, ' तू आणि तुझी मुलं कुर्याझमधली ही घाण उपसून काढू शकाल अशी तुम्हाला खात्री वाटते का ?'

मला वाटतं मी एकाच वेळी आलेल्या या प्रश्नांच्या सरबत्तीनं दचकलो. प्रश्नकर्त्याच्या डोळ्याला डोळा भिडवून व आवाजात शक्य तितकं मार्दव ठेवून अगदी प्रामाणिकपणाने मी उत्तर दिलं,

' होय. मला पूर्ण विश्वास वाटतो. '

त्या माणसाने पुन्हा एकदा माझ्याकडे संथपणे पाहून म्हटलं, ' हे पहा, आता मी एक अगदी तांत्रिक प्रश्न तुला विचारणार आहे. ' क्लॅमरला तो म्हणाला, 'तूही ऐक. हा तत्वाचा प्रश्न नसून अगदी तांत्रिक प्रश्न आहे. नीट विचार करून सांग. ४० रूपये पगाराचे ४० शिक्षक न घेता १५ शिक्षक घ्यावेत असं का वाटतं ? याचं मला अगदी थोडक्यात उत्तर दे. '

एक क्षणभर विचार करून मी म्हटलं, ' मी शक्य तितक्या थोडक्यात सांगतो. ४० रुपये पगाराचे ४० शिक्षक हे कुठच्याही अनाथ मुलांच्या सामुदायिकात–संस्थेत–अवनती निर्माण करतीलच परंतु अशी मंडळी जगातल्या कुठच्याही संस्थेत नीतिभ्रष्टता वाढवतील. '

तो गुळगुळित चेहऱ्याचा माणूस एकदम खुर्चीत मागे रेलला व गदगदून हसू लागला. हसण्यामुळे त्याचा आवाजसुद्धा धड उमटेना. तशा स्थितीत क्लॅमरकडे बोट करुन तो म्हणाला,

' क्लॅमरसारख्यांच्या सामुदायिकातसुद्धा असं होऊ शकतं का ?'

' हो, जरुर होऊ शकतं.' असं मीही तितक्याच गंभीरपणानं उत्तर दिलं.

त्याचा औपचारिकपणा एकदम कुठल्या कुठे पळाला. त्यानं ल्यूबोव सॅवलेयॆव-नाकडे हात पसरून म्हटलं, ' हेच, हेच मी तुम्हाला सतत सांगत होतो. जेवढी जास्त संख्या तुम्ही वाढवाल तेवढी काम निपटण्याची वृत्ती कमी होते.'

एकाएकी त्यानं मानेला झटका दिला व पुन्हा त्याला आपल्या हुद्याची आठवण झाली असावी. त्याच्या हुद्याला साजेशा भाषेत झुरिन्स्कायाकडे वळून तो म्हणाला.

' त्याला कुर्याझचा ताबडतोब ताबा देऊन टाका.'

' २० हजार रुबल मिळणार असतील तर.' मी उठता उठता म्हटलं.

' होय. ते तुला मिळतील. पण ही रक्कम जास्त आहे असं तुला वाटत नाही का ?'

' खरं तर एवढीही पुरणार नाही. '

' ठीक आहे. तू त्याचा ताबा घेऊ शकतोस. तू मागितलेली रक्कमही तुला मिळेल. पण एक गोष्ट लक्षात ठेव की ते यशस्वी करून दाखवलंच पाहिजे.' असं बोलून त्याने माझा निरोप घेतला व तो ताबडतोब निघून गेला.

गॉर्की कॉलनीतील उत्साही निश्चयाचा भर आता जरा ओसरून सावकाश परंतु सैनिकी वक्तशीरपणात त्याची परिणती झाली होती. लापोट हा आता पुढारी झाला होता व कोव्हल त्याला प्रत्येकवेळी चतुरपणे मदत करत असे. कॉलनीवर प्रभुत्व ठेवणं ही काही तशी सामान्य गोष्ट नव्हती. अशा तऱ्हेचं अत्यंत खेळीमेळीचं वातावरण सबंध कॉलनीमध्ये होतं जे पूर्वी कधी जाणवलं नव्हतं. सामुदायिकाच्या जबाबदारीची तीव्र जाणीव सर्वांच्यात दिसत होती. जराही कुठे चुकलं तर सर्वांना आश्चर्य वाटे. तसंच कटू शब्दात समज दिली जाई, 'म्हणे आम्ही कुर्याझ सुधारायला जाणार आहोत.'

कुर्याझला कसल्या अडचणींना तोंड द्यावं लागेल याबद्दल कुणाच्याही मनात शंका नव्हती. सामुदायिक टिकविण्यासाठी व वाढवण्यासाठी इतर सर्व गोष्टी गौण मानाव्या लागतील, तसंच स्वार्थत्याग करावा लागेल याची आमच्या कॉलनीतल्या मुलांना चांगली कल्पना होती.

हा एक आनंद होता. कदाचित जगात मिळणाऱ्या आनंदातला सर्वात मोठा आनंद होता. ही एकमेकांवर अवलंबून असण्याची जाणीव होती. माणसांच्या शक्ती व माणसा–माणसातली संबंधांची लवचिकता, धीमेपणा, सामुदायिकाची खरी ताकद ही साऱ्या वातावरणात भरून गेल्यासारखी दिसत होती.

हे सर्व माझ्या मुलांच्या हालचालीत, नजरेत, भावनात, बोलण्या-चालण्यात व कामात हरघडी दिसून येत होतं. सगळयांचे डोळे उत्तर दिशेला वळलेले होते. तिथे एका अज्ञात ठिकाणी, अजाणतेपणा, दारिद्र्य, अंदाधुंदी, क्षुद्रपणा जणू काही एखाद्या भिंतीच्या आड आमच्यावर हल्ला करण्यासाठी टपून बसल्यासारखा होता.

माझ्या मुलांच्या वर्तणुकीत कुठच्याही तऱ्हेचा दांभिकपणा नव्हता. किंबहुना प्रत्येकाच्या मनात खोलवर एक प्रकारची भीती व अस्वस्थता सुप्तावस्थेत वसत होती. कारण प्रत्यक्ष शत्रू कोण आहे हे अजून कोणीही पाहिलेलं नव्हतं.

प्रत्येक वेळेला शहरातून येण्याच्या वेळी मुलं माझी आतुरतेने वाट पहात. कधी मोठ्या रस्त्यावर, कधी झाडावर, कधी इमारतीच्या कौलांवर बसून टेहळणी करत असत. मी आवारात शिरल्याबरोबर ज्याची पाळी असेल तो बिगुल वाजवून सर्वसाधारण सभेची खबर देत असे. या बाबतीत मला विचारण्यासाठीही ते थांबत नसत. मी मुकाट्याने सभेला जाऊन बसत असे. प्रत्येक वेळी मुलं टाळ्या वाजवून स्वागत करत. जणू काही ती प्रथमच एखाद्या कलावंताला भेटल्यावर करत असत त्याप्रमाणे. या टाळ्या वस्तुत: माझ्यासाठी वाजवल्या जात नसत तर आमच्या सर्वांच्याच हितसंबंधांशी निगडीत असत.

अखेर मेच्या सुरुवातीला मी एक दिवस सह्या केलेल्या करारनामा घेऊन सभेमध्ये उपस्थित झालो.

या करारनाम्याप्रमाणे तसंच सरकारी शिक्षणखात्याच्या हुकुमान्वये 'मॅक्झिम गॉर्की कॉलनी आपल्या सर्व कर्मचाऱ्यांसह नेता येणाऱ्या सर्व वस्तूंसकट–प्राणी व इतर साहित्य घेऊन–कुर्याझ या ठिकाणी बदली करावी. मूळची कुर्याझ कॉलनी बंद केल्याचं फर्माविण्यात आलं. त्यातील २८० मुलं व तेथील सर्व मालमत्ता गॉर्की कॉलनीच्या हवाली करण्यात यावी. जेव्हा गॉर्की कॉलनीचा डायरेक्टर कुर्याझची सर्व व्यवस्था आपल्या हाती घेईल त्यावेळी काही थोडे कर्मचारी सोडता कुर्याझमधल्या बाकीच्या सर्व कर्मचाऱ्यांना रजा द्यावी.'

मेच्या ५ तारखेला मी कुर्याझचा ताबा घ्यायला सुरुवात करावी व ती १५ मेपर्यंत पूर्ण करावी.

हा करारनामा व हुकूम मी वाचून दाखवल्यानंतर आमची मुलं आनंदाने ओरडली नाहीत किंवा नेहमीप्रमाणे कुणाला हवेत उडवायचा उपक्रमही त्यांनी केला नाही. अशा स्तब्ध वातावरणाचा लापोटनं भंग केला. तो म्हणाला,

' मित्र हो, आपण यासंबंधी गॉर्कीला स्वतःच लिहू. परंतु कुठल्याही तऱ्हेची कुरकुर चालणार नाही. '

' छान ! उत्तम ! कुरकुर नाही हे अगदी बरोबर आहे. ' असा एका छोट्या मुलाचा आवाज आला. कालिनासाहेबांनी हात हवेत हलवून म्हटलं,

' मुलांनो, पुढे चला. कोणत्याही तऱ्हेची भीती न बाळगता पुढे चला. '

□

१

## कुर्याझकडे

मला लवकरच कुर्याझ कॉलनीचा दोन दिवसांच्या आत ताबा घ्यायला सुरुवात करायची होती. पण त्याआधी कमांडर कौन्सिलची सभा घेऊन त्यांना कल्पना द्यायची होती. हेतू असा की माझ्या मदतीशिवाय आमचं सर्व सामान व्यवस्थितपणे एकत्र करून ते वाहून नेण्याचं काम मुलांनीच करावं अशी माझी इच्छा होती.

कॉलनीतल्या मुलांच्यात भीती, आशा, निराशा, अनिश्चितपणा, उत्सुकता होती. या सगळ्याबरोबरच निरनिराळ्या बारीकसारीक वस्तू फुटकळ सामानासकट न विसरता याद्या करून व्यवस्थित दोरांनी बांधून टाकल्या होत्या. हे सारं एकमेकात इतकं मिसळून गेलं होतं की मला मुलांच्या या सामर्थ्याची कल्पना तर आलीच आणि त्याचबरोबर त्या सोडून परत जागच्या जागी बांधल्याही जातील याबद्दलच्या त्यांच्या सामर्थ्याची कल्पना आली.

आमच्या हातात कुर्याझला बदली करण्याचा करारनामा पडून एक रात्रच फक्त उलटून गेलेली होती, तोच आमच्या कॉलनीमध्ये प्रचाराला केव्हाच सुरुवात झाली होती; त्यामुळे काहीजणांच्या इच्छा, मनस्थिती यांना एक प्रकारचं उधाण आलं होतं. कुर्याझ म्हणजे प्रत्यक्ष काय आहे हे पाहिलं नसल्याने ही गडबड धांदल चालत असावी. याउलट मी मात्र कुर्याझचं ते भयानक भूत हे माझ्या डोळ्यासमोरून घालवू शकत नव्हतो. हे कुर्याझचं भयानक भूत माझा गळा दाबायला उठेल. खरं तर त्याचं मरण केव्हाच ठरून गेलं होतं.

कमांडर कौन्सिलमध्ये नऊ मुलं व एक शिक्षक यांनीच माझ्याबरोबर कुर्याझला यावं असा ठराव झाला होता. मी जास्त मुलं न्यावी असं म्हटलं असतं, परंतु मी त्यांना समजावून सांगितलं की आपण कमी संख्येनं गेलो तर गॉर्की कॉलनीचं नाव काही खराब होणार नाही. कुर्याझचा संबंध कर्मचारीवर्ग काढून टाकला असला तरीही एकंदर वातावरण आपल्या कमालीचं विरूद्ध आहे.

यावर स्मितहास्य करत कुडल्टी म्हणाला, ' अॅन्टन, तुम्ही १० किंवा २० जण आहात. पण यामुळे काही फारसा फरक पडणार नाही. तुम्ही फारसं काही करू शकणार नाही याबद्दल आमची खात्री आहे. जेव्हा आपण सगळे जण तेथे पोचू तेव्हाची गोष्ट निराळी. आपण त्यांना एकदम चकीत करून टाकू. ते ३०० जण आहेत ही गोष्ट तुम्ही विसरु नका. आपण आपली तयारी इथंच व्यवस्थितपणे करून घेतली पाहिजे. आपल्याला ३२० डुकरं बरोबर घ्यायची आहेत हे विसरू नका. याशिवाय दररोज आपल्याकडे नवीनवी भरती होते आहे. खार्कोव्हमधल्या लोकांची डोकी तरी फिरली असली पाहिजेत किंवा आपल्याला चिडविण्यासाठी म्हणून मुद्दाम लोक ही भरती करत असावेत.

नवीन करण्यात येणाऱ्या या भरतीमुळं मीसुद्धा थोडासा खचलो होतोच. त्या लोकांना आमच्या सामुदायिकाचा जोर जणू काही कमी करावयाचा होता. गॉर्की कॉलनीची शक्ती, स्वास्थ्य, लवचिकपणा, शुद्धता राखणं जास्तीत जास्त अवघड करून ठेवायचं होतं.

कुर्याझच्या वातावरणाशी कशा तऱ्हेनं सामना द्यावा याचा मी खूप विचार करून निर्णय घेतला होता. तो असा की कुर्याझमधल्या लोकांना सुरुवातीपासून यात घ्यायचं. थोडीही ढिलाई, विलंब किंवा उत्क्रांती किंवा मंदगतीनं सरमिसळ आमचा सर्व कार्यक्रम बिघडवून टाकील. याउलट कुर्याझमधील बेबंदशाही हळूहळू आमच्या परंपरा, आमची शिस्त, आमची निष्ठाही बिघडवून टाकील याचीही शक्यता होती. खार्कोव्हच्या या महंतांचा आग्रह होता की सावकाश एकमेकात मिसळण्यानं चांगल्या मुलांचा वाईट मुलांच्यावर प्रभाव पडून मी सुधारतात. परंतु माझी खात्री आहे की उत्तमातील उत्तम मुलंसुद्धा एखाद्या कमजोर सामुदायिकात एखाद्या गिधाडाप्रमाणे वर्तन करू शकतात. अर्थात मी आमच्या विद्वान शिक्षणाधिकाऱ्यांचं मत खोडून काढायच्या भानगडीत पडलो नाही. एकदम धडक द्यायची व मगच राहिलेलं हळूहळू बदलायला सुरुवात करायची. ही नवीन भरती माझ्या मार्गात अडचणी निर्माण करतील. आमचा कुडल्टी खरोखरच शहाणा. या नवीन रंगरूटांना कुर्याझला बदलून जाण्यापूर्वी फार काळजीपूर्वकपणे आमच्या बाकीच्या शिस्तीत बसवून घेतलंच पाहिजे हे त्याला समजलं पाहिजे.

या सर्व गोष्टींचा व्यवस्थित आढावा घेऊनच आमच्या हुशार, संमिश्र तुकडीला बरोबर घेऊन मी कुर्याझला जाण्यासाठी निघालो. कालिनासाहेबांनी

शेवटपर्यंत आमची व्यवस्था लावण्याच्या बाबतीत लक्ष घालायचं कबूल केलं असूनसुद्धा पुढे येऊ घातलेल्या विरहाच्या कल्पनेनं ते अगदी खचून गेले होते. गोंधळलेल्या मनस्थितीत ते मुलांच्यामध्ये वावरत. निरनिराळ्या कामाचा तपशीलवार आढावा घेत व परत ती विसरून जात. त्यांना हा जणू काही या वयात फार मोठा धक्का बसला होता. आमची मुलं कालिनासाहेबांनी दिलेल्या सूचना आदरपूर्वक घेऊन त्यांना 'हे ठीक आहे, हे बरोबर आहे' अशा तऱ्हेने उत्साहित उत्तरं देत किंवा माना डोलावत. परंतु त्याचवेळी त्या वृद्ध माणसाला वाईट वाटू न देण्याची खबरदारी घेत व नेमलेलं काम आपल्या मनाप्रमाणं करून टाकत.

आमच्या जुन्या कॉलनीमध्ये मी कोव्हलला आमच्या जेवणघराचा प्रमुख म्हणून ठेवलं होतं. ट्रेपकेवाडी लुनाचास्की कम्यून आमची उभी पिकं असलेली शेतं व चक्की ताब्यात घेणार होते. या सामुदायिकाचे प्रतिनिधी आमच्या गॉर्की कॉलनीच्या निरनिराळ्या भागात अधूनमधून डोकावून जात होते. या सामुदायिकाचा प्रमुख नेस्टेरेन्को नावाचा गृहस्थ आमच्या कोव्हलकडे एकसारखा संशयाने पहायचा. ओल्गा व्होरोनोव्हाला या नेस्टेरेन्को व कोव्हल यामधला लपंडावाचा प्रकार आवडत नव्हता. व नेस्टेरेन्कोला घालवून देण्याच्या ते प्रयत्न करत होते.

एके दिवशी ती नेस्टेरेन्कोला म्हणाली, 'बाबा रे, आमच्या कॉलनीत कोणी लुच्चे, भामटे नाहीत. तेव्हा तू वस्तू पळवल्या जाण्याची धास्ती बाळगू नकोस व मुकाट्यानं आपल्या घरी जा.' यावर नेस्टेरेन्को हसून चिडलेल्या कोव्हलकडे बघून धूर्तपणाने हसून म्हणाला.

'हा माणूस कोण आहे हे तुला माहित आहे काय? हा श्रीमंत शेतकरी आहे. त्याचं वर्तन अगदी श्रीमंत शेतकऱ्यासारखं आहे.'

आता मात्र कोव्हल भयंकरच चिडला होता. 'तुला काय वाटतं, आम्ही कष्ट करून उभी केलेली ही शेतं फुकटफाकट तुमच्या हातात द्यावी? या शेतावर आमच्या मुलांनी किती श्रम घेतले आहेत ते माहित आहे का? का म्हणून आम्ही तुम्हाला द्यायची? तुम्ही आमची वाडी देणार म्हणून? तुमची पोटं केवढी वाढलेली आहेत ती बघा. आणि उगाचच पैसे देऊ शकत नाही असा देखावा करता ते काही चालायचं नाही. तुम्हाला याचे पैसे बरोबर मोजलेच पाहिजेत.'

'पण तू जरा विचार कर. मी पैसा कुठून बाबा आणून देऊ?'

'मी त्याचा का म्हणून विचार करावा? आम्ही ज्यावेळी पेरणी केली त्यापूर्वी तुम्हाला विचारलं होतं, पेरणी करावी की नाही? तुम्ही त्यावेळेला मारे अगदी जोरात सांगितले, 'हो. करा, करा. पेरणी करा.' आता तुम्हाला पैसे द्यावेच लागतील. गहू, सातू व बीट या सर्वांचे पैसे दिलेच पाहिजेत.'

आपली मान एका बाजूला वळवून नेस्टेरेन्कोनं खिशातून तंबाखूची पिशवी काढली. त्याच्यात काहीतरी चाचपडायला सुरुवात केली. ओशाळलेलं हसू तोंडा-

वर आणून तो म्हणाला, 'खरं आहे ते, पेरणी करायला सांगितली होती हे खरं आहे. म्हणून काय त्याच्यावर केलेल्या श्रमाचे पैसे मागायचे. मुलांनी हे श्रम त्यांच्या सामुदायिकासाठी केले असं म्हटलं जातं.'

कोव्हल एकदम चिडून खुर्चीतून उठला व बाहेर जाण्यासाठी वळला. त्याचा राग अगदी अनावर झाला होता, 'आमच्या मुलांनी तुमच्यासारख्या आळशी व ऐतखाऊ लोकांसाठी काय म्हणून श्रम करावे ? काय तुम्ही आजारी आहात ? तुम्हाला काय धाड भरली आहे ? तुम्ही स्वतःचं सामुदायिक आहे असं म्हणता व मुलांनी केलेल्या श्रमावर फायदा उठवायला पहाता ? तुम्ही जर पैसे देणार नसलात तर मी हे सारं धान्य गोन्चारोवका गावातल्या लोकांना विकून टाकीन.'

ओल्गा व्होरोनोव्हा हिनं नेस्टेरेन्कोची काहीतरी समजूत काढून त्याला वाटेला लावलं. अर्धा एक तास बगीच्यामध्ये ती कोव्हलशी बोलत होती व त्याच्याशी समझोता घडवून आणायचा प्रयत्न करत होती. कॉलनी व लूनाचारस्की सामुदायिक या दोन्ही तिला सारख्याच आदरणीय होत्या. कुठच्याही स्त्रीचं मन अशा परिस्थितीत द्विधा होणं अगदी साहजिक होतं. कॉलनी ही तिला जणू काही आपल्या आईप्रमाणे होती. शेरेच्या हाताखाली काम करून शेतीकामाचा जो अनुभव तिनं मिळवला होता त्यामुळे तिला पुरुषवर्गावर एक फार मोठं स्थान सामुदायिकात मिळालं होतं व त्यातल्या स्त्री–घटकांच्यामध्ये अत्यंत हळुवारपणे वागून तिनं त्यांचे निरनिराळे प्रश्न सहानुभूतीपूर्वक सोडवायला मदत केल्यामुळे त्यांच्यातही ती प्रिय होती. निरनिराळ्या अडचणींच्या व प्रसंगांच्या वेळीं तिच्याजवळ तरुण मुलामुलींचं एक पथक त्या प्रसंगांना तोंड देण्यासाठी केव्हाही सज्ज केलेलं होतं. कारण त्या तरुण मुलामुलींच्यात तिला 'जोन ऑफ आर्क'सारखाच मान दिला जाई. तिनं स्वतःच्या विशुद्ध वागणुकीनं, चलाखपणानं, दुर्दम्य आशावादानं लहान–थोरांच्या मनात एक स्थान निर्माण करून ठेवलं होतं. तिच्याशी वाटाघाटी करत असताना कोव्हलनं आदरानं तिच्याकडे पाहिलं व ही आम्हीच घडविलेली आहे असा शेरा मारुन टाकला.

ओल्याला या मोठ्या देणगीमुळं लुनाचारस्की सामुदायिकाला गॉर्की कॉलनीकडून एवढं मोठं बक्षीस बहाल केल्यामुळं गॉर्की कॉलनीबद्दलचा तिचा अभिमान दुणावला. हे काही लहानसहान बक्षीस नव्हतं तर एक अतिशय शिस्तबद्ध वाडी. परंतु आमच्यावर मात्र हे बक्षीस म्हणजे एक संकटच होतं. शेतीकामामध्ये श्रमांचं व प्रयत्नांचं किती महत्व आहे हे दुसऱ्या कुठेही समजू शकत नाही. शेतातले तण काढणं, पिकांची बरोबर संगती लावणं, प्रत्येकवेळी सर्व साधनं व्यवस्थित आहेत की नाहीत, तो बरोबर उपयोगात आणली जातात की नाही, हे आमच्यापेक्षा दुसऱ्या कोणालाही माहिती नसेल. आणि खरोखुरी संपत्ती या झाडाझुडपांच्या मुळांमध्ये तसंच शास्त्रोक्त पद्धतीनं वाढविलेल्या निरनिराळ्या वाफ्यांमध्ये किंबहुना

साध्यासुध्या भासणाऱ्या वस्तूंमध्ये, उदा. चाकं, गाड्यांचे आस, आमच्या पवनचक्कीचे पंखे या सर्वांमध्ये जणूकाही भरून राहिलेली होती. आणि आता आमच्या या संपत्तीतला काही भाग सोडून द्यावा लागणार होता व काही भाग इथून उखडून काढून वाहून नेण्यासाठी गाड्यांमध्ये भरावा लागणार होता. शेरे इतका का भांबावून गेला होता ते कळायला फारशी काही अडचण नव्हती. त्याचं भांबावणं त्याच्या प्रत्येक हालचालीत दिसून येत होतं. जणू काही एखाद्या संकटालाच तो सामोरा जात होता.

शेरेच्या या उदासवाणेपणाचा आमच्या एडवर्ड निकोलाएविचवर फारसा परिणाम झाला नाही. तो आपल्या नेहमीच्या शांतपणानेच प्रवासात नेण्याच्या साऱ्या वस्तूंची जमवाजमव करत होता. कारण त्याला खार्कोव्हला जाणाऱ्या बिनीच्या तुकडीत जायचं होतं. त्याच्या खचलेल्या आकृतीचा विचार करण्याचं मी सोडूनच दिलं होतं. कारण तो एक सोडला तर आमच्या कॉलनीतली सारी मुलं दुसरीकडे जाण्याच्या विचारानं आनंदानं व उत्साहानं नाचत होती.

माझ्या आयुष्यातला सर्वात आनंदाचा क्षण निघून जात होता. आता कधी-कधी मला त्याची आठवण झाली की पश्चाताप होतो. परंतु त्यावेळी मी त्या गोष्टीचा फारसा मन लावून किंवा दीर्घकाळ विचार केला नाही. तसंच त्या पुढल्या गोष्टीकडे खंबीरपणे व स्थिरचित्तपणे माझ्या त्या आयुष्याचा ठामपणे विचार करण्याचं मनातही आणलं नाही. किंबहुना ते क्षण, त्या हालचालीतील ते शब्द त्यांचा प्रकाश, त्यांच्या ओळी, यांचे रंग लक्षात ठेवायचासुद्धा प्रयत्न केला नाही.

ही १२० मुलं म्हणजे एकेकाळी उनाड असलेली १२० पोरं नव्हेत तर त्यांना एक आसरा घर व भरपूर काम मिळालेलं होतं. एवढंच म्हणता येणार नाही तर ती १२० मुलं म्हणजेच नीतीनं जगण्याचा प्रयत्न करणारी, शेकडो शक्तींना अत्यंत सुलभपणे एकमेकांत गुंतविलेली अशी भक्कम शक्ती म्हणजेच जणू काही स्वयंनिर्णय घ्यायला पात्र असलेली, कुठल्याही संकटाला न डगमगणारी व आपत्तीला तोंड द्यायला आनंदाने सज्ज असावी अशी होती.

त्या दिवसात साधा सरळ चालणारा असा मुलगा आमच्या कॉलनीत सापडणं जरा कठीणच होतं. सर्वच मुलांना एका जागेवरून दुसऱ्या जागेवर पळतच जायची सवय लागली होती. चिमण्या किंवा पाखरांसारखे अतिशय कामात गर्क असलेले, तरीसुद्धा त्यांच्या हालचाली शिस्तबद्ध व रेखीव असायच्या. कित्येकदा माझ्या मनात पाखंडी विचार घोळत असत. खरोखर अतिशय आनंदी असणाऱ्या लोकांवर कोणत्याही तऱ्हेचं बंधन नसावं, याउलट त्या बंधनाची जागा अत्यंत आनंदी अशा नवमानवानं घ्यावी. ज्यामुळे इतरांना काय करावं, कसं करावं व का करावं याची जाणीव देता येईल.

अशा तऱ्हेने पुष्कळ वेळा घडत असे. पण मी आल्योशा व्होल्कोव्हच्या मोठ्या

आवाजामुळे असल्या बंडखोर विचारांच्या तंद्रीतून बाहेर येई. आल्योशा त्याच्या आवराआवरीनं डागाळलेला चेहरा एखाद्या चुकीच्या पद्धतीनं आवराआवर करत असलेल्या मुलावर ओरडत असे.

'अरे मूर्खा, तू हे काय करतोस ? त्या पेटीला कसले खिळे मारतोस ? तीन इंच लांबीचे खिळे काय फुकटात मिळतात असं वाटलं तुला?'

अशा तऱ्हेनं हटकल्यामुळे तो बिचारा मुलगा हिरमुसला होऊन, गोंधळून हातोडी आपल्या पायावर घासत बसे व विचारी,

'मग किती लांबीचे खिळे ठोकायचे ते तरी सांगा.'

आल्योशा उत्तर देई, 'अरे, आपण एकदा वापरलेले खिळे त्या पेटचा व खोकी बंद करण्यासाठी सहज वापरता येतात. पण तू मला आधी सांग, हे तीन इंची खिळे तुला कुठून मिळाले ?'

तो बिचारा मुलगा जणू आगीत होरपळून निघाल्यासारखा दिसे. व्होल्कोव्ह त्या मुलाला अगदी बोलून पुरेपुरेसे करी व तीन इंचाचे खिळे वापरले म्हणून हा मुलगा जणू काही कुठचंही जबाबदारीचं काम करायला लायक नाही अशी अवस्था करून टाकी.

शोकांत असाच हळूहळू जगात अवतरतो. अनेक लोकांना जुने खिळे म्हणजे काय हे खरोखरच समजत नाही. असले हे खिळे, जुनं लाकडी सामान, खोकी वगैरेतून मोठ्या मिनतवारीने उपटून काढलेले असतात. ते उपटले जाताना वाकडे तिकडे होतातच. त्यांना गंजही चढलेला असतो. त्यांचं डोकं बहुधा अर्धमुधं गेलेलंच असतं. तसंच त्यांचं टोकंही बोथट झालेलं असतं. कधीकधी हे खिळे नागमोडी ही झालेलेही आढळतात. असले हे खिळे जगातला कुठलाही लोहार तयार करु शकणार नाही. असले हे खिळे हातोडीनं ठोकून ठोकून सरळ करावे लागतात. बिचारा लोहार कित्येकदा असले हे वेडेवाकडे खिळे दुसऱ्या एखाद्या लोखंडी तुकड्यावर ठेवून व आपल्या चौड्यावर बसून खूप जोरजोराने ठोकत असतो व त्याचा आकार पूर्ववत करायचा प्रयत्न करत असतो. हेच ते जुने खिळे पुन्हा दुसऱ्यांदा उपयोगात आणले जातात त्यावेळी ते बरोबर वाकडे होतातच व योग्य जागा सोडून ते कुठेही घुसतात. म्हणूनच आमच्या कॉलनीतल्या मुलांना या जुन्या खिळ्यांचा तिटकारा असावा. आणि म्हणून नवीन खिळे वापरण्याचा त्यांना मोह होतो. कुठलीही नवी गोष्ट करताना जुन्यांचा वापर करावा की नाही अशी त्यांच्या मनात शंका उत्पन्न होते. कुठचीही नवी गोष्ट कमांडर कौन्सिलमध्ये चर्चिली जाते व आमच्या नव्या साहसावर पडदा पडण्याची भीती वाटते.

खिळ्यांचीच गोष्ट नव्हे तर आमची रंगहीन टेबलं, खुर्च्या, विचित्र बाकं, तसंच आमची वेडीवाकडी मेजं इ. इ. जुनी चाकं, मोच्याचं वाया गेलेलं सामान,

झिजलेल्या फाईली, फाटकीतुटकी पुस्तकं, अनेक वर्षे एके ठिकाणी राहिल्याने जुनी पुराणी झालेली अडगळ ही आमच्या अव्यक्त शिस्तबद्ध कार्याची साक्षच देत होती. त्या वस्तू फेकण्याचाही आम्हाला धीर होत नव्हता.

नवीन वस्तू यांच्याकडे बघायचा तर मला धीरच होत नव्हता. तरीही त्या अनोळखी आकृत्या माझ्या नजरेसमोरुन नकळत सरकत होत्या. या वस्तू इथंच सोडून जाणं हे शहाणपणाचं नव्हतं का ? एखाद्या मुलांच्या संस्थेला देऊन टाकणं जास्त शहाणपणाचं ठरलं असतं ? जणू काही एखादी डुकराची जोडी किंवा बटाटयाचं पोतं जसं लांच म्हणून देऊ त्याचप्रमाणे हेही देऊन टाकावं. मी वारंवार या वस्तूंचे माणसाच्या व समाजाच्या उपयोगाच्या दृष्टीने वर्गीकरण करत असे. आता तर माझे डोळे अगदी तयार झाले होते. कुठच्याही वस्तूच्या खाणाखुणा किंवा एखाद्या व्यक्तीचं बाह्यरुप, आवाज, चाल वगैरे वगैरे किंवा वास इत्यादी गोष्टीमुळे नजरेच्या एका कटाक्षात मी त्या वस्तूचं वर्गीकरण करु शकत असे. तसंच त्याचं काय रुपांतर करता येईल त्याचीही बरोबर कल्पना करत असे.

उदा. ओलेग ऑब्नेवला कुर्याझला नेणं कितपत योग्य होईल की त्याला मागेच ठेवावं ? काही झालं तरी त्याला सोडून द्यावं असं वाटत नव्हतं. ही व्यक्ती तशी दुर्मिळच परंतु चित्तवेधक नमुना. ओलेग हा एक साहसी व नखरेल प्रवासी, पूर्वीच्या नॉर्मन वंशातला, उंच, धिप्पाड असा होता. कदाचित त्याच्या काही पिढ्या रशियन बुद्धिमान लोकांच्याशी मिसळून गेल्या असाव्यात. त्याचं निदर्शक म्हणून त्याचं रुंद कपाळ तसंच रुंद जिवणी, चमकदार व आकर्षक डोळे हे होते. ओलेगनं पोस्टाच्या पैशाच्या व्यवहारात काहीतरी अफरातफर केल्यामुळं त्याला पोलिसांनी कॉलनीत आणून ठेवला होता. तो त्यांच्याबरोबर अगदी हसत खिदळत आला तसंच आपला भविष्यकाळ कसा जाणार आहे याबद्दलची उत्सुकताही त्याच्या चेहऱ्यावर दिसत होती. पोलिस त्याला ठेवून गेल्यानंतर ओलेगनं माझं म्हणणं अगदी लक्षपूर्वक ऐकून घेतलं. मोठ्या मुलांची ओळख करून दिल्याबद्दल आनंदही व्यक्त केला. लहान मुलांबद्दलही त्यानं उत्सुकता दाखविली. आमच्या आवाराच्या मधोमध तो उभा राहिला व इकडेतिकडे न्याहाळत हसत हसत म्हणाला,

'हा, हीच तर कॉलनी, म्हणजे मॅक्झिम गॉर्की कॉलनी. ठीक आहे. मला इथं रहायची सवय करायलाच हवी.'

त्याला आम्ही आठव्या तुकडीत घातला होता. आमच्या फ्रेडरेन्कोनं डोळे किलकिले करून जरा साशंकपणेच त्याच्याकडे पाहिलं व म्हणाला,

'तुम्ही काही कामगार वाटत नाही. खरं की नाही ? कारण तुमचं जाकिट हे काही कामगाराला शोभणारं नव्हे बरोबर ?'

ओलेगनं आपल्या ऐटदार जाकिटाकडे पाहिलं. एक कोपरा हातात धरून तो कमांडरच्या चेहऱ्याकडे औत्सुक्यानं बघत राहिला व म्हणाला,

'कॉम्रेड कमांडर, माझं जाकिट कामाच्या आड येणार नाही. तुम्हाला आवडलं असलं तर देऊ काय ?'

फ्रेडरेन्को एकदम मोठ्यानं हसला. त्याच्या तुकडीतल्या, म्हणजेच आठव्या तुकडीतल्या इतर पहिलवान मुलांनीही त्याच्या हास्यात आपला सूर मिळवला.

'ठीक आहे, तू म्हणतोच आहेस तर मी घालून बघतो.' फ्रेडरेन्को त्याला म्हणाला.

फ्रेडरेन्कोनं ओलेगचं ते जाकिट अंगात चढवलं व संध्याकाळपर्यंत घालून तो कॉलनीभर फिरला. फ्रेडरेन्कोच्या त्या ध्यानामुळे आमच्या कॉलनीतल्या मुलांना एक करमणूक झाली. संध्याकाळी फ्रेडरेन्कोनं ओलेगला त्याचं जाकिट परत केलं. व जरा कडक शब्दांतच सांगितलं.

'तुझं हे जाकिट गुंडाळून ठेव व कामाचे कपडे अंगात चढव. उद्या तुला सीड ड्रीलच्या पाठीमागे दिवसभर काम करायचंय.'

ओलेगने आश्चर्यानं कमांडरकडे पाहिलं. आपल्या जाकिटावर एक विचित्र नजर टाकली व विचारलं, 'अशा तऱ्हेचे कपडे इथे चालणार नाहीत असं तुमचं म्हणणं आहे काय ?'

दुसऱ्या दिवशी ओलेग साधा सदरा घालून कामावर आला. तो उपरोधिकपणे पुटपुटत होता, 'आता तू खरा कामगार झालास. तुला आता पडेल ते काम केलं पाहिजे. एकंदरीत हे सारंच नवीन आहे. तुला आता पेरणीच्या यंत्राच्या मागे जावयाचे आहे.'

या नवीन कामामध्ये ओलेगकडून बऱ्याचशा चुका झाल्या. पेरणीचं यंत्र काही कारणामुळं म्हणा, बरोबर चालत नव्हतं व बिचारा ओलेग रडवेला चेहरा करून यंत्रामागोमाग फरफटत जात होता. वाटेत येणाऱ्या मातीच्या ढेकळांवर अडखळत होता. व मधूनच पायात काटा मोडला तर एका पायावर उभा राहून नाचत तो काटा उपटून काढत होता. पेरणीच्या यंत्राच्या चाकाची पाती त्याला योग्य तशी फिरती ठेवता येत नव्हती. प्रत्येक दोनतीन मिनिटांनी तो तुकडीच्या प्रमुखाला केविलवाणेपणाने हाका मारत होता.

'अहो राव, तुमची ती जनावरं जरा बाजूला ठेवा. इथं हे चाक पुनः अडखळतंय पहा.'

फ्रडरेन्कोनं ओलेगकडून ते काम काढून घेतलं व दुसऱ्या पाळीत ढेकळं फोडायचं अवजार घेऊन यायला सांगितलं. अर्ध्याएक तासानं ओलेग फ्रेडरेन्कोकडे परत आला आणि अगदी समजावणीच्या सुरात सांगू लागला,

'कॉम्रेड कमांडर, काय झालं माहित आहे का ? ती मेरी घोडी खाली बसून राहिली.'

फ्रेडरेन्कोनं विचारलं, 'काय म्हणालास ?'

'माझी घोडी रे. कृपा करून प्रत्यक्ष येऊनच बघ. ती बसली आहे आणि हलतच नाही. तू जरा तिला समजावणीच्या गोष्टी सांग ना .'

फ्रेडरेन्को घाईघाईनं मेरी बसली होती तिथं गेला व ते पाहून चिडून ओरडला.

'अरे, तू काय करून ठेवलंस तुला काही कल्पना आहे का ? तू सगळा गोंधळ करून ठेवलास. हा दांडा इथे कसा आला ?'

ओलेगनं आपल्याकडून एखाद्या शेतकऱ्याच्या भावना हे पाहून काय होतील ते जाणण्याचा प्रयत्न केला. तो म्हणाला,

'काय झालं सांगू का ? काही माशा मेरीच्या भोवती घोंगावत त्रास देत होत्या. म्हणून ती खाली बसली. खरं म्हणजे तिनं काम करत राहिलं पाहिजे, नाही का ? बरोबर आहे ना मी म्हणतोय ते ?'

मेरी आपल्या दाण्याच्या खालून ओलेगकडे बघत होती. फ्रेडरेन्कोही खूप चिडला होता. तो रागारागानं म्हणाला, 'बसली म्हणे. घोडी कधी अशी बसेल का कधी ? तिला उभी कर पाहू.'

त्यावर ओलेगनं तिचा लगाम पकडला व 'चल, उठ' असं तिला जोरात म्हणाला.

ते पाहून फ्रेडरेन्कोही जोरात हसायला लागला. 'अरे, असा ओरडतोस काय तिच्या अंगावर ? चल उठ म्हणायला तू काय गाडी चालवणारा आहेस काय ?' यावर ओलेग परत म्हणाला,

'कॉम्रेड कमांडर, ... ...

त्याचं वाक्य पुरं व्हायच्या आतच फ्रेडरेन्को त्याला म्हणाला, 'तू काय सारखं सारखं कॉम्रेड कमांडर, कॉम्रेड कमांडर... ...लावलंयस.'

'मग मी तुला कोणत्या नावाने हाका मारू ?'

'अरे, पण मला नाव आहे की नाही ?'

'बरं, कॉम्रेड फ्रेडरेन्को, हे पहा, मी काही गाडी चालवणारा नाही हे अगदी खरं आहे. तसंच यापूर्वी कुठल्याही मेरीबरोबर माझी कधी दोस्ती नव्हती. अर्थात मेरी नावाची माझी दोस्त मुलगी होती. पण ते अगदीच निराळं. हे असे घोडे, घोड्याचा लगाम वगैरे गोष्टी माझ्या आयुष्यात कधीच आल्या नव्हत्या.'

थोडासा रागाने पण कसाबसा राग आवरून फ्रेडरेन्कोनं या नव्या वल्लीकडे पाहिलं. तो एका बाजूला तोंड करून थुंकला व ओलेगला म्हणाला,

'आता जरा त्या घोड्याला व्यवस्थित करण्याचं बघ.' संध्याकाळी फ्रेडरेन्कोनं हात झाडत अगदी सावकाश त्याच्या युक्रेनियन उच्चारात सांगितलं.

'याचा आपल्याला काय उपयोग आहे ? हा साला नुसता केक खाईल व पोरींशी गुलगुल गप्पा मारील. मला विचारलंत तर मी सांगेन की हा कुर्‍याझला नेण्याचा लायकीचा नाही.'

आठव्या तुकडीचा कमांडर माझ्या तोंडाकडे पहात होता. फ्रेडरेन्कोच्या बोलण्याला दुजोरा मिळण्याची तो माझ्याकडून अपेक्षा करत होता. मी पाहिलं की ही सर्व सूचना संपूर्ण आठव्या तुकडीकडून आलेली आहे. ही तुकडी त्यांच्या पक्क्या एकीबद्दल व त्यांच्या ठरलेल्या समजुतीबद्दल प्रसिद्ध आहे. प्रत्येक वेळी या तुकडीतील मुले दुसऱ्या तुकड्यांकडून तशाच अपेक्षा करत. हे सर्व ध्यानात घेऊन मी फ्रेडरेन्कोला ठामपणे म्हटलं,

'आपण ओलेगला कुर्याझला घेऊन जाणारच व तू तुझ्या तुकडीतल्या मुलांना एक गोष्ट समजावून दे. ओलेगला चांगला कामगार बनविणं हे आपलं अगदी कर्तव्य आहे. तुम्ही जर हे केलं नाहीत तर ते कोणीच करणार नाही व हे वेळेवर न केल्यानं ओलेग सोविएत सरकारचा कायमचा शत्रू बनेल. मी काय म्हणतोय ते तुझ्या लक्षात आलंय ना ?'

'तुम्ही काय म्हणताय ते माझ्या चांगलं लक्षात आलंय.' फ्रेडरेन्को म्हणाला.

'तसंच तू आपल्या तुकडीत ही मी सांगितलेली गोष्ट सर्वांनाच समजावून सांग.'

'ठीक आहे. आम्ही आपसात याची चर्चा करतो.' फ्रेडरेन्को म्हणाला.

त्यानं आपला एक हात डोक्याच्या मागं नेला, 'आम्ही स्लाव अडचणीत पडलो की अशा तऱ्हेची हाताची हालचाल करत असतो.'

'एकंदरीत ओलेग आमच्याबरोबर जाणार हे निश्चित झालं. तसंच उझीकोव्हचं काय करायचं ?' मी तर अगदी चिडून व खरं म्हणजे ठामपणे अर्कादी उझीकोव्हला कुर्याझला न्यायचंच नाही असा हुकूम केला होता. हा उझीकोव्ह माझा कोण लागत होता; खरा तर...? जाऊ द्या. दुसऱ्या एखाद्या धंद्यात किंवा कारखान्यात असल्या निरूपयोगी लोकांना केव्हाच टाकून देण्यात आलं असतं. किंवा त्याचं काय करायचं म्हणून अर्धा डझन समित्या नेमल्या असल्या, नवे नियम तयार केले गेले असते. अंतर्गत खात्याच्या कॉमिसारीएटला व त्यासारख्याच एखाद्या अधिकाऱ्याला अर्जविनंत्या केल्या असत्या. अगदी प्रावदामध्येसुद्धा लेख लिहून असली माणसं नेमणाऱ्या मध्यस्थांची कृत्यं उघडकीस आणण्याचा अवलंब केला असता. जुन्यापान्या बालड्यांमधून कुणी इंजिन बनवलंय का ? किंवा बटाट्यांच्या सालीपासून कधी मुरंब्याचे डबे तयार केले आहेत असं कधी ऐकलंय का ? पण माझ्याकडून मात्र इंजिनं किंवा मुरंबे तयार करण्याची अपेक्षा केली नसली तरी उझीकोव्हला एक उत्तम नागरिक बनवावं अशी अपेक्षा जरुर केली.

अर्कादी उझीकोव्ह यानं लहानपणापासून आत्तापर्यंत आपलं आयुष्य मोठ्या रस्त्यावर भटकण्यात घालविलं होतं. इतिहास व भूगोल याची अनेक पर्वं त्याच्या डोक्यावरून निघून गेली होती. त्याच्या वडिलांनी उझीकोव्हच्या लहानपणीच आपल्या कुटुंबाला सोडून देऊन कुठं पलायन केलं होतं व त्याच्या पित्याची

जागा कुठल्यातरी भाडोत्री माणसानं घेतली होती. हे सद्‌गृहस्थ डॉनकोन सरकारमध्ये म्हणे कोणीतरी हुद्देदार होते. डेनिकिन सरकार रशिया सोडून जेव्हा गेलं त्यावेळी हे महाशय आपल्या साऱ्या कुटुंबियांसमवेत त्यांच्याबरोबर परदेशी निघाले. दुर्दैवाने हे सर्व लोक जेरुसलेममध्ये अडकले. याच शहरात आपले आईवडील म्हणून जे कोणी होते ते अर्काडी उझीकोव्ह घालवून बसला. ही सर्व मंडळी–अर्कार्डीचे कुटुंबीय – एखाद्या रोगराईला बळी पडले नाहीत. परंतु माणुसकी नसलेल्या वातावरणात ते सापडले व अर्काडीला या जगात एकटाच सोडून मरुन गेले. बिचारा अर्काडी त्या अनोख्या वातावरणात – अरब व अल्प-संख्याक यांच्या तावडीत सापडला. या सर्व मधल्या वेळात उझीकोव्हचा खरा बाप एकाएकी उपटला. या गृहस्थांनी नवे जागतिक, आर्थिक धोरण याचा फायदा घेऊन कुठल्यातरी एका संस्थेचा सभासद म्हणून स्वतःला नोंदवून घेतलं. आपल्या मुलाच्या बाबतीतला त्यांचा दृष्टिकोनही बदलला. त्यांनी आपल्या या दुर्दैवी मुलाचा मोठ्या शिकस्तीनं शोध काढला. आंतरराष्ट्रीय परिस्थितीचा फायदा घेऊन आपल्या मुलाला आपल्याकडे पाठवावं अशी कारवाई केली. आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो असलेल्या अर्काडी ठिकाणावरुन एके दिवशी जहाजात बसवून देण्यात आलं व तो ओडेसा बंदरात उतरला. आता मात्र तो खराखुरा आपल्या पित्याच्या छत्राखाली आला. अशा तऱ्हेने दोन महिने कसेबसे गेले असतील तोच अर्काडी महाशयांनी आपल्या परदेशीय शिक्षणाचा व्यवस्थित उप-योग करून वडिलांना चांगलाच शह दिला. अर्काडीचं डोकं म्हणजे रशियन उदार स्वभाव व अरब कल्पनाशक्ती या दोहोंचा जणूकाही संगमच होतं. त्यामुळे छोट्या अर्काडींनी वडिलांना एकदम साफ करून टाकलं. अर्काडीनं घरातल्या छोट्यामोठ्या वस्तू उदा. घड्याळं, चांदीचे चमचे, काचेचे पेले, भारीपैकी कपडे तसंच किमती अलंकार, इतकंच काय तर फर्निचरलासुद्धा बाहेरची वाट दाखवली. इतकंही करून तो थांबला नाही तर अर्काडीनं आपल्या वडिलांचं चेकबुकही हाताळायला सुरुवात केली. तो अगदी सुंदर, वळणदार अक्षरात आपल्या वडिलां-सारखी हुबेहूब सही करत असे. ज्या हातांनी अर्काडीच्या वडिलांनी त्याला जवळ केलं होतं त्याच हातांनी त्याला दूर करण्याची तयारी त्यांनी करून टाकली. एक दिवस अर्काडीच्या वडिलांनी मला बोलावणं पाठवलं. हे गृहस्थ म्हणजे अगदी अस्सल युरोपीयन वागणुकीचे व शिस्तप्रिय असे दिसले. माझ्यासमोर बसून अर्काडीचा सबंध इतिहास त्यांनी मला ऐकवला व सद्‌गदीत होऊन मला सांगितलं की फक्त तुम्हीच माझा मुलगा सुधारु शकता.

हे बाळ माझ्या बाजूच्याच कोचावर आरामात बसलेलं होतं. त्याच्याकडे बघून मला अगदी मनस्वी राग आला होता. त्याला आपल्या कॉलनीत घ्यावे असं मला जराही वाटत नव्हतं. परंतु माझा अगदी नाइलाज झाला. कारण अर्काडीच्या

वडिलांनी एक कागद माझ्या हातात दिला. तो कागद पाहिल्यावर मला नाही म्हणणं अशक्यच होतं. आणि म्हणून असा हा अर्काडी उझीकोव्ह आमच्या कॉलनीत येऊन पडला.

तो चांगला उंच, सडपातळ असा होता. त्याचे जणू पारदर्शक कान त्याच्या चेहऱ्यावर व डोक्यावर उठून दिसत. त्याच्या फिक्या भिवया व थोड्या आठ्या असलेलं त्याचं कपाळ जणू काही त्याच्या नाकाबरोबर खाली ओघळतंय असा भास होई. त्याचं नाक म्हणजे त्याच्या इतर अवयवांच्या मनाने जरा जास्तच बेढब दिसे. अर्काडी सहसा आपल्या भिवयांच्या खालून आपले डोळे वरती लावून दुसऱ्याकडे बघत असे. या त्याच्या बघण्याच्या लकबीमुळे त्याच्याकडे पहाणाऱ्याच्या मनात अर्काडीबद्दल कमालीचा तिरस्कार वाटे. अर्काडीचे डोळे बिलकुल भावनाहीन व बथ्थड होते. या सगळ्यावर ताण म्हणजे त्याचं तोंड एखाद्या भुकेल्या कुत्र्याच्या तोंडासारखं नेहमी उघडं राही. असं एकंदर हे अर्काडीचं चित्र होतं.

मला असं वाटत होतं की आमची मुलं एखाद्या काळोख्या कोपऱ्यात नेऊन याला बडवून काढतील किंवा कुठेतरी त्याला धक्काबुक्की करतील. आपल्या डॉरमिटरीमध्ये कोणीही याला प्रवेश देणार नाहीत किंवा आपल्याबरोबर टेबलावर जेवायलाही घेणार नाहीत. चांगल्या मनुष्यस्वभावाला अनुसरून ही मुलं त्यांचा रागराग करतील. मी सर्व गोष्टींच्या माझ्या शैक्षणिक तंत्राच्या अभ्यासामुळेच माझ्या मनावर ताबा ठेवू शकत होतो

पहिल्या दिवसापासूनच उझीकोव्हनं त्याच्या सहपाठींच्या वस्तू चोरायला व व रात्री बिछाना ओला करायला सुरवात केली. मिटका झेवली कपाळाला आठ्या घालून माझ्याकडे आला व त्याच्या काळ्या भिवया आकुंचित करून म्हणाला,

'अँटन, असल्या मुलाला आपण आपल्या कॉलनीत प्रवेश कशासाठी दिला हे मला अगोदरच सांगा. हे पहा जेरूसलेम ते ओडेसा, ओडेसा ते खार्कोव्ह, खार्कोव्हहून आपल्याकडे या कॉलनीत व इथून आता कुर्याझला असं याला कशासाठी फिरवत बसायचं ? आपल्याकडे काय कमी विक्षिप्त मंडळी आहेत म्हणून याची आणखी भर ! मला याचं उत्तर सांगा.'

मी अगदी शांत बसून राहिलो. मिटका पण माझ्याकडून उत्तराची अपेक्षा करत तिष्ठत राहिला. गालातल्या गालात हसणाऱ्या लापोटकडे रागारागाने पहात तो पुन्हा बोलला,

'मी असला प्राणी अद्याप कधीही पाहिलेला नाही. आपण त्याला खरो खरीच काही कडू जहर डोस देऊ या किंवा भाकरीचा गोळा तयार करून त्यात पिना भरून तो त्याला खायला देऊ या. म्हणजेच तो वठणीवर येईल.'

'अरे तो ते खाणार नाही.' लापोट हसत म्हणाला.

'कोण ? उझीकोव्ह खाणार नाही ? ठीक आहे. मग तर आपण करूनच बघू या. गंमतीखातर तरी करूयाच. अरे, तो ते चावणारसुद्धा नाही. तर पट्कन गिळूनसुद्धा टाकील. तो किती खादाड आहे तुला माहीत आहे ना ? कसा हाव-रटासारखा खात असतो बकाबका. त्याच्या खाण्याची ती रीत पाहूनसुद्धा किळस वाटते. मला तर नुसत्या विचारानंसुद्धा घृणा वाटते.'

मिटकानं असं बोलून अंगावर शहारे आणले. लापोट त्याच्याकडे डोळे मोठे करून विजयाने पहात होता. मनातून मी खरं तर त्यांच्याच बाजूला होतो. मी स्वतःशीच विचार केला, 'काय करावं बरं. उझीकोव्हनं आपले कागद तर आणले आहेत.'

ते दोघेजण आमच्या झालेल्या बोलण्यावर विचार करत कोचावर बसले होते. इतक्यात वास्का अलेक्सेएव हसत हसत खोलीत डोकावत होता. त्याबरोबर मिटका त्याच्याकडे पाहून म्हणाला, 'अरे व्हास्का, आमचेकडे असल्या वल्ली तुम्हाला किती पाहिजेत तेवढ्या आहेत.'

वास्काला कशाबद्दल बोलणं चाललं होतं ते कळलंच नाही. तो एकदम लाजला व थोडासा रागावला पण. तो एकदम मिटका बसला होता त्याच्या पायावर धपकन बसला. व त्याच्या पायावर डोकं घुसळत त्यानं जोरानं निश्वास सोडला. त्या निश्वासात थोडा विशाद, थोडा राग व थोडं हसू या सर्वाचं मिश्रण झालं होतं.

वास्का अलेक्सेएव आमच्या कॉलनीमध्ये अगदी आपणहून आला होता. आयुष्यात भोगाव्या लागणाऱ्या निरनिराळ्या हालअपेष्टांमुळं तो आला तो अगदी डोळ्यात पाणी घेऊनच आला होता. एका पावसाळ्या दिवशी संध्याकाळी आमची कमांडर कौन्सिलची सभा चालू होती. त्यावेळी वास्का सरळ आमच्या पुढ्यात येऊन उभा राहिला. सुदैवाने त्या दिवसाची हवा वास्काला फार उप-युक्त ठरली. एखाद दुसऱ्या दिवशी तो आला असता तर कदाचित आम्ही त्याला आमच्या कॉलनीत प्रवेश दिला नसता. कमांडर कौन्सिलच्या संमिश्र तुकडीच्या एक रखवाली करणाऱ्या मुलानं त्याला माझ्या ऑफिसात आणून सोडलं व म्हणाला,

'ॲन्टन, हा मुलगा आपल्या गेटवर रडत उभा होता. बाहेर पाऊस चिकार पडतो आहे. याचं आपण काय करु या ?'

कमांडरच्या सभेमध्ये एकदम मध्येच व्यत्यय आला व सर्वजण या नवीन आलेल्या रडणाऱ्या मुलाकडे पाहू लागले. सर्वजण आपल्याकडे पहातायत असं पाहून व्हास्कानं सदऱ्याची बाही, बोटं, जाकिटाची कॉलर, डोक्यावरची टोपी या सर्वांचा उपयोग करून आपले डोळे कोरडे करण्याचा प्रयत्न केला. त्यानं चेहऱ्यावरचा भाव किंचित बदलून समोर बसलेल्या वाऱ्या लापोटकडे पाहिलं व हा त्या सभेचा मुख्य असला पाहिजे अशी अटकळ बांधली. व्हास्काचा चेहरा

गुबगुबीत असून आकर्षक होता. त्याच्या पायात साधेच बूट होते. त्याचं जाकिट मात्र त्याला बरंच तोकडं होत होतं. शिवाय ते अगदी जीर्ण झालेलं दिसत होतं. एकंदरीत त्याचं व्यक्तिमत्व उठून दिसणारं होतं. तो साधारण १३ वर्षांचा असावा.

'काय पाहिजे तुला ?' लापोटनं जरा दरडावून विचारलं. यावर नव्या पाहुण्यानं गंभीरपणे उत्तर दिलं की,

'मला कॉलनीत राहू द्या.'

'कशासाठी इथं रहायचंय ?'

'माझे वडील घर सोडून कुठेतरी निघून गेले व आई म्हणाली, तुला वाटेल तिकडे तू जा.'

'छट्, आई असं सांगणं शक्यच नाही.'

'हो. पण ती माझी खरी आई नाही हो.'

या उत्तरानं लापोटच्या मनस्थितीत चलबिचल झाली.

'थांब जरा, काय म्हणालास, ती तुझी खरी आई नाही ? पण वडिल तरी खरे आहेत ना ?तुझ्या वडिलांनी तुला घेऊन जावं. किंबहुना त्यांनी नेलंच पाहिजे. ते त्यांचं कर्तव्य आहे. समजलं ?

हे ऐकल्यावर त्या मुलाच्या डोळ्यात पाणी उभं राहिलं. त्यानं तितक्याच वेगानं डोळे साफ करण्याचा सपाटा लावला. एक निश्वास सोडून तो छोटा मुलगा घाबरत घाबरत म्हणाला,

'माझा बाप. तोसुद्धा माझा खरा बाप नव्हे. क्षणभर कमांडर कौन्सिलच्या सभेमध्ये एकदम शांतता झाली. लगेच मोठ्यानं हसण्याचा आवाज फुटला. आमचा लापोट इतका हसला, इतका हसला की त्याच्या डोळ्यातून शेवटी पाणी यायला लागलं. तो हसता हसता म्हणाला, 'अरे, बेटया, तू एकदम गोंधळलास. आता तुझी खरीखुरी हकीकत आम्हाला सांग पाहू.' ह्या आमच्या नव्या रंगरुटानं कोठल्याही तऱ्हेचा अवमान न करता लापोटच्या चेहऱ्यावर नजर रोखून आपली हकिगत सांगितली. त्याचं नाव वास्का असून त्याचं आडनाव अलेक्सेएव असं होतं. त्याचा खरा बाप टॅक्सी ड्रायव्हर असून तो बायकापोरं सोडून एक दिवस निघून गेला. त्यानंतर त्याच्या आईनं एका शिंप्याबरोबर लग्न केलं. थोड्याच दिवसांनी त्याची आई सारखी खोकू लागली. म्हणजे बहुधा तिला क्षयरोग झाला असावा. त्यातच ती मरण पावली. त्यानंतर त्या सावत्र बापाने कुठेतरी जाऊन दुसरं लग्न केलं. यंदाच्या ईस्टरमध्ये त्या माझ्या सावत्र बापानं कळवलं की आपण कधीही परत येणार नाही व मला स्वतःची सोय लावून घे असं पत्रात लिहिलं.

हे ऐकल्यावर आपल्याला याला घेतलं पाहिजे असं कुडल्टी म्हणाला, 'हो

पण हा खोटं कशावरून बोलत नसेल ? खरं सांग हा. खोटं बोलायला तुला कोणी शिकवलं ?'

वास्का म्हणाला, 'त्या तिकडे एक माणूस रहातो ना, त्यानं मला सांगितलं इथे खूपशी मुलं रहातात व शेती करतात. तूही त्यांच्यामध्ये जा. तुला ते ठेवून घेतील.'

म्हणून वास्का अलेक्सेएव अशा तऱ्हेने आमच्या कॉलनीत प्रविष्ट झाला. लवकरच तो आमच्या मुलांच्यात मिसळला व सर्वांचा आवडता झाला. वास्काला कुर्याझला न्यावं की नाही याबद्दल आमच्या खाजगी बैठकीत दुमत झालं नाही. कारण वास्काला कमांडर कौन्सिलनंच खुशीनं प्रवेश दिला होता व तो अगदी आमच्यातलाच एक समजला जात होता.

नवीन आलेल्यामध्ये मार्क स्काईनहौस व वेरा बेरेझोवस्काया हे होते.

मार्क याला ओडेसा येथील उन्मार्गी मुलांची व्यवस्था लावणाऱ्या समितीने आमच्याकडे पाठवला होता. तो चोरी करत होता, असं त्याने आणलेल्या कागदपत्रावर लिहिलं होतं. तो एका सैनिकाबरोबर आलेला होता. त्याला पहाताक्षणीच माझी खात्री झाली की ओडेसा समितीनं या मुलाच्या बाबतीत काहीतरी चूक केलेली आहे. त्याच्या डोळ्याकडे बघून त्यानं कधीकाळी चोरी केली असेल असा जराही भास होणं अशक्य होतं. असे डोळे रोजच्या आयुष्यात फार क्वचितच आढळतात. असे डोळे खरोखरी नेस्टेरो, कॉलब्राज, रायफल वगैरेसारख्याच चित्रकारांनाच लाभलेले असतात. आणि ते त्यांच्या साधुसंत किंवा निर्व्याज चेहऱ्यांच्या चित्रकृतीतून उमटलेलं असतं. एका ओडेसाच्या गरीब ज्यू मुलाच्या वाट्याला हे असे बोलके डोळे ही गोष्ट विश्वास ठेवण्यासारखीही वाटत नाही. मार्क अत्यंत दरिद्री अवस्थेत असला पाहिजे. त्याचं शरीर जेमतेम झाकलेलं होतं व त्याच्या पायात १७–१८ ठिकाणी भोकं पडलेली होती. त्याचा चेहरा मात्र अगदी स्वच्छव नितळ होता. त्याचे कुरळे केस अगदी छान विंचरून बसवलेले होते. त्याच्या पापणीचे केस अगदी कमालीचे दाट व लांब होते. उघडझाप करत असताना प्रत्येकवेळी डोळ्यातलं पाणी त्या निपटून काढत असल्या पाहिजेत.

त्याच्याकडे बघून मी विचारलं, 'तू चोरी करत होतास असं या कागदपत्रात लिहिलेलं आहे ते खरं आहे का?'

मार्कच्या त्या मोठ्या, काळ्याभोर, स्निग्ध व पाणीदार डोळ्यात एक चमक आली. त्यानं आपल्या पापण्या मोठ्या कष्टानं उचडून मान वरती करुन माझ्या चेहऱ्याकडे रोखून पाहिलं. तो म्हणाला,

'होय, ते खरं आहे, मी चोरी केलेली आहे.'

'तू भुकेसाठी चोरी केलीस का ?'

'नाही. मी भुकेपोटी चोरी केलीय असं म्हणता येणार नाही.'

मार्क त्याच स्निग्ध दृष्टीनं माझ्याकडे नजर लावून बसला होता. माझी मलाच लाज वाटली. थकल्या भागलेल्या या गरीब बिचाऱ्या पोराला प्रश्न विचारून मी उगीचच सतावत होतो. तोंडावर बळेबळेच हसू आणून मी म्हणालो,

'ठीक आहे. हे बघ, तुला तुझ्या भूतकाळाची आठवण देऊन मी सतावणार नाही. भले तू चोरी केली असलीस तर असलीस. अनेकदा माणसाला विचित्र गोष्टी कराव्या लागतात. पण जाऊ दे. ते सारं विसरुन जा. तू कधीकाळी शाळेत जात होतास काय ?'

'होय तर. माझं पाचवी इयत्तेपर्यंत शिक्षण झालेलं आहे व मला आणखी पुढे शिकायची इच्छा आहे.'

'वा उत्तम. तुला आम्ही तारानेटच्या ४ थ्या तुकडीत घालतो. ही चिठ्ठी घे आणि ४ थ्या तुकडी कमांडर तारानेट् याला शोधून काढ. तो तुझ्यासाठी सर्व काही करील.'

मार्कनं ती चिठ्ठी माझ्या हातातून घेतली, पण तो जागचा हलला नाही. तो टेबलाजवळ चुळबूळ करत तसाच उभा राहिला.

'कॉम्रेड डायरेक्टर, मला काहीतरी आपल्याला सांगायचंय. मला ते तुम्हाला सांगितलंच पाहिजे. सबंध वाटभर मी कसं सांगायचं त्याचा विचार करत आलो व ते सांगितल्याशिवाय मला आता रहावत नाही.'

मार्कनं आपले तेच स्निग्ध डोळे माझ्याकडे रोखले व तो अपेक्षेने पहात राहिला.

'तुला काय सांगायचं आहे ? तू अगदी बिनदिक्कत सांग. काहीही लपवून ठेवू नकोस. मी सर्व काही ऐकून घेईन.'

मार्क सांगू लागला, 'मी इथे येण्यापूर्वी एका कॉलनीत होतो. तिथे परिस्थिती वाईट होती असं म्हणता येणार नाही. परंतु माझं चारित्र्य मात्र तिथे घसरतंय असं मला वाटू लागलं. डेनिकीनच्या लोकांनी माझ्या बापाला मारून टाकलं. मी एक कोम्सोमोल आहे. असं असूनसुद्धा त्या अत्याचारानंतर माझं रक्त तापत नाही. उलट मी मवाळ होत चाललो आहे. असं होणं बरोबर नाही हे मला समजतंय. मला खरंखुरं बोल्शेविक व्यक्तित्व बाणवलं पाहिजे व त्याचमुळे मी फार दुःखी झालोय. मी जर तुम्हाला सर्व काही सांगितलं तर तुम्ही मला ओडेसाला पाठवणार नाही का ?' असं म्हणून मार्कनं त्याची तीव्र दृष्टी माझ्या चेहऱ्यावर रोखली.

'तू काहीही सांगितलंस तरी मी तुला आता तिकडे पाठवणार नाही' असं मी त्याला आश्वासन दिलं.

'कॉम्रेड डायरेक्टर, तुमच्या आश्वासनाबद्दल मी खरोखरच आभारी आहे. तुम्ही आश्वासन द्याल अशी मला खात्री वाटत होती. म्हणूनच मी इथे

येण्याचा पक्का विचार केला. त्याशिवाय 'न्यूझिया' वार्तापत्रात मी एक लेख वाचला होता. 'नव्या जगाचा नवा माणूस कुठे तयार होतो ?' असं त्या लेखाचं शीर्षक होतं. तो लेख तुमच्या याच कॉलनीबद्दल लिहिलेला होता. ते वाचल्यानंतर मला खरोखरी असं वाटलं की मी इथेच जायला पाहिजे. मला त्यांनी इथे पाठवावं म्हणून मी अनेकदा विनंती केली. माझ्या विनंतीचा काहीही उपयोग झाला नाही. उलट मला असं सांगितलं गेलं की, ती कॉलनी उन्मार्गी मुलांसाठी आहे. तू तिथे जाऊन काय करणार ? म्हणून मी मनाचा निश्चय केला व त्या कॉलनीतून पळालो. तिथून पळालो तो सरळ रस्त्यावरुन जाणाऱ्या एका ट्राममध्ये घुसलो. तुम्हाला कल्पना करता येणार नाही इतक्या झटपट साऱ्या घटना घडल्या. मी ट्राममध्ये शिरल्याबरोबर एका माणसाच्या खिशात सरळ हात घातला. क्षणार्धात मला कोणीतरी पकडलं व मला मारायला निघाला. परंतु त्यांनी तसं न करता मला सरळ नेऊन कमिशनपुढे उभे केले.'

'त्या कमिशनमधल्या लोकांनी तुझ्यावर ठेवलेल्या आरोपावर विश्वास ठेवला ?'

'हो. कारण ते सर्व लोक चांगले दिसले व ते न्यायनिवाडा करण्यासाठीच तर बसले होते. शिवाय माझ्या या कृत्याला भरपूर साक्षीपुरावा सुद्धा होता ना ? मला हवं होतं तसंच सर्वकाही घडलं. मी पूर्वीही चोऱ्या केल्या आहेत असं त्यांना सरळ सांगितलं.'

मी अगदी मनमोकळेपणे हसलो. कमिशनच्या या निर्णयाबद्दल मला जी शंका आली होती ती मार्कच्या निवेदनामुळे पक्कीच झाली. त्यानंतर मार्कला सांगितल्याप्रमाणे तो चवथ्या तुकडीत आपलं काम वगैरे समजावून घेण्यासाठी गेला.

बेरा बेरीझोवस्काया ही आणखी एक नवीन भरती. ते हिवाळ्याचे दिवस होते. मारिया कोंड्राटचेएवना बोकोवा बाईला पोचवायला जवळच्या रेल्वे स्टेशनवर गेलो होतो. कारण तिच्याबरोबर काही महत्वाचे कागदपत्र खार्कोव्हला पाठवण्यासाठी द्यायचे होते. मला मारियाबाई प्लॅटफॉर्मवर एका रेल्वे रखवालदाराबरोबर जोरजोराने बोलताना दिसली. त्या रेल्वे रखवालदाराने एका हाताने सुमारे १६ वर्षाच्या एका मुलीचा दंड धरलेला होता. त्या मुलीच्या पायात पायमोजे नव्हते तर नुसतेच पावसात वापरायचे रबरी बूट होते. तिने अंगात जुन्या पद्धतीचा अंगरखा घातलेला होता. बहुधा तिला एखाद्या कनवाळू म्हातारीने दिला असावा. त्या मुलीचं डोकं उघडंच होतं. तिचे केस एखाद्या घोंगडीप्रमाणे दिसत होते. बहुधा त्याला कित्येक दिवसात पाणी लागलेलं नसावं. एका बाजूला केसांची जाडशी बट तिच्या गालावर वळवळत होती. ती मुलगी धडपड करत आपला हात सोडवून घेण्याची खटपट करत होती. एकीकडे

ती हसत जणूकाही येणाऱ्या जाणाऱ्यांना भुलवायचा प्रयत्न करत होती. ती दिसायला खरोखरच चांगली होती. तिचे ते हसरे, पाणीदार डोळे खास रशियन –संकटात सापडलेल्या प्राण्याची जणू नजर–होते. त्या डोळ्यात एक प्रकारची सूक्ष्म असहायतेची झाक होती. तिचं हसणं हे दुसऱ्यांना आकर्षित करण्याचं एकच शस्त्र तिच्याजवळ असावं. ते तिचं कौशल्य होतं.

तो रखवालदार मारियाबाईंना उद्देशून म्हणाला, 'अहो, तुम्हाला मोठा कळवळा येत असेल पण या उनाड पोरांचा आम्हाला किती उपद्रव होतो याची तुम्हाला कल्पना नाही.'

तो त्या मुलीकडे वळून म्हणाला, 'तू मागच्या आठवड्यात याच गाडीमध्ये होतीस की नाही सांग व चिक्कार प्यालेली होतीस की नाही तेही कबूल कर.'

'मी प्यालेली होते ? काय बनवाबनवी करता राव ?' असं लटक्या रागानं त्या रखवालदाराकडे पहात ती म्हणाली. याचवेळी तिनं आपला हात त्याच्या हातातून सोडवून घेतला व तो आपल्या तोंडावर धरला.

'तुम्ही माझा हात सोडा पाहू.' असं पुन्हा एकदा ती त्याला म्हणाली.

ती २–३ पावले मागे सरकली व मोठ्यानं हसली. तो रखवालदार तिला पकडण्यासाठी तिच्याजवळ जात होता. भोवती जमा झालेला गर्दीची तिला काहीही पर्वा नसावी.

मारियाबाईनाच बहुधा या साऱ्या प्रकारची लाज वाटली व त्या शोधक दृष्टीनं इकडेतिकडे पहात होत्या. याचवेळी त्यांची दृष्टी माझ्यावर पडली. त्यांनी मला 'अॅन्टन, अॅन्टन, ' म्हणून हाका मारल्या व मला एका बाजूला घेऊन त्या म्हणाल्या, 'हे सर्व काही भयानक आहे. विचार करा की ही एक मुलगी आहे इतकंच नव्हे तर दिसायलाही सुंदर आहे. काहीही करुन हिला वाचवलंच पाहिजे.'

'मारियाबाई, मी काय करावं असं तुमचं म्हणणं आहे ?'

'काय ? भलताच सभ्यपणाचा आव आणू नका ? माझं म्हणणं तर ऐकून घ्याल ?'

'काही ऐकणार नाही. तुम्ही अगदी शिष्ट आहात. तुम्हाला म्हणजे फक्त तुमच्या फायद्याचं गणित समजतं. यामध्ये तुम्हाला काही रस नाही. मग तो रख-वालदार घेऊ दे हवा तसा फायदा. '

'माझं ऐका. ती चक्क एक वेश्या आहे. व तिला एखाद्या मुलांच्या सामुदा-यिकात नेणं कितपत योग्य ठरेल ?'

'तुमचे तर्कवितर्क थांबवा. तुम्ही नुसते मठ्ठ शिक्षणतज्ञ म्हणे. '

त्या अपमानकारक शब्दांची मला भयंकर चीड आणि व मी मारियाबाईंना तडकून उत्तर दिलं. 'ठीक आहे. मी तिला असाच कॉलनीत घेऊन जातो, झालं तुमचं समाधान ?'

लगेच मारियाबाईनी आपला नूर बदलला. माझ्या गळ्यात हात टाकून त्या मला म्हणाल्या, 'किती किती चांगला आहेस तू ? मी तुझे मनापासून आभार मानते.'

त्यानंतर ती त्या मुलीजवळ गेली व तिने तिच्या कानात काहीतरी सांगितलं. भोवती जमलेल्या गर्दीला उद्देशून तो रखवालदार म्हणाला,

'तुम्ही सारेजण काय बघताय इथे ? इथे काय सिनेमा चाललाय ? चालू लागा आपापल्या उद्योगाला. असं म्हणून बाजूला तोंड करुन तो थुंकला व खांदे उडवत दूर निघून गेला.

मारियाबाईनी त्या मुलीला धरून माझ्यासमोर आणली. ती मुलगी अजूनही हसतच होती. मारियाबाई म्हणाली, 'हे पहा, मी हिची ओळख करून देते. हिचं नाव व्हेरा बेरेझोवस्काया. ती तुमच्या कॉलनीत रहायला तयार आहे.'

व्हेराकडे वळून मारिया म्हणाली, 'हे तुझे कॉलनीचे प्रमुख. हे फार दयाळू अंतःकरणाचे आहेत. तू तिथे सुरक्षितपणे राहू शकशील.'

व्हेरानं माझ्याकडे पाहून हास्य केलं व म्हणाली, 'तुमच्याबरोबर जाण्याला माझी काहीही हरकत नाही.'

मी व मारियाबाईनी एकमेकांचा निरोप घेतला. मी माझ्या या नव्या रंगरूटाला बरोबर घेऊन आमच्या गाडीकडे आलो.

'तुला थंडी वाजेल. हे घोंगडं पांघरुन घे बरं.' असं म्हणून मी एक घोंगडं व्हेराकडे दिलं. तिनं ते पांघरुन घेतलं. ती आनंदी स्वरात म्हणाली,

'मी कॉलनीत काय करावं बरं ?'

'तुला शाळेला पाठवू; तसंच फावल्या वेळात तुला काही कामही शिकवू.'

व्हेरा बराच वेळ गप्प बसली. एकाएकी बायकांच्या ठराविक आवाजात तिनं मला उद्देशून म्हटलं, 'नाही बुवा. माझ्याच्यानं शिक्षण वगैरे होणार नाही हं ! तुम्ही मला ते सांगूही नका.' संध्याकाळ झाली होती व अंधार वाढत होता. हवा जरा ढगाळ व कुंदच होती. गाडी आता जरा घसरणीच्या वाटेवरून चालली होती. सोरोकानं आमचं बोलणं ऐकू नये अशी माझी इच्छा होती व म्हणून मी अगदी हळू आवाजात व्हेराला सांगितलं,

'आमच्या कॉलनीत सगळी मुलं व मुली शिक्षण घेतात.' व्हेरा माझ्याजवळ सरकून बसली व जरा मोठ्यानंच बोलली, 'अंधार वाढतच चाललाय. मला जरा भिती वाटतेय. तुम्ही मला कुठे घेऊन चाललात ?'

मुकाट्यानं बैस असं मी तिला जोरात सांगितलं. यावर ती जरा गप्प बसली. आम्ही आता कॉलनीजवळ येत होतो. सोरोका हळूहळू कुणाला तरी उद्देशून कुरकुरत होता. बहुधा हा अंधार कुणी व कशाला केला किंवा रानातल्या अरुंद रस्त्यांना उद्देशूनच तो चडफडत असावा.

'मी काही बोलू का ? तुम्हाला काही सांगू का ?' असं व्हेरा माझ्या कानात कुजबुजली.

'सांग काय सांगायचं ते' असं मी तिला म्हटलं.

'तुम्हाला माहीत आहे का ? अहो मी गरोदर आहे.'

मी जरा विचार करून मग बोललो, 'इथून जाण्यासाठी ही सारी बतावणी तर करत नाहीस ना ?'

'मुळीच नाही. मी खोटं कशाला बोलू ! शपथ मी सांगितलं ते खरं आहे.'

दूरवर कॉलनीचे दिवे दिसू लागले होते. आम्ही कुजबुजतच होतो.

'असू दे. हरकत नाही. आपण त्याची विल्हेवाट लावून टाकू.' असं मी धीर देत म्हटलं. 'पण किती महिने झाले आहेत ?'

'दोन महिने' असं ती म्हणाली.

'आपण त्याची विल्हेवाट लावून टाकू' असं मी तिला धीर देत म्हटलं.

'साऱ्यांना कळलं तर ते मला हसतील !'

'कोण हसतील ग ?'

'तुमची ती कॉलनीतली मुलं'

'कुणालाही कळणार नाही.'

'तुझ्या माझ्या शिवाय तिसऱ्या कुणालाही ते कळणार नाही असं मी आश्वासन देतो मग तर झालं.'

व्हेरानं यावर विचित्र हास्य केलं.

'ठीक आहे. तुम्ही म्हणताय तर !'

मी यावर काहीही बोललो नाही. आम्ही आता कॉलनीच्या रस्त्यावर आलो होतो. सोरोका गाडीतून उतरून घोड्यांच्या बाजूनं चालत होता. एकीकडे खुषीत शीळ घालत होता. व्हेरा एकदम माझ्या मांडीवर डोकं ठेवून स्फुंदून स्फुंदून रडू लागली.

'हिला रडायला काय झालं ?' सोरोकानं विचारलं.

'तिला बरं वाटत नाही.' मी उत्तर दिलं.

'नातेवाईकांची आठवण झाली असेल दुसरं काय ? या नातेवाईकांसारखं वाईट जगात काही नसेल.'

सोरोका परत चढून आपल्या जागेवर बसला व किंचितसा चाबकाचा फटका त्यानं मारला.

'कॉम्रेड मेरी, चटचट चल बरं हं ! आता ठीक आहे.' आम्ही कॉलनीच्या पटांगणात येऊन पोचलो.

तीन दिवसांनी मारिया कोंड्रोटयेवना खार्कोव्हहून परत आली. मी तिला व्हेरासंबंधी काहीच बोललो नाही. एक आठवड्याने आम्ही कॉलनीत जाहीर

केलं की व्हेराला काही पोटाचा (किडनीचा) त्रास असल्यामुळे तिला रुग्णालयात पाठवावी लागली. रुग्णालयातून परत आलेली व्हेरा दु:खीकष्टी व खचल्यासारखी दिसत होती. तिनं मला विचारलं, 'आता मी काय करावं असं तुमचं म्हणणं आहे?'

मी किंचित विचार केला आणि सरळ सांगितलं, 'आता तू खरं आयुष्य जगायला सुरुवात करायची.'

तिच्या बावरलेल्या भकास चेहऱ्यावरून मला वाटलं की, जगायची धडपड ही फारशी काही कठीण किंवा चमत्कारिक नसावी.

अशी ही व्हेरा. तिलाही आम्ही कुर्याझला घेऊन जायचं ठरवलंच होतं. अशा तऱ्हेनं सारेजण जाणार होतेच. नवीन भरती झालेले वीसजणही आमच्या बरोबरच जाणार होतेच. त्यांना शिक्षणखात्यानं माझी परिस्थिती लक्षात न घेता माझ्यावर जवळजवळ लादलेलंच होत. माझी अकरा तुकड्यांतली पहिली मुलं यांना घेऊनच मला कुर्याझला जायला मिळालं असतं तर किती छान झालं असतं. ही माझी मुलं शिस्तबद्ध तर होतीच पण गेली सहा वर्ष त्यांनी माझ्याबरोबर कमालीच्या कठीण परिस्थितीशी सामना दिला होता. त्यांचे विचार, अनुभव, ध्येय, रितीरिवाज यांत कमालीचा सारखेपणा होता. त्यांच्याबरोबर मला कोणच्याही तऱ्हेची भिती बाळगण्याचं कारण नव्हतं. याउलट ही नवी मुलं वरवर दिसायला आमच्या मूळच्या तुकड्यांमधून सामावली असली असं भासलं तरी मला त्यांची काळजीच वाटे. ती कुठेतरी भटकत व मला वारंवार अवस्थ करीत. त्यांचे नवशिके चेहरे कसेतरी चालत, काहीतरीच बोलत.

माझी अकरा तुकड्यांची मुलं अगदी पोलादी शिस्तीत वाढली होती. माझ्या या मुलांना कुर्याझमध्ये भलत्याच गोष्टींचा सामना करावा लागला तर त्यांना किती त्रास होईल? कल्पनाच करवेना. माझी संमिश्र तुकडी पुढे गेली. त्या दिवशी तर मला खरोखर त्याचं कसं होईल या काळजीनं कमालीचा खेद वाटत होता. संध्याकाळच्या गाडीने झुरिन्स्काया आली. तिनं मला ऑफिसात यायला सांगितलं व दार आतून घट्ट लावून घेतलं.

'अॅन्टन सेमियानोविच, मला खरोखर वाईट वाटलंय. अजूनही वेळ गेलेली नाही. त्या कुर्याझला जाण्याचं वेड डोक्यातून काढून टाका.'

'टचुबोवाबाई काही आकस्मित घडलं काय?' असं मी विचारलं.

'सांगते ऐका. काल मी कुर्याझला गेले होते. भयंकर परिस्थिती आहे तिथं. मला ते दृश्य बघवेनाच. मी स्वत: जेलमध्ये होते, शिवाय मी आघाडीवर लढलेही. पण मनाला अस्वस्थ करून टाकणारी इतकी भयंकर अवस्था मी कधी पाहिली नाही.'

'पण असं झालं तरी काय ते तर सांगाल?'

'मला काही वर्णन करताच येत नाही. कल्पना करा की तीनशे मुलं खाण्यापिण्याची सोय नसलेली, वैतागलेली व कमालीची आळसात लडबडलेली. ती

सगळी अवस्था अगदी पशुवत आहे. त्याला अराजकही म्हणता येणार नाही. दैन्य, घाण, दुर्गंधी यात अखंड बुडलेली अशी ती मुलं आहेत. तुम्ही तिथे जाऊ नये. आपण केलेला पहिला बेत साफ वेडेपणाचा होता असं मला वाटतंय ' असं त्यांनी एका दमात सारं वर्णन केलं.

' जरा दम खा. कुर्याझची जर अशी परिस्थिती असेल तर आपण अवश्य तिथे गेलंच पाहिजे. ते सुधारण्यासाठी प्रयत्न करणं आपलं कर्तव्यच आहे. '

ट्युबोवाबाईंनी निःश्वास सोडला. ' तुम्ही म्हणता ते खरं आहे. त्या संस्थेला वाऱ्यावर सोडून देऊ शकत नाही. पण त्यासाठी तुम्ही कष्ट घेऊन उभ्या केलेल्या या सामुदायिकाचा बळी द्यावा असं मला वाटत नाही. तुम्ही याची किंमत जाणताच. हे तुमचं सामुदायिक सांभाळलं पाहिजे, वाढवलं पाहिजे. या सामुदायिकाची घडी एखाद्याच्या लहरी खातर विस्कटावी असं मला वाटत नाही. '

' कुणाची लहर म्हणता ? '

' कुणाची लहर ते मला माहीत नाही. तुमच्या कर्तृत्वाबद्दल मला जराही संशय नाही की किंतु नाही. तुमची वृत्तीच फार वेगळी आहे. तुम्हाला सांगूनच टाकते की तुमच्या कल्पनेपेक्षा तुम्हाला शत्रू जास्त आहेत एवढं लक्षात ठेवा.'

' मग त्याचं काय ? '

' कुर्याझला जर तुम्ही अपयशी ठरलात तर त्या लोकांना फार फार आनंद होणार आहे.'

' होय बाई, मला याची पूर्ण जाणीव आहे. '

' मग आता कसं बोलतात. तेव्हा शांतपणे विचारांती आपण ही कल्पना सोडून द्यावी असं नाही का तुम्हाला वाटत ? अजूनही वेळ गेलेली नाही. हे मी तुम्हाला मघाशीच सांगितलं. '

ल्युबोवाबाईंच्या या सूचनेवर मी फक्त हसलो, त्यांना मी म्हटलं, ' तुम्ही तर आमच्या दोस्तच आहात. तुम्ही आमच्याबद्दल दाखविलेली आस्था आणि कळकळ याला फार मोठी किंमत आहे. पण माफ करा. तुमचे हे विचार म्हणजे आपल्या जुन्या शिक्षणतंत्रातल्या विचाराशी जुळतात की नाही.'

' मला काही समजतच नाही. '

' हे पहा, कुर्याझमध्ये जाऊन ते सुधारण्यासाठी अपार कष्ट करावे लागतील. हे खरं आहे. माझ्या शत्रूंना आनंद वाटेल किंवा नाही हा भाग सध्या बाजूला ठेवू. कष्ट करणं हे आपल्या सर्वांना जरुरीचं आहे. आमच्या कॉलनीतल्या प्रत्येक मुलाने कष्ट सोसलेच पाहिजेत. कष्ट सोसणंही महत्वाचंच आहे. तुम्ही जरा गॉर्की कॉलनीत फिरुन या व मुलांशी जरुर बोला. या घडीला माघार घेणं अगदीच अशक्य आहे.'

दुसऱ्या दिवशी पुढे जाणारी आमची संमिश्र तुकडी खार्कोव्हला रवाना झाली. ल्युबोवाबाई आमच्याच गाडीतून गेल्या.

# २

# ‘आमची पहिली संमिश्र तुकडी’

व्होल्कोव्ह हा आमच्या जाणाऱ्या पहिल्या तुकडीचा म्होरक्या होता. तो मितभाषी असून नाटकी आव आणणारा नव्हता. तो क्वचितच आपल्या चेहऱ्याचे भाव बदलत असे. असं असलं तरी कुठल्या लोकांशी आणि कुठल्या वेळेला कसं वागायचं ते त्याला बरोबर समजत असे. त्याच्या वागण्यात पक्का आत्मविश्वास असून त्याच्या बोलण्यात किंचित उपरोधाची धार असे. प्रत्येक स्वाभिमानी खेडवळ माणसात हे गुणधर्म प्रथमावस्थेत असतातच. ते एखाद्या सामुदायिकात राहिल्यानंतर, त्याला चांगला व्यवस्थित आकार दिल्यावर, त्याचं व्यक्तित्व उठून दिसतं. अशा तऱ्हेच्या म्होरक्याची धकाधकीच्या वातावरणात जरुरी असते. त्याचा धीटपणा व संयम हे गुण फार उपयोगी पडतात. व्होल्कोव्हने कुर्याझ आणि कुर्याझमधली मुलं कशी असतील याचा विचार करण्यात कधीच वेळ घालवला नाही. हे एक मला मोठं समाधान होतं. बाकीची मुलं एकसारखी निरनिराळे प्रश्न विचारुन भंडावून सोडत असत. त्या सर्वांना व्होल्कोव्ह निर्विकारपणे टोला मारी.

‘अरे पोरांनो, कुर्याझची मुलं कशी आहेत याचा तर्क करत बसू नका. ती सुद्धा हाडामासाची इतरांसारखीच माणसंच आहेत.’

पुढे जाणाऱ्या ह्या पहिल्या तुकडीची जुळवाजुळव करताना व्होल्कोव्हनं विचारपूर्वक सर्व गोष्टी केल्या. प्रत्येक मुलगा अगदी तोलून मापून घेतला व एखाद्याबद्दल शंका आली तर बेधडकपणे याला घेऊ नका, हा टिकाव धरणार नाही असं सांगायला तो कचरला नाही.

अशी ही पहिली संमिश्र तुकडी फार व्यवस्थित तयार झाली होती. त्यातला प्रत्येकजण कोम्सोमोलचा घटक होता. किंबहुना कॉलनीतल्या मुलांच्यात बिंबवलेल्या सगळ्या कल्पना व निरनिराळ्या कार्यक्षेत्रात त्यांनी संपादन केलेलं नैपुण्य अशाच मुलांची ही पहिली संमिश्र तुकडी बनविलेली होती.

१) व्हिट्का बोगोयावलेन्स्की–याला कमांडर कौन्सिलने नवीन नाव बहाल केलं होतं. कोणतं म्हणाल तर गॅरकोव्हस्की. हा गॅरकोव्हस्की सडपातळ व साधा पण फार हुशार. हा अगदी शिस्तबद्ध आणि कोणाचंही काम केव्हाही करायला तयार. त्याची प्रत्येक गोष्टीबद्दल काही ठाम मतं होती. तो दुसऱ्या माणसाची बरोबर पारख करत असे. गॅरकोव्हस्कीच्या बुद्धीचा आणखी एक पैलू म्हणजे तो कुठच्याही मुलाला बरोबर पारखत असे. त्याच्या एकंदर वागण्याचा अर्थ ठामपणे न चुकता लावत असे. त्याचबरोबर त्या मुलात असलेल्या उत्कृष्ट गुणांचा सामुदायिकासाठी कसा उपयोग करावयाचा याचा त्याला समज पडत असे. त्यामुळे सामुदायिकातल्या घटकाच्या वागण्याच्या सवयी, लकबी, फरक वगैरे गोष्टींचा तो तपशील लक्षात ठेवत असे.

२) मिटका झेलवी–आमचा जुनाच दोस्त. गॉर्कीचं तत्वज्ञान तंतोतंत आत्मसात केलेला व आचरणात आणणारा. मिट्काची वाढ अत्यंत चांगल्या तऱ्हेने झाली होती. तो अगदी उमदा व आकर्षक तरुण झाला होता. त्याचं ते व्यवस्थित असलेलं डोकं व काळेभोर पण किंचित तिरकस डोळे. आमच्या कॉलनीतली अनेक छोटी मुलं मिटकाच्या बोलण्याची सहीसही लकब उचलण्यासाठी धडपडत. त्याचे ते मोजकेच पण प्रभावी भाषण, व्यवस्थित व स्वच्छ कपडे, त्याचं चालणं, कॉलनीबद्दल वाटणारी अतीव निष्ठा या साऱ्याच गोष्टी इतर मुलांना आकर्षित करत. मिटकाच्या दृष्टीनं आम्ही कुर्याझला बदली करून जाणं याला फार मोठं राजकीय महत्व होतं. कुर्याझच्या मुलांना सुधारायची संधी आम्हाला मिळालेली आहे ही एक महत्वाची गोष्ट आहे. या कामामुळं आमची कीर्ति इतर ठिकाणी पसरेल व दुसऱ्या समजसत्तावादी देशातल्या लोकांना याचा खरोखर फायदा होईल.

३) मिखाईल ओवचारेन्को–हा काही तसा फार हुशार मुलगा नव्हता. परंतु तो काम चांगलं करी. अतिशय उत्साही व कॉलनीच्या कामामध्ये नेहमीच रस घेणारा. त्याला आम्ही मिशा म्हणत असू. मिशाचा भूतकाळ फार विक्षिप्त होता. व त्यालाही कधीकधी त्याची नीटशी संगती लावता येत नसे. आमच्या देशातल्या बहुतेक सगळ्या मोठ्या शहरातून मिशानं थोडा काळ तरी वास्तव्य केलं होतं. परंतु या सफरीचा त्याच्या ज्ञानात भर घालण्यासाठी काहीही उपयोग झालेला नव्हता. तो आल्या दिवसापासूनच कॉलनीवर खूप प्रेम करत असे व गेल्या सहा वर्षांच्या काळात कधीही काही तक्रार ऐकू आली नाही. मिशाला कुठलं काम कसं करावं ते सगळं माहित होतं. परंतु त्यानं कुठल्याच कामात कौशल्य मिळवलं नाही.

कुठच्याही वर्कशॉपमध्ये तो जास्त काळ राहिला नाही. हे सर्व जरी असलं तरी तो चांगल्यापैकी संघटनाचतुर होता. कुठल्याही तुकडीकडून बांधाबाधीचं किंवा ने–आण करण्याचं काम तो उत्तम प्रकारे करून घेई. कुठलंही काम तो अतिशय वेगाने संपवत असे. तो आपली काम व्यवस्थित वाटून देई व भराभर हुकूम सोडत असे. पण त्याच्या तुकडीतील मुलं कधीही रागावली नाहीत; कारण मिशाचा काम करता करता एकीकडे खूपसा विनोद चालत असे. मिशा तसा संबंध कॉलनीत अतिशय दांडगा व धिप्पाड होता. सिलँटीपेक्षाही तो जास्त दणकट होता. म्हणूनच व्होल्कोव्हनं या सगळ्या गोष्टी ध्यानात घेऊन मिशाला तुकडीचा प्रमुख म्हणून निवडलं असावं.

(४) डेनिस कुडल्टी : कुर्याझच्या मोहिमेच्या बाबतीत त्या मुलाचं व्यक्तिमत्व उठून दिसलं. कुडल्टी जेव्हा सभेत बोलायला उठे व एखाद्या मुलाचं नाव घेऊन बोले त्यावेळी त्या मुलाला जणू काही आपलं रक्त गोठतंय असा भास होई. एखाद्या दुर्वर्तनी मुलाच्या विरूद्ध बोलताना जणू काही तो त्याला अतिशय त्वेषानं व व्यवस्थितपणे धुळीला मिळवतोय असं वाटे. अशा मुलाबद्दलची फिर्याद तो इतक्या प्रभावीपणे मांडी की त्याला कॉलनीतून हाकलून देणंच योग्य आहे असं ऐकणाऱ्याचं ठाम मत होत असे. तो खरोखरच हुशार व स्पष्टवक्ता असल्यामुळे तो प्रखर टीका करत असे. आपली कॉलनी ही अतिशय उपयुक्त, चांगल्या तऱ्हेनं मजबूत पायावर उभी आहे यावर त्याचा अढळ विश्वास होता. कॉलनी म्हणजे जणूकाही तेलपाणी देऊन व्यवस्थित दुरुस्त केलेली गाडीच आहे. तिच्यात बसून मजेनं शेकडो मैल आरामात प्रवास करणं अतिशय सोपं आहे. तसा कुडल्टी एखाद्या मध्यम शेतकऱ्यासारखा दिसे. आमच्या कॉलनीच्या नाटकातून तो मध्यम शेतकऱ्याचेच काम करत असे. आमच्या कोम्सोमोल संघटनेचा हाच पहिला सूत्रधार व मेहनती कार्यकर्ता होता. तो खराखुरा गॉर्कीईट असून कधीही फुकट बडबड करत नसे. वक्त्यांची त्याला नावड होती. लांबलचक भाषण चाललं असेल तर त्याचं डोकं उठे.

(५) इवडोनेव – याला बनेल मुलांना ताळ्यावर आणण्यासाठी म्हणून मुद्दाम भरती केला होता. चांगल्यापैकी कोम्सोमोल (बालवीर) असून तसा आनंदी मित्रही होता. त्याचं बोलणं व एकंदर वागणं यावर अजूनही त्यानं पूर्वी रस्त्याच्या कडेला व सुधार वसतीगृहात घालविलेल्या आयुष्याची छाप दिसून येई. एखाद्या कसलेल्या नटाप्रमाणे जरूर त्यावेळी तो उपरोधिकही बोलू शकत असे.

(६) झोर्का व्होल्कोव्ह – हा कोम्सोमोल संघटनेत आमच्या कोव्हलचा अगदी उजवा हात. याला गंमतीनं राजकीय मुखत्यार म्हणत. आमच्या संमिश्र तुकड्यांची घटना त्यानंच बनविली होती. झोर्का जन्मतःच राजकारणात मुरलेला,

तापट, स्वयंसिद्ध व निग्रही होता. त्याच्याबद्दल बोलताना कोव्हल म्हणायचा की, झोर्का हा त्या मुलांची राजकीय नाडी ताळ्यावर आणी. कुर्याझची मुलं ही सध्या साम्राज्यशाहीच्या जोखडाखाली आहेत. त्यांना तो ताळ्यावर आणी. मारामारीचीच वेळ आली तर मागेपुढे पहाणार नाही. उलट चांगला धडा शिकवी.

(७, ८) टोस्का सोलोव्ह्योव व वान्या शेल्यापुतीन, हे दोघे आमच्या छोट्या मुलांचं प्रतिनिधित्व करत असत. दोघेहीजण अतिशय तरतरीत होते. टोस्काचे केस चांगले होते व वान्याचे केस पिंकट रंगाचे. दोघेही व्यवस्थित केस बसवत असत. टोस्का तसा दिसायला चांगल्यापैकी होता. वान्याचं नाक चपटं असून चेहरा गोलमहोल होता.

शेवटचा नववा म्हणजे आमचा कोस्टचा व्हेट्कोव्हस्की-कोस्टचा कॉलनीत परत आला तोही जरा विचित्र परिस्थितीतच. आम्ही कॉलनी सोडण्याच्या तीन दिवस आधी कोस्टचा कमालीचा कृश झालेला व ओशाळलेला असा दिसत होता. त्याचं मुलांनी जरा घुश्श्यातच स्वागत केलं. पहिल्या प्रथम लापोटने त्याला खिजवलं.

'काय रे, कॉकेशसमधल्या त्या ठिकाणाहून तू परत कसा आलास ? मला नेतोस का तिकडे ?'

कोस्टचा अगदी दीनवाणा हसला. 'नको रे बाबा, मी खूप पाहिलं.' यावर लापोट म्हणाला,

'काय रे, दुर्दैव नाही. ते कशासाठी तेथे आहे? त्याचा काय उपयोग आहे?'

व्होल्कोव्हनं कोस्टचाकडे जराशा तीक्ष्ण नजरेनं पाहिलं व त्याला विचारलं. 'तू अगदी निरनिराळ्या मजेदार गोष्टींवर ताव मारत होतास म्हणे.'

न घाबरता कोस्टचा म्हणाला, 'होय ते खरं आहे.'

'आज तुला कसली मेजवानी हवी आहे ?'

कोस्टचा मोठ्याने हसत हसत म्हणाला, 'हे बघ, मी कमांडर कौन्सिलच्या पुढे उभे रहाणार आहे. ते चांगल्या गोष्टी कशा आणखी चांगल्या बनवतात आणि वाईट गोष्टीही तितक्याच सहजतेने बनवतात हे तुला चांगलं माहित आहे.'

'हे बघ कोस्टचा, फालतु गोष्टीवर चर्चा करायला आम्हाला सध्या वेळ नाही. पण एक सांगतो. मी तुझ्यासाठी आघाडीच्या तुकडीत जागा ठेवली आहे. तुला यायचं असेल तर बघ. काय लापोट, मी म्हणतो ते बरोबर आहे ना ?'

त्यावर 'ही चांगली कल्पना आहे' असा लापोटनं शेरा मारला. 'अरे पण कौन्सिलपुढे उभं रहायचंय, त्याचं काय ?'

'हे बघ, सध्या आम्ही मार्शल लॉ पुकारलाय व म्हणून कौन्सिलपुढे न जाता गोष्टी मिटवून टाकायच्या असं आम्ही ठरवलेलं आहे.'

अशा रितीने काहीही कल्पना नसताना कोस्टचाची आघाडीच्या तुकडीत

भरती झाली. दुसऱ्याच दिवशी कोस्टया कॉलनीचा गणवेष घालून कॉलनीत वावरू लागला.

इव्हान डेनिसोविच किरगिझोव्ह या नावाचा शिक्षक आमच्याबरोबर आघाडीच्या तुकडीत सामील झाला. हा मनुष्य आम्ही इव्हान इव्हानोविचच्या जागी घेतला होता. पिरोगोवका येथील शिक्षणतंत्राच्या रगडयातून आम्ही त्याला खरोखरीच फूस लावली होती. एखाद्या नवख्या माणसाला इव्हान डेनिसोविच हा खेडवळ शिक्षक वाटला असता.. रशियन साहित्यात तो एक चांगल्यापैकी नायक म्हणून शोभला असता. तो ३० वर्षांचा असून उदार, हुशार, शांत व अतिशय कामसू होता. ही त्याची योग्यता रशियन भाषेतल्या कुठल्याही रहस्यमय पुस्तकात राजा किंवा कुठलाही नायक वा दुष्ट माणूस त्याच्यापुढे गर्व करू शकला नसता अशीच होती. अशी कोणतीही गोष्ट नव्हती की जी इव्हान डेनिसोविच करू शकत नसे. तो नेहमी काम करत असे व ते जरा निराळ्या तऱ्हेने. त्याच्यावर आणखीही काम लादलं तरी तो ते निपटून टाकील असं वाटे. जवळून पहाणाऱ्याला असं वाटे की त्याच्यावर आणखी काम टाकणं योग्य नाही. अनवधानानं तुमच्या तोंडून कामाबद्दल काही बोलणं होई. उदा. 'इव्हान, आपलं ते पदार्थविज्ञान शास्त्राचं सामान भरायचं राहिलंय हो.' इव्हान एखाद्या पेटीत पुस्तकं व वह्या भरण्यात गर्क झालेला असेल तर वरती बघून म्हणे, 'पदार्थविज्ञान शास्त्राचं सामान काय ? बरं, मी मुलांना हाताशी घेऊन ते भरुन टाकतो हं.' तुम्ही बाजूला गेल्यावर तुम्ही केलेल्या अन्यायाची तो जराही तक्रार करणार नाही. याउलट तो स्मितहास्य करून मुलांना सांगे,

'जा रे, आणखी मुलांना बोलावून आणा आणि आपण हे सामान भरून टाकू या.'

आम्ही सकाळी खार्कोव्हला येऊन पोचलो. युरियेव्ह हा समाजशिक्षण खात्याचा इन्स्पेक्टर. त्यानं हसतमुखानं येऊन आमचं स्वागत केलं. त्या दिवशी मे महिन्यातली सकाळ अगदी छान होती. मुलांच्या खांद्यावर थोपटत तो म्हणाला.

'हेच तुमचे गॉर्काईट्स काय ? छान. ल्युबोवाबाई पण इथे आहेतच. हे फार बरं झालं. माझ्याकडे एक मोटारगाडी आहे. आपण ल्युबोवाबाईंना घेऊन खालाबुडाकडे जाऊ या व तिथूनच कुर्याझला जाऊ. तुम्ही येणार ना ल्युबोवाबाई?'

'मुलांना आगगाडीनं रायझोव्हला पाठवू या. रायझोव्हच्या उपनगरी स्टेशनापासून आपलं जाण्याचं ठिकाण फक्त दोन कि. मी.चं अंतर आहे. थोडासा गवताळ प्रदेश ओलांडला की झालं. मला वाटतं, तुम्ही आधी खाऊन घेणार का ? नाहीतर आपण असं करू. कुर्याझला गेल्यावरच खाण्याचा कार्यक्रम करू.'

मुलं माझ्याकडे अतिशय उत्सुकतेनं पहात होती व संशयित नजरेनं युरियेव्हकडे पहात होती. काहीतरी धाडस करायला मिळणार म्हणून त्यांना फार

उत्साह वाटत होता आणि ते धाडस करण्याची संधी या माणसाकडून मिळणार आहे म्हणून युरियेव्हमध्ये त्यांना विशेष रस दिसला.

हे पहा कॉम्रेड, आमची ही संयुक्त आघाडीची तुकडी मोठी चलाख आहे' आपण जर गाडीनं जाणार असू तर आपल्या बरोबर त्यांनाही गाडीने येऊ द्या' मला वाटतं आपल्याला दोन गाड्या सहज मिळू शकतील.'

हे ऐकून युरियेव्हनं अक्षरशः आनंदानं उडीच मारली. 'फारच छान.' तो म्हणाला. 'या मुलांना बरोबर कसं वागायचं ते सर्व काही माहित आहे. मी आता असं करतो. समाजशिक्षण खात्याकडून एक गाडी भाड्यानं घेतो. त्यामध्ये ही मुलं बसून जातील आणि मीसुद्धा त्यांच्याबरोबर त्याच गाडीतून जायचं ठरवलंय.'

'मग चला तर' असं म्हणून व्होल्कोव्ह युरियेव्हकडे पाहून मनापासून हसला.

'उत्तम, उत्तम. आपण खरोखरच बरोबर जाऊ या. आधी आपण भाड्याने गाड्या आणू.'

व्होल्कोव्हनं टोस्काकडे बघून हुकूम दिला. 'तू त्यांच्याबरोबर गाड्या आणण्यासाठी जा.' टोस्कानं सलाम करून 'ठीक आहे' असं म्हटलं. हे सर्व पहात असताना युरियेव्ह अगदी भारावून गेला. तो अक्षरशः टोस्काचा हात धरून म्हणाला,

'मला खरोखर याची कल्पना नव्हती.'

युरियेव्ह जवळजवळ धावतच चौकाकडे निघाला. परंतु टोस्का मात्र आपल्या सैनिकी चालीप्रमाणे त्याच्यामागून जात होता. आपलं वैशिष्टय कुठल्याही परिस्थितीत सोडायला टोस्का तयार नव्हता. आमची मुलं एकमेकांकडे पाहून गालातल्या गालात हसत होती. गॉर्कोव्हस्कीनं हळूच विचारलं,

'हा विक्षिप्त माणूस कोण आहे?'

आमच्या तीन गाड्या एका तासाने कुर्याझच्या टेकडीची चढण मोडकळीस आलेल्या एका चर्चच्या भिंतीपाशी येऊन उभ्या राहिल्या. घाणेरड्या व विकृत दिसणाऱ्या काही आकृत्या रेंगाळत आमच्या गाडीच्या समोर येऊन थांबल्या. त्यांच्या फाटक्या विजारी जमिनीवर लोळत होत्या. व्यवस्थित कडक शिस्तीचे आमचे गॉर्काईट्स यांना बघून त्यांच्या तोंडावर कुठल्याही तऱ्हेची उत्सुकता दिसली नाही.

दोन शिक्षक एकमेकाकडे सूचक नजरेनं पहात व आमच्याबद्दल चेहऱ्यावर तुच्छता दाखवत आमच्याकडे आले.

'यांना कुठं ठेवायचं?' त्यांनी माझ्याकडे पहात विचारलं.

'आम्ही तुम्हाला शिक्षकांच्या खोलीत ठेवू. ही मुलं कुठल्यातरी डॉरमिटरीत आपल्याला सामावून घेतील.'

'हे बघा, त्यांची तुम्ही काळजी करू नका. तुमचे डायरेक्टर कुठे आहेत ते सांगा.'

डायरेक्टर महाशय शहरात गेले होते असं कळलं. परंतु कुणी तरी एक त्यातल्या त्यात श्रेष्ठ गणली जाणारी व्यक्ती आमच्यापुढे आली. त्यांनी फिक्कट राखाडी रंगाची विजार घातली होती व त्याच्यावर तेलकट डाग जागोजाग पडलेले दिसत होते. हे काम करावं लागण्याबद्दलची नापसंती त्या व्यक्तीच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसत होती. त्यांनी आम्हाला कॉलनी दाखवायचं कबूल केलं. मला आणि यूरियेव्हला तिथं काही नवीन बघायचं नव्हतंच व आम्हाला त्याच्यात काही अर्थही वाटत नव्हता. ल्युबोवाबाई चेहरा टाकून मुकाटयानं उभ्या होत्या. मुलं मात्र त्या वाटाडयाबरोबर कॉलनी बघण्यासाठी गेली. इव्हान डेनिसोविच पण त्यांच्यामागून हळहळू गेले.

खालाबुडा आपल्या काठीनं निरनिराळ्या दिशांकडे दाखवत कुर्याझमध्ये एकेकाळी असलेल्या संपन्नतेबद्दल सांगत होता. व आता कशी दशा झाली त्याबद्दलही बोलत होता. एकाएकी आमच्या संमिश्र तुकडीची मुलं धावतपळत आमच्याकडे आली. त्यांचे चेहरे अगदी गोंधळलेले दिसत होते. या सगळ्या गोंधळाला आपण कशी शिस्त लावू असंच जणू कुडल्टीच्या चेहऱ्यावरचा भाव दर्शवित होता. मिटका झ्वेल्वी तर कमालीचा चिडलेला दिसत होता. त्याने दोन्ही हात खिशात घातले होते व तो अस्वस्थपणे बघत होता. ही त्याची अवस्था ल्युबोवाबाईंच्या नजरेतून सुटली नाही. 'ही जागा तुम्हाला आवडली नाही होय ना ?' असं त्यांनी मुलांना उद्देशून विचारलं.

मिटकानं काहीच उत्तर दिलं नाही. पण व्होल्कोव्ह मात्र मोठ्यानं हसला व म्हणाला, 'आम्हाला यांना टाळ्यावर आणण्यासाठी चौदावं रत्नंच दाखवावं लागेल.'

'म्हणजे तू म्हणतोयस तरी काय ?' असं घाबऱ्या घुबऱ्या ल्युबोवाबाईंनी विचारलं.

'अहो, आम्हाला यांना कसंही करून शिस्त लावावीच लागेल.' एकाएकी त्याने एका हडकुळ्या मुलाची कॉलर पकडली व त्याला ल्युबोवाबाईंकडे आणन उभा केला. त्या मुलांच्या पायात काही नव्हतं. डोक्यावरही काही नव्हतं. त्यानं एक फाटकी विजार व तसाच फाटका कुडता घातला होता. त्याच्याकडे बघत व्होल्कोव्ह बाईंना म्हणाला, 'याचे कान बघितलेत का तुम्ही ?'

तो मुलगा निमूटपणाने मान फिरवून गेला. त्याचे कान घाणीने नुसते काळेकुट्ट झाले नव्हते तर ती घाण साठून त्याचे थर जमले होते व ते उन्हात चांगलेच चकाकत होते. शिवाय ओरखडयांनी आलेलं रक्त त्यात मिसळून तेही विचित्र दिसत होतं. हे ओरखडे थोडेबहुत बरे झाल्यासारखे असावेत.

'अरे, तुझ्या कानांना काय झालंय ?' त्याला ल्युबोवाबाईंनी विचारलं.

तो मुलगा विचित्रपणाने हसला. त्यानं एका पायाने आपला दुसरा पाय खाजवायला सुरुवात केली. त्याचे पायही इतके घाणेरडे होते, जणू काही ते त्याच्या घाणेरड्या कानांशी स्पर्धाच करायला निघाले असावेत.

'अहो, ही खरुज आहे.' मुलानं अडखळत सांगितलं.

'अरे, तू या खरजेमुळे मरशील. तुला भीती नाही का वाटत?' टोस्कानं विचारलं.

'त्यात काय घाबरायचंय. आमच्यातल्या कित्येक मुलांना माझ्यापेक्षाही जास्त खरुज झालेली आहे. त्यातलं कोणीही दगावलेलं आतापर्यंत मी ऐकलेलं नाही.'

इकडे तिकडे, सबंध आवारात फारशी मुलं कुठं दिसली नाहीत. क्लबमध्ये व क्लबला जाणाऱ्या जिन्यावर खूप घाण पडलेली होती. काही दुःखीकष्टी चेहऱ्याची मुलं वाटेवर फिरताना दिसत होती. सगळ्या डॉरमिटरी घाणीनं व दुर्गंधीनं भरुन गेलेल्या होत्या. तिथे सूर्यप्रकाश जराही दिसत नव्हता. खिडक्यांच्या, तावदानांच्या काचा नावालासुद्धा शिल्लक नव्हत्या.

'सगळी मुलं गेली कुठे?' असं मी विचारलं.

यावर मघाशी दोन शिक्षकांपैकी एकजण माझ्याकडे वळला व रागारागानेच म्हणाला,

'हा कसला तुमचा प्रश्न?'

एक गोल चेहऱ्याचा साधारण १५ वर्षांचा मुलगा आमच्या मागोमाग येत होता. मी त्याला सहज विचारलं,

'काय रे, तुमचं इथलं आयुष्य कसं काय आहे?'

'आमचं आयुष्य काय विचारता? याला काय तुम्ही जगणं म्हणता का? याला काही आयुष्य म्हणता येणार नाही. पण थोड्याच दिवसात सर्व काही सुधारेल असं सगळेजण म्हणतात.'

'असं कोण म्हणतं रे?

'सगळीच मुलं असं म्हणतात हो.' असं तो म्हणाला, 'ते म्हणतात की लवकरच चांगली सुधारणा होईल. परंतु त्यासाठी आम्हाला मारही खावा लागेल.'

'मार खावा लागेल? तो कशासाठी?'

'होय हो. ते चोरांना बडवतातच ना? आणि इथे तर चोर चिकार आहेत.'

'पण मला असं सांग की, तू कधी तोंड धूत नाहीस का. आंघोळ करत नाहीस का?'

'अहो, आम्ही कशी आंघोळ करणार.? इथे मुळी पाणीच नाही. पाणी काढायचा पंप कधीच मोडून गेलाय. शिवाय आमच्याकडे साबणही नाही. पुसायला टॉवेलही नाही.'

'या साध्या साध्या गरजेच्या वस्तुसुद्धा तुमचे अधिकारी तुम्हाला देत नाहीत का ?'

'देत असत. पूर्वी देत असत. पण इथे सारं काही चोरीला जातं. इथे आता चोऱ्या होऊन होऊन भांडारात काही शिल्लक राहिलेलं नाही.'

'हे असं कसं झालं ?'

'एका रात्री कोठी फोडली गेली. कुलुपं तोडून टाकली व सगळं इथून वाहून नेण्यात आलं. डायरेक्टरांनी अद्दल घडवीन अशी धमकी दिली.'

'मग त्यांनी काय केलं ?'

'काही नाही. नुसती शिक्षा देईन असं ते बोलत व मुलं 'देऊन तर बघा' अशी उलट धमकी देत. याउलट त्यांनी लष्करालाच बोलावलं.'

'बरं, लष्कराच्या लोकांनी येऊन काय केलं ?'

'मला काहीच माहीत नाही.'

'तू चोरी केलीस का ?'

'नाही हो, मी कधीच नाही केली. मला खरं तर दोन विजारी काढायच्या होत्या. पण मी गेलो त्यावेळेस बरीच मोठी मुलं आतमध्ये होती. माझ्या हाती फक्त जमिनीवर पडलेल्या दोन किल्ल्या मिळाल्या.

'हे सारं केव्हा घडलं रे ?'

'मागच्या हिवाळ्यात.'

'बरं, तुझं नाव काय, सांग बघू ?'

'प्योटोर मालिकोव्ह माझं नाव.'

आम्ही शाळेच्या बाजूला वळलो. यूरियेव्ह आमचं संभाषण मुकाट्यानं ऐकत होता. खाऊबुडा हळूहळू आमच्या मागून येत होता. त्याला आमच्या सगळ्या मुलांनी घेरले होते. आमच्या मुलांना एकदर नवीन व्यक्तींबद्दल नेहमीच कुतूहल वाटत असे. खालबुडाची दाढी हवेत उडत होती. त्याच्या पाठीमागून त्याची काठी पण त्याच्याबरोबर फरपटत येत होती.

आम्ही शाळेच्या इमारतीत शिरलो. ही इमारत पूर्वी भिक्षूंचं वसतीगृह म्हणून वापरली जाई. 'चिल्ड्रेन्स एड कमिटी'ने ती व्यवस्थित बांधून घेतली. सबंध कॉलनीत ही एकच इमारत डॉरमिटरीशिवाय होती. या इमारतीला लांबलचक सज्जा असून त्याच्या दोन्ही बाजूना चिचोळे वर्ग काढलेले होते. ही शाळेची इमारत इथे का बांधली असावी बरं ? या खोल्या खरं तर डॉरमिटरीसारख्याच उपयोगात आणण्याच्या होत्या.

एका वर्गात भिंतीवर काही पत्रिका चिकटवलेल्या होत्या. त्या पत्रिकांवर वेडीवाकडी चित्रं काढलेली होती. हा पायोनियरचा कोपरा म्हणून आम्हाला दाखविण्यात आला.

खरं तर हा वर्ग व त्याची भित पाहुण्यांना व इन्स्पेक्टरना दाखविण्यासाठीच केलेली होती. हा सगळा निव्वळ देखावा होता. असं वाटायचं कारण असं की हा पायोनियरचा कोपरा दाखविण्यासाठी आम्हाला नेलं होतं, परंतु त्याची चावी अर्ध्या तासाने कशीबशी सापडली. आम्ही एका बाकावर विश्रांती घेण्यासाठी बसलो. माझी मुलंपण आता जरा शांत झाली होती. व्हिटका माझ्या कानाजवळ येऊन कुजबुजला.

'अँटन, आपण सर्वजण याच खोलीत झोपू या. त्यांचे बिछाने आपल्याला मुळीच नकोत. कारण सांगू का ? त्याच्यात खूप उवा पडलेल्या आहेत.'

झ्वेल्वी पण दुसऱ्या बाजूने माझ्या कानाशी लागला. 'अँटन, काही काही मुलं खरोखरच चांगली आहेत हं. पण हे त्यांच्या शिक्षकांचा इतका द्वेष करतात. त्यांना आपण काम करायला लावायचं असलं तर... ...'

'तर काय म्हणतोस ?'

'तर आपल्याला खूप आरडाओरडा करायला हवा.'

अजून कुर्याझचा ताबा घेण्याच्या हुकुमाबद्दल चर्चा व्हायची होती. डायरेक्टरसाहेब एकदाचे शहरातून परत आले. त्याच्याकडे बघून मला असं वाटलं की, याच्या अंगात रक्तचं नसावं व त्यामुळे काही ताकदच नसावी. मला तर त्याची कीवच आली. त्याला काही शिक्षा करावी असं मला काही वाटेना. कोणी या असल्या भुक्कड माणसाला डायरेक्टर म्हणून नेमलं असेल ?

डायरेक्टरसाहेबांनी एकदम चढाईचा पवित्रा घेतला. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे ताबडतोब हस्तांतराचं काम करून टाकावं. कमी जास्त काही झाल्यास त्याची जबाबदारी आपण घेणार नाही.

यूरियेव्हनं विचारलं, 'काय हो महाशय, तुमची जबाबदारी नाही याचा अर्थ काय ?'

'अगदी सरळ आहे. मुलं इतक्या भयानक अवस्थेत आहेत की त्यांच्याकडून काहीही घडू शकतं. तुम्हाला माहित आहे का ? त्यांच्याजवळ पिस्तुलंसुद्धा आहेत.'

'मुलांची मनस्थिती अशी असण्याचं कारण काय बरं ? हे तुमच्याच कर्तृत्वाचे प्रताप आहेत ना ?'

'माझ्या कर्तृत्वाचे प्रताप ? काय चाललंय त्याची मुलांना चांगली कल्पना आहे बरं का हो ! तुम्ही समजत असाल त्यांना काही माहित नाही म्हणून. पण त्यांना सारं काही माहित आहे.'

'त्यांना काय काय माहित आहे सांगा पाहू......'

'आपल्यापुढे काय वाढून ठेवलंय याची त्यांना चांगली कल्पना आहे.' असं म्हणून डायरेक्टर महाशय खिडकीकडे पळाले व वाकून खाली पाहू लागले. जणू त्यांना सुचवायचं होतं की आमचं येणं इथल्या कॉलनीतल्या मुलांना पसंत नाही.

मिटका परत माझ्या कानात कुजबुजला, 'काय जंगली माणूस आहे हो हा !'

मी मिटकाला जरा गप्प बसायला सांगितलं व डायरेक्टरकडे वळून म्हणालो,

'जे काही घडेल त्याला उत्तर द्यायची जबाबदारी तुमचीच आहे बरं का ? ते आज घडो किंवा आम्ही कॉलनी ताब्यात घेतल्यानंतर घडो. ही जबाबदारी तुम्हाला बिलकुल टाळता येणार नाही. तेव्हा आता चर्चा करण्यात वेळ न घालवता लवकरात लवकर तुम्ही आपला गाशा गुंडाळावा अशी मी आपल्याला विनंती करतो.'

थोड्याशा चर्चेनंतर असं ठरलं की हस्तांतराचं काम दुसऱ्या दिवशी दोन वाजता व्हावं. तिथे एकूण ४० शिक्षक होते. त्यांना ताबडतोब काढून टाकावं. त्यांनी त्यांना रहायला दिलेल्या जागा तीन दिवसात खाली करून द्याव्यात. त्यांची बिऱ्हाडं इथून हलवण्यासाठी जास्तीत जास्त पाच दिवसांची मुदत दिली जावी.

'तुमची ती शिक्षकमंडळी केव्हा येणार आहेत ?' असं डायरेक्टरांनी विचारलं.

'तुमचा भांडाररक्षक (कोठीवान) इकडे केव्हा येईल ?'

'आमच्याकडे असा भांडाररक्षक वगैरे कोणी नाही. माझ्या या मुलांपैकीच एकजण असलेल्या वस्तूंच्या याद्या व वस्तू ताब्यात घेईल.'

'मी तुमच्या मुलाबिलांच्या ताब्यात काहीही देणार नाही.' असं डायरेक्टर उसळून म्हणाले.

आता मात्र मला त्याच्या सगळ्या भोंदूगिरीचा राग आला. वास्तविक ताब्यात देण्यासारखं यांच्याजवळ होतं तरी काय ? मी त्याला म्हटलं.

'हे बघा, हे असल्या कायदेबाजीच्या तत्वाला मी किंमत देत नाही. आजपासून तिसऱ्या दिवसाच्या अखेरीला तुमच्यापैकी एकही जण या परिसरात रहाता कामा नये.'

'का ? आम्ही तुमच्या मधे येऊ अशी भीती वाटते काय ?'

'होय, अगदी बरोबर बोललात.'

यामुळे डायरेक्टरसाहेबांचा अपमान झाला. ते रागारागाने उठून दरवाजाकडे गेले. त्यांच्यामागोमाग त्यांचे सारे शिक्षकही गेले. जाताजाता उभं राहून डायरेक्टरनी एक शेवटचा टोला हाणला,

'आम्ही तुमच्यामध्ये बिलकुल येणार नाही समजलात. दुसरे उपटसुंभ मात्र तुमच्यामध्ये येतील.'

आमची सगळी मुलं जोरात हसली.

ल्यूबोवाबाईनी दीर्घ निःश्वास सोडला. यूरियेव्हनं खिडकीच्या बाहेर डोकं

काढून काहीतरी पहाण्याचा बहाणा केला. हेतू हा की त्यांना वाटणारा संकोच दिसू नये. खालाबुडा भिंतीवरच्या पत्रिकांकडे निर्विकार चेहऱ्याने पहात होता.

यूरियेव्ह म्हणाला, 'मला वाटतं आता आपण निघू या. आपण परत उद्या येऊच. तुमचं काय म्हणणं आहे ल्यूबोवाबाई ?'

ल्यूबोवानं माझ्याकडे अगदी करून दृष्टीनं पाहिलं.

'तुम्ही कृपा करून उद्या येऊ नका.' असं मी तिला सांगितलं.

'का बरं, असं का म्हणतोस ?'

'तुमच्या येण्याचा खरा तर काय उपयोग ? तुम्ही मला काहीही मदत करू शकणार नाही. फुकट चर्चा करण्यात आपण वेळ मात्र घालवू.'

यूरियेव्ह जरा घुश्श्यातच निघून गेला. ल्यूबोवाबाईंनी मुलांचा निरोप घेतला. माझा निरोप घेताना माझ्याशी हस्तांदोलन करत त्या म्हणाल्या,

'अँटन, तुम्हाला भीती नाही ना वाटत ?'

ते सारे जण शहराकडे निघून गेले. आम्ही सारेजण परत पटांगणात आलो. संध्याकाळचं जेवण वहात असावेत. कारण भरलेली भांडी घेऊन मुलं रस्त्यानं स्वयंपाकघराकडून डॉरमिटरीकडे जात होती. कोस्टयानं माझ्या हाताला स्पर्श केला व हसला. मिटका व व्हिटका यांनी भांडी घेऊन जाणाऱ्या दोन मुलांना अडवलं,

'काय रे, अशी कामं करता काय तुम्ही ?'

मिटका म्हणाला, 'काय विक्षिप्त लोक आहात तुम्ही. नीट कामं करता येत नाहीत ? तुम्ही काय जनावरं आहात ?'

काय होतंय हे प्रथम माझ्या ध्यानात आलं नाही. कोस्टयानं कुर्याझमधल्या भाकरी घेऊन जाणाऱ्या एका मुलाचा हात पकडला. एका हातात भाकरी व दुसऱ्या हातात रस्सा घेऊन तो चालला होता. ती भाकरी जागोजाग कुरतडलेली होती. कोस्टयानं त्या मुलाचा हात धरून हलवला. सारा रस्सा अंगावर सांडला होता व त्यातले कोबी आणि बीट रुटचे बारीक बारीक तुकडे त्याच्या सदऱ्यावर विखुरले होते. ते ध्यान पाहून कोस्टयाला काही हसू आवरेना. आम्हाला हसू आवरणं कठीण झालं. कारण मांसाचा एक तुकडा त्या मुलानं मुठीत घट्ट दाबून धरला होता. बाकीच्यांची अवस्था तशीच असावी.

मिटका हसत हसत पुढे म्हणाला, 'डॉरमिटरीकडे जाताना वाटेत ही मुलं त्या रस्त्यातले मांसाचे तुकडे काढून घेतात. असंच की नाही ? अरे मूर्खा, तू निदान आपल्या बाह्यातरी वर सारायच्या होत्या.'

'बाप रे ! अँटन, आपलं या साऱ्या गोंधळात काय होणार समजत नाही.'

थोड्याच वेळात माझी मुलं निरनिराळ्या दिशांना पांगली. मे महिन्यातला तो गोड दिवस कुर्याझच्या टेकडीवर मजेने जणू काही विसावला होता. पण त्या

टेकडीनं त्याला प्रतिसाद दिला नाही. मला असा भास झाला की जग दोन भागात एखाद्या पारदर्शक समांतर रेषेनं विभागलं गेलंय. वरचा भाग म्हणजे आकाश. ते निळ्या रंगाने, मधूर वासानं व निळ्या पक्ष्यांच्या थव्याने भरलेलं आहे. तसंच लहानमोठ्या ढगांनी, कमालीच्या शांततेनं भरुन गेलंय. दूर क्षितिजाजवळ छोट्या छोट्या झोपड्या, आकर्षक झाडंझुडपे व वळणावळणाने जाणारा ओढा, काळी हिरवी, काही ठिकाणी भाजून तांबूस दिसणारी शेतं ही जणू सुट्टीच्या तयारी-साठी सूर्यप्रकाशात मांडून ठेवल्यासारखी दिसत होती. हे चांगलं का वाईट देव जाणे. पण डोळ्यांना चांगलं दिसत होतं. साधंच परंतु आकर्षक व पहाणाऱ्याला त्या गोड मे दिवसाचा आपणही एक भाग असावं असं वाटू देणारं होतं. माझ्या पायाखाली कुर्याझची शापीत जमीन, जुन्या भींती, घाण, कोळी, कीटक, ढेकूण यांनी काठोकाठ भरून ती घाण, उनाड प्रवृत्तीच्या मागे बाहेर टाकत होती. नाही. हे खरं जग नाही. हे काहीतरी वेगळंच आहे. मुद्दामच अशा अवस्थेला आणून सोडलंय.

मी अशा तऱ्हेनं कॉलनीत फेरफटका मारत असताना कोणीही माझ्याजवळ आलं नाही. पण पहिल्यापेक्षा जास्त मुलं इकडे तिकडे वावरताना दिसत होती. ती दुरुन दुरुनच माझ्याकडे पहात होती. मी काही डॉरमिटरीमध्ये गेलो. खूपशी मुलं प्रत्येक डॉरमिटरीत दिसत होती. इथं डॉरमिटरीशिवाय काही दिसतंच नव्हतं. कारण जिकडे पहावं तिकडे घरं, झोपड्या, वर्कशॉप्स सगळ्यांचं डॉरमिटरीत रुपांतर झालेलं दिसत होतं. काही डॉरमिटरीमधून मुलं जुन्या गाद्यांच्या ढिगाऱ्या-वर, काही लाकडांच्या फळ्यांवर व काही खाटांच्या पत्र्यावर बसलेली होती. ती सारीजणं आपले हात गुडघ्याभोवती घट्ट आवळून खाल्लेलं जेवण पचवत होती. काहीजणं उवा मारत होती. कुठेकुठे घोळक्यानं पत्ते खेळताना दिसत होती. काही-जणं धुरकटलेला, राहिलेला रस्सा चाटून पुसून खात होती. माझ्याकडे कोणीही लक्ष दिलं नाही. त्यांच्या जगात मला थाराच नव्हता.

एका डॉरमिटरीमध्ये काही मुलं 'निव्हा' (क्रांतिपूर्वीचं एक सचित्र साप्ता-हिक) नावाचं साप्ताहिक बघण्यात गर्क झालेली होती. त्याचं मला आश्चर्य वाटलं.

मी त्या मुलांना विचारलं, 'अरे, तुमच्या उशांचं तुम्ही काय केलंत ?' सर्व मुलांनी एकदम माझ्याकडे वळून पाहिलं. एका टोकदार नाकाच्या मुलानं माझ्या-कडे विचित्र नजरेनं पाहिलं आणि सावकाश मला विचारलं,

'उशा म्हणता तुम्ही ? मला वाटतं तुम्हीच कॉम्रेड मेकेरेन्को असावेत.'

'मी तोच आहे.'

'तुम्ही सध्या साऱ्या कंपाउंडभर फिरता आहात आणि बघताहात, खरं ना?'

'बरोबर, मी सध्या तेच करत आहे.'

'उद्या दोन वाजता......'

'बरोबर आहे, उद्या दोन वाजता.'

'अरे, पण तुम्ही माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीत. तुमच्या उशा कुठं गेल्या ?'

'आम्ही सांगू ना तुम्हाला ? आताच सांगू काय ?' त्या मुलानं माझ्याकड जरा कौतुकाने पाहिलं व एका घाणेरड्या ठिगळं लावलेल्या गादीवर मला बसायला थोडीशी जागा करुन दिली. मी खाली बसलो.

'बरं, आता तुझं नाव काय मला सांग पाहू.'

'वान्या झायचेन्को.'

'तुला लिहितावाचता येतं का ?'

'गेल्या वर्षी मी चौथ्या इयत्तेत होतो. आणि यंदाच्या हिवाळ्यात तुम्हाला माहितच आहे की सध्या आमच्याकडे शाळा चालू नाही.'

'ठीक आहे. पण तुमच्या उशा आणि चादरी कुठे गेल्या ?'

वान्याचे घारे डोळे विनोदाने जरा चमकले. त्यानं आपल्या सर्व मित्रांकडे पाहिलं व तो टेबलावर चढून बसला. त्याचे फाटके तुटके बूट माझ्या अगदी पाया-जवळ येऊन भिडले होते. बाकी सर्वांनी आमच्याभोवती कोंडाळे केले. अचानक माझी नजर एका मुलावर पडली. मी त्याला ओळखलं. हा तर गोल चेहऱ्याचा मालिकोव्ह. 'अरे, तू इथेच आहेस का ?'

'अं अं ...हा आमचा गट आहे.' असं म्हणून त्यानं मुलांकडे बोट दाखवायला सुरुवात केली. हा टीम्का ? ओडरयूक, इल्या मारेन्को'

टीम्काचे केस लालसर होते. व त्याच्या चेहऱ्यावर सुरकुत्या होत्या. त्याच्या पापण्यांना केस नव्हतेच. त्याचे हास्य जरा उपरोधिक होते. याउलट इल्या चांगला गोलमहोल होता. परंतु त्याचा चेहरा फिक्कट व थोडासा डागाळलेला होता. पण त्याचे डोळे मात्र अगदी पाणीदार व पापण्या भरदार होत्या. वान्याने डॉरमिट-रीत आपल्या मित्रांच्या डोक्यावरुन जरा लांबवर पाहिलं. आणि अगदी सावधपणे कुजबुजल्या आवाजात म्हणाला, 'तुम्हाला उशा कुठं गेल्या याची माहिती हवी आहे ना ? मग मी खरं सांगतो तुम्हाला. अहो इथं कधी उशा नव्हत्याच.'

असं म्हणून तो हात पसरुन मोठ्याने हसला. इतर सारेजणही त्याच्या-बरोबर हसले.

'आम्ही सारेजण फार मजेदार आहोत. इथलं सारं वातावरणच फार गंमतीदार आहे. इथे उशा नाहीत. केव्हातरी होत्या म्हणे. पण त्या भुर्रर्र भुर्रर्र उडून गेल्या.' असं म्हणून तो पुन्हा एकदा मोठ्याने हसला.

'समजा, एके रात्री गाजरं उशीवर डोकं ठेवून झोपली व दुसऱ्या दिवशी सकाळी उठतात तो उशा गुल......अशी गंमत.'

वान्यान हसऱ्या डोळयानं कोडाऱ्यूककडे पाहिलं. तो हसता हसता मागेपुढे पहात होता व प्रत्येकवेळी त्याचा दाब माझ्या पायावर जोरानं पडत होता.

'तुम्हाला उशा हव्यात ना ? मग तुम्ही लिहून द्या. प्रत्येक गोष्ट तुम्ही लिहून दिली पाहिजे. असंच आहे ना ? ती केव्हा दिली, कोणाला दिली हेसुद्धा लिहिलं पाहिजे. पण इथं, अहो, माणसांचीसुद्धा गणती होत नाही. मग उशांचं काय घेऊन बसलात ? किती मुलं आहेत हे कोणाला पण सांगता येणार नाही.'

'असं कसं असेल रे ?'

'अगदी सरळ आहे. त्यात काय ? आता हा इल्या व्होनारेन्को इथे रहातो. याची कधी कोणी नोंद ठेवली आहे ? मुळीच नाही. कोणाला माहितसुद्धा नाही. मीसुद्धा कुणाला माहित नाही. पुढे सांगू का ? असे इथं कित्येकजण आहेत. ते इथं रहातात. पुन्हा परत येतात. या टीम्काला कोणी इथं पाठवलंय असं वाटतं का तुम्हाला ? हा एक दिवस आला आणि इथेच रहायला लागला.'

'मग त्याला इथे रहायला आवडतं का'

'छे, छे, तसं मुळीच काही नाही. अहो, तो बोगोडुकोव्ह कॉलनीतून पळाला व दोन आठवड्यांपूर्वी इथे आला. त्याला खरं तर गॉर्की कॉलनीत जायचं होतं.'

'त्या बोगोडुकोव्ह कॉलनीतल्या लोकांना ही गोष्ट माहित आहे काय ?'

'असेल तर. सगळयांना माहिती आहे. चांगलं माहिती आहे.

'हा एकटाच का बरं इथं पळून आला ?'

'असं पहा, आवडीनिवडीत फरक असतो. कोणाकोणाला कडक शिस्त आवडत नाही. असं म्हणतात की तुमच्या कॉलनीत कडक शिस्त आहे. बिगुल वाजला की असेल तिथून पळत यावं लागतं, व लगेच कवाईत करावी लागते. त्याच्यानंतर मग काम आणि हे सगळयाच मुलांना जमत नाही. नाहीच आवडत.'

'मग ते पळून जातात' असं मालिकोव्ह मध्येच म्हणाला.

'म्हणजे कुर्याझची मुलं ना ?'

'होय. ती सगळी पळून जातात. जितक्या जोराने पळता येईल तितक्या जोराने पळतील. तुम्हाला माहित नाही मॅकॅरेन्को, आम्ही काम करायचं आणि तुम्हाला नाव मिळायचं ते काय म्हणून ? ते पळतीलच.'

'कुठे पळून जातील ?'

'पळून जायला पुष्कळ जागा आहेत की नाही सांगा पाहू. तुम्हाला आवडेल त्या कॉलनीत तुम्ही जाऊ शकता.'

'आणि तू काय करायचं ठरवलं आहेस ?'

'मी होय. हा आमचा गट आहे. आम्ही चौघेजण यात आहोत. तुम्हाला खरं सागू. आम्ही चोरी करत नाही. कारण आम्हाला आवडत नाही. असं आहे. आता हा टीम्का. तो सुद्धा स्वतःसाठी काही घेणार नाही. घेईल ते फक्त गटासाठी.'

टोम्का लाजून माझ्याकडे हळूच बघत होता. त्याने डोळे जमिनीकडे लावले.

मी उठलो व त्यांना म्हणालो, 'तुमच्या गटाची मी रजा घेतो. आपण नक्कीच एकमेकांशी जुळवून घेऊ शकू याबद्दल माझी खात्री आहे.' त्यांनी पण मला हसत हसत निरोप दिला.

मी तिथून बाहेर पडून पुढे चालू लागलो. चार मुलं तरी आपल्या बाजूला आहेत याचं मला समाधान वाटलं. पण बाकी २७६ जणांचं काय ? कदाचित त्याहीपेक्षा जास्त. झारचेन्को म्हणाला ते खरं आहे. इथे असे कित्येकजण आहेत की ज्यांची गणती झाली नाही व नावं नोंदवली नाहीत. एकाएकी या न नोंदवलेल्या मुलांच्या विचाराने मी बैचेन झालो. या असल्या भयानक गोंधळाच्या फंदात पडण्याचा मूर्खपणा मी कशाला केला असं वाटलं. माझं स्वतःचंच यश मी पणाला लावलं नाही, तर माझं सबंध सामुदायिकही मी पणाला लावलं नाही का ? हा २८० आकडा कागदावर दिसायला नुसता तीन आकडी व माझी शक्ती न संपणारी. परंतु आज या २८० जणांना मी या भयानक गलिच्छ वातावरणात सोडणार. या साऱ्या विचारांनी माझ्या पोटात जणू काही खड्डा पडला व एकाएकी माझे पायही लुळे पडल्यासारखे वाटले.

तीन लोक समोरुन माझ्याकडे येत असलेले मला दिसले. ते साधारण १७ वर्षांच्या वयाचे असावेत. त्यांचे केस व्यवस्थित कापून, वळवून बसवलेले होते. त्यांच्या पायातले बूट व्यवस्थित पॉलिश केलेले दिसत होते. एकाचे केस तांबूस वर्णाचे होते. त्यानं अगदी नवं तपकिरी रंगाचं जाकिट घातलं होतं. त्याच्या अंगात चुरगळलेला व रक्ताचे डाग पडलेला सदरा दिसत होता. दुसऱ्याच्या अंगात कातडी जाकिट होतं आणि तिसऱ्याच्या अंगातला सदरा अगदी स्वच्छ होता. तपकिरी जाकिट घातलेल्या मुलानं आपले दोन्ही हात विजारीच्या खिशात घातलेले होते. त्यानं आपली मान किंचित कलती ठेवलेली होती. माझ्यासमोर त्यानं कसलं तरी ओडेसा पद्धतीचं गाणं जोरात गुणगुणलं. त्याबरोबर त्याचे शुभ्र दात चमकले. त्याचे डोळे तसे मंदच होते व भिवया लालसर व जाड होत्या. दुसरे दोघे त्याच्या बाजूला उभे होते व त्यांनी आपले हात एकमेकांच्या खांद्यावर ठेवलेले होते. त्याच्या तोंडात सिगारेट होती व जीभेने ते या बाजूकडून त्या बाजूला सरकवत होते. आणखी काही कुर्याझची मुलं या तिघांच्याकडे येताना दिसली.

त्या लाल केसाच्या मुलानं आपले डोळे बारीक करून मला मोठ्याने विचारलं, 'हं, तुम्हीच मॅकॅरेन्को काय ?'

मी त्याच्यापुढे उभा राहिलो आणि खूप प्रयत्न करून चेहऱ्यावर राग दिसू न देता शांतपणाने त्याला उत्तर दिलं 'होय. मीच मॅकॅरेन्को आहे. आणि तुझं नाव काय ते मला सांग पाहू.'

त्या लाल केसाच्या व्यक्तीनं पुन्हा एकदा शीळ घातली. माझ्या प्रश्नाच उत्तर दिलंच नाही. उलट डोळे बारीक करून आपल्या शरीराचा सर्व भार एका पायावर ठेवून तो माझ्याकडे बघतच राहिला. एकाएकी त्यानं आपले खांदे उंच केले, पाय सरळ केले व विजारीच्या खिशात दोन्ही हात घालून तो वेगाने निघून गेला. त्याचे दोघे मित्र तसेच, एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवलेल्या स्थितीत व जोर-जोराने 'एक मुलगा, एक मुलगी. आणि त्यांनी गंमत केली, 'असं कर्कश्श आवाजात म्हणत निघून गेले. बाकीची घोळक्यातली मुलं माझ्याकडे चौकस नजरेनं पहात होती. त्यांची आपसात कुजबुज चाललेली मला ऐकू आली.

'हे नवे डायरेक्टर बर का ?' आणि पुन्हा कुजबुज, 'त्यानं काय फरक पडणार आहे ?'

इतक्यात 'कॉ. मॅकॅरेन्को, तुम्ही केव्हा सुरुवात करणार ?' असा प्रश्न ऐकू आला.

त्या आवाजाच्या रोखाने मी पहायला लागलो. एक काळ्याभोर डोळ्यांची तरुण मुलगी माझ्याकडे बघून हसत होती. तिनं बर्फासारखा शुभ्र ब्लाऊज व काळाभोर टाय लावलेला पाहून जरा आश्चर्यच वाटलं.

'माझं नाव गुलयेव्हना.' ती म्हणाली.

हे नाव मी ऐकलं होतं. ती कपडे शिवण्याच्या खात्यात शिक्षिका होती. ती पार्टीची सभासद होती. कुर्याझमध्ये ही एकुलती एक पक्ष सभासद होती. तिच्याकडे बघून खरोखरच मला समाधान वाटलं. ती किंचित स्थूलपणाकडे झुकत असावी. तिची कंबर बारीक असून केसांची झुलुपं काळीभोर व चकचकीत होती. तिच्यावर जणूकाही एक प्रकारची पावित्र्याची झाक दिसत होती.

'ठीक आहे. आपण सुरुवात करु या.' मी म्हटलं.

'मला नाही हो ते जमणार. मी काही तेवढी हुशार नाही.' ती म्हणाली.

'घाबरु नकोस. तुला मी शिकवीन.'

'ठीक आहे. मी तुम्हाला मुलींचा कक्ष बघण्यासाठी बोलवायला आले होते. तुम्ही अजून आमच्याकडे आलाच नाहीत. सर्व मुली तुमची वाट पहात आहेत. त्यांना तुम्हाला पहायची फारच उत्सुकता आहे. मला सांगायला अभिमान वाटतो की या मुली मला मानतात. इतकंच काय, त्यांच्यामध्ये तीन कोम्सोमोलसुद्धा आहेत.'

आम्ही एका दोन मजली इमारतीकडे गेलो. गुलयेव्हना म्हणाली, 'तुम्ही सगळे जुने कर्मचारी काढून टाकायला सांगितलंत हे बरं केलंत. एकूण एक सर्वांना अगदी हाकलून लावा. मलापण कुठेतरी पाठवून द्या.'

'नाही, नाही. मी तुझ्याबद्दल चांगली व्यवस्था केलेली आहे. व तुझ्या मदतीवर मी विसंबून राहिलो आहे.'

'पुन्हा विचार करा बरं. नाहीतर मागाहून पस्तावाल.'

आम्ही मुलींच्या डॉरमिटरीत पोचलो. ही डॉरमिटरी बरीच मोठी असून त्यात ६० खाटा व्यवस्थित ओळीत लावलेल्या होत्या. मला आश्चर्य वाटलं, जुनं का होईना, प्रत्येक खाटेवर ब्लँकेट होतं. तसंच प्रत्येक बिछान्यावर चादरही होती. व सगळ्या गंमत म्हणजे त्यांच्या खाटांवर उशा होत्या.

सगळ्या मुली आमचीच वाट पहात होत्या. सगळ्यांच्या अंगात विटके व ठिगळं लावलेले परंतु स्वच्छ कपडे होते. सगळ्यात मोठी मुलगी १५ वर्षांची असावी.

'कसं काय मुलींनो,' मी त्यांना विचारलं.

'तुम्हाला अँन्टन सेमियानोविचना भेटायचं होतं ना? म्हणून मी त्यांना घेऊन आले आहे' असं गुलयेव्हना म्हणाली.

मुलींनी कुजबुजत मला अभिवादन केलं व आपल्या खाटेवरनं उठून आमच्याकडे आल्या. या मुलींच्याकडे पाहून मला खरोखरच वाईट वाटलं. मला असं वाटलं की आपण या मुलींच्यासाठी क्षुल्लक का होईना पण काहीतरी आनंद त्यांच्या आयुष्यात आणला पाहिजे. त्या सगळ्या जणी आपल्या बिछान्यावर बसल्या व माझ्याकडे बुजऱ्या नजरेने बघत होत्या. आपल्याला यांच्याबद्दल एवढं का वाईट वाटलं. मला समजेना. कदाचित त्या फार कृश व हडकुळ्या होत्या म्हणून किंवा त्यांनी ठिगळं लावलेले कपडे घातलेले होते म्हणून असेल. हा विचार माझ्या डोक्यात येण्याचं कारण माझ्या मुलींनी फाटके कपडे घालू नयेत अशी एक माझी समजूत झाली असावी म्हणूनच. एवढ्याच कारणासाठी मला त्याची कीव आली असेल असंच काही नक्की म्हणता येणार नाही.

'तुम्ही या वातावरणात कशा रहाता? (कसं काय निभावून घेता?)' असं मी त्यांना विचारलं.

माझ्या प्रश्नाचं त्यांनी उत्तर दिलं नाही. त्या फक्त माझ्याकडे स्मितहास्य करत टक लावून बघत राहिल्या. त्यावेळी मला वाटलं की मंदस्मिताखेरीज त्यांना ओठाचा दुसरा उपयोग माहितच नसावा. खरंखुरं हास्य त्यांना माहितच नसावं. मी साऱ्यांकडे नजर फिरवत शेवटी गुलयेव्हनाच्या चेहऱ्यावर स्थिर केली.

'मला वाटतं मला बराच बरावाईट अनुभव आहे, पण इथं काही तरी विशेष आहे व मला ते समजत नाही' असं मी गुलयेव्हनाला म्हटलं.

'आणि काय विशेष दिसलं तुम्हाला?' असं डोळे वर करून विस्मयानं गुलयेव्हनानं मला विचारलं.

एक लहानखोरी मुलगी माझ्यासमोर बसली होती. ती तशी काळी सावळीच होती व तिनं गुलाबी रंगाचा झगा घातला होता. ती इतकी ठेंगणी होती की तिचे फक्त गुडघेच मला दिसत होते. माझ्याकडे रोखून बघत ती चटकन

म्हणाली, 'तुम्ही तुमच्या गॉकाईट्सना घेऊन लवकर इकडे या. आम्हाला इथ सुरक्षित रहाणं दिवसेंदिवस कठीण होत चाललंय.'

त्याक्षणी मला तिथं काय विशेष आहे ते जाणवलं. तिथे सर्वत्र भीतीचं सावट पसरलं होतं. त्या ठेंगण्या, ठुसक्या, काळ्यासावळ्या मुलींच्या नजरेत, हालचालीत, ओठांच्या थरथरण्यात नुसती भीती भरलेली होती.

'यांना कमालीच्या भीतीनं ग्रासलेलं दिसतंय.' मी गुलयेव्हनाला म्हटलं.

'होय अ‍ॅन्टन, त्यांना भयंकर त्रास होतोय. दिवसेंदिवस रहाणं मुष्किलीचं झालंय.'

गुलयेव्हनाच्या डोळ्यांच्या कडा ओलावल्या. तिनं चटकन आपली नजर खिडकीबाहेर करून डोळे लपविण्याचा प्रयत्न केला.

'तुम्हाला कशाची भीती वाटते ते अगदी खरंखुरं सांगा.' मी पुन्हापुन्हा विनवून त्यांना सांगितलं.

प्रथम घाबरत एकमेकींना आपसात सांगण्याचा आग्रह करत व शेवटी धीटपणानं त्यांनी त्या साऱ्या भयानक परिस्थितीचं चित्र व त्यांचं तिथलं आयुष्य याबद्दल सविस्तर माहिती सांगितली :

त्यांच्या डॉरमिटरीतच त्यांना थोडातरी आधार वाटतो. त्या जराही बाहेर पडल्या तरी मुलं त्यांची छेड काढतात. त्यांच्या मागून घाणेरड्या भाषेत बोलतात. त्यांच्या प्रसाधनगृहांची दारं वाटेल तशी दांडगाई करून उघडतात; अनेकदा त्यांना उपवास घडतो. कारण त्यांना जेवण शिल्लकच रहात नाही. मुलं सारे खाद्यपदार्थ खुशाल पळवितात व आपआपल्या डॉरमिटरीत नेऊन ठेवतात. खाद्यपदार्थ जेवणघरातून डॉरमिटरीत न्यायचे नाहीत असा नियम आहे. खानसामे तसं सांगत असत; पण मुलं त्यांना दाद देत नाहीत. अर्थात मुलींना अशी दांडगाई करून खाद्यपदार्थ मिळवणं कठीण होतं. त्या बिचाऱ्या जेवणघरात जाऊन शिस्तीत थांबत. अनेकवेळा मुलांनी जेवण पळवलंय व जेवण नाही असं त्यांना सांगण्यात येई.

केव्हा केव्हा थोडीशी उरलीसुरली ब्रेड त्यांना दिली जाई. शिवाय त्या जेवणघरात जास्त वेळ काढणंही धोक्याचं असे. कारण कित्येकदा मुलं येऊन त्यांना खुशाल झोडपून काढत. त्यांना वेश्या म्हणत, घाणेरडी भाषा बोलत व त्या मुलींनी ती बोलावी अशी त्यांच्यावर सक्ती करत. याशिवाय ती मुलं मुलींकडून विकण्यासाठी वस्तू मागत व मुलींनी देण्याचं नाकारलं तर खुशाल त्यांच्या डॉरमिटरीत हाती लागेल ती वस्तू पळवित व बाजारात नेऊन विकत. मुली आपले कपडे फक्त रात्रीच धुवू शकत असत. पण अलीकडे तेही धोक्याचं झालंय. केव्हा काय प्रसंग ओढवेल ते सांगणं कठीण झालंय. आमच्यातल्याच दोन मुली वाट्या गोरोड्कोन्हा आणि मान्या वसिलेनको रात्री कपडे धुवायला गेल्या. त्या परत आल्या त्या रडतच आणि रात्रभर रडतच राहिल्या.

दुसऱ्या दिवशी त्या कॉलनी सोडून निघून गेल्या. कुठे गेल्या ते कोणालाच माहित नाही. एका मुलीनं डायरेक्टरकडे तक्रार करण्याचं धाडस केलं. तर काही मुलांनी दुसऱ्या दिवशी ती शौचकूपाला गेली असताना शौचकूपातली घाण तिच्या तोंडाला फासली. सर्वजण म्हणतात की लवकरच हे सारं संपेल. पण काही मुलं म्हणतात काहीच होणार नाही. कारण गॉर्काईट्स आहेत संख्येनं थोडे. त्यांना केव्हाच पिटाळून लावता येईल.

गुलग्रेव्हना मुलींचं भाषण अगदी लक्षपूर्वक ऐकत होती. पण माझ्यावर रोखलेली नजर तिनं जराही हलवली नाही. मी तिच्याकडे पाहून किंचित स्मित केलं, पण ते खरंतर तिच्या पाणावलेल्या डोळ्यांकडे बघूनच केलं होतं.

मुलींनी आपलं हे सारं भयानक चरित्र सांगून संपविल्यावर त्यातल्या एका मुलीनं–तिचं नाव सोनाहोल–मला गंभीरपणे विचारलं– 'समाजसत्तावादी देशात असल्या साऱ्या गोष्टी खपवून घेतल्या जातात कशा ?'

'तुम्ही जे सांगितलंत ते खरोखरच लज्जास्पद आहे. विशेषतः समाजसत्तावादी देशाला तर फार फार काळीमा लावणारं आहेच. असलं काही खपवून घेतलं जाणार नाही. कुणीही समाजसत्तावादी देशात कदापिही खपवून घेणार नाही. थोड्याच दिवसात हे सारं बदलेल व तुम्हाला चांगले सुखाचे दिवस येतील. कोणीही तुमच्या वाटेला जाणार नाही. हे जीर्ण कपडेही आपण फेकून देऊ व तुम्हाला जरूर नवे कपडे मिळतील.'

खिडकीजवळ एक मुलगी बसली होती. ती थोड्या आश्चर्याने म्हणाली, 'थोड्याच दिवसात हे सारे संपेल म्हणता ?'

'होय बाळ, जास्तीत जास्त दहा दिवसात.' तिला ठासून सांगितलं. मी अंधार पडेपर्यंत कॉलनीभर भटकत राहिलो. मनात निरनिराळे उलटसुलट विचार येत होते.

तीनशे वर्षांच्या जुन्या व जाडजुड भिंतींनी वेढलेली ती प्राचीन वर्तुळाकार जागा, मोडकळीला आलेले ते चर्च, वेडीवाकडी जमीन आणि सगळीकडे जाणवणाऱ्या शिक्षणतंत्राच्या अडचणी. जणू माजलेल्या रानटी गवतासारख्या जमिनीपासून छतापर्यंत ती देती भरलेली घोड्याची पागा. तीच दशा गुरांच्या गोठ्याची. ही पूर्वीच्या काळी जोगीणींची रहायची जागा होती व पार तोडून मोडून गेलेली. फळबाग हे सारं वातावरण भकास व भयाण समाज शिक्षणाचा अभाव प्रकर्षानं दाखवित होतं. मुलांच्या डॉरमिटरीत कर्मचाऱ्यांची मोकळी घरं, खेळायच्या जागा, स्वयंपाकघर या सगळ्यावर विषारी फळं लागलेली होती. येत्या काही दिवसातच तीच सारी मला पचवायची होती.

माझ्या डोक्यातले विचार रागामुळे सैरभैर झाले. १९२० साली आला होता तसा राग परत उफाळून येत आहे असं वाटलं. एकाएकी कमालीच्या

घृणेचं भूत आपल्यावर सवार होत आहे असं वाटलं. कुणाचं तरी मानगूट पकडावे अशी जबर इच्छा होऊ लागली. त्याचक्षणी जागचे तसूभरही न हलता कोणाला तरी धरावं व त्याचं नाक त्या घाणीत, त्या कचऱ्याच्या ढीगात घासावं आणि ताबडतोब काहीतरी करावं. शिक्षणतंत्र, समाजशिक्षण, तत्वज्ञान, क्रांती काही नको. समाजसत्तावादाची धुंदी नको, साधं तर्कशास्त्र नको, तर फक्त सच्चा साधा रांगडेपणा. संतापामुळे माझी भीती–लवकरच सामोऱ्या येणाऱ्या परिस्थितीबद्दलची व त्यामुळे होणाऱ्या अपयशाची–कुठे दूर पळाली. मुलींना दिलेल्या आश्वासनाच्या आठवणीनं मला आलेला क्षणिक संताप विरुन गेला. त्या घाबरलेल्या, गुपचूप सहन करणाऱ्या दीनवाण्या मुलींना मी दहा दिवसात जगायला योग्य वातावरण निर्माण करून देण्याचं दिलेले अभिवचन माझ्याच सद्सद्-विवेक बुद्धिचं प्रतिनिधीत्व करत आहे असं वाटू लागलं.

हळूहळू अंधार वाढत होता. कॉलनीत कुठेही दिव्याचा उजेड दिसत नव्हता. काळाकुट्ट अंधार भिक्षूंच्या वसतीगृहावरुन वाढत वाढत चर्चला वेढून गेला. सगळीकडून ती उनाड कार्टी काहीतरी खाण्याचे पदार्थ मिळवून सापडेल तिथं रात्र घालविण्यासाठी जागा शोधत होती. कुठेही बोलण्याचा, हसण्याचा, गाण्याचा, गप्पागोष्टींचा आवाज येत नव्हता. मधूनमधून दबलेल्या कुरबुरीचा व आळसटलेला भांडणाचा आवाज ऐकू येत होता. दोन मस्त प्यायलेली पोरं एकमेकांना शिवीगाळ करत जिना चढायचा प्रयत्न करीत होती. कोस्टया व्हेटकोव्हस्की व व्होलोकोव्ह तुच्छतेनं त्यांच्या पाठमोऱ्या सावल्या न्याहाळत होते.

## ३

# दैनंदिन फेरफटका

दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे दोन वाजता कुर्याझच्या प्रमुख डायरेक्टरांनी करारनाम्यावर सही केली व सर्व जुन्या कर्मचारीवर्गाला जाण्याची ताकीद दिली. अशा तऱ्हेनं कॉलनीचा ताबा आम्हाला दिला गेला. हे महाशय घोड्याच्या गाडीत बसून निघून गेले. त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघताना मला त्यांचा खरोखर हेवा वाटला. हा खरोखर मुक्त झाला. त्याचाच विजय झाला. कोणीही त्याला कसलीही धमकी दिली नाही.

मी मात्र अंतःकरणातून दुःखी असून पंख तुटून गेलेल्या पक्षाप्रमाणे जड शरीराने या कुर्याझच्या विचित्र जगात आजपासून वावरणार आहे.

वान्का शेलापुटीन मे महिन्यातल्या त्या सूर्यप्रकाशात सुखावलेला दिसत होता. तो जणूकाही एकाद्या हिऱ्यासारखा चमकत होता. चर्चच्या भिंतीला अडकविलेल्या तांब्याच्या घंटेलासुद्धा वान्कासारखं चमकायला आवडलं असतं. परंतु ती घंटा एकतर जुनी होती व साफ काळी झाली होती. त्यामुळं सूर्याच्या उन्हात ती अगदी मंद दिसत होती. शिवाय त्या घंटेला खूप चिरा पडल्या होत्या. वान्कानं कितीही प्रयत्न केले असते तरी ती पहिल्यासारखी चकाकू शकली नसती. पण काही करून वान्काला सर्व मुलांची सभा घेण्यासाठी घंटा वाजवून त्यांना एकत्र जमवायचं होतं.

नको असलेली जबाबदारी जड वाटते, टोचत राहते. परंतु असं होणं म्हणजे

कमकुवतपणा आहे हे पटतं. क्षुल्लक कारणावरूनसुद्धा चीड येते व ती अगदी मनात रूतून बसते. आणि त्यामुळे ताण व चिंता दोन्ही वाढतात. शेलापुटीन जेव्हा घंटा वाजवू लागला तेव्हा असंच काहीसं थोडंसं व्हायला लागलं होतं. घंटेचे कर्कश्श आवाज ऐकून मनात आलं की असले आवाज कॉलनीत उमटविणं अगदी अयोग्य आहे.

व्हिट्का गारकोव्हस्की माझ्या बाजूला उभा राहून माझ्या चेहऱ्यावरचे भाव निरखत होता. त्यानं आपले लक्ष चर्चच्या भिंतीवर टांगलेल्या त्या घंटेकडे वळविलं. त्याने डोळे विस्फारुन तिकडे पाहिलं. जणू काही बऱ्याच महत्वाच्या गोष्टी त्याच्या नजरेतून सांगून गेल्या. व्हिट्का स्वतःशीच हसला. डोक्याला एक हिसका देऊन

गंभीरपणे मला म्हणाला,

'आपण सर्व काही व्यवस्थित करून घेऊ.'

तो तडक घंटेच्या बाजूला गेला. वाटेत त्याला व्होल्कोव्ह भेटला. त्यानं त्याला काहीतरी सांगितलं. वान्कानं दोनतीन वेळा त्या घंटेला हिसका देऊन तोच तो कर्कश्श आवाज काढला. तो हसत हसत म्हणाला,

'मी एवढी घंटा वाजवतोय तरी यांना ऐकू जात नाही ? यांना काही समजतच नाही वाटतं !'

जुन्या चर्चमध्येच मंडळाची (क्लबची) जागा होती. चर्चच्या खिडक्या खूप उंचउंच असून त्याला पुढे जाळीचा कठडा केलेला होता. दोन शेकोटया दोन बाजूना तिरक्या बांधलेल्या होत्या. एक मोडकळीस आलेलं टेबल मधल्या अर्धवर्तुळाकार व्यासपीठावर उभं केलेलं होतं. 'उभं रहाण्यापेक्षा बसणं बरं,' असा चीनी लोकांच्यात वाक्प्रचार आहे त्याचा या ठिकाणी कुर्याझमध्ये सपशेल इन्कार केलेला दिसत होता. तिथं बसायला काहीही नव्हतं. तसं पाहिलं तर कुर्याझमधील या मुलांना बसायला आवडत नव्हतंच. डोक्यावर केसाचं जणू जंगल झालेलं एखादं डोकं मध्येच डोकावे; पण लगेच परत दिसेनासं होई. तीन तीन, चार चार मुलांची टोळकी आवारात हिंडत होती. ते रात्रीच्या जेवणाची वाट पहात होते. आज कारभार बदलल्यामुळे जेवणाला उशीर होणार होताच. पण या सगळ्या नुसत्या सबबी. असो. कुर्याझची जनता व संस्कृती जणू काही एखाद्या आवरणाखाली झाकून ठेवली असावी.

शिक्षक लोक आजूबाजूला कुठेही दिसत नव्हते. गेल्या रात्री आम्ही नुसत्या टेबलांवर झोपलो होती. त्यामुळे झोपही चांगली लागली नव्हती. शिवाय मुलांनी बऱ्याच उशीरापर्यंत कुर्याझमधल्या जीवनाच्या चमत्कारिक व सुरस (?) गोष्टी सांगून बरीच करमणूक केली होती.

चाळीस शिक्षकांना चाळीस खोल्या रहाण्यासाठी दिल्या होत्या. अठरा महिन्यांपूर्वी याच शिक्षकांनी मोठ्या हौसेनं आपापल्या खोल्या फर्निचर, भरत-कामाचे टेबलक्लॉथ, पडदे, शोभिवंत वस्तूंनी सजविल्या असतील. इतरही काही

मौल्यवान वस्तू त्यांच्या संग्रही असतील. पण लवकरच त्यांना आढळून आलं असेल की या वस्तूंच्या बदल्यात दुसऱ्या काही अधिक मौल्यवान वस्तू मिळू शकतात असं कुर्याझमधील रहिवाशांना (मुलांना) ज्ञान होऊन त्यांच्या (शिक्षकांच्या) वस्तू नाहीशा होऊ लागल्या होत्या. या कृत्याला पारंपारिक भाषेत दरोडेखोरी, चोरी वगैरे म्हणतात. अशा तऱ्हेनं वस्तू नाहीशा होतात हे लक्षात आल्यावर बिचाऱ्या शिक्षकांनी, उरलेल्या वस्तू तरी वाचविता याव्यात म्हणून त्या शहरात आपल्या घरी पाठवून दिल्या. फक्त जरुरीपुरतं व न हलविता येणारं सामान तेवढं शिल्लक ठेवलं होतं. इझवेस्तिया या वर्तमानपत्राचा अंक पसरुन जर एखादा शिक्षक कामावर असताना विश्रांतीसाठी थोडा वेळ बसला असला तर त्यालासुद्धा फर्निचर म्हणायला हरकत नाही.

कुर्याझमधील शिक्षक आपलं जीवित सुरक्षित रहाण्यासाठी तेथील मुलांच्या पुढे करुणा भाकत. तशीच ते आपल्या वस्तू न नेण्याबद्दलही त्या मुलांच्या विनवण्या करत असत. चाळीस शिक्षकांच्या चाळीस खोल्यांना अशा तऱ्हेनं बनविण्यात आलं होतं. जसं एखाद्या लढाईत शत्रूपक्षापासून बचाव करण्यासाठी एखाद्या भिंतीचा किंवा आडोशाचा उपयोग केला जाईल, तद्वतच ते चाळीस शिक्षक कामावर असतेवेळी आपल्या चाळीस खोल्यांचा स्वसंरक्षणासाठी उपयोग करत. बचावासाठी खिडक्या, दारे, झडपा यांची अशा तऱ्हेनं केलेली रचना मी यापूर्वी कुठेही पाहिली नव्हती. या शिक्षकांच्या खोल्यांच्या दारांना, खिडक्यांना जाड जाड काचा लावल्या होत्या व भली जाडजूड कुलुपं ठोकलेली होती.

आमची संमिश्र आघाडीच्या मुलांची तुकडी आल्यापासून मी कुठेही एकही शिक्षक पाहिला नव्हता. त्याची हकालपट्टीही तशी नावालाच झाली. त्यांच्या रहाण्याच्या जागा खरोखरच कल्पित कथेतल्यासारख्याच होत्या. फक्त व्होडकाच्या रिकाम्या बाटल्या व ढेकूण यांचं अस्तित्व तिथं मनुष्यवस्ती असावी एवढं दर्शवित होतं.

एक गृहस्थ—त्यांचं नाव लोझकिन आहे असं कळलं—ते तेवढे या सगळ्या गोंधळातून बाजूला दिसले. त्यांनी आपल्या शिक्षणतंत्राबद्दल मला बराच वेळ ऐकवलं व आपला गॉर्की कॉलनीतच रहाण्याचा इरादा आहे, या चुकलेल्या मुलांना ताळ्यावर आणून प्रगतीच्या मार्गावर नेऊन सोडण्याचं पवित्र कार्य आपण करायचं ठरवलंय वगैरे चऱ्हाट सांगत बसले होते.

'गोंधळ, गोंधळ. नुसता साऱ्या गोष्टींचा गोंधळ. तुम्ही घंटा वाजवा. चार चार वेळा वाजवा. पण ही पोरं काही यायची नाहीत. का येत नाहीत बरं? कारण असं की शिक्षणतंत्र बरोबर वापरलंच नाही. अहो, हे मी सारखं सांगत असे. पण ऐकतो कोण? सवय लावावी लागते. प्रत्येक गोष्टीची सवय लागणार कशी? एखाद्या मुलाने चोरी केली तर त्याला त्यापासून परावृत्त करायला हवं

ना ? मी नेहमी त्यांच्याशी विचार करून वागतो. म्हणून ही मुलं माझ्याकडे नेहमी येतात. ती मला मान देतात. एकदा मी माझ्या सासुरवाडीला गेलो होतो, कारण माझी सासू आजारी होती. आणि माझ्या गैरहजेरीत काय झालं ठाऊक आहे ? या पोरट्यांनी माझ्या खोलीच्या खिडकीची कांब काढली व माझं सारं सामान चोरुन नेलं. त्यांनी मला अक्षरशः नवजात बालकाच्या अवस्थेत संपूर्ण लुटून नेलं. अंगावरच्या कपड्याशिवाय काहीही ठेवलं नाही. ठीक आहे. तुमच्याशी वाईट वागणाऱ्या माणसाला तुम्ही खुशाल लुटा हो ! पण जो तुमच्याशी चांगलं वागतो, सहानुभूतीनं वागतो, त्याला तुम्ही का सतावता ? एवढ्यासाठीच शास्त्रीय दृष्टिकोन हवाच असं मी सतत सांगत असतो हो ! मुलांच्या मनात नवीन शिकायची आवड उत्पन्न व्हावी म्हणून मधूनमधून मी त्यांना माझ्याकडे बोलावत असे. हे असं करायला पाहिजेच. एकदा मी त्यांना एक गणित घातलं. काय म्हणून विचारा बरं ! माझ्या एका खिशात सात कोपेक दुसऱ्या खिशात असलेल्या पैशांपेक्षा जास्त आहेत आणि तेवीस कोपेक् प्रत्येक खिशात आहेत तर एकूण किती कोपेक आहेत. कल्पना आवडली का नाही ?'

लोझकीननं त्याचा डोळा बारीक करून माझी प्रतिक्रिया जाणून घेण्याचा प्रयत्न केला. त्याला कशाला दुखवायचं म्हणून मी उडवाउडवी करू लागलो तर तो माझ्या मागेच लागला. म्हणतो कसा, ' मग सांगा माझ्या गणिताचं उत्तर. किती कोपेक प्रत्येक खिशात असं वाटतं तुम्हाला ?'

' मला याचं उत्तर तुम्ही विचारता ?' असं मी घुश्शातच विचारलं, ' किती कोपेक असतील सांगतो, ऐका तर.'

' काय हो महाशय, तुम्ही कधी शाळेला गेला होता का ?'

' अर्थात गेलो होतो हो. पण माझं बरंचसं शिक्षण घरच्या घरीच झालंय. माझं सारं आयुष्य म्हणजे एक स्वशिक्षणाचा भाग आहे. मी कुठल्याही संस्थेत किंवा शिक्षणतंत्राच्या महाविद्यालयात गेलो नाही. इथं असलेले काही लोक महाविद्यालयात शिकलेले आहेत बरं ! एक चांगला लघुलिपी (शॉर्टहँड) शिकलेला दुसरा एक कायद्याचं शिक्षण घेतलेला. तुम्ही त्यांना, मी मघा सांगितलं, तसं उदाहरण सोडवायला सांगा, किंवा दुसरं उदाहरण, दोन भावांना वडिलोपार्जित संपत्ती मिळाली ... ...'

मी त्याला मध्येच थांबवून विचारलं, ' ती भित्तीपत्रिका त्या लघुलिपी जाणणाऱ्यानंच लिहिली होती का ?'

' होय, होय. त्यानंच लिहिली होती. अहो त्याला इथं लघुलिपी शिकवण्याचा वर्गसुद्धा काढावयाचा [illegible] जेव्हा का या मुलांनी त्याला लुटलं ना; तसा तो इथून निघून गेला. म [illegible] बंदशाहीत मुळीच रहायचं नाही, असं त्यानं

सांगितलं. त्यामुळे तो वर्ग तसाच राहून गेला. थोडीशी कुठंकुठं सुरुवात झाली होती, इतकंच.'

मुलांच्या खेळाच्या खोलीत एका पुठ्ठ्यावर खालील अक्षरे लिहिलेली होती व तो पुठ्ठा शेगडीच्या वर खिळ्याला अडकवला होता :

' लघुलिपी शिकणं म्हणजे समाजसत्तावादाकडे वाटचाल आहे.' लोझकिन अशा तऱ्हेनं खूप वेळ बडबडत होता. काही वेळानं तो निघून गेला. जणू हवेत विरुन गेला. त्याच्याबद्दल मला फक्त एकच आठवण राहिली. ती म्हणजे व्होल्कोव्ह त्याला उद्देशून म्हणाला, ' मूर्ख लेकाचा ! '

मुलांच्या त्या खेळाच्या जागी आम्ही सर्वसाधारण सभा बोलावली होती. पण कुर्याझमधील मुलं तिथं जमण्याचं चिन्ह दिसेना. व्होल्कोव्ह संथपणे क्लबच्या मोकळ्या भिंतीकडे पहात होता. कुडल्टीचा चेहरा रागानं लाल झाला होता. तो स्वतःशीच काहीतरी पुटपुटत होता. मित्का उपरोधिकपणे हसत होता. मिशा ओव्हचारेन्को मात्र शांत होता व जराही विचलित झाला नव्हता. त्यानं आपलं अर्धवट राहिलेलं संभाषण पुढे चालू ठेवण्यासाठी मोका साधला. तो म्हणाला,

' पहिली मुख्य गोष्ट म्हणजे जमीन नांगरायला घेतलीच पाहिजे व पेरणी झालीच पाहिजे. मे महिना सुरूदेखील झाला. घोडे काही न करता स्वस्थ उभे आहेत. '

' डॉरमिटरीत तरी कोण आहे ? कोणी नाही. सारे शहरात भटकायला गेले आहेत.'

तो मोठ्यानं शिव्या हासडू लागला. मी समोर असल्याची दखलसुद्धा न घेता तो बडबडतच होता.

' त्यांनी होऊन मागितल्याशिवाय त्यांना आज रात्रीचं जेवण देऊ नये असं मला वाटतं.' कुडल्टी म्हणाला.

' असं करायचं नाही ' असं मी त्याला निक्षून सांगितलं.

' नाही ? वा ! वा ! ' असं कुडल्टी ओरडलाच ' आम्ही काय करायचं इथं ? जमिनीवर सारं गवत उगवलंय. ती नांगरलेलीसुद्धा नाही. ते सर्व शिष्ट येतील व आयते जेवतील. त्यांनी काही केलं तरी चालवून घ्यायचं का ?'

व्होल्कोव्हनं रागारागानं आपली जीभ ओठावर फिरवली, खांदे उडविले, व रागाच्या सपाट्यात जोरात म्हणाला, ' आंतोन सेमयानोविच, तुम्ही आमच्याशी पुढील कार्यक्रमाबद्दल चर्चा करावी अशी मी विनंती करतो.'

' आणि जेवणाचं काय ' असं कोणीतरी म्हणालं.

' थांबतील ते. बसू दे त्यांना. शिवाय ते सारे शहरात गेले आहेत. '

आम्ही सर्वजण त्या खोलीत बसलो. बसल्यावर व्होल्कोव्हनं सुरुवात केली. ' जमीन नांगरायची का ? नांगरली की पेरणी तर केलीच पाहिजे. पण

यांच्याकडे पेरायलासुद्धा काही नाही. बटाटेसुद्धा पेरायला नाहीत. आम्ही नांगरणी, पेरणी करू. त्यांना मरु दे तिकडे. पण काय पेरायचं. सगळीकडे किती घाण कचरा दुर्गंधी पसरली आहे. आपली मुलं (गॉर्काईट्स) आली की त्यांना काय सांगायचं ते समजत नाही. कोणत्याही सभ्य सुसंस्कृत माणसाला अशा जागी पायसुद्धा ठेवावासा वाटणार नाही. डॉरमिटरीत गाद्या, उशा, कपडे कशाचा ठावठिकाणा नाही. त्यांच्या कुठल्याच कपड्यांचा पत्ता नाही. जेवणघरात थाळ्या, चमचे वगैरे काही नाही. आपण सुरुवात तरी कुठून व कशी करणार? सुरुवात तर आपल्याला केलीच पाहिजे.'

मुलं माझ्याकडे कुतुहलानं बघत होती. त्यांना वाटलं जणू काही कुठे सुरुवात करायची ते मला चांगलं माहीत आहे.

कुर्याझची मुलं कशी असली तरी मला त्याची एवढी फिकीर वाटत नव्हती. पण या सर्व जरुरीच्या वस्तू कशा मिळवायच्या, कशा संभाळायच्या हाच मोठा डोंगराएवढा प्रश्न माझ्यापुढे पडला होता. त्यात कुर्याझकरांचा विचार लुप्त झाला होता.

कुर्याझ ताब्यात घ्यायचा करारनामा चिल्ड्रेन्स एड कमिटीबरोबर झाला त्यावेळी वीस हजार रुबल्स त्या कमिटीकडून सर्व डागडुजी करता तसेच जरुर त्या वस्तू नव्या खरीदण्याकरता मला मिळवायचे होते. कुर्याझची एकंदर परिस्थिती पाहिल्यावर ती रक्कम नुसती 'दर्यामे खसखस' आहे असं मला वाटू लागलं. माझ्या गॉर्काइट्सनी जरुर त्या वस्तूंची यादी करताना जराही अतिशयोक्ती केली नव्हती. कुडल्टी जेव्हा सामानाचा ताबा घेऊ लागला तेव्हा खरोखर तिथल्या भयानक दारिद्र्याची कल्पना आली. ताबा देताना सही करण्याचं काम डायरेक्टरनं केलं, पण त्याची सही नावापुरतीच होती. तो डायरेक्टर पक्का बनेल होता व करारनामाही अगदी छोटासाच होता. वर्कशॉपमध्ये थोडी यंत्रे होती व घोड्याच्या पागेत एकदोन तट्टं होती. या पलिकडे काही हत्यारं, वस्तू किंवा शेतीची अवजारं वगैरे काहीही नव्हतं. अर्धाएक डझन डुकराची पिल्लं डुक्करखान्यात दिसत होती. ते ठिकाण कधी साफ केलेलं नसावं. ती डुकरं अगदी लहान होती, पण त्यांची मोठी डोकी, बारीक पाय व आखूड शेपट्या पाहून आमची मुलं हसू लागली. कुडल्टीला कुठेतरी एका कोपऱ्यात नांगराचा फाळ मिळाला. तो घेऊन तो नाचू लागला. खूप दिवसांनी जणू काही त्याचा भाऊ भेटला असावा. कोणाला तरी माती उकरायचं फावडं सापडलं. शाळेमध्ये तर काही टेबलांचे व खुर्च्यांचे पाय व फळ्याच्या मोडक्यातोकड्या चौकटी तेवढ्या होत्या. हिवाळा वर्षातून शेवटी येतो व म्हणून गृहिणी वसंतऋतूत हिवाळ्यासाठी थोडाबहुत लाकूडफाटा ठेवतात, तसंच हे सामान ठेवलेलं असावं.

सारंच नवीन करायला हवं होतं. नवीन खरेदी करून मगच ते बांधता आलं असतं. प्रथम कशाची गरज होती तर ती म्हणजे संडास व मोऱ्या. शिक्षकतंत्रात या विषयाचा विचार कोणी करत नाही आणि म्हणूनच मला वाटतं कुर्याझला ही महत्वाची गोष्ट दुर्लक्षिलेली असावी. कुर्याझचे जुने शिष्यगण रहायचं वसतीगृह छोटयाशा टेकडीवर होतं व ही टेकडी सर्व बाजूंनीच उताराची होती. दक्षिणेच्या बाजूला भिंत नव्हती, त्यामुळे वसतीगृहाला लागून असलेल्या चिखलांनी भरलेल्या डबक्याच्या पलीकडे पोड्व्होरकी खेडयातील गवतांनी शाकारलेली छोटी छोटी घरं दिसत होती. तो देखावा खरोखर छान होता. एखाद्या कवीला ते दृश्य बघून नक्कीच काव्य सुचलं असतं. पण आमच्या कुर्याझच्या कृतघ्न मुलांनी पोड्व्होरकीच्या रहिवाशांना कसलं बक्षिस बहाल केलं होतं याचा अंदाज कराल तर पुढं बोलायला शब्दच नाहीत. त्या टेकडीच्या सबंध उतारावर समाज शिक्षणखात्यानं लाखो रुपये खर्चून दिलेल्या खुराकाचं घाणीत झालेलं रुपांतर बहाल केलं होतं.

माझ्या मुलांना वर वर्णन केलेल्या गोष्टीचाच फार त्रास झाला. मिशा ओव्हचेरन्कोनं अत्यंत गंभीरपणानं आणि कळवळून तक्रार केली. तो म्हणाला, 'आंतोन, खरं सांगा, आम्ही काय करायचं? खार्कोव्हला जायचं का? आणि जायचं झालं तर कसं जायचं?'

आमच्या या चर्चेनंतर पोड्व्होरकी गावचे दोन सुतार बालवीर खोलीच्या दारात येऊन धडकले. त्यातला एक वयस्कर सैनिकासारखा दिसत होता त्यानं खाकी टोपी घातली होती व त्याच्या चेहऱ्यावर उत्सुकता दिसत होती.

'खरं तर हे अगदी लाजिरवाणं आहे हं! माणसाला खायला तर पाहिजेच, आणि शिवाय निसर्गनियम पण पाळलेच पाहिजेत. पण शेवटी......असो. समाजाबद्दल लाकडी तक्ते आपल्याला रायझोव्ह गुदामात मिळतील. तुम्ही काळजी करू नका हं. मला इथे सारेजण ओळखतात. ठरलेले पैसे तुम्ही द्या मग मी बरोबर सामान आणून छान टुमदार जागा तयार करून देतो पहा. त्या चर्चच्या मठातल्या जोग्यांनासुद्धा मिळाली नसेल एवढी छान. कमी खर्चात करायची असेल तर प्लायवूडची करू. ती अगदी हलकीशी होईल. पण तुम्हाला जर चांगली हवी असेल तर तुम्ही १ किंवा १॥ इंच रुंदीचा हार्डबोर्ड घ्यावा असं मी म्हणेन. ती चांगली जाड राहील. हिवाळयात थंडी वाजणार नाही व उन्हाळयात त्याला भेगा पण पडणार नाहीत.'

मला त्या माणसाचं बोलणं ऐकून खरोखर कौतुक वाटलं. हा माणूस उन्हाळा, हिवाळा, वारा, पाऊस या सगळया गोष्टींचा बांधकाम करताना विचार करतो! असा माणूस मला प्रथमच भेटला. त्या सुताराचं नाव होतं बोरोव्हाय. मी त्याला एक नोटांचं बंडल दिलं. बोरोव्हायनं एक चुणचुणीत पोरगा मदत-

नीस म्हणून आणला होता. त्याला त्यानं आपल्या त्याच आर्जवी आवाजात पुढल्या कामाच्या सूचना दिल्या. त्याचा तो आवाज पुन्हा एकदा ऐकून मी सुखावलो.

'वान्या, मी जरुर ती लाकडं बाजारातून घेऊन येतो. तू पळत जाऊन आपली अवजारं घेऊन ये. माझी पण आणायला विसरु नकोस. आपण कामाला सुरुवात करू. आपल्यापैकी कोणीतरी आमच्याबरोबर द्या. म्हणजे आपल्याला कुठं व कसं बांधायचं ते समजावून सांगा.'

किरगिझोव्ह व कुडल्टी हसत वान्याबरोबर जागा व रचना कशी करायची ते दाखवायला निघून गेले. बोरोव्हायनं नोटांचं बंडल एका कापडाच्या तुकड्यात बांधलं व नीट कमरेभोवती गुंडाळलं. पुन्हा एकदा त्यानं मला त्याच त्या आवाजात आश्वासन दिलं. 'कॉम्रेड डायरेक्टर, माझ्यावर विश्वास ठेवा. मी तुमचं काम यथायोग्य पार पाडीन.'

मी त्याच्यावर विश्वास टाकला. मला जरा धीर आला. या सगळ्या बेशिस्त गोंधळाच्या संक्रमण काळात काहीतरी मी मार्गावर आणायला सुरुवात केली असं वाटलं व शिक्षणतंत्रही आपण हळूहळू अमलात आणू शकू असा विश्वास वाटला.

दुसराही एक प्रश्न आम्ही योग्य तऱ्हेने निकालात काढला, तो म्हणजे चमचे, थाळ्यांचा. कारण त्याचाही संबंध आमच्या दैनंदिन जीवनाशी निगडीत होताच. घुमटाच्या आकाराचं छप्पर असलेल्या त्या जेवणघरात घाऱ्या डोळ्यांचे जोगी व जोगीणी डोळे किलेकिले करुन हात उंचावून आशीर्वाद देत असत. तिथे टेबलं बाकं होती, पण चमचे किंवा थाळ्या नसाव्यात हे अजबच. पण कुर्याझच्या मुलांना यापैकी काहीच नव्हतं. जवळजवळ अर्ध्या तासानं बराच आरडाओरडा अनुनयविनय करून व्होलकोव्हनं इव्हाजेनयेवला एक जुनाट गाडी तबेल्यातून मिळवून दिली व बाजारातून चारशे थाळ्या व लाकडी चमचे आणायला सांगितलं.

मोठ्या फाटकात इव्हाजेनयेवच्या गाडीला गराडा पडला व आनंदाच्या आरोळ्या व मिठ्या. आमची मुलं ओळखीच्या आवाजाचा वास आल्यावर सरळ फाटकाकडे धावली. मी सुद्धा त्यांच्या पाठीमागे धावलो आणि काय आश्चर्य. कारावानोवची मिठी माझ्याभोवती पडली. आपली ताकद दाखवायची त्याला आजकाल हौस वाटत असे.

झादारोवच्या ताब्यात असलेली आमची तुकडी (राबफाकला गेलेली) सगळीच्या सगळी आमच्या मदतीला आली होती. त्या क्षणापासून डोक्याला सतावणाऱ्या त्या कुर्याझकरांचे प्रश्न कुठल्या कुठे दडून बसले. लोझकीनसारख्याला सुद्धा हे गणित सुटलं नसतं.

अशा या अडचणीच्या व गुंतागुंतीच्या परिस्थितीत आमचे राबफाकचे विद्यार्थी आले याचा आम्हा सर्वांना फार आनंद झाला. ते सारेजण आले होते. आमचा धिप्पाड बुरुन, सेमयान काराबानोव यांच्या अतिरेकी चेहऱ्यावर शिक्षणाचे संस्कार

स्पष्टपणे दिसायला लागलेले पाहून समाधान वाटलं. आंतोन ब्रातचिन्को तसा मोकळ्या स्वभावाचा, पण त्यानं आपला तो स्वभाव पशुवैद्यकाच्या शिक्षणात चांगला गुंतवलेला दिसला. माखयी बेलुखीन संयमी, आनंदीत, असादची गंभीर, पण खंबीर, व्हेर्शनेव्ह हुशार व सत्यशोधक, मारुस्या लेवचेन्को, काळ्याभोर डोळ्यात हुशारीची चमक असलेली नात्स्या नेचेव्हनया, नेहमीप्रमाणेच चुणचुणीत, इरक्रुटसच्या गव्हर्नरचा मुलगा म्हणविणारा जॉर्जियाव्हस्की, ऋैनिक, गोलोस आणि शेवटी माझा लाडका दत्तक मुलगा झादारोव, सातव्या संमिश्र तुकडीचा म्होरक्या. सातव्या संमिश्र तुकडीची मोठी मुलं राबफाक पास करुन लवकरच उच्च शिक्षणासाठी पुढे जातील याबद्दल आम्हाला जराही शंका नव्हती. अजूनही आम्ही त्यांना आमचे गॉर्काईट्स समजतो. ते विद्यार्थी झाले होते. परंतु शिक्षणाचं कोणी कोणी काय केलं आहे हे विचारायला आम्हाला आज वेळ नव्हताच. सुरुवातीचे कुशल प्रश्न झाल्यावर आम्ही सारेजण बालवीरांच्या खोलीत परत जमा झालो. काराबानोव टेबलाजवळच्या खुर्चीवर आरामशीर बसला व म्हणाला, 'आंतोन सेम्यानोविच, आम्हाला सगळं समजलं म्हणून काही झालं तरी जायचंच असं आम्ही ठरवलं आणि आम्ही आलोय.'

आमच्या राबफाक विद्यार्थ्यांना आम्ही आमचे पहिल्या दिवसाचे अनुभव सांगितले. त्या सर्वांनी आश्चर्यानं व काळजीनं इकडे तिकडे पाहिलं, खुर्च्यांची उगीचच हालचाल केली. झादारोवनं गंभीर चेहरा करुन कपाळाला आठ्या घालून खिडकीबाहेर नजर वळवली.

'छे ! छे ! जबरदस्ती करुन भागणार नाही कारण त्यांची संख्या बरीच आहे.'

बुरुननं आपले रुंद खांदे उडवले व स्मितहास्य केलं.

'तसं काही ते संख्येने खूप आहेत असं नव्हे. तो प्रश्न महत्वाचा नाही. पण त्यांना गोळा करुन काय करायचं? त्यांना एकत्र आणायला काही आहे का तुमच्याजवळ ? कामं पुष्कळ आहेत असं तुम्ही म्हणता पण कुठे आहेत ? त्यांना जमवून ठेवायला काहीतरी पाहिजे ना. तरीही आपल्याला त्यांना एकत्र आणलंच पाहिजे. काय करायचं ते ठरवलंच पाहिजे.'

गुलयाव्ह आत आली. ती आमचं बोलणं शांतपणं ऐकत होती. काराबानोवनं संशयानं तिच्याकडे पाहिलं. तिनं हसून अभिवादन केलं व ती म्हणाली, 'तुम्ही त्यांना कधीच एकत्र जमवू शकणार नाही.'

'आम्ही त्यांना एकत्र आणू शकणार नाही असं म्हणता' काराबानोव जरा रागारागानं बोलला. 'तुम्हाला काय वाटलं ? मग पहाच तर. सगळे दोनशे ऐंशी एकाच वेळी आले नाहीत तरी एकशे ऐंशी तरी आम्ही आणून दाखवूच. इथे स्वस्थ बसून भागणार नाही.'

आम्ही सर्वांनी मिळून एक योजना तयार केली. त्यानुसार कुर्याझकरांना रात्रीचं जेवण द्यायचं ठरवलं. त्या मुलांना खरोखर भूक लागली होती आणि ते जेवण्यासाठी डॉरमिटरीमध्ये जमा झाले होते. 'त्यांना जेवण घेऊ दे. त्यांना आपण चकित करु. त्यांना सांगायचं, 'मूर्खांनो, सभेला चला. तुम्ही माणसं आहात का जनावरं ? हे सारं तुमच्या भल्यासाठीच चाललं आहे. तुम्हाला नव्या जगाची ओळख करुन द्यायला लागलो तर तुम्ही झुरळांसारखे भराभर सैरभर होता. कोणी तुमच्याशी दांडगाई केली तर घाबरू नका. लगेच माझ्याकडे या. तुम्हाला काय हवं ते आम्हाला सांगा. जेवणानंतर घंटा वाजेल. मग मात्र तुम्ही सारेजण सभेला या.'

१०–१२ कुर्याझकर मंडळी जेवणघराच्या दारात जेवण वाढण्याची वाट बघत बसली होती. मिशा ओवचेरेन्को दरवाजात वाट अडवून उभा होता. काल ज्या लाल केस असलेल्या मुलानं माझं नाव विचारलं होतं त्याला तो उपदेश करत होता, 'जो कोणी काम करत नाही त्याला जेवण घ्यायचा हक्क नाही. कोणी मला हक्क आहेच म्हणून माझ्याशी वाद घालू लागला तर त्याला कसलाच हक्क नाही असं मी स्पष्ट सांगेन. तुम्हाला जर डोकं असेल, काही अक्कल असेल तर तुम्हाला मी म्हणतो ते समजेल. मला वाटलं तर मी थोडंबहुत काही देईन, पण हक्क म्हणून नव्हे. काम करुन मिळवावं लागतं. फुकट नाही मिळत. प्रत्येकाला काम केलंच पाहिजे. तुम्ही तर नुसते आळशी, फुकटखाऊ आहात. समजा, मी काही दिलं तर ती भिक्षा घातली असं मी म्हणेन, समजलं का ?'

तो लाल केसांचा मुलगा मिशाकडे एखाद्या रागावलेल्या रानटी श्वापदाप्रमाणे एका डोळ्यानं पहात होता. दुसरा डोळा काही पाहू शकत नव्हता. आदल्या दिवसापेक्षा त्या मुलाच्या चेहऱ्यात खूपच बदल झाले होते. त्याचा चेहरा एका बाजूनं बराच सुजला होता व काळानिळा झाला होता. त्याच्या वरच्या ओठावर व उजव्या गालावर रक्त आलेलं दिसत होतं. हे सगळं पाहून मिशाला काय घडलं ते विचारणं जरुरीचं होतं. मी त्याला विचारलंही.

'याचा अर्थ काय ? याच्या चेहऱ्यावर ही रंगरंगोटी कुणी केली ?'

मिशा जरा गंभीरपणे हसला व माझं विचारणं कितपत बरोबर आहे याबद्दल उलट प्रश्न विचारायला लागला, 'तुम्ही मला विचारता आंतोन? हे माझं कृत्य नाही. हे या खोव्हराकचं स्वतःचंच आहे. मी माझं काम चोख करतोय व मी माझ्या कामाचा सगळा तपशील तुम्ही डायरेक्टर म्हणून तुम्हाला जरुर देतो. व्होलकोव्हनं मला दरवाजात उभा रहा व कुणालाही आत सोडू नको असं सांगितलं. त्याप्रमाणे मी दरवाजात उभा होतो आणि या घटकेलाही मी तेच करतोय. मी त्याच्यामागे पाकशाळेत गेलो का ? का डॉरटमिरीत त्याचा पाठलाग केला ? का मी त्याच्यामागे भुणभुण लावली ? पण या खोव्हराकलाच सांगू दे, ही सारी मुलं

त्यांचं काही काम नसताना उगाचच इथं जमून बसतात. त्यांना काही काम नाही. कदाचित त्याची कुणाशी टक्कर झाली असेल तर त्याला लागलं असेल.'

खोव्हराक इतका वेळ फुसफुसत होता. त्यानं मिशाकडे बघून मान डोलावत आपली बाजू मांडायला सुरुवात केली, ' हो, तुम्हाला असं वाटतंय की आम्हाला उपाशी ठेवायचा तुम्हाला अधिकार आहे व वर मारायचा पण, असंच ना ? तू अजून माझा इंगा ओळखला नाहीस. होय की नाही ? पण लवकरच तुला समजेल.'

अजून वरचढ कोण हे ठरायचं होतं आणि त्याचा मला विचार करायचाच होता. पूर्वीही अशा गोष्टी घडल्या होत्या व त्या निस्तरताना खूप त्रास झाला होता.

' डयूक ऑफ इनगैन ' मारला गेला तेव्हा नेपोलियननं उच्चारलेल्या प्रसिद्ध वाक्याची आठवण मला यावेळी झाली. ' हा कदाचित गुन्हा असेल, पण जे काही झालं ती नक्कीच चूक नव्हती.'

मी जरा सामोपचारानं घ्यायचं ठरवलं. ' त्याला मारण्याचा तुला अधिकार आहे काय ?' मी मिशाला जरा रागानंच विचारलं.

यावर मिशानं एक भली मोठी सुरी माझ्यापुढे धरली व म्हणाला, ' हे पाहिलंत का? ही सुरी आहे ना? मला ही कुठे मिळाली म्हणून विचाराल. तुम्हाला वाटेल कदाचित मी खोव्हराककडून चोरली तर नाही ? याची खूप तोंडातोंडी चालली होती. व्होल्कोव्हनं मला सांगितलं होतं की इथं उभा रहा. हा माझ्यापुढे सुरीचं टोक धरुन मला म्हणतो, ' मला आत जायचंय !' मी याला अर्थातच जाऊ दिलं नाही. आंतोन, हा मला पुन्हा म्हणतो ' मी आत जाणार.' आणि मला धक्के मारायला लागला. म्हणून मी त्याला एक ठोसा दिला. खरोखर एकच सणसणीत ठोसा लगावला. तरीही हा मूर्ख ती सुरी फिरवत राहिला. यांना शिस्त जराही माहीत नाही. बथ्थड लेकाचे.'

' अरे, तू त्याला चांगलंच बडवलं आहेस. बघ त्याच्या चेहऱ्यावर सारं रक्त आलंय. तुझ्या ठोशाचं हे कर्तृत्व.'

मिशानं आपल्या मुठीकडे जरा न्याहाळून पाहिलं. तो परत म्हणतो कसा, ' होय. हा माझ्याच ठोशाचा प्रताप. दुसऱ्या कुणाच्या नाही. मला मान्य आहे. पण मी माझी जागा कधीही सोडली नाही. व्होल्कोव्हनं मला इथं उभं रहायला सांगितलं आणि मी ते काम बजावलं. खोव्हराक मूर्ख. तो आपले हात ओवाळत राहिला.'

' तुझे हात पण स्वस्थ नाही राहिले, खरं ना ?'

' मी सांगितलेलं काम बजावत असताना मला हात बांधून ठेवायला कोणी सांगितलं नाही. समजा मी माझ्या पायांची हालचाल केली किंवा माझा हात एका विशिष्ट पद्धतीनं मी ठेवला. आणि तो दुसऱ्या बाजूला हलवत असताना याला लागला तर तो काय माझा दोष आहे. इकडे तिकडे फिरणाऱ्यानं स्वतःला

सांभाळावं. हे बघ खोव्हराक, समज समोरुन आगगाडी येत आहे तर तू बाजूला व्हायला पाहिजे. तू जर तुझ्या हातात सुरी धरुन तसाच उभा राहिलास तर आगगाडी आपला रस्ता बदलणार नाही. तू तसाच मध्ये उभा राहिलास तर गाडी निघून जाईल व तुझं काही नामोनिशाण शिल्लक राहणार नाही. समज, एखादं यंत्र चालू आहे आणि तू मध्ये हात घातलास तर काय होईल ते तुला माहीत आहे. तू काही कुक्कुलं बाळ नाहीस.'

मिशा हे सारं खोव्हराकला मजेत समजावून सांगत होता. त्याच्या आवाजात पण आपुलकी होती. हातवारे करुन, हावभाव करुन, उजवा हात पुढे करून गाडी कशी येईल व ती आली असताना खोव्हराकनं कुठे व कसं उभं रहावं इ. खोव्हराक त्याचं बोलणं शांतपणे ऐकत होता. त्याच्या चेहऱ्यावरचं वाळलेलं रक्त उन्हात चमकत होतं. राबफाक विद्यार्थ्यांचा एक घोळका मिशाचं ते बोलणं शांतपणे ऐकत उभा होता. मिशा ओव्हचेरेन्कोला हे सांभाळताना किती त्रास झाला असेल त्याची त्यांना कल्पना आली होती.

आमचं हे संभाषण चालू असताना बरीच कुर्याझकर मंडळी आजूबाजूला जमून मिशाचं बोलणं ऐकत होती. त्यांच्या चेहऱ्यावरच्या भावावरून मिशाचं म्हणणं त्यांना पटलेलं दिसत होतं. शिवाय मिशानं जिंकली होती. त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव पाहून मलाही जरा समाधान वाटलं व नव्या शिष्यगणाची पुसटशी कल्पना आली. एखाद्या तारेच्या मजकुरातली काही अक्षरं पुसट व काही गडप असतात तद्वतच काही जणांच्या चेहऱ्यावर बदला घेतल्याचं समाधान त्यांच्या धुळीनं माखलेल्या व रश्याचे ओघळ वाळलेल्या चेहऱ्यावरुनसुद्धा झाकले जात नव्हते. त्यातल्यात्यात वान्या झायचेन्कोच्या चेहऱ्यावर सूड उगविल्याचा आनंद स्पष्टपणं दिसून येत होता. वान्या त्यांच्या टोळक्याच्या पुढे आपले दोन्ही हात कमरेच्या पट्ट्यात अडकवून दोन्ही पाय जरा अंतरावर ठेवून उभा होता. व खोव्हराकच्या चेहऱ्याकडे अगदी लक्षपूर्वक, किंचित हसत पहात होता. एकाएकी त्यानं आपला पाय आपटला व त्याचं डोकं पुढे झुकलं आणि तो जरा मोठ्यानंच बोलला,

'काय खोव्हराक, तुला कोणी मारलेलं आवडत नाही, खरं ना? होय की नाही?'

'गप्प बस रे काटर्या!' खोव्हराक गुरगुरला. त्याचा आवाज भावनाशून्य होता.

'बरं झालं, बरं झालं. पाहिलंत त्याला आवडलं नाही. त्याला नव्या लोकांनी बरोबर वठणीवर आणलं. ते त्याला आवडलं नाही.' वान्या टाळ्या पिटत ओरडला.

खोव्हराक वान्याच्या दिशेनं धावून गेला. पण काराबानोवनं आपला

हात खोव्हराकच्या खांद्यावर ठेवला. काराबानोवच्या त्या कृतीनं खोव्हराकच्या अंगाला चांगला झटका बसला. वान्यालासुद्धा आता जराही भीती वाटलेली दिसत नव्हती. उलट तो मिशा ओवचेरेन्कोच्या बाजूला जरा सरकून उभा राहिला. खोव्हराकनं सेमियानकडे जरा संशयी नजरेनं पाहिलं आणि स्वतःला त्याच्या हातातून सोडवून घेतलं. सेमियाननं त्याच्या या कृतीकडं पाहून दयार्द्र स्मित केलं. खोव्हराकची नजर उगाचच भिरभिरत राहिली व त्याची दृष्टी वान्याच्या चेहऱ्यावर स्थिरावली. वान्याचे डोळे नेहमीप्रमाणे आनंदानं चमकत होते. खोव्हराक आता मात्र पुरताच गोंधळला होता. आपण फजित झालो व एकटे पडलो याची तीव्र जाणीव, गालावरचे वाळू लागलेले रक्त, मिशाचे ते लांबलचक स्पष्टीकरण, काराबानोवचं ते हास्य या साऱ्याचा मेळ घालताना खोडसाळ, परंतु शत्रूवत वाटणाऱ्या वान्याकडे दुर्लक्ष करणं व जणू काही काही झालं नाही असा आपला नेहमीचा दादागिरीचा आव आणून दाखविण्याची त्याची धडपड चालली होती. पण वान्यानं आता खवचटपणा करायचं ठरवलं होतं.

'तू खरोखर भयंकर आहेस. मला काही आज रात्री झोप येणार नाही. मला चांगलीच धडकी भरली आहे. खरोखर सांगतो, मला भयंकर भीती वाटते आहे.'

यावर कुर्याझकर व गॉर्काईट दोघेही मनापासून मोठ्यांदा हसले.

'हरामखोर' अशी शिवी हासडून खोव्हराकनं वान्याच्या दिशेनं झडप घेतली.

'खोव्हराक' असं मी दरडावलं.

'काय म्हणणं आहे तुमचं?' असं जरा तुच्छतेनंच त्यानं विचारलं.

'इकडे ये.'

माझी आज्ञा पाळायची त्याला फारशी जरूर वाटत नसावी असं त्याच्या हालचालीवरुन दिसलं. तो पँटच्या खिशात हात घालून चाचपडत राहिला. त्याची दृष्टी माझ्या पायावर स्थिरावली होती. माझ्या आवाजात चांगला कणखरपणा आला. परत मी त्याला 'माझ्याजवळ ये' असं जोरात सांगितलं.

सगळीकडे एकदम शांतता पसरली. पेट्या मालिकोव्हचा 'हूं' असा हुंकार तेवढा ऐकू आला.

खोव्हराक माझ्याजवळ आला. त्याचा खालचा ओठ जरा पुढे आला होता. तो माझ्याकडे धमकावणीच्या दृष्टीने टक लावून पहात होता. तो माझ्यापासून दोन पावलांवर पोचल्यावर त्याचे दोन्ही पाय एकदम लुळे पडले. कालही तो असाच वागला होता.

'सावधान' (अटेंशन) असं मी ओरडलो.

'सावधान या शब्दाचा अर्थ काय?' असं तो पुटपुटला. त्यानं आपले हात

खिशातून बाहेर काढले. एक हात उजव्या मांडीवर मारामारीच्या पवित्र्यात ठेवला. बोटं मात्र ताठ ठेवली होती.

काराबानोवनं त्याचा हात कमरेवरुन काढला.

'हे बघ मित्रा, तुला जेव्हा 'सावधान'चा इशारा मिळतो तेव्हा असं डुलत डुलत उभं रहायचं नसतं. तर मान ताठ ठेवायची आणि दोन्ही हात सरळ ठेवायचे.' असं काराबानोव म्हणाला.

खोव्हराकला जरा राग आला, पण सांगितलेलं त्यानं ऐकलं.

'तू आता गॉरकाईट आहेस. तू आपल्या संस्थेतल्या मुलांशी नीट वागलं पाहिजे. त्यांना दमदाटी नाही करायची. ध्यानात आलं ना तुझ्या ?' मी त्याला सुनावलं.

'ठीक आहे.' असं म्हणून खोव्हराकनं डोळ्यांची उघडझाप केली. त्याचा खालचा ओठ किंचित थरथरला व किंचितसं हसू त्यातून निसटलं. माझ्या बोलण्यात समजावणीपेक्षा कडकपणा जास्त होता. कारण खोव्हराकच्या लक्षात ते आलं असावं असं त्याच्या उत्तरावरुन मला वाटलं.

'नुसतं ठीक आहे असं म्हणून भागत नाही. बरोबर आहे असं म्हण.' बेलुखीनचा आवाज घुमला.

माखाईनं खोव्हराकचे खांदे धरुन चांगले घुसळले. त्याचे दोन्ही हात चांगले फिरविले. एक हात त्यानं वर उचलला व कपाळावर टेकवला व त्याला अगदी साध्या, सरळ भाषेत, 'बरोबर आहे. छोट्या मुलांवर दादागिरी करणार नाही असं म्हण,' असं शांतपणं सांगितलं.

खोव्हराकचं तोंड जास्तच वाकडं झालं.

'माझ्यामागे तुम्ही सारेजण का म्हणून लागता ? मी काय केलं ? मी कोणाची काहीच खोडी केली नाही. उलट तुमच्याच त्या मुलानं मला मारलं आहे. मी तर काहीसुद्धा केलं नाही.' खोव्हराक एका दमात बोलला.

एव्हाना बरेच कुर्याझकर भोवती जमले होते. काराबानोवानं खोव्हराकच्या खांद्यावर हात ठेवला व तो त्याला मृदु आवाजात म्हणाला, 'दोस्ता, तू खरोखर हुशार आहेस. मिशा आपलं काम बजावतोय. तो सर्वांसाठी हे काम करतो आहे, स्वतःसाठी करत नाही हे लक्षात घे. माझ्याबरोबर चल. मी तुला सारं समजावून सांगतो.'

ते निघून गेले. त्यांच्या पाठोपाठ नवे तत्व जाणणारे बरेच नवखे घोळक्यानं गेले.

जेवण वाढण्यासाठी व्होल्कोव्हनं स्वयंपाक्याला सांगितलं. तो स्वयंपाकी मिशाच्या मागं मागं सारखा फेऱ्या घालत होता. स्वयंपाक्यानं लांबलांब मिशा ठेवल्या होत्या व त्यानं पांढरी स्वच्छ टोपी घातली होती. व्होल्कोव्हनं आज्ञा

देताच स्वयंपाक्यानं त्यांच्याकडं पाहून समाधानाचं स्मित केलं. एवढयात वान्या त्याच्या टोळक्यासह उभा होता. त्यानं एकाची बाही पकडली आणि म्हणाला, 'वा आज त्यानं पांढरी स्वच्छ टोपी घातली आहे पाहिलंस ! टीम्का तुला काय वाटतं ?'

टीम्का किंचित हसून म्हणाला, 'अरे ती त्याचीच टोपी आहे. त्याच्याकडे आहे हे मला ठाऊक होतं.'

पाच वाजता सर्व मुलांची सर्वसाधारण सभा घेतली. राबफाक विद्यार्थ्यांच्या प्रचाराचा परिणाम म्हणा किंवा दुसऱ्या काही कारणास्तव म्हणा, पण बरेच कुर्याझकर सभेला उपस्थित होते. व्होल्कोव्हनं परत मिशा ओव्हचेरेन्कोला दरवाजात उभं केलं. असादची व शेलापुटीन हे हजर असलेल्या मुलांची नावे लिहून घेत होते. शिक्षणतंत्राची अशा तऱ्हेनं सुरुवात तर झाली. तसंच वस्तुंची यादी पण एकीकडे करण्यात आली. काहीजण उशीरा आले ते आपल्याला जेवण मिळेल का नाही याची चौकशी करत राहिले.

त्या छोटया चर्चमध्ये एवढया मोठया संख्येनं आलेली मुलं मावेनात.

वरती वेदीवर (आलट्र) उभं राहून पुढयात असणाऱ्या निराश्रित मुलांचं चांगलंच दर्शन झालं. मधून मधून कुठेतरी एखादा चेहरा आकर्षून घेत होता. क्वचितच खरा बालिश आवाज व मोकळे हसू ऐकू येत होतं. मुली एका बाजूला घोळका करुन अस्वस्थपणे शेगडीच्या बाजूला उभ्या होत्या. उदासिन चेहऱ्याची, फाटक्या कपडयांची, वाढलेल्या केसांची व घामट वास मारत असलेली मुलं यांचा जणू एक समुद्रच माझ्यासमोर उभा होता.

गॉर्की कॉलनीबद्दल मी त्यांना थोडक्यात माहिती सांगितली. तिथलं आयुष्य काम, शिस्त वगैरे याबद्दल सांगितलं. 'कुर्याझकरांनासुद्धा इथून पुढं स्वच्छता, शिस्त, काम, अभ्यास हे सर्व करायचंच. नवं आयुष्य, नव्या आशाआकांक्षा फुलवायच्या आहेत. माणुसकी अंगी बाणून नवा आनंद आपल्या आयुष्यात निर्माण करावयाचा आहे. तुमच्या सुदैवानं तुम्ही एका नव्या समाजरचनेच्या देशात आहात. तिथं जमिनदार, कारखानदार, मालकशाही या सर्व गोष्टी नाहीशा झाल्या आहेत. इथे माणसाला खरंखुरं स्वातंत्र्य आणि कामाचा हक्क व त्यापासून मिळणारा आनंद लुटायचा आहे.' पण ह्या व्याख्यानाला प्रतिसाद मिळत नव्हता. बरेचजण दुर्लक्ष करत होते. त्यामुळं मला कंटाळा येऊ लागला होता. कपाटं, खुर्च्या, टेबलं वगैरे निर्जीव वस्तूंसमोर मी बोलतोय असं मला वाटू लागलं. 'सर्व मुलांच्या लहान लहान तुकडया पाडायच्या, प्रत्येक तुकडीत वीस मुलं व एक नायक असेल. तुमच्यातले चौदा जण नायक म्हणून तुम्ही निवडा.' ती सारीजणं शांत होती. प्रश्न विचारायला सांगितले तरी ती स्वस्थच राहिली. कुडल्टी व्यासपीठावर आला आणि साऱ्यांना उद्देशून म्हणाला, 'तुम्हाला स्वतःची शरम

वाटली पाहिजे. तुम्ही भाकरी, भाजी, कढी वगैरे रोज खाता. हे सारं तुम्हाला फुकट कोण देणार आहे ते सांगा ना ? समजा, मी उद्या तुमचं जेवण बंद केलं तर काय कराल ? '

तरीही सारे गप्पच.

आता माच कुडल्टी चिडला. मग मी मध्ये पडलो. ' उद्यापासून प्रत्येकानं सहा तास काम केलं पाहिजे. जमीन नांगरायची आहे, पेरणी करायची आहे. ध्यानात ठेवा. तुम्ही काम करणार का नाही ? सांगा. ' असं विचारलं. कोपऱ्यातून एकच आवाज आला. ' होय आम्ही काम करणार. '

सारे मठ्ठ चेहरे आवाजाच्या दिशेकडे वळले व पुन्हा ते एकाच ओळीत आले.

मी झादारोव्हकडे पाहिलं. मला हसून त्यानं प्रतिसाद दिला. आपल्या हातानं माझ्या खांद्यावर थोपटत तो म्हणाला, ' आंतोन, सारं काही ठीक होईल. '



# ४

# सारं काही ठीक

कुर्याझकरांना व्यवस्थित वळण लावण्याबद्दलची आमची चर्चा खूप वेळ लांबली. राबफाकचे विद्यार्थी डॉरमिटरीतून जाऊन मुलांची व त्यांच्या नावांची नोंद करत होते. त्या मुलांच्या तुकडया बनवायच्या होत्या. मी पण निरनिराळया ठिकाणी फिरत होतो व माझ्याबरोबर गोरकोव्हस्कीला घेतला होता. यात माझा हा हेतू होता की चुकून कुठे सामुदायिकाची जाणीव काही मुलांच्यात सापडते का किंवा सुप्त सामाजिक जाणीव दिसते का ? गोरकोव्हस्की माझ्याबरोबर चाचपत फिरत होता. ' तो एखाद्या डॉरमिटरीजवळ जाई व मोठयांदा विचारी, ' कोण आहे रे ? इथं कुणाचा कंपू या खोलीत रहातो ?'

पुष्कळदा प्रतिसाद मिळतच नसे, कारण कोणताच कंपू किंवा एखादा एकटाच मुलगाही त्या ठिकाणी सापडत नसे. ती पोरं कुठं जात हे त्यांचं त्यांनाच ठाऊक ! मग आजूबाजूला उभ्या असलेल्या मुलांना त्या खोलीत कोण रहातात, त्यांची नावं काय, कोणता मुलगा त्यांचा म्होरक्या आहे वगैरे प्रश्न मी विचारत असे. अर्थात फारसं समाधानकारक उत्तर मिळतच नसे. बऱ्याचशा कुर्याझकरांना एकमेकांची नावं माहीतच नव्हती. ते एकमेकांना कान, बुटाचा तळवा, सईस अशा बाह्य खुणांवरुन मिळालेल्या टोपणनावांने ओळखत. या इथं एक देवीचे व्रण असलेला मुलगा रहात असतो व त्या खाटेवर वालकीगावचा मुलगा रहात असे, अशा तऱ्हेचे उत्तर कधीकधी ते देत असत.

काही काही ठिकाणी सामाजिक जाणीव असलेली थोडी मुलं आढळली, पण बाजूच्या वातावरणाचा इतका जबरदस्त परिणाम की ती जाणीव असून नसल्या-सारखीच होती.

रात्रीपर्यंत साधारणपणे या कुर्याझकरांची थोडीफार कल्पना येण्यात मला यश मिळालं, असं म्हणायला हरकत नाही.

ही मुलं खरोखरच निराश्रित, निराधार होती. तरीही ती साधारणपणे उंडगी समजली जात तशी नव्हती. आमच्या वाङ्मयात किंवा बुद्धिमान लोकांच्या मनात निराश्रित म्हणजे पुंडगुंड असा समज असतो. पण खरा निराधार निराश्रित असतो तो अगदी मोठा चतुर तत्ववेत्ता, अराजकवादी विध्वंसक, बनेल व सर्व नीतीनियम धाब्यावर बसवणारा असा सर्वसाधारण समज आहे. भित्र्या व नेभळट शिक्षणतंत्रज्ञांनी समाजशास्त्र, परावर्तित्वशास्त्र वगैरेंसारख्या बोजड, संदिग्ध शास्त्रांतली काही टोपणं, निराश्रित किंवा निराधार या शद्बाला चिकटवून त्यात आणखीनच भडकपणा भरला. त्यांची अगदी पक्की धारणा आहे की निराश्रित किंवा निराधार मुलं कंपू करुन रहातात व त्यांचा एक म्होरक्या असतो; शिवाय त्यांची एक वेगळी पद्धत व ठकबाजी करण्याची विशिष्ट पद्धत असते. त्यांचे काही विशिष्ट कायदेकानू असतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे हे 'स्वयंस्फूर्त सामुदायिक' असतं वगैरे वगैरे, असं अगदी त्यांच्या समजुतीप्रमाणं शास्त्रशुद्ध नाव द्यायलासुद्धा ते कमी करत नाहीत.

या निराधार व्यक्तित्वाच्या कल्पनेला रशियन व दुसऱ्या युरोपियन वाङ्मयात विद्वानांनी जास्त भडकपणा देण्याचा प्रयत्न केला आहे. सगळ्या निराधार व्यक्ती चोर, डाकू, नशाबाज, व्यसनी व गुप्तरोगानं पछाडलेल्या असतात, असे सरसकट विधान करण्यात येते. सबंध जगाच्या इतिहासात 'पीटर दी ग्रेट' यांच्यावरच जास्तीत जास्त पाप करण्याचे खापरही याच लोकांकडून फोडण्यात येते. युरोपा-तील खोडसाळ लोकांना याच कारणामुळे सोविएत देशांतील लोकांच्याबद्दल बदनामीकारक अफवा पसरवण्याला संधी मिळाली.

खरे पहाता, सोविएत देशातील निराश्रित, निराधार मुलांचे आयुष्य या गोष्टीत वर्णन केल्याप्रमाणे मुळीच नाही.

आमचा समाज हा कायमचा निराधार, निराश्रितांचा समाज आहे. रस्त्या-रस्त्यांतून असल्याच, म्हणजे चोर, दरोडेखोरांचीच तत्वप्रणाली चालते हे विधान खंबीरपणे खोडून काढलं पाहिजे. आमच्या देशातल्या अराजकवाद्यांच्या गोष्टी तिखटमीठ लावून सांगणाऱ्या शिष्ट लोकांना सांगणे आवश्यक आहे की क्रांती-नंतर व त्या पाठोपाठ आलेल्या भयानक दुष्काळानंतर निराधार झालेल्या लहान मुलांना घराघरांतून व सामुदायिकांतून महत्प्रयासानं व जिद्दीनं आमच्या संघटित जनतेनं वाचविलं. इतकेच नाही तर मोठंही केलं. असंख्य मुलं देशाभिमानी व समाजसत्तावादाचा अंगिकार केला त्या सोविएत जनतेनं वाढविली. व ती आज

देशातील निरनिराळ्या कारखान्यांत व संस्थांत काम करत आहेत. या मुलांना वाढविताना व शिक्षण देताना शिक्षणतंत्र कशा तऱ्हेनं वापरलं गेलं हा प्रश्न निराळा आहे.

कुर्याझसारख्या संस्थांमधील मुलांचं संगोपन व शिक्षण निराशाजनक ठरलं त्याला कारण म्हणणे या मुलांच्याबद्दल असलेल्या विचित्र कल्पना. ही मुलं परत रस्त्यावर वणवण भटकू लागली कारण (इथं मुलांचाच खास करून विचार चालला आहे) ती कायमची तशीच राहणार होती असं नव्हे किंवा मोकाट भटकणं व रहाणं हेच त्यांना पसंत होतं असंही नव्हे. त्यामागे काही मोकाट मनमानेल तसं राहण्याची वृत्ती आहे असंही नव्हे. ती बिचारी दुसरा चांगला आसरा मिळण्याच्या शोधार्थ भटकत राहिली. त्यांनी अनेक प्रकारच्या शिक्षणसंस्थांचे उंबरठे झिजवले व अनेक सुधारघरे धुंडाळली, पण त्यांना मनासारखं एकही भेटलं नाही. त्यांना चाकोरी-तल्या शिक्षणतंत्रातून न जाता देशाचा, पितृभूमीचा उत्कर्ष करण्यासाठी लागणाऱ्या शिक्षणाची आस होती. बरेच वेळा या घडपडीत त्यांना अपयश आलं. शिक्षणतंत्र आणि शिष्ट व भोंगळ शिक्षणाधिकारी त्या मुलांना आपल्या तावडीतून सुटू देत नसत. ठरीव चाकोरीतील शिक्षण हेच बरोबर व यावरच माणसानं मोठं व्हावं असा त्यांचा आग्रह असे. त्यामुळे शाळाचुकार मुलं एका संस्थेतून पळून दुसऱ्या संस्थेत गेली की त्यांना त्याच त्या चाकोरीतून परत जावं लागे. व म्हणून ती परत तिथून पळ काढीत. एका संस्थेतून भरती होण्याच्या मधल्या वेळात ते आपलं आयुष्य रस्त्यावर काढीत. तांत्रिक ज्ञान किंवा कारकुनी करण्याची कुवत नसल्यामुळं आपल्या भरपूर वेळेचा उपयोग ते महत्वाचा म्हणजे आहाराचा म्हणजेच पोटाचा प्रश्न सोडवण्यासाठी करत. सारी नीतीमत्ता, सारासार विचार बाजूला ठेवत व अगदी रांगड्या पद्धतीनेच तो सोडवीत. इतर प्रश्न सोडवितानासुद्धा तत्वप्रणाली वगैरेंच्या परस्परसंबंधाचा साधकबाधक विचार करणे त्यांना पर-वडत नसे. कारण निराश्रित, निराधारांना औपचारिकपणा माहीतच नसतो. अशा लोकांना वेळेची किंमत माहीत नसल्यामुळे त्यांना घाई नसते. मनात खोलवर आपण कुठेतरी गाडी चालविणं किंवा कारखान्यात कामगार बनणं हेच त्यांनी ठरविलेलं असतं. परंतु त्या ध्येयाप्रत पोचण्यापर्यंत निवांत रहाण्यासाठी जरुर पडेल तेव्हा स्त्रियांचे बटवे व पुरुषांच्या ब्रीफ केसेस पळवायचं काम ते करतात. शेवटी एकदोन कुठल्यातरी छोट्या कारखान्यात किंवा गॅरेजमध्ये जाऊन पोचतात.

मोठमोठ्या ग्रंथांतून खूप कष्ट घेऊन माणसाच्या स्वभावाचे अभ्यास व वर्गीकरण करून निराश्रित, निराधारांसाठी व्यवस्था शोधून काढावी. या सगळ्या वर्गीकरणातून खारकोव्हचे झेरिन्स्की सामुदायिक हेच सर्वात चांगलं ठिकाण आहे असं माझं मत आहे.

निराश्रित, निराधार लोकांचे तीन गट पडतात असं आपण गृहित धरू.

पहिल्या गटातील लोक आपलं भविष्य आपण घडवत असतात. कुठल्याही त्रासाला किंवा कष्टाला ते भीत नाहीत. आपल्याला लोहाराचं काम करायचंय हे ठरवलं असल्यामुळं ते आगगाडीच्या कुठल्या तरी भागात प्रवेश करतात. त्यांना आगगाडीत मिळणाऱ्या जेवणाची किंवा पहिल्या वर्गाच्या मऊ गाद्यागिरद्यांची आकर्षणं नसतात. काही लोकांच्या मते या निराश्रितांना क्रिमियन युद्ध किंवा सोची येथील विशिष्ट पाणी हवंय, यासाठी ते आगगाडीनं तिकडे धावतात. परंतु हे सपशेल चूक आहे. हे असले लोक डायनेपोर बंधारा किंवा ओडेसा निकोलेएव येथील जहाजावर काम करण्यासाठी मॉस्को, खारकोव्ह वगैरे ठिकाणच्या कारखान्यांतून काम करण्यासाठी जातात. त्यांना तसल्याच कामाचं आकर्षण असतं.

दुसऱ्या तऱ्हेचे निराश्रित, निराधार यांच्या अंगात काही कलाकुसर असते. त्यामुळे या पहिल्या प्रकारच्या लोकांपासून ते निराळे पडतात. कापडगिरण्या, मोचीकाम वगैरेंसारख्या कसबी कामांकडे ते धाव घेतात. हे नाहीच जमलं तर ते सुतारकाम, लोहारकाम किंवा कागदाच्या पिशव्या—खोकी वगैरे कामाकडे वळतात. तिसऱ्या प्रकारचे यापेक्षाही खालच्या पातळीवर जातात व काहीही काम करतात.

दुसऱ्या प्रकारची मुलं पण आगगाडी किंवा ट्रॅममधून भटकतात. पण सहसा ते मागच्या बाजूला बसतात. त्यांना झमेरीन्का इथल्या खास व्यवस्थेची किंवा मॉस्कोतल्या कडक नियमांची कल्पना नसते.

झेरेन्स्की सामुदायिकातली मुलं नेहमी पहिल्या प्रतीचे नागरिक बनण्याची खटपट करत. ते आगगाडीतून प्रचार करून आपल्या संस्थेत भरती करत. दुसऱ्या प्रतीची मुलं तिथं फार कमी लेखली जात असत.

कुर्याझमध्ये पहिल्या किंवा दुसऱ्या प्रतीची मुलं नव्हतीच. तिथं फक्त तिसऱ्या प्रतीची मुलं होती. निराश्रित भटक्या मुलांच्यात काय किंवा थोडीबहुत शिकलेल्यांत काय पहिल्या प्रतीची नव्हतीच. दुसऱ्या प्रतीची थोडीबहुत असावीत. पण बहुसंख्य मुलं तिसऱ्या प्रतीचीच होती. ही सारी मुलं कुठेही पळून गेली नाहीत किंवा दुसरा पर्याय शोधण्याच्या भानगडीत पडली नाहीत. त्यांनी आपलं बालपण, अमोल बालपण त्या कामी उपलब्ध असलेल्या समाज शिक्षणाच्या हवाली विश्वासपूर्वक देऊन टाकलं होतं.

मला कुर्याझमध्ये तिसऱ्या प्रतीचीच मुलं आढळली. त्यांच्या साधारण दिलेल्या माहितीवरून ही मुलं दोनतीन संस्थांतून फिरुन आलेली असावीत व काहीजण त्यापेक्षाही जास्त ठिकाणांहून आलेली असावीत. चांगल्या रहाणीबद्दलच्या त्यांच्या आशाआकांक्षांमुळे ती इकडून तिकडे भटकली नाहीत. पब्लिक शिक्षण खात्याच्या काही तरी करण्याच्या आशाआकांक्षा अनेकदा एतक्या ढोबळ स्वरुपात असतात की कित्येकदा तरबेज तज्ञालासुद्धा पुनर्घटन करणे, एकत्रीकरण,

विभागीकरण, पुनर्भरण, काटछाट, प्रगती, विसर्जन, पुनर्बांधणी वाढविणं, नमुने करणं, प्रमाणीकरण, स्थलांतर, पुनर्वसन वगैरे कृतींमधील सूक्ष्म फरक कळणं जड जात असे.

मी कुर्याझला पुनर्घटन करण्याच्या उद्देशानंच आलो होतो. त्यामुळं तिथल्या मुलांनी माझ्याशी बेपवाई दाखवली तर त्यात काही नवीन नाही. जेव्हा जेव्हा शिक्षकांमध्ये बदल होतो, शिक्षण धिकारी बदलतात तेव्हा तेव्हा नवीन आलेल्यांना हा अनुभव येतोच. निराश्रित, निराधार लोकांनी नव्या माणसाकडे दुर्लक्ष करणं किंवा साशंकतेनं पहाणं हे अगदी एक शास्त्रच असतं.

ठरवून औदासिन्य दाखवणं हा शिक्षणक्रम लांबविण्याचा एक अपरिहार्य भाग असतो. यात तंत्रज्ञाचं अगाध ज्ञान दाखवण्याचा हेतू कधीकधी असतो.

बहुतेक सारे कुर्याझकर १३ ते १५ वर्षे वयोगटातले होते. परंतु त्यांच्या चेहऱ्यावर सुसंस्कृतपणाचं कोणतंही लक्षण दिसत नव्हतं. वागण्या–बोलण्याचे संस्कारही त्यांच्यावर झालेले नव्हते हे पटकन नव्या माणसाला प्रथमदर्शनीच जाणवत असे. वास्तविक जन्मापासून ही मुलं समाजशिक्षणाच्या सावलीत वाढली होती. त्याच्या प्रत्येक हालचालीत एक प्रकारची रांगडी स्वयंस्फूर्तता होती. अर्थात त्या स्वयंस्फूर्ततेत निर्व्याज बालिशपणा नव्हता. कुठल्याही गोष्टीला वेडावाकडा प्रतिसाद देण्याची प्रवृत्ती होती. जीवन म्हणजे काय याची त्यांना पुसटशीही कल्पना नव्हती. फक्त खायचे पदार्थ व ते कसे मिळवायचे इथपर्यंतच त्यांची मजल जात होती व त्यासाठी ते काहीही करत. त्यांच्या आयुष्यात ते कशीही दांडगाई करून, रानटी जनावरांप्रमाणे धक्काबुक्की करत जेवण्याच्या, खाण्याच्या भांड्याजवळ पोचत. हे करताना कधी खूप कष्ट पडत, कधी कमी त्रासाने ते हस्तगत करता येई. त्यांच्या व्यक्तिगत आयुष्यात दुसरं काही स्पंदन नव्हतंच. कुर्याझकर साधारणपणे सहजासहजी हस्तगत होईल अशा वस्तूंची चोरी करत किंवा जी झटकन विकली जाईल अशाच वस्तूवर ते हात टाकत. या लहान मुलांना सतत धाकदपटशा दाखवून व माराच्या भीतीनं त्यातल्या लहान मुलांची सपशेल मानखंडना मोठ्या मुलांकडून होत असे. समाजशिक्षणात अलिप्तता, स्वयंशिस्त या गोंडस नावांखाली त्या गुंडगिरीकडे संपूर्ण दुर्लक्ष केले जाई.

ही मुलं तसं पाहिलं तर काही मठ्ठ नव्हती. सर्वसाधारण बुद्धिमत्ता असलेली होती. दुर्दैवानं ती असल्या भयानक वातावरणात येऊन पडली होती. एकीकडे पोषक वातावरणाला बिचारी अंतरली होती व दुसरीकडे जे काय मिळेल ते पोटात भरून त्यांना जगण्याची धडपड करावी लागत होती.

अशा या विचित्र वातावरणात काही निरनिराळ्या स्वभावाची मुलं एकत्र आणली गेली होती. खोव्हराक ज्या डॉरमिटरीत रहात असे, ती जागा म्हणजे कॉलनीतल्या गुंडांचा अड्डाच. माझ्या मुलांनी सांगितलं की त्या डॉर-

मिटरीत सरासरी १५ मुलं रहात होती व कोरटकोव हा त्यांचा दादा होता. या मुलाला मी अद्याप पाहिलेला नव्हता. कारण ही कुर्याझमधली मुलं दिवसाचा बराचसा वेळ जवळच्या शहरात घालवत. असो. आमच्या येवजेन्येवला त्याचे काही जुने ओळखीचे चेहरे दिसले होते; ते तर चक्क दिवसा शहरात चोरी करत व रात्री झोपायला या कॉलनीचा उपयोग करत. विटका गारकोव्हस्कीला यवजेन्येवचं म्हणणं पटलं नाही. 'त्यांना चोर म्हणू नकोस तर मवाली म्हण.' यापुढं जाऊन व्हिटका म्हणाला, 'कोरट्कोव, खोराक, चुरिलोव, पॉडनेव्हेन्स्की व इतर यांनी आपला बराचसा धंदा कॉलनीमध्येच चालवला होता. सर्वप्रथम त्यांनी शिक्षकांचे रहाण्याचे गाळे, तसंच कॉलनीमध्ये असलेली वर्कशॉप व भंडारं वगैरे साफ केली. त्यानंतर कॉलनीत रहाणाऱ्या मुलांच्याकडे असलेल्या वस्तूही साफ करून टाकल्या. एक मेच्या निमित्ताने काही मुलांना नवे बूट देण्यात आले होते. आणि गारकोव्हस्कीच्या सांगण्याप्रमाणे हे बूट मुख्यत्वेकरून विकणं हा त्यांचा सर्वात किफायतशीर धंदा होता. आजुबाजूच्या खेड्यातून तर त्यांनी चोऱ्या केल्याच; परंतु अख्तिरकडे जाणाऱ्या राजमार्गावरही त्यांचा धंदा चालत असे.'

व्हिटकाने आपले डोळे आकुंचित करून, हसून तो म्हणाला, 'आता या पेंढाऱ्यांचा काम करायचा बेत आहे असं वाटतं? सगळी लहान मुलं त्यांना भयंकर भितात. ते समोर आले की चळाचळा कापतात. म्हणून हे सारे जण चांगले दादा झाले आहेत. जरा विचार करा, या लहान मुलांना ते (कुत्र्याची) पिल्लं समजतात. अशी प्रत्येकाची अनेक पिल्ले आहेत. सकाळी उठल्यावर ते या लहानग्यांना जोरातं सांगतात,

'तुम्ही कुठेही जा. वाट फुटेल तिकडे जा; पण संध्याकाळ पर्यंत ह्या ह्या वस्तू आमच्यासाठी घेऊन या.' यापैकी काहीजण गाड्यातून, बाजाराच्या ठिकाणी चोऱ्या करतात. त्यांना चोरीसुद्धा सफाईदारपणे करता येत नाही. म्हणून शेवटी ते भीकच मागतात. भीक मागण्यासाठी ते भर रस्त्यावर, पुलाच्या खाली अशा ठिकाणी उभे रहातात. हे लहानगे सांगतात की भीक मागण्यामुळे त्यांना रोजी २ ते ३ रुबल मिळतात. चुरिलोवची पिल्लं सगळ्यात जास्त चांगली आहेत असं समजतात. ही पोरं दिवसाला जास्तीत जास्त ५ रूबल कमवून आणतात. त्यांच्या वाटणीचे नियमही ठरलेले आहेत. ३/४ दादाला, १/४ स्वतःला. यामुळेच डॉरमिटरीत काहीही राहिलं नाही हा निष्कर्ष बेशक काढावा. या दादा लोकांच्याजवळ चांगले चांगले कपडे, पैसे वगैरे आहेत. पण ते व्यवस्थितपणे लपवून ठेवतात. या पॉड्व्हर्कीच्या परिसरात अनेक जागा आहेत जिथं हे दादालोक सारं काही लपवून ठेवतात. कारण रोज संध्याकाळी हे दादालोक फार उशीरापर्यंत कोठेतरी नाहीसे झालेले दिसतात.

दुसऱ्या तऱ्हेची मुलं म्हणजे मारिकोव्ह व झायचेन्कोसारखी. जरा जास्त

आपुलकीनं चौकशी केली असता असं आढळून आलं की या ग्रुपमधली मुलं फारच थोडी आहेत. या ना त्या प्रकारे आपला आब राखून. दादालोकांनी खूप त्रास दिला. त्यांचे डोळे काढायचं ठरवलं. परंतु आपलं अस्तित्व त्यांनी टिकवून धरलं आहे. मला ही मुलं फार फार आवडतात. त्यांच्यातली सभ्यता व चांगुलपणा हे गुण वाखाणण्यासारखे वाटतात. तसंच त्यांच्या अंगात विनोदबुद्धीही आहे. ही मुलं स्त्रियांचा द्वेष करणारी असून ब्रह्मचर्यावर विश्वास ठेवणारी दिसतात. आमच्या या अग्रेसर तुकडीसह मी जेव्हा डॉरमिटरीच्याजवळ गेलो त्यावेळी त्या मुलांनी माना वरती करून जणू काही मोठ्यानं मोकळा श्वास घेतला व ते सगळे जण डॉरमिटरीच्या दिशेनं धावले. वर त्यांचं केलेलं वर्णन व त्यांच्या बुद्धीचा पडताळा आला. परंतु अजूनही संपूर्णपणे माझ्या बाजूला येण्याची त्यांना भीती वाटत असावी. पण त्यांचा छुपा पाठिंबा खात्रीनं माझ्या बाजूला होता.

मी व व्हिटका चालता चालता अचानक तिसऱ्या प्रकारच्या सामाजिक स्तराकडे वळलो. प्रथम व्हिटकानं मला ती डॉरमिटरी दाखवली. मैदानाच्या लांब कोपऱ्यात लाकडी भिंतींच्या आधारानं एकुलती एक छोटीशी खोली होती. त्याला पुढे लहानसा व्हरांडाही काढलेला होता. त्या छोट्या घरकुलाकडे बोट दाखवून वान्या झायचेन्को म्हणाला, ‘ हे शेतकीतज्ञ इथे राहतात बरं का.’

‘ शेतकीतज्ञ ? एकूण किती जण आहेत ते ?’

‘ चौदा जण.’

‘ चौदा शेतकीतज्ञ ! इतके कशाला ?’

‘ त्यांनी रायचं बियाणं पेरलंय आणि आता ते इथंच राहतात.’ मला खाला-बुडाची आठवण झाली व माझी शंका जास्त दुणावली.

‘ अरे, तुम्ही हे नाव त्यांना दिलेलं दिसतंय. ’

वान्या अगदी गंभीर चेहरा करून व जोरात मान हलवून म्हणाला, ‘ होय. ते खरोखरीच शेतकीतज्ञ आहेत. त्यांनी जमीन नांगरली व रायचं बी पेरलं. पहा बरं, ते वरती आलेलं दिसतंय की नाही. केवढं तरी उंच वाढलंय ते.’

व्हिटकानं जरा रागानंच झायचेन्कोकडे पाहिलं व म्हणाला, ‘ ती निळे शर्ट घातलेली मुलं ना ? ती कॉलनीतली नाहीत ? उगाच आचरटपणा करू नको. ’

‘ आचरटपणा कसला ? ती सारी जण फक्त शिफारसपत्रासाठी थांबली आहेत. ती मिळाली की लगेच ती इथून निघून जातील.’ वान्यानं असं पुन्हा ठासून सांगितलं.

‘ बरं बाबा, चल तर. बघू या तरी तुझे शेतकीतज्ञ कोण आहेत ते.’

आम्ही घरकुलाजवळ गेलो. तिथं दोन खोल्या होत्या. प्रत्येक खोलीत खाटा होत्या. खाटांवरील चादरी बऱ्याच स्वच्छ होत्या. खाटांवर निळे शर्ट घातलेली तरुण मुलं होती. त्यांचे केस वगैरे व्यवस्थित बसविलेले होते. त्यांच्या चेहऱ्यावर

मार्दव होतं. भिंतीवर काही चांगली चित्रे कापून लावलेली दिसत होती. तसेच छोटे छोटे आरसेही मधूनमधून भिंतीवर टांगलेले दिसत होते. खिडकीच्या तावदानांना कागदही लावलेले दिसत होते.

माझ्या अभिवादनाला त्या तरुण मंडळींनी अगदी थंड प्रतिसाद दिला. वान्यानं त्यांची ओळख करून देण्याच्या अतिउत्साहाचाही त्यांच्यावर परिणाम झालेला दिसला नाही.

'पहा बरं, मी सांगितलं तसेच ते शेतकीतज्ञ आहेत की नाही ? व्होस्को-बायनिकोव्ह हा त्यांचा म्होरक्या बरं का ?'

व्हिटकानं माझ्याकडे चमत्कारिकपणे पाहिलं. जणू त्याला सुचवायचं होतं की आपण शेतकीतज्ञांना भेटायला आलो नसून कुणा लाकडी ठोकळ्यांनाच भेटायला आलोय. त्या मानवी आकृती जिवंतपणाचं काही लक्षण दाखवायला नाखूष दिसल्या.

'तुम्ही घाबरू नका हं मुलांनो. पण मला सांगा हे सारेजण तुम्हाला शेतकीतज्ञ का म्हणतात ?' असं मी त्यांना विचारलं.

व्होस्कोबॉयनिकोव्ह हा चांगला उंच होता पण त्याचा चेहरा अगदी निस्तेज होता. आपण कुणी तरी आहोत असा आव चेहऱ्यावर आणायचा तो प्रयत्न करत होता. तो आपल्या खाटेवरून उठला व दोन्ही हात पाटलोणीच्या खिशात घालून आमच्यासमोर उभा राहून म्हणाला, 'होय, आम्ही शेतकीतज्ञ आहोतच व आम्हाला लवकरच आमची शिफारसपत्रे मिळणार आहेत.'

'तुम्हाला शिफारसपत्र कोण देणार ?'

'कोण देणार म्हणजे काय ? अर्थात डायरेक्टर देणार.'

'कुठले डायरेक्टर देणार ?'

'आमचे जुने डायरेक्टर देणार.'

व्हिटकाला एकदम हसू आलं. तो हसतच म्हणाला,

'मला वाटतं मलासुद्धा ते शिफारसपत्र देतील.' व्होस्कोबॉयनिकोव्ह चिडला व रागारागानं म्हणाला, 'यात हसण्यासारखं काय आहे ? तुम्हाला माहीत नसलेल्या गोष्टीत उगाच तोंड खुपसू नका.'

आता व्हिटकाही चिडला. तो म्हणाला, 'मला माहीत आहे तुम्ही सारे महामूर्ख आहात. पण हा सारा गैरसमज इथं कोण पसरवतंय ते आम्हाला जरा सांगशील का ?'

'मला वाटतं तुम्हीच हा सारा आचरटपणा चालवला आहे,' असं व्होस्को-बॉयनिकोव्ह धुसफुसत म्हणाला.

व्हिटकाला आता हे सारं सहन होईना. तो म्हणाला, 'ठीक आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणे होऊ दे'

आम्ही त्यांच्या खाटेवर बसलोच. ते सारे शेतकीतज्ञ रागावून, उद्धटपणे व नाखुशीनेच बोलायला तयार झाले. त्यांना आमच्याबद्दल अविश्वास वाटत होता. परंतु स्वतःला सावरून त्यांनी खालाबुडाच्या रायची हकीगत व त्याबरोबर त्याचं सारं भवितव्य ठरवणारी ती हकीकत सांगितली. आदल्या हिवाळयात खालाबुडानं एक खास प्रतिनिधी रायची पेरणी करण्यासाठी कुर्याझला पाठविला होता. त्यानं कुर्याझमधल्या १५ मुलांना आपल्याबरोबर काम करण्यासाठी तयार केलं. खालाबुडानं त्यांना भरपूर पैसे द्यायचं कबूल केलं. तसंच त्यांना रहाण्याची वेगळी व्यवस्था करून दिली. त्यांना खास नव्या खाटा, गाद्या, पांघरुणं, कपडे, कोट वगैरे दिले. तसंच प्रत्येकाला पन्नास रूबलपण द्यायचं कबूल केलं. पीक आल्यावर प्रत्येकाला शिफारसपत्रही द्यायचं कबूल केलं. साऱ्या गोष्टी मिळाल्या व कबूल केलेल्या साऱ्या चैनीच्या वस्तूही मिळाल्या. त्यामुळे त्या मुलांना शिफारसपत्रेही मिळण्याबद्दल खात्री वाटत होती. ती सारी मुलं जवळजवळ अशिक्षितच होती. दुसऱ्या वर्गापलिकडं त्यांचं कोणाचंही शिक्षण झालेलं नव्हतं. शिफारसपत्र देण्याचं काम वसंतऋतुपर्यंत पुढं ढकललं गेलं. अर्थातच त्या मुलांना त्याचं फारसं काही वावगं वाटलं नाही. खालाबुडाचा खास प्रतिनिधी केव्हाच नाहीसा झाला होता. तो कुठल्या तरी मुलांच्या संस्थेत गेला म्हणे. कुर्याझ कॉलनीच्या डायरेक्टरनं शिफारसपत्राचं काम मोठ्या आवडीनं आपल्या अंगावर घेतलं होतं. कॉलनी सोडून जाण्यापूर्वी त्यानं या मुलांना शिफारसपत्रे तयार आहेत असं दडपून सांगितलं होतं.

'मुलांनो, तुम्हाला अगदी सपशेल फसवलंय,' असं मी त्यांना सांगितलं, 'तुम्हाला खूप अभ्यास करायला पाहिजे, अनेक वर्षे अभ्यास करायला पाहिजे, तरच तुम्ही शेतकीतज्ञ व्हाल. त्या शिक्षणासाठी मोठी विद्यालये, तंत्रशिक्षणाच्या संस्था आहेत. अशा एखाद्या संस्थेत प्रवेश मिळवायचा आहे तर प्रथम प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण पुरं करावं लागतं. बरं मला सांगा, सात वेळा आठ घेतले तर किती होतात ?'

एका काळसर शांत मुलाला मी हा प्रश्न विचारला होता. त्यानं चाचरतच उत्तर दिलं, 'अठ्ठेचाळीस.'

वान्या झायचेन्कोनं दीर्घ श्वास घेतला व आपले डोळे मोठे करून म्हणाला, 'वा रे शेतकीतज्ञ, अठ्ठेचाळीस म्हणे. छान उत्तर दिलंस.'

यावर व्हॉस्कोबॉयनिकोव्हला राग आला व वान्यावर खेकसला. 'तुला मधे तोंड घालायला कुणी सांगितलं. तुला काम करायचंय त्याच्याशी ?' वान्या तरीही हटायला तयार नव्हता. तो अगदी विश्वासानं म्हणाला, 'अरे छपन्न बरं का, छपन्न !'

'बरं असतील कितीतरी.' असं जरा भरदार शरीरयष्टीचा एक मुलगा

म्हणाला. त्याचं नाव स्वाटको असं कळलं. 'अहो, आम्हाला सोव्हकोझमध्ये जागा देऊ असं आश्वासन मिळालंय आणि तुम्ही असं कसं सांगता ?'

'ते करता येईल.' असं मी म्हटलं. 'राष्ट्रीय शेतकी कामात काम करणं उत्तमच. पण तुम्ही साधे कामगार म्हणून रहाल. तुम्हाला शेतकीतज्ञ म्हणून कुणी ओळखणार नाही.'

ते सारे जण चिडीनं रागानं व नैराश्यानं आपल्या खाटांवर दाणकन बसले. स्वाटको तर रागानं एकदम भडकला, 'आम्हाला न्याय मिळणार नाही असं तुम्हाला वाटतं का ? आम्हाला सर्व काही समजतंय. मागच्या डायरेक्टरनं आम्हाला कल्पना दिली होती. तुम्हाला जमीन नांगरून पाहिजे आहे. आणि कोणीही ते करायला तयार नाही. आणि म्हणून तुम्ही आम्हाला बनवाबनवी करायचा प्रयत्न करताय. तुम्ही खालाबुडाशी बोलला असालच. पण तुम्हाला तुमच्या त्या प्रयत्नात यश येणार नाही.'

व्हॉस्कोबॉयनिकोव्ह आपले हात विजारीच्या खिशात खुपसून एकदम खूप उंच उभा राहिला.

'तुम्ही आम्हाला फसवायला इथं आलात काय ? आम्हाला बऱ्याच लोकांनी ही गोष्ट सांगितली होती. आम्ही खूपशी जमिनीत पेरणी केली आहे. आणि खूप कष्ट केले आहेत. तुम्ही आमचा गैरफायदा घेणार आहात असं दिसतंय.'

'मूर्ख बिचारे,' असं व्हिटका शांतपणे म्हणाला.

'असं काय गॉर्कीईट, आम्ही पण तुम्हाला दाखवू शकतो. इथं येऊन आम्हाला बनवायचा व गैरफायदा घ्यायचा प्रयत्न करताय काय ?'

मी जाण्यासाठी उठलो. ते सारेजण आमच्याकडे रागारागानं बघत होते. मी शांतपणे त्यांचा निरोप घेण्याचा प्रयत्न केला.

'हे बघा मुलांनो, तुम्हाला शेतकीतज्ञ व्हायचंय तर जरूर व्हा. आमची आडकाठी नाही. आम्हाला सध्यातरी तुमची जरूरी नाही. तुमच्याशिवाय आम्ही आमचं काम चालवू शकतो.'

आम्ही जाण्यासाठी वळलो. पण व्हिटकाला राहवलं नाही. तो बाहेर पडता पडता म्हणालाच, 'अरे, तुम्ही खरोखर महामूर्ख आहात !'

या उद्गारामुळे ती मुलं साहजिकच चवताळली. व्हिटकाला तिथून धूम ठोकावी लागली.

बालवीर पथकाच्या खोलीत झोरका व्होल्कोव्ह कुर्याझच्या पुढे आलेल्या मुलांमधून तुकड्या बनवत होता. व त्यातल्या काहीजणांना कमांडर केलं होतं. त्यावरून पुन्हा एकदा नजर टाकत होता. मी खरं तर झोरकाला सांगितलं होतं की आपल्याला असले कमांडर नकोत. त्याचा फारसा उपयोग होणार नाही. पण झोरकाला स्वतःच्या अनुभवातूनच हे शिकायचं होतं.

सारे रंगरुट बाकावर बसले होते. त्यांचे उघडे पाय एकमेकांच्या पायावर घासले जात होते. त्या सर्वांच्या मध्ये झोरका एखाद्या वाघासारखा दिसत होता. तो आपले डोळे गरागरा फिरवत होता. ती सारी मुलं बहुधा विचारात गढली होती. त्यांना वाटत असेल की हा एक नवीन खेळ आहे, परंतु जुनाच खेळ यापेक्षा बरा होता. ते झोरकाचं बोलणं ऐकत होते व विनयशीलपणे जणू काही त्याच्या बोलण्याला प्रतिसाद देत होते. त्यांचा तो प्रतिसाद झोरकाला फारसा मानवलेला दिसला नाही.

'अरे तुम्ही हसता काय? कशासाठी तुम्ही हसता? मी बोलतोय ते समजतंय का? गेली कित्येक वर्षे तुम्ही टोळासारखं आयुष्य काढताय. सोविएत सरकार म्हणजे काय हे माहीत तरी आहे का तुम्हाला?' असं झोरका गडगडला. हे ऐकून त्या साऱ्या सुस्तावलेल्या कमांडरनी हसू दाबलं व ते एकदम ताठ बसले.

'मी सांगतो ते ऐका. तुम्ही कमांडर आहात तेव्हा तुमच्या तुकडीतल्या मुलांनी तुमचे हुकूम पाळले पाहिजेत.' एक जरा दिसायला बरा असा मुलगा न आवरणारं हसू काढीत म्हणाला, 'आणि त्यांनी नाही ऐकलं तर?' या मुलाचे नाव पेटुरको होते. त्याच्याकडे बघताक्षणी मी समजलो की हा स्वतःच पक्का कामचुकार असावा.

कमांडर्स म्हणून आलेल्या मुलांत स्पिरीडॉन खोव्हराक होता. बेलुखीन व काराबानोव बरोबर झालेल्या बोलण्यामुळे तो बराच सरळ आला होता. पण तो परत हिरमुसला झालेला दिसला. बहुधा या सगळ्या जुन्या गोतावळ्यात त्याला भरती केलेलं आवडलेलं दिसलं नाही.

त्याच दिवशी संध्याकाळी झोरकाचं ते भावपूर्ण भाषण व कुर्याझकरांचं बेपर्वा हसू यातूनसुद्धा आम्ही कमांडर्स कौन्सिल बनवलं. कॉलनीत असलेल्या सर्व मुलांची नावं लिहून काढली, तसंच दुसऱ्या दिवशी काय करायचं तेही ठरवून दिलं. वोल्कोव व कुडल्टीनं दुसऱ्या दिवशी शेतात काम करण्याची सारी जय्यत तयारी करून ठेवली. ते कमांडर्स व अवजारं अगदी केविलवाणी दिसत होती. हे सारं करून आम्ही झोपायला गेलो. आम्ही कमालीचे थकलेले तर होतोच शिवाय अपयशाची भावनाही तितकीच तीव्र होती. बोरोव्हाय व त्याच्या मदतनीसांनी साफसफाईला केली होती. सुरुवात आधीच साठलेल्या घाणीचे सारे ढीग काढून टाकून तिथे चकचकीत केलं होतं. पण एकंदर कुर्याझचा प्रश्न खरोखर विचित्रच होता. नवीन घडी घालायला कुठून सुरुवात करावी हे समजणं मुश्किलीचं होऊन बसलं होतं.

दुसऱ्या दिवशी राबफाकचे विद्यार्थी खारकोव्हला परत गेले. आदल्या दिवशी कमांडर कौन्सिलमध्ये ठरल्याप्रमाणे सकाळचा बिगूल सहा वाजता वाजला. जुनी घंटा काढून आम्ही चर्चच्या भिंतीवर मंजूळ आवाज काढणारी घंटा बसवली होती. परंतु तो इशारा काही कुर्याझकरांना उठवायला लागू पडला नाही. कॉलनीचा

नेमलेला मॉनिटर इव्हान डेनिसोवीच किरगिझोव्ह आपले लाल रंगाचे नवे कपडे घालून सगळ्या डॉरमिटरीतून डोकावून आला. सगळीकडे फिरुन तो हिरमुसलं तोंड करून परत आला. सगळी कॉलनी अगदी गाढ झोपी गेली होती. जागेपणाची थोडीशी हालचाल तबेल्यात दिसत होती. त्या ठिकाणी आमच्या संमिश्र तुकडीची मुलं शेतात जाण्याची तयारी करत होती. साधारण वीस मिनिटांनी ते सारेजण दोनतीन घोडयांचे नांगर घेऊन शेतावर गेले. कुडल्टी गाडी घेऊन बटाटयाचं बियाणं आणण्यासाठी शहराकडे गेला. त्याला ओढलेल्या, जागरण केलेल्या चेहऱ्याची काही मुलं कॉलनीत येताना दिसली. थांबवून त्यांची झडती घ्यावी किंवा रात्रभर ते कुठे होते हे विचारण्याचं त्याला धाडस झालं नाही. ते अगदी सरळ जाऊन डॉरमिटरीत झोपले. म्हणजे झोपणाऱ्या मुलांची संख्या आणखी वाढली.

आदल्या रात्री ठरल्याप्रमाणे, तसेच या कमांडर्स कौन्सिलनं मान्य केल्याप्रमाणे, कॉलनीतल्या सर्व मुलांनी डॉरमिटरी स्वच्छ करायच्या कामाला सुरूवात करायची होती. तसेच भोवतीच्या मैदानात वाफे करण्याच्या व नवीन जमीन उकरुन नवीन वाफे तयार करण्याच्या कामाला सुरूवात करायची होती. तसेच ती भिंतही पाडायला सुरूवात करायची होती. असा सारा उत्साह. अशा तऱ्हेच्या उत्साहाच्या व आशावादी क्षणी मला आपल्याजवळ मोठी ताकद आहे असं वाटलं होतं. चारशे मुलं ! आर्किमिडीजला चारशे मुलं हाताशी आहेत या जाणीवेनं आनंदातिशयानं कदाचित मृत्यू आला असता. त्यानं कदाचित विचार केला असता, जगाची गती फिरवायला ही चारशे मुलं म्हणजे उत्तम आधार होईल. मलासुद्धा ही दोनशेऐंशी कुर्याझमधली मुलं ही एक माझ्या एकशेवीस गॉर्काइट्सपेक्षा खूप मोठी एकवटलेली ताकद वाटली.

ही सारी एकत्रित ताकद असूनही त्या फाटक्यातुटक्या, घाणेरडया बिछान्यावर अस्ताव्यस्त पडली होती. नाश्ता करायचीसुद्धा त्यांना शुद्ध नव्हती. आम्ही आधीच चमचे व थाळ्या आणल्या होत्या व त्या जेवणाच्या टेबलावर शक्य तितक्या व्यवस्थित मांडून ठेवल्या होत्या. शेलापुटीनने जवळजवळ एक तास घंटा बडविली तेव्हा कुठे काहीजण जेवणघराकडे आस्तेआस्ते येताना दिसले. नाश्ता सरासरी दहा वाजेपर्यंत चालला होता. मी त्यावेळी अनेकवेळा भाषण करुन कोण कुठल्या तुकडीत आहे व त्यांचे कमांडर्स कोण कोण आहेत व प्रत्येक तुकडीला काय काम वाटून दिलंय ते समजावून सांगायचा प्रयत्न केला. मी सरासरी दहा वेळा तरी हे सांगितलं असेल. पण ती सारीजण खाण्यात गर्क होती. वर मान करुन एकानंसुद्धा बघण्याचं सौजन्य दाखविलं नाही. आज केवढी उत्तमपैकी खीर बनवली होती हे त्या कारटयांच्या गावीही नव्हतं. शिवाय प्रत्येकाला पावावर लोणीसुद्धा ठेवलं होत. त्यांनी अलिप्तपणे खीर खाल्ली, लोणी खाल्लं व पावाचे तुकडे करुन विजा-

रीच्या खिशात कोंबले. हळूहळू ते सारेजण जेवणघरातून बोटं चाटत बाहेर पडले. मी त्यांच्याकडे बघत होतो याची त्यांनी एकदासुद्धा दखल घेतली नाही. मी मात्र आर्किमिडिजच्या आशेनं त्यांचे चेहरे न्याहाळत होतो.

मिशा ओवचारेन्को चर्चच्या पायरीवर वाट पहात उभा होता. त्याच्याकडे एकजणसुद्धा फिरकला नाही. चर्चच्या पायरीवर, मिशाच्या बाजूलाच काल खरेदी केलेली फावडी, कुदळी व झाडू रचून ठेवलेले होते. मिशाच्या हातात नवीन वही, तीही कालच खरेदी केलेली, होती. या वहीत कोणती अवजारं कोणाला दिली हे तो लिहून ठेवणार होता. मिशा भोवताली सारं सामान घेऊन उभा होता. तो एखाद्या अजागळासारखा दिसत होता. कारण एकही पोरटा त्याच्याकडे फिरकला नाही. वान्या झायचेन्कोला दहाव्या तुकडीचं कमांडर केलं होतं. ती तुकडी सारे त्याचेच सवंगडी घेऊन बनवली होती. पण त्याचाही पत्ता नव्हता. त्याच्यावर व त्याच्या मित्रांवर मी केवढा विश्वास टाकला होता. मला तो जेवणघरात नाश्ता घेतेवेळी पण दिसला नव्हता. नव्या कमांडर्सपैकी जेवणघरात खोव्हराक तेवढा दिसला होता व तो आता माझ्या बाजूला येऊन उभा होता व जाणाऱ्या मुलांच्या घोळक्याकडे निर्विकारपणं पहात होता. खोव्हराकची तुकडी चर्चची भिंत पाडायचं काम करणार होती. त्यासाठी मिशानं पहारी वगैरे तयार ठेवल्या होत्या. खोव्हराक त्याला दिलेल्या कामाच्या बाबतीत काही बोलण्याचं टाळत होता. बेरकीपणे तो दुसऱ्याच गोष्टीचं–नेमून दिलेल्या कामाच्या व्यतिरिक्त–बोलणं उकरुन काढत होता.

'गॉर्की कॉलनीतल्या मुली फार सुंदर आहेत असं म्हणतात ते खरं आहे का ?' खोव्हराकनं विचारलं.

मी त्याला उत्तर न देता बाजूला निघून गेलो. पण तो लोचटपणे माझ्या मागेमागे येत राहिला. त्याच्या मूर्खासारख्या विधानाचा माझ्यावर काय परिणाम होतो ते अजमावण्यासाठी माझ्या तोंडाकडे पहात राहिला.

'असं म्हणतात की तुमच्या स्त्री–शिक्षिका फार कडक आहेत म्हणे ! त्या इथे आल्यावर खूप मजा येईल नाही ? इथेसुद्धा काही स्त्री शिक्षिका होत्या. त्या तशा वाईट नव्हत्या. पण तुम्हाला काय सांगू. अहो त्यांना माझ्या डोळ्यांची भीती वाटायची. मी नुसतं त्यांच्याकडे बघितलं तरी त्या लाजून चूर व्हायच्या. माझी नजर काय एवढी वाईट आहे का ? तुम्हीच सांगा. पण असं होत असे.'

'तुझी तुकडी कामाला का गेली नाही सांग पाहू ?' असं मी विचारलं.

'खरं सांगू. मला समजत नाही हे सारं कशाला करता ? मीच गेलो नाही तर माझी तुकडी का गेली नाही ते मला कसं माहीत असणार ?'

'अरे पण तू का गेला नाहीस ?'

'काम करायला जायला मनच होत नाही' असं म्हणून तो अगदी मोठ्यांदा

हसला. डोळे बारीक करून तो चर्चच्या वरच्या क्रॉसकडे पहात राहिला. परत तो मला म्हणाला, 'जवळच्या पॉडव्होरकी गावात काही तरूण मुली आहेत. मी त्यांची तुमच्याशी ओळख करून देईन.'

आदल्या दिवसाच्या संध्याकाळपासून मी उफाळणारा राग मोठ्या कष्टानं आवरत होतो. आता मात्र खरोखर आतमधून काहीतरी धुमसत वर येऊ लागलं होतं. अगदी आतल्या मनातून तो राग लवकरच वर येईल व बाहेर पडेल असं वाटू लागलं होतं. पण इतक्यात माझ्या मेंदूकडून हुकूम आला, 'सावधान'! आणि सारी गात्रं एकदम मोकळी व्हायला लागली व त्याच त्या आतल्या हुकूम करणाऱ्या शक्तीनं मला सांगितलं की त्या मूर्ख खोव्हराकला सोडून दे. वान्या झायचेन्कोची तुकडी नेमलेल्या वेळी कामाला का गेली नाही त्याचा तपास कर. वान्या नाश्ता घ्यायला सुद्धा आला नाही.

मी खोव्हराकला सांगितलं, 'तू इथून चालता हो पाहू'. माझ्या वागण्याचं खोव्हराकला आश्चर्य वाटलं. पण तो तिथून निघून गेला. मी वान्याच्या डॉरमिटरी-कडे माझा मोर्चा वळविला. वान्या एका गादीवर पडला होता व त्याची सारी मित्रमंडळी त्याच्याभोवती जमा झाली होती. त्यानं आपला एक हात डोक्याखाली घातला होता व दुसरा त्या मळकट उशीवर ठेवला होता.

'काय झालं रे?' मी पुढे होऊन विचारलं.

ती सारी मुलं जरा बाजूला सरकली व मला त्यांनी जागा करून दिली. ओडारयूकनं क्षीणपणे हसण्याचा प्रयत्न केला व तो हळू आवाजात म्हणाला,

'त्याला काल कोणीतरी मारलं.'

'कोणी मारलं?'

वान्याचा आवाज घुमला, 'कोणी मारलं माहीत नाही. गंमत म्हणून मारलं. रात्री ते आले. त्यांनी घोंगडं टाकून मला झाकून टाकलं आणि साऱ्या अंगभर मार दिला. माझ्या छातीत दुखतंय.'

वान्याचा आवाज तसा खणखणीत आला. त्याच्या मरगळलेल्या चेहऱ्याच्या अगदी उलट.

कुर्याझच्या जवळपास एक छोटंसं इस्पितळ होतं एवढं मला आठवत होतं. त्या सगळ्या रिकाम्या घाणेरड्या खोल्यांपैकी एका खोलीत एक बाई रहात असे. मी तिला बोलवायला मॅलिकोव्हला पाठवलं. मॅलिकोव्हला दारातच शेलापुटीन भेटला.

शेलापुटीन म्हणाला, 'अंतोन सेम्यियानोविच, काही लोक गाडीतून आले आहेत व त्यांना तुम्हाला भेटायचंय.'

मी पुढे येऊन पाहिलं तर एका मोठ्या फियाट गाडीजवळ ब्रेगेल, झोया आणि क्ल्यामर उभे होते. ब्रेगेलनं अगदी शिष्टपणानं हसून पाहिलं.

'काय तुम्ही ताबा घेतला?'

'हो, घेतला.'

‘कसं काय, सर्व ठाकठीक आहे ?’

‘हो. तसं म्हणायला हरकत नाही.’

‘ठीक म्हणायला पाहिजेच.’

कॉम्रेड झोया माझ्याकडे जरा अविश्वासानंच पहात होती.

क्ल्यामर आजूबाजूला न्याहाळून पहात होता. ते माझे शंभर रूबल पगाराचे शिक्षक कुठे दिसतात ते पहात होते. इस्पितळाची ती आया आमच्या बाजूनं अडखळत अडखळत चालत वान्या झायचेन्कोकडे गेली. तबेल्यातून व्होलकोव्हचा रागारागानं बोलण्याचा आवाज आला.

‘हलकट. तुम्ही माणसांची व जनावरांची दोघांचीही फार मोठी हानी केली आहे. एक जोडीसुद्धा नीट काम करू शकत नाही. तुम्ही खरोखर नालायक आहात. हे घोडे नाहीत. आणि काहीच नाही.’

कॉम्रेड झोया एकदम चमकली. तिनं जागच्या जागी पायांची चाळवाचाळव केली व आपल्या डोक्याला एक झटका दिला.

‘ह्यालाच आम्ही समाजशिक्षण म्हणतो’. मी एकदम मोठ्यांदा हसलो.

‘याला मी समाजशिक्षण म्हणत नाही. पण त्या बिचाऱ्याला आपल्या मनातलं खरंखुरं व्यक्त करायला बरोबर शब्द सापडत नाहीत असा त्याचा अर्थ.’

‘अस्सं म्हणता, शब्द सापडत नाहीत काय ?’ असं म्हणून क्ल्यामर छद्मी-पणानं हंसला, ‘मी म्हणेन त्याची तेवढीच मजल आहे.’

‘का बरं ? प्रथम त्याला काहीच माहीत नव्हतं. मग हेच शब्द प्रथम त्याच्या कानावर आले.’

ब्रेगेलला काहीतरी बोलायचं होतं. माझ्याकडे तिनं एकटक पाहिलं. परंतु ती काहीच बोलली नाही.

□

५

# गद्यकाव्य

दुसऱ्या दिवशी मी कोव्हलला खालील आशयाची तार पाठवली: 'सर्व मुलं व सर्व शिक्षकवर्ग ताबडतोब कुर्याझला पहिल्या गाडीने निघून या.'

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी मला तारेचं उत्तर मिळालं: 'गाडीत सर्वांना जागा मिळत नाही. परंतु सर्व शिक्षकवर्ग आजच निघत आहे.'

कुर्याझमध्ये एकच गाडी होती. त्यातून दोन वाजता रायझोव्ह स्टेशनवरून एकातेरिना, ग्रीगोरयेवना, लिडीया, पेट्रोव्हना, बुरसाई, झुरबीन आणि गोरोविच कुर्याझला येऊन पोचले. जुनी शिक्षकमंडळी रहात होती त्यातून काही खोल्या साफ करून तिथं त्यांची व्यवस्था करून दिली. खाटा कशाबशा गोळा केल्या व गाद्या शेजारच्या शहरातून विकत आणल्या.

ही पुनर्भेट खरोखर फार आनंदाची झाली. शेलापुटीन व टोस्का यांनी वयाचं अंतर सोडून एकमेकांना मिठी मारली. इतकंच नव्हे एकमेकांचं लहान मुलां-सारखं चुंबन घेत होते. गॉर्कीइट्सही अगदी छान व उत्साही दिसत होते. त्यांच्या चेहऱ्यावरून गॉर्की कॉलनीत सर्व ठाकठीक असल्याची खात्री मिळत होती. एकेटेरिनानं पुढे सांगितलंच 'आंतोन, तिकडे सारी तयारी झाली आहे. ती सारी-जण फक्त गाडीत जागा मिळण्यासाठी थांबलो आहेत.'

'मुलं कशी आहेत?'

'मजेत आहेत. पोरं सध्या पेटयांवर झोपतात. आणि कमालीची अवधीरी

आहेत. आपली मुलं खरोखर भाग्यवान आहेत. आपण तसे सारे जण सुखी आहोत. आहोत की नाही ? तुम्ही कसे आहात ?'

'मीसुद्धा खूप आनंदीत आहे असं म्हणायला हरकत नाही.' असं मी जरा सावधानतेनं म्हटलं, 'पण या कुर्याझमध्ये कोणी सुखी आहेत असं वाटत नाही.'

'का काय झालं ?' असं लिडोचकानं जरा काळजीच्या सुरात विचारलं.

'तसं काही भयंकर झालेलं नाही.' असं व्होलकोव्हनं जरा घुश्यातच सांगितलं. 'आम्ही इथं आहोत तेवढे पुरे पडत नाही. एवढंच. इथं शेतातून खूप काम पडलंय. आमची पहिली संमिश्र तुकडी म्हणा किंवा दुसरी संमिश्र तुकडी म्हणा, काही म्हणा'.

'अरे पण कुर्याझची पोरं कुठे आहेत ?'

मुलं एकदम मोठ्यांदा हसली. व म्हणाली, 'थांबा, आता तुम्हाला दिसेलच सारं काही.'

प्योटोर इव्हानोविच गोरोविचनं आपला ओठ चावला व प्रथम मुलांकडे नंतर काळचाकुट्ट झालेल्या खिडक्यांच्या तावदानांकडे व नंतर माझ्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनं पाहिलं.

'आपल्या दुसऱ्या मुलांनी खरोखर ताबडतोब इथं येण्याची जरूरी आहे ?'

'होय तर, अगदी तातडीनं येण्याची जरूरी आहे. गॉर्काईट्सनी या साऱ्या गोंधळातून वाचविण्यासाठी जितक्या लवकर येणं शक्य आहे तितक्या लवकर येण्याची जरूरी आहे. नाहीतर आपली फजिती अटळ आहे.'

प्योटोर इव्हानोविचनं आपला घसा साफ केला. ते म्हणाले, 'काय करायला पाहिजे ? तुम्हालाच परत कॉलनीकडे जायला पाहिजे. आम्हाला इथे थोडा त्रास होईल यात शंका नाही. पण इलाज नाही. रेल्वेवाले आपले पेटारे वाहून आणायला भरमसाट पैसे मागताहेत. ते थोडीसुद्धा सवलत द्यायला तयार नाहीत. त्यांचा हा पद्धतशीर खोडसाळपणा चाललाय. तुम्हाला एका दिवसासाठी तरी गेलंच पाहिजे. कोव्हलचं रेल्वेवाल्यांबरोबर भांडण झालंय.'

आम्ही सारे एकदम गप्प झालो. व्होल्कोव्ह आपले खांदे मागेपुढे करत उभा होता. त्यानं घसा साफ केला व एखाद्या वयस्क माणसासारखा बोलला, 'होय. तुम्ही जाच तिकडे. जितक्या लवकर जाता येईल तेवढं लवकर जा. आम्ही इथे कसंतरी सांभाळून घेऊ. आहे त्यापेक्षा काही जास्त वाईट परिस्थिती येणार नाही. आपल्या मुलांना जास्त इकडेतिकडे रमू नका म्हणून समजावून सांगा.'

इव्हान डॅनिसोविच खिडकीत बसला होता. तो सहजपणे आपल्या हातातील घड्याळाकडे बघत म्हणाला, 'आता दोन तासांनी तिकडे जाणारी गाडी आहे. ती तुम्ही सहज पकडू शकता. तुमची शेवटची काय इच्छा असेल ती बोलून टाका.'

'कसली इच्छा घेऊन बसलात ! काय त्याचा उपयोग ? हो. एक करा. तुम्ही कधीही जबरदस्ती करु नका. तुम्ही सहाजण आहात. तुम्हाला २–३ तुकड्या

आपल्या बाजूला वळवून घेता आल्या तर पहा. नीट ध्यानात ठेवा. तुकड्याचं आपल्या बाजूला वळवून घ्यायच्या हं ! वैयक्तिक असं कोणालाही आपल्याकडे घ्यायचं नाही. '

' म्हणजे मतपरिवर्तन करायचं हो ना ? ' असं गोरोविच जरा नाराजीच्या सुरात म्हणाला.

' होय, तसंच काहीसं. पण ते कुणाच्या लक्षात येईल अशा तऱ्हेनं करू नका. त्यांना समजावून सांगायचा प्रयत्न सोडू नका. आपण काय करू शकतो, कॉलनी कशी स्वच्छ व्यवस्थित लावू शकतो, मोडतोड झालेली दुरुस्त करू या वगैरे वगैरे. अरेच्या, पण तुम्हाला मी यात काय शिकविणार ? तुम्ही सर्व चांगले जाणकार आहात. एकाच दिवशी तुम्ही हे सारं करू शकणार नाही, परंतु थोडी उत्सुकता जागी करणं शक्य आहे. '

माझ्या डोक्यात कमालीचा गोंधळ उडाला होता. निरनिराळ्या परस्परांना पूरक किंवा अवरोधक कल्पना व विचार यांची एकच गर्दी उसळली होती. त्यातील एखादी जरी मला जुळेल असं वाटलं तरी माझं मलाच वाटे की नाही ही आपली एक सहज तरळती कल्पना होती.

शिक्षणशास्त्राला त्याचं तंत्र असतं. विज्ञानशास्त्र असतं, रसायनशास्त्र असतं, भूमितीशास्त्र असतं. इतकंच नव्हे, तर अध्यापनशास्त्राचं तत्वज्ञान असतं. मला समजेना, मी त्या सहाजणांना कुर्याझच्या त्या अंधःकारमय वातावरणात कसं सोडलं. मी त्यांना मारे जरा प्रचार करा म्हणून सांगितलं. माझ्या मनात ते सहाजण चांगले सुसंस्कृत, गंभीर व चांगले विचारवंत आहेत. परंतु कुर्याझच्या त्या बिघडलेल्या वातावरणात त्यांचं अस्तित्व म्हणजे चमचाभर मध डांबराच्या पिपात टाकून त्याचा परिणाम पहात रहाणं. कुर्याझ एवढं ओंगळ आहे का ? माझं रसायनशास्त्राचं ज्ञान तसं फारच तुटपुंजं. कुठचीही रसायनांची झालेली प्रतिक्रिया व तिचा निकाल हे संपूर्णपणे मिळालेच नाहीत. रसायनशास्त्र इथं लावायचंच झालंच तर वेगळ्या प्रकारचं रसायनशास्त्र इथं लावायचं. इथे स्फोटक स्वरुपाचं, भडका उडविणारं किंवा धक्का देणारं, चर्चच्या भिंती, विचित्र कपडे, बालमानस-शास्त्र, शिफारसपत्रे, असले शेतकीतज्ञ या सर्वांना धडका मारुन उंच उडवून देईल असं स्फोटक रसायनशास्त्र पाहिजे.

मी व माझी संमिश्र तुकडी यांना एखाद्या बंदुकीत ठासून भरुन टाकले तर आमच्यात धडाका उडवून देण्याचं चांगलं सामर्थ्य आहे. मला १९२० सालची आठवण झाली. आम्ही त्यावेळी धडाकून सुरुवात केली होती. आमच्याजवळ स्फोटक द्रव्यही पुष्कळ होतं. मी स्वतः त्यावेळी अगदी गोगोलच्या वाकुलासारखा हवेत तरंगत होतो. मला कशाचीही भीती म्हणून वाटत नसे. पण आता निराळी परिस्थिती होती. आता माझ्या डोक्यात भलत्यासलत्या कल्पना भरविल्या होत्या.

एखाद्या शिक्षणतज्ञालाच असले दांभिक व ढोंगी उपहार शोभले असते. असो. पुन्हा विचार आला, 'आई, एकत्र छोटासा स्फोट मी करणार आहे.' 'ठीक आहे,' उत्तर मिळालं, 'पण मुलांच्या भावना जराही दुखविता कामा नये.'

इथं स्फोट होण्याची आशा नाही. 'व्होलकोव्ह, गाडी ताबडतोब जोड.' मी निघालो. एका तासानं मी गाडीमध्ये उघड्या खिडकीजवळ उभा होतो. आकाशातले तारे न्याहाळत होतो. गाडी अगदीच भिक्कार होती. आत बसायला बाकं सुद्धा नव्हती.

गाडी सुरु झाल्यावर डोक्यात विचारचक्र सुरू झालं. मी खरोखर कुर्याझमधून पाठ फिरवून पळून तर आलो नाही ना! का माझ्यामधल्या त्या सुप्त स्फोटक शक्तीला घाबरुन पळून आलो. मलाच माझी समजूत घालावी लागली. स्फोटक द्रव्य हे नेहमीच नाश करणारं असतं. मी कशाला त्याच्याबरोबर खेळावं? माझे एवढे उत्तम तयार गॉर्काइट्स असताना कशाची भीती? आणखी चार तासांनी मी ही घाणेरडी कुबट अंधारी गाडी सोडून माझ्या प्रियजनांमध्ये जाऊन पोचेन.

मी घोड्याच्या गाडीतून कॉलनीत येऊन पोचलो. सूर्य त्यावेळी पश्चिमेकडे कलला होता. सारी मुलं सगळीकडून मला पाहताच माझ्याकडे धावत आली. मी त्यांना कॉलनिस्ट म्हटलं नव्हे, ते सारे जणू काही रेडियमची उत्पत्ती! आमचा गालाटेन्को, त्याला धावणं पसंत नाही. धावणं हाही एक वाहतुकीचा प्रकार असतो हे मानायला तो तयार नसे. पण त्यानंही लोहारखात्यातून डोकावून पाहिलं व ताडकन् उठून पळत येऊ लागला. पळताना तो दारियस राजाच्या हत्तीसारखा दिसत होता. त्यानंही इतरांच्या सुरात आपला सूर मिळवला. सारेजण आनंदी, आश्चर्यचकित व अवधीरे दिसत होते, 'आंतोन, कसं काय कुर्याझ? चांगलं आहे का?'

गालाटेन्कोकडे पाहून विचार आला, यानं हे निर्व्याज मोकळं हसू कुठं मिळविलं? हे कमावलेलं शरीर व डोळ्यांची नियमित उघडझाप कुठे कमावली? हे निर्मळ डोळे एखादं औषध लावून केले? का नुसते शुद्ध पाण्यानं धुवून आकर्षक केले? अजून जीभ जरी बोलताना अडखळत असली तरी तिला आपली भावना दर्शविता येते.

'अरे तुम्ही सारेजण इतके मजेत कसे रे आहात? आज काही नृत्य वगैरे नाही ना?' असं मी विचारलं.

'हो तसं म्हणा हवं तर! आज पहिलाच दिवस असा आहे की आम्हाला काहीही काम नाही. आज संध्याकाळी आपल्या आजूबाजूच्या मित्रांना 'फ्ली' हा नाट्यप्रयोग दाखवायचा ठरवलंय व त्यांना कायमचा रामराम करायचा. हो, पण तिथं कसे काय चालले आहे ते आम्हाला सांगा ना.' असं लापोट म्हणाला.

सारी मुलं नव्या पाटलोणी व व्हेलवेटच्या टोप्या घालून फिरत होती. हे कपडे कुर्याझमधल्या मुलांवर छाप पाडण्यासाठी शिवले होते. त्या नव्या कपड्यात

माझे गॉर्काइट सुट्टीच्या मूडमध्ये दिसत होते. सहाव्या तुकडीची मुलं रात्रीच्या कार्यक्रमाची तयारी करण्यात गुंतली होती. झोपण्याच्या खोल्या, शाळा, निरनिराळी वर्कशॉप्स, खेळाची खोली या सर्व ठिकाणी सामानांनी भरलेल्या पेट्या, गाद्या व इतर सारं सामान रचून ठेवल्यामुळे भरुन गेल्या होत्या. सारी रिकामी जागा झाडून पुसून स्वच्छ करून ठेवली होती. शुरा व झेलवीच्या अकराव्या तुकडीकडे ही सारी जबाबदारी सोपविली होती. माझी आईसुद्धा तिचं सारं सामान आवरून टाकल्यामुळे त्या ट्रंका, पेट्यांमध्ये जागा करून बसली होती. मुलांनी आईसाठी एक घडीची खाट ठेवली होती. या व्यवस्थेबद्दल शुराला फार अभिमान वाटत होता. 'आंतोन, आजी काही आमच्यासारखी गवतावर झोपू शकत नाही. आम्ही सर्वजण सध्या गवतावरच झोपतो. गाद्यांपेक्षा गवतावर झोपायला मजा वाटते. आपल्या मुली सध्या गाड्यांमधून झोपतात. त्या नेस्टेरेन्कोनं कालच तर खरा ताबा घेतला. पण तो आमच्या सारखा मागे लागला आहे. त्याला आपण सारी कॉलनी दिली. पण थोडंसं गवत द्यायला तो कटकट करतो. ते जाऊ दे. आम्ही आजीचं सामान बांधलंय ते तुम्हाला पसंत पडलं का ? आजी, तूच सांग पसंत आहे का नाही ?'

आजीनं स्मितहास्य केलं. पण तिनं बरोबर त्यांना एका बाबतीत अडवलं.

'अरे, तुम्ही सारं छान मोहोरबंद केलयत. पण तुमचे डायरेक्टर कुठे झोपणार आज ?'

'आजी, त्याची काळजी करु नकोस. त्यांची आम्ही बरोबर व्यवस्था लावू. आमच्या अकराव्या तुकडीकडे छान मऊ गवत आहे. एडवर्ड निकोलायेविच आम्हाला रागावलासुद्धा की इतकं चांगलं गवत झोपायला वापरणं म्हणजे गुन्हा आहे. पण आम्ही त्याच्यावर झोपलो व नंतर ते मोलोडेट्सला देऊन टाकलं. आणि त्यानं काही तक्रार न करता ते खाल्लं. आंतोनसाठी आम्ही छान जागा शोधून काढू. आजी तू निर्धास्त रहा.'

बरीचशी मुलं शिक्षकांच्या खोल्यांमधून राहिली होती. कारण तिथं बरंचसं सामान पडलेलं होतं. कोव्हल व लापोट लिडोचकाच्या खोलीत रहात होते. कोव्हल रागानं धुसफुसत खिडकीमध्ये बसला होता. तो तोंडानं रेल्वे अधिकाऱ्यांविरुद्ध बडबडत व जोरजोरात हातवारे करत होता.

'हे उद्दाम नोकरशहा आहेत. आम्ही त्यांना किती समजावून सांगितलं की हे मुलांसाठी आहे. पण ते विश्वास ठेवायला तयार नाहीत. मी त्यांना म्हणालो, 'अहो आमच्या मुलांच्या काय जन्मतारखेचे दाखले तुम्हाला आणून देऊ ?' पण त्यांचे जन्मतारखेचे दाखले नाहीतच. पण त्यांच्याजवळ बोलण्यात काही अर्थ नाही. म्हणे एक मोठा माणूस आपल्याबरोबर एक लहान मुलाला तिकीटाशिवाय गाडीनं नेऊ शकतो. पण त्यांचं म्हणणं हे एक मूल मोठ्या माणसा-

शिवाय प्रवास करणार आहे. कसं समजावयाचं त्यांना ? त्यांची डोकी नाहीत खोकी आहेत. परत त्यांना समजावलं की हे आमचं सामुदायिक आहे आणि आम्हाला सामान न्यायचंय हो. त्यासाठी आम्ही मालगाडीचे डबे मागतो. पण एखाद्या ठोकळ्याबरोबर बोलण्यात अर्थ नाही. ते नुसते हिशेब करत रहातात. माल, त्याचं भाडं, वेळ लागला तर भरावा लागणारा भुर्दंड. मग ते सारे नियम शोधून काढत बसतात. घोड्याला न्यायचा आकार निराळा. घरगुती सामान न्यायचा आकार वेगळा, शिवाय शेतीची अवजारं असली तर वेगळा. मी त्यांना म्हटलं, 'अहो तुम्ही आम्हाला काय एखादे मध्यमवर्गीय कुटुंब एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जातंय असं समजलात काय ?' काही नाही. तिथं बसून आपल्या कामात अडथळे आणण्याखेरीज त्यांना काही समजत नाही... ...म्हणे तुम्ही मध्यमवर्गीय असा नाहीतर कोणी असा; आम्ही ओळखतो फक्त प्रवासी... ...गाडीनं जाणारे प्रवासी व इकडून तिकडे पाठवला जाणारा माल. मी शेवटी त्यांना वर्गीय दृष्टिकोनातून समजावण्याचा प्रयत्न केला तर ते जास्तच रागावून म्हणाले, आम्हाला वर्ग वगैरे समजत नाही, इथं आम्ही फक्त जकात जाणतो.'

कोव्हलच्या या रेल्वेच्या अधिकाऱ्यांविरुद्धच्या तक्रारी किंवा कुर्यांझमधले माझे वाईट अनुभव याकडे लक्ष न देता, पुन्हा पुन्हा चांगला विषय काढायचा लापोट एकसारखा प्रयत्न करत होता. जणू काही कुर्यांझ या नावाची काही संस्था अस्तित्वात नाहीच असे भासवायचा त्याचा प्रयत्न होता. खरं तर थोड्याच दिवसात त्याला त्या अपशकुनी जागी जाऊन कमांडर्स कौन्सिलचं पुढारीपण करायचं आहे हे तो विचारात घ्यायला तयार नव्हता. त्याच्या त्या खिदळण्यामुळे मी प्रथम नामोहरम झालो होतो. पण माझी नाउमेद हळूहळू त्याच्या त्या विनोदामुळे कुठल्याकुठे विरघळून गेली. मीही इतरांच्या बरोबर हास्यविनोदात व गप्पात रंगून गेलो. रोजच्या दैनंदिन चाकोरीतून जरा फुरसत मिळाल्यामुळे लापोटची विनोदबुद्धी खूपच तयार झाली होती. त्याच्याजवळ काहीतरी जबरदस्त आकर्षण होतं. त्याच्याभोवती नेहमी खूपसा घोळका असे. लोक त्याच्यावर बेहद्द खूष असत. सगळ्या प्रकारचे लोक– उदा. मूर्ख, वेडे, त्याच्यावर श्रद्धा ठेवणारे किंवा निराधार असे– त्याच्याभोवती पिंगा घालत. तो बरोबर माणसांची पारख करी व त्याप्रमाणे त्यांची वर्गवारी लावी, व त्याप्रमाणे त्यांचा समाचार घेत असे. लोक त्याच्यासमोर अतिसूक्ष्म नाजूक सौंदर्याची चर्चा करत, तसंच काही मासलेवाईक व्यक्तीच्या नमुन्यांची चर्चा करत.

गुस्टायव्हन या सगळ्या भानगडीत चक्रावून गेला होता. त्याच्याकडे पाहून लापोट म्हणाला, 'अरे तिथं अवाराच्या मधोमध चर्च आहे. त्या चर्चला पालक नाही. तुलाच आम्ही पालक नेमू.'

गुस्टायव्हनचे ओठ थरथरले. तो म्हणे रोज रात्री खोलीच्या अंधाऱ्या

कोपऱ्यात प्रार्थना म्हणत असतो. त्याला मुलं चिडवीत तरी तो कधी रागावला नाही त्याला त्याच्यात आपला मोठेपणाच वाटत असे. बाकं बनविणारा आमचा कोझीर तसा गप्प बसणारा नव्हता. कोझीर म्हणाला, 'कॉम्रेड लापोट, असं कशाला बोलतोस, परमेश्वर तुला क्षमा करो. गुस्टायव्हन पालक कसा होईल ? त्याला पोपचा आशीर्वाद थोडाच आहे !'

लापोटनं आपल्या डोक्याला जोराचा हिसडा दिला.

'अरे कसले आशीर्वाद घेऊन बसलास. आम्ही त्याच्या अंगावर पालकाचे कपडे चढवू. मग बघ तो कसा मस्त पालक होतो का नाही !'

'छे छे ! त्याला मोठ्या धर्मगुरुचा आशीर्वाद असलाच पाहिजे.' असं पुन्हा एकदा कोझीरनं ठासून सांगितलं. 'धर्मगुरुचा हात त्याच्या डोक्यावर ठेवला गेलाच पाहिजे.'

लापोट कोझीरच्या पुढ्यात उकीडवा बसला व त्याच्याकडे डोळे मिचकावून बघत म्हणाला,

'गफार जरा थांब. मला याचं उतर दे. तुझ्या त्या धर्मगुरुला काय अधिकार असतो सांग पाहू.'

'अर्थात धर्मगुरुला अधिकार असतोच.'

'कमांडर्स कौन्सिलला अधिकार असतो हे तुला मान्य आहे ना. मग झालं तर. कमांडर्स कौन्सिल त्याच्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद देतील म्हणजे काम झालं.'

'कमांडर्स कौन्सिल तसं काही करू शकत नाही. त्यांना आशीर्वाद द्यायचा अधिकार नसतोच,' असं कोझीर म्हणाला. त्या चर्चेत त्याला बराच रस होता.

लापोटही माघार घ्यायला तयार नव्हता. कोझीरच्या समोर बसून त्याच्या गुडघ्यावर हात ठेवून तो म्हणाला, 'कमांडर्स कौन्सिल आशीर्वाद देऊ शकतात आणि त्यांनी दिलेल्या आशीर्वादानं तुझा धर्मगुरु वेडापिसा होऊन जाईल समजलास.'

कोझीर बिचारा शांत स्वभावाचा. तो लापोटचं बोलणं मन लावून ऐकत होता. त्याला लापोटचं म्हणणं खोडून काढणं कठीणच होतं. धर्मगुरुंनी किंवा पालकांनी त्याच्यासाठी काय केलं होतं ? काही नाही. पण कमांडर्स कौन्सिलन त्याच्यावर फार मोठे उपकार केले होते. तोच मोठा आशीर्वाद होता. कमांडस कौन्सिलनं त्याला त्याच्या बायकोपासून वाचविलं होतं. इतकंच नव्हे तर त्याला स्वतंत्र, स्वच्छ खोली, त्यात खाट वगैरे दिली होतीच. शिवाय गुडच्या तुकडीनं बनविलेली उत्तम बुटाची जोडीही त्याला बहाल केली होती. कोझीर उद्या मेला. तर आकाशातला बाप त्याला काही अनुदान देईल कदाचित. पण त्याच्या य जगातल्या आयुष्याबद्दल सर्वस्वी कमांडर कौन्सिल जबाबदार होते.

'लापोट तू कुठे आहेस?' अशी गालाटेन्कोची हाक खिडकीतून ऐकू आली.

लापोट म्हणाला, 'अरे मी इथंच आहे. काय पाहिजे?' असं म्हणत तो धर्मगुरुच्या आशीर्वादाबद्दलची चर्चा तिथंच सोडून निघून गेला.

गालाटेन्को सावकाशपणे खिडकीतून आत आला. लापोटला आपला चेहरा दिसावा अशा तऱ्हेनं पुढं आला. त्याचं तोंड रागानं व उद्वेगानं वेगळंच दिसत होतं.

इतक्यात त्याच्या डोळ्यांत अश्रूंनी गर्दी केली. भरलेल्या आवाजात तो म्हणाला, 'लापोट, त्याला सांग, बजावून सांग की मी त्याला हात दाखवीन.'

'अरे पण कोणाला ? '

'तारानेटला.'

इतक्यात गालाटेन्कोचं लक्ष माझ्याकडे गेलं. त्यानं डोळे पुसले व माझ्याकडे पाहून हसला.

'काय झालं काय गालाटेन्को ? '

'त्याला काय अधिकार आहे ? त्याला वाटतं आपण चौथ्या तुकडीचे कमांडर आहोत... त्याला मोलोडेटस्साठी एक जरा ऐसपैस पेटी तयार करायला सांगितली आहे. आणि तो म्हणतो एक मोलोडेट्साठी व दुसरी गालाटेन्कोसाठी.'

'असं तो कुणाला सांगत होता ? '

'त्याच्या हाताखाली सुतारकाम करणाऱ्या मुलांना.'

'असं काय बरं.'

'ऐसपैस पेटी मोलोडेटसाठी हे बरोबर आहे. '

'काय म्हणायचंय त्याला.'

'म्हणजे माझ्यासाठी पण तशीच पेटी बनवायची.'

लापोटनं आपलं डोकं सावकाश खाजवलं. गालाटेन्को उत्तराच्या अपेक्षेनं लापोटच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात होता.

'पण तू काही गाडीच्या डब्यातून उडी टाकणार नाहीस, खरं ना ?' असं लापोट गालाटेन्कोला म्हणाला.

गालाटेन्कोनं खिडकीतून खाली वाकून पाहिलं व पायांची चाळवाचाळव केली.

'मी कशी उडी घेईन ? आणि मी उडी तरी कुठे घेणार ? तरीसुद्धा तो तारानेट म्हणतो पेटी चांगली मजबूत पण ऐसपैस बनवा, नाहीतर तो सारा डबा मोडूनतोडून टाकील.

'कोण मोडेल म्हणे ?'

'तो म्हणजे तारानेटच्या म्हणण्याप्रमाणे मी. '

'पण तू काही असं करणार नाहीस. खरं की नाही ? '

'पण मी असं कसं करीन ? कधीच करणार नाही. '

'तारानेटला वाटतं की तू खूप ताकदवान आहेस म्हणून तो म्हणाला. त्याच्यावर रागावू नको.'

'मी खूप चांगला ताकदवान आहे. पण म्हणून ती पेटी कशासाठी ?'

लापोटनं खिडकीवरून उडी टाकली व तो सुतार खात्यात गेला. गालाटेन्को-पण त्याच्या पाठोपाठ तिकडे गेला.

लापोटच्या चाहत्यांत अर्कांडी उझीकोव्ह हा आणखी एकजण होता. लापोटच्या म्हणण्याप्रमाणे अर्कांडी हा एक मनुष्य स्वभावाचा दुर्मिळ नमुना आहे व त्याच्या-बद्दल नेहमी मनापासून चांगलं बोले.

'अर्कांडीसारखा माणूस आयुष्यात केव्हातरीच भेटतो. तो माझी पाठ सोडत नाही. त्याला इतर मुलांची भीती वाटते. तो जेवतो माझ्या शेजारी बसून व झोप-तोही माझ्या बाजूला,' असं लापोट बोलला.

'तू एवढा त्याला आवडतोस ?'

'तसं तर आहेच हो ! पण खरं सांगू, माझ्याकडे थोडे पैसे होते. कोव्हलनं दोरी विकत आणण्यासाठी मला दिले होते. ते अर्कांडीनं पळवले.'

असं बोलून लापोट मोठ्यांदा हसला व बाजूला पेटीवर बसलेल्या अर्कांडीकडे वळून म्हणाला.

'अर्कांडी, ते पैसे तू कुठे लपवलेस ते सांग पाहु ?' आपली जागा न बदलता किंवा तोंडावर जराही ओशाळेपणा न दाखवता अर्कांडीनं शांतपणे उत्तर दिलं.

'मी ते तुझ्या जुन्या पाटलोणीच्या खिशात केव्हाच ठेवून दिले आहेत.'

'मग पुढे काय झालं ?' लापोटनं विचारलं.

'पुढे काय, तुला ते मिळाले.'

'मला ते मिळाले नाहीत. चोरा, तू ते काढून घेत असताना मी तुला पकडलं खरं आहे की नाही ?'

'होय खरं आहे' असं अर्कांडीनं कबूल केलं. अर्कांडी आपल्या थिजल्या डोळ्यांनी लापोटकडे टक लावून पहात होता. ते माणसाचे डोळे नव्हते. ते डोळे एखाद्या कनिष्ठ प्रतीच्या निर्जिव प्राण्याचे डोळे होते.

'आंतोन, तो तुमच्याकडेसुद्धा चोरी करील. करशील का नाही सांग पाहू ?'

यावर उझीकोव्ह काहीच बोलला नाही.

'तो खचित करील,' असं लापोट जोरानं म्हणाला. उझीकोव्ह त्याच्या थिजल्या डोळ्यांनी त्याच्या नायकाच्या नीलक्या डोळ्यांकडे पहात होता.

नीट्सेनको हाही लापोटच्या चाहत्यांपैकी होता. त्याची मान उंच व

हडकुळी असून मानेचं हाड खूपच पुढे आलेलं होतं. त्याचं डोक लहानसं होतं व त्याच्या रुंद खांद्यावर ते विचित्र दिसे. त्याच्याबद्दल लापोट म्हणाला,

'या मठ्ठ डोक्याचं तुम्ही काही करू शकता ! त्याच्यातून काहीही बनवता येईल. गाडी, तुळया, चमचे, फावडी, खुरपी वगैरे वगैरे व त्याला वाटतं तो मोठा हुषार गिऱ्हाईक आहे.'

एकप्रकारे मला समाधान वाटलं की हे सारे प्राणी लापोटनं आपल्या कह्यात ठेवले होते. त्यामुळे बाकीच्या गॉर्काइट्सपासून ते सुरक्षित होते. लापोटचा विनोदी स्वभाव जणू काही एखाद्या रोगजंतूनाशक औषधासारखा परिणामकारक होता. त्यामुळे माझ्या मुलांची हुषारी, शिस्त याबद्दलचं मत जास्त दृढ झालं आणि आता तर ते जास्त पक्कं व स्पष्ट झालं.

सगळी मुलं कुर्याझबद्दल विचारीत होती. पण त्या विचारण्यात उत्सुकतेपेक्षा औपचारिकपणाच जास्त होता. माणसं एकमेकांना भेटल्यावर कसं काय विचारतात त्यासारखंच. कुर्याझबद्दलची आस्था आमच्या सामुदायिकाच्या मनात कुठंतरी आत दडली होती किंवा तिची आठवण बुजून गेली होती असं म्हटलंत तरी चालेल. दुसरी अनेक व्यवधानं जास्त महत्त्वाची होती– उदा. मालगागी, मोलोडेट्स व गालाटेन्कोसाठी लाकडी पेटचा, शिक्षकांच्या खोल्या, सामानानं भरलेल्या खोल्या, या साऱ्या जबाबदाऱ्या. रात्रीचं गवतावर झोपणं, फली नावाचा त्या दिवशी होणारा कार्यक्रम, नेस्टेरेन्कोचा क्षुद्रपणा, पुडकी, वोजे, नव्या व्हेलवेट टोप्या, गोंचारोव्हका खेडचातल्या मारुस्या, नाताल्या व टाटान्यासचे रडवेले चेहरे–कारण नुकतीच थोडी ओढ वाटायला लागलेली. या इतक्या गोष्टीत त्यांची मनं गुंतलेली होती. मोठी हुषार मुलं आपसात हास्य विनोद करण्यात व कोटचा करण्यात दंग झाली होती. ती सारीजण गव्हाच्या पूर्ण उगवलेल्या शेतावरुन वारं खेळावं व गव्हाची कणसं कशी वाऱ्यानं स्वच्छंद डुलतात, हालतात तशी दिसत होती. परंतु त्या प्रत्येक आळसरलेल्या कणसांत ताकद होती. आणि हळुवार वाहणाऱ्या त्या वाऱ्यानं कणसं हालतडुलत होती, पण हलताना एकही दाणा खाली पडणार नाही याची काळजी घेत होती. कणसांना जशी केव्हा झोडपणार त्याची काळजी नसते, तद्वतच कुर्याझ-मध्ये काय आहे याची आमच्या मुलांना काळजी नव्हती. योग्य वेळी कणसांची झोडपणी होईल, तसंच योग्यवेळी ही सारीजण कुर्याझला पोचून तिथे आपाआपलं काम करु लागतील.

अनवाणी पायांनी आमची मुलं त्या पाऊलवाटेवर मोठचा डौलात चालली होती. कमरपट्टे घातल्यामुळे त्यांच्या चालण्यात एक आकर्षकपणा आला होता. त्यांचे डोळे माझ्याकडे पाहून स्निग्धपणे हसत होते व त्यांचे ओठ मंद आवाजात मला दोस्तीची सलामी देत होते. बगीच्यात रिकाम्या बाकावर, हिरवळीवर, नदीच्या किनाऱ्यावर सगळीकडे माणसांचे घोळके दिसत होते. काहीजण आपले जुने अनुभव

जुन्या गोष्टी, आपल्या आईवडिलांबद्दल, लढाईबद्दल, तसेच दरोडेखोरांबद्दल गोष्टी एकमेकांना सांगत होते. त्यांच्या डोक्यावर शांत झाडांचे शेंडे, मधमाशांचे थवे व फुलांचा सुगंध दरवळत होता.

मला अचानक वाटलं, अरे हे तर जिवंत काव्यच आहे. परंतु ते खरं वाटेना. याबरोबरच निरनिराळ्या आकृत्या–मेंढपाळ, लोकरीचं कापड–या साऱ्यांनी माझ्या मनात गर्दी केली. कधी कधी आयुष्य आपली थट्टा करतं. आणि ही मस्करी पुष्कळदा झेपत नाही. लिलाकच्या झाडाखाली एक बसक्या नाकाची आकृती बसली होती. ती बासरी वाजवीत होती व ते वाजविताना तिच्या चेहऱ्यावर सुरकुत्या पडल्या होत्या. तिचा चेहरा तसा जरा मिस्किल होता. पलीकडे लताकुंजात मुली फुलं माळीत होत्या. नताशा पेत्रेनको एक माळ हातात घेऊन माझ्या हाताला जणू काही स्पर्श करते असं वाटलं. माझ्या या दिवास्वप्नाचा भंग झाला. एकाएकी पान (कालीना) एका मोठ्या झाडाआडून बाहेर आला. त्याच्या करड्या मिशा अंधारात थरथरल्या. त्यानं डोळे आकुंचित करून पाहिलं.

' मी तुम्हाला सगळीकडे शोधतोय. कोणी म्हणालं की तुम्ही शहरात गेलात. त्या रेल्वेवाल्यांची गाठ पडली का ? आपल्या मुलांची जाण्याची तयारी झाली आहे नाही का ? हे रेल्वेवाले उगाचच आपल्याला अडवून ठेवताहेत. '

' कालीनासाहेब, मुलं इथं आहेत तोपर्यंतच तुम्ही आपल्या मुलाकडे का जात नाही. आम्ही एकदा गेलो की तुम्हाला खूप जड जाईल. '

कालीना उगाचंच खिशात हात घालून पाईप शोधत राहिले. नंतर ते सावकाश म्हणाले,

' या ठिकाणी प्रथम मी आलो आणि म्हणून मी सर्वांत शेवटी जाईन. या बाजूच्या शेतकऱ्यांनी मला आणलं तेच माझी काळजी घेतील. मी त्या मौसी कार्पोविचला सांगितलंय. मला इथून हलवायची काळजी करायचं कारण नाही. जग किती लांबवर पसरलंय हे तुम्ही पुस्तकातून वाचलंच आहे. माझ्यासारखे म्हातारे या जगात खूप खूप वावरले आहेत. कोणीही कधी हरवलेला ऐकला नाही. हे सारे इथले लोक मला हलवतील. '

कालीना व मी तिथंच येरझाऱ्या घालत राहीलो. ते झाडाचे शेंडे, कोलोमॅकचं पाणी, फुलं माळून बसलेल्या मुली, पग्गी व त्याची बांसरी हे आलटून पालटून न्याहाळीत होते व मधूनच पाईपची चाळवा चाळव करीत होते.

' मला कधीकाळी इच्छा झाली तर मी तुमचं ते कुर्गाझ बघायला येईन. पण नाही. मी येणार नाही. माणूस म्हणजे एक साधी वस्तू किंवा एखादं झुडुप. त्यानं आयुष्यात काही काम केलंय का नाही त्याची कोणी फिकीर करत नाही. तत्वतः तो हाडामासाचा माणूस. पण प्रत्यक्षात अगदीच टाकाऊ. लोक फार तर

त्याचा गोंद करायला उपयोग करतील. लोकं जशी शहाणी व्हायला लागतील तशी ते म्हाताऱ्या माणसांचा गोंद करायला शिकतील. या म्हाताऱ्या माणसांचा उत्तम प्रकारचा गोंद होईल.'

सारखी करावी लागलेली शहराकडे धावपळ व झोपेवाचून काढलेल्या रात्री, त्यामुळे मी कमालीचा थकून गेलो होतो. आजूबाजूचं वातावरण माझ्याभोवती फिरतंय व मधूनमधून ते हळूवार आवाज करतंय असा मला भास होत होता. कालीना जुन्या आठवणी काढीत होते. मी मात्र त्यांच्या सध्याच्या वयाबद्दल विचार करीत होतो व त्याशिवाय दुसरं काही माझ्या मनात येतच नव्हतं.

'कालीनासाहेब, तुमचं आयुष्य तसं काही फार वाईट तऱ्हेनं गेलं नसेल, असं मला वाटतं !'

'थांबा मी तुम्हाला सांगतो.' त्यांनी पाईपमधली राख झाडली व पुढे बोलले ! 'हे पहा, मी काही मूर्ख नाही. मला सारं कळतं. आयुष्य म्हणजे एक सारी बेशिस्त धडपड. तुम्ही खातापिता, ते पचवता, परत खाता, झोपता वगैरे वगैरे ...'

'थांबा थांबा ! आणि काम, काम नाही ?' 'अरे जा, कुणाला तुमच्या कामाची जरूर आहे ? त्या कामाचं तंत्र सांगतो ते ऐका– ज्यांना तुमच्या कामाची जरूर आहे ते स्वतः कधीच काम करीत नाहीत. ते नुसते मिरवणारे. पण ज्यांना स्वतःला त्या कामाची जरूरी नसते ते घाण्याला जुंपलेल्या बैलासारखे राबतात.'

आम्ही दोघेही थोडा वेळ गप्प राहिलो. पुन्हा कालीनाच बोलू लागले,

'या बोल्शेविकांच्या जमान्यात मला फार थोडा वेळ जगायला मिळणार म्हणून वाईट वाटतं. ते प्रत्येक गोष्ट त्यांना पटेल त्याप्रमाणेच करतात. ते सारे तसे राकट आहेत आणि मला असला राकटपणा आवडत नाही. त्यांनी आयुष्याला नवीन वळण दिलंय याबद्दल शंका नाही. तुम्ही काम करता की नाही याची त्यांना काळजी आहे. त्यांना दुसऱ्या कशातही स्वारस्य नाही. प्रत्येकाला तुमच्याकडून कामाची अपेक्षा आहे. आणि तुमच्यासारखे काही बावळट लोक, त्यांना कामाशिवाय दुसरं काही सुचत नाही. त्यांना खायचीसुद्धा शुद्ध नसते. त्यांच्या बायका त्यांना जेवणाची खाण्याची आठवण करून देणाऱ्या असल्या तर ठीक. तुम्हाला आठवतं, मी असाच एकदा तुमच्याकडे आलो होतो आणि तुम्ही जेवला का म्हणून विचारलं ! संध्याकाळ होऊन गेली होती आणि तुम्ही आठवण करायला लागतात की आपण जेवलो का नाही व नंतर म्हणालात हो आपण जेवलो. पण आज नाही काल संध्याकाळी जेवलो. असं कधी ऐकलेलं आठवतं का ?'

मी व कालीना बगीच्यात अंधार पडेपर्यंत इकडून तिकडे येरझाऱ्या घालीत होतो. दिवस मावळलेला दिसला. अंधार पडायला लागला तेव्हा कोस्टचा धावत आमच्याकडे येताना दिसला. हातांनी तो झाडाच्या फांदीनं पायावर बसणारे

मच्छर झटकीत होता. तो धापा टाकीत म्हणाला, 'तिकडे सारी तयारी झाली आहे आणि तुम्ही आपले इथे येरझाऱ्या घालीत बसलात. चला, तुम्हाला आलंच पाहिजे. झारच्चं सोंग कसं छान झालंय ते तुम्ही पहायला पाहिजे. लापोट झार बनलाय. नाक तर त्यानं कसं छान बनवलंय. पहा तरी !'

आमची सारी मित्रमंडळी आजूबाजूच्या गावातून व शेतमळ्यावरून आमच्या नाट्यगृहात जमले होते. तसंच ल्युनाचार्सकी सामुदायिकाचे (कम्यूनचे) सारे लोक आले होते. नेस्टेरॅन्को पडद्यामागे सिंहासनावर बसला होता. मुलं त्याला त्याच्या क्षुद्रपणाबद्दल बोलत होती व तो त्यांना तिथून घालवून द्यायचा प्रयत्न करीत होता. ओल्या व्होरोनोव्हा आरशासमोर उभी राहून आपला शृंगार करीत होती. ती झारच्या मुलीचं काम करणार होती. ती मुलांच्या चिडवण्यामुळे हैराण झाली होती. ती म्हणाली, 'माझ्या नेस्टेरॅन्कोला हे सारे किती त्रास देताहेत ?'

'फली' हे नाटक आज काही प्रथमच आम्ही दाखवित नव्हतो. यापूर्वीही आम्ही ते एकदा दाखवलं होतं. पण आजचा प्रयोग काही वेगळाच होता. कारण आमचा नेहमीचा सजावट करणारा बुरसाई व गोरेवस्की हे कुर्याझमध्ये अडकले होते. त्यामुळे आजचा साजशृंगार जरा ठीक प्रकारे झाला नव्हता. परंतु त्याबद्दल कोणाच्याही फारसं मनात आलं नाही, कारण आजचा कार्यक्रम म्हणजे निरोप समारंभच होता. तसं पाहिलं तर औपचारिक निरोपाची तशी काही गरज नव्हती. पिरोगोव्हका व गोंचारोव्हका गावातल्या मुली जणू काही अति प्राचीन युगात फेकल्या गेल्या होत्या. कारण त्यांच्या समजुतीप्रमाणे इतिहास कोलोमॅक नदीच्या तीरावर गॉर्की कॉलनी आल्यावरच सुरू झाला. मोठ्या चक्कीच्या बाजूला, तसंच मार्च महिन्यापासून न पेटलेल्या भट्ट्यांच्या बाजूला, रंगमंचाच्या बाजूच्या छोट्या गल्लीत, रिकाम्या पडलेल्या बाकांवर, इकडेतिकडे पसरलेल्या रंगमंचाच्या सामानावर मुली बसल्या होत्या. त्यांची हिरमुसलेली तोंडं खाली वळली होती व त्यांचे कशिदा काढलेले रूमाल डोक्यावरून खांद्यावर ओघळले होते, त्यामुळे त्यांचे सोनेरी केस बाहेर डोकावत होते. हळुवार शब्द किंवा मधूर स्वर, दीर्घ निश्वास कशामुळेही या तरुण मुलींना हसऱ्या करणं अशक्य होतं. त्यांची नितळ सुंदर बोटं त्यांच्या अंगावरील शालीच्या टोकाशी खेळत होती. हे खरं तर मार्दवाचं वरवरचं लक्षण होतं. आमची काही मुलं त्यांच्या बाजूला उभी राहून आपल्यालाही खूप दुःख झाल्याचं दाखवित होती. लापोट मात्र मधून मधून वेषभूषेच्या खोलीतून डोकावून त्यांना औपचारिक सहानुभूती दाखवायचा प्रयत्न करीत होता. व अगदी भरलेल्या आवाजात पेट्याला हाका मारून सांगत होता, 'पेट्या, अरे मारूस्या नुसती बसेल; काही बोलणार नाही. पण तुला कार्यक्रमात काम करायचंय. तुला घोड्याचं काम करायचंय, आपला सजून ये कसा बर.'

पेट्यालासुद्धा एकदम बरं वाटलं; कारण त्यामुळे मारूस्याच्या तावडीतून

त्याची लवकर सुटका झाली. त्यानं घाईघाईनं अगदी तिचा निरोप घेतला व तो एकदम आत पळाला. या साऱ्या मारूत्स्यांची (मुलींची) हृदयं जणू काही सुट्या भागांची बनवलेली असली पाहिजेत. दोन महिन्याच्या नंतर हीच मारूत्स्या पेट्याची मूर्ती तिच्या हृदयपटलातून काढून टाकून त्या जागी कुणी एखादा स्टेरोझेवोये गावच्या पानासची स्थापना करील. तो पानासही याच वेळी गॉर्काइटसचा निरोप घेत असेल व बरं झालं आता मारूत्स्या आपल्यावरच प्रेम करील या आनंदात मश-गूल असेल. एकंदर जग ठीक चाललंय. पेट्याही त्याला मिळालेल्या घोड्याच्या पार्टवर खूष असेल.

तो शेवटचा कार्यक्रम सुरू झाला. थोडं प्रास्ताविक झालं. एकमेकांनी एक-मेकांचे आभार मानले व पडदा वर गेला. रंगमंचावर झार बसलेला दाखवला होता व त्याचे सारे सैन्याधिकारी त्याच्याभोवती हळूहळू आवाजात काही बोलत होते. इतक्यात मागून तीन घोड्यांची गाडी– हे घोडे म्हणजे गालाटेन्को, केरीटी व फेडोरन्को– धावत रंगमंचावर येऊन थडकले. ते मधूनच गवत चघळीत आपली डोकी हलवित होते. त्यांच्या त्या येण्यानं तो जुनाट रंगमंच त्यांच्या वजनानं मोडेल की काय असं वाटत होतं. तारानेटनं सईसाचा पार्ट केला होता. तारानेटच्या कमरपट्ट्याला एक आकृती लोंबत होती. तोच दरोडेखोर प्लाटोला याचं काम ओलेग ओगतेव्हनं केलं होतं. प्रेक्षकही याच दृश्यात अगदी गढून गेले. कालीना-साहेब पुढच्या रांगेत बसले होते. तेही या दृश्याने भारावून गेले होते व त्यांच्या डोळ्यातून आलेलं पाणी ते हातांनी पुशीत होते.

एकाएकी मला कुर्याझची आठवण झाली. लोक दया दाखवावी म्हणून प्रार्थना करत नाहीत. आणि कोणीही माझ्यापासून हे समाधान हिरावून घेऊ शकत नाही. एकाएकी आपण कमालीचे थकलो आहोत याची मला तीव्र जाणीव झाली.

मुलांच्या वेषभूषेच्या खोलीत खूपच उजेड असावा व ती आरामशीर असावी. लापोट त्याच्या झारच्या त्या कपड्यातच होता. झारचा तो मुकुट त्याच्या मानेवर रुळत होता. अशा स्थितीत तो एकातेरिनाबाईच्या आरामखुर्चीत बसला होता. तो गालाटेन्कोला सांगत होता की इतकं चांगलं घोड्याचं काम आपण पाहिलं नव्हतं. असा घोडा मी कुठेच पाहिला नव्हता, मग नाटकात तर सोडाच.'

ओल्या व्हेरोनोव्हानं लापोटला सांगितलं, 'अरे उठ, आंतोन सेमयोनोविचना बसू दे.'

मी त्या आरामखुर्चीत बसलो आणि लगेच झोपी गेलो. कार्यक्रम संपायची वाटसुद्धा पाहिली नाही. झोपेत कुठेतरी अकराव्या तुकडीची मुलं आपसात जोरा-जोरात चर्चा करत होती. 'अरे आपण यांना बाहेर नेऊ या!' पण सिटीलॅनं साऱ्यांना गप्प बसायला सांगितलं. त्यांना इथेच झोपू दे, असंही तो म्हणाला.

□

## ६

# पाच दिवस

दुसऱ्या दिवशी मी कालिनासाहेब, ओल्या व वेस्टरेन्को यांचा निरोप घेऊन परत जायला निघालो. कोव्हलला आमच्या सर्व सामानाची नीट काळजी घ्यायला सांगितली. तसंच ते सामान गाडीमध्ये कसं काळजीपूर्वक ठेवायचं ते सर्व समजावून दिलं. त्यांनी सर्व सामान व मुलांसह पाच दिवसांच्या आत ट्रेपकेवाडी सोडून खारखोव्हला पोचण्यासाठी निघालं पाहिजे अशा सूचना देऊन ठेवल्या.

माझं मन उगाचच साशंक झालं होतं. माझ्या मनाचा समतोल जरा बिघडल्यासारखं मला वाटू लागलं. मनात नाही नाही त्या शंका येऊ लागल्या. मी रायझोव्ह स्टेशनवरून एक वाजता कुर्याझ कॉलनीला पोचलो. फाटकात पाऊल टाकतो न टाकतो तोच मी अडचणीत पडल्याची मला जाणीव झाली.

त्या ठिकाणी ब्रेगेल, क्ल्यामर, युरियेव व सरकारी वकील एका केसची चौकशी करण्यासाठी जमलेले होते. कुर्याझचा जुना डायरेक्टरदेखील लुडबुडताना दिसत होता. माझ्याकडे रागाने बघत ब्रेगेल म्हणाला, 'माहीत आहे का तुम्हाला आपापसात मारामारी करायला सुरुवात झाली आहे ते ? '

'कोण कोणाला मारायला लागले आहेत ते सांगा ?' असं मी म्हणालो.

'दुर्दैवाने आम्हाला तेच तर माहीत नाही. तसंच याला फूस लावणारे कोण आहे तेही आम्हाला माहीत नाही. '

सरकारी वकील जरा ठेंगणाठुसका होता. ब्रेगेलबाईकडे चष्म्यातून चोरटा

कटाक्ष टाकत हळू आवाजात म्हणाला, ' मला वाटतं केस तशी सरळ साधी आहे. कोणी कोणाला फूस लावली असेल असच म्हणता येणार नाही. कदाचित कुणीतरी आपलं मागचं उट्ट काढून घ्यायचं ठरवलं असेल तशी मोठी ही केस काही चिंता-जनक नाही. तरीही कोणी केलं हे माहित होणं जरूरीचं आहे. आता डायरेक्टर इथं आले आहेत. ते स्वत: सर्व केसचा नीट छडा लावतील व आपल्याला कळवतील. '

सरकारी वकिलाच्या या वागण्यानं ब्रेगेलबाईचं समाधान झालेलं दिसलं नाही. माझ्याशी एक शब्दही न बोलता ती गाडीत जाऊन बसली. युरियेव्हनं माझ्याकडे पाहून हास्य केले. सारा आयोग उठून निघून गेला.

दोरोश्को नावाचा एक कुर्याझ कॉलनीतला मुलगा आदल्या रात्री जवळ जवळ अर्धा डझन चांगले बूटाचे जोड डॉरमिटरीतून चोरून घेऊन चालला असता त्याला फाटकात गाठून काहीजणांनी बेदम मारलं होतं. एकंदरीत पाहाता हा हल्ला पूर्वनियोजित असला पाहिजे. कोणीतरी त्याला बूट चोरताना पाहिलं असलं पाहिजे. तो जेव्हा फाटकात पोचला तेव्हा चर्चच्या बाजूच्या झुडपांतून बाहेर येऊन त्याच्या अंगावर एक कांबळं टाकलं. त्याला खाली पाडून खूप झोडपून काढलं. गोरोव्हस्की (गॉर्कीईट) हा तबेल्याकडून येत होता. त्यानं काही आकृत्या इकडेतिकडे पळताना पाहिल्या. दोरोश्कोला त्यांनी तिथंच सोडलं. कांबळं व बूट घेऊन ते सारे पळून गेले. ताबडतोब साऱ्या डॉरमिटरीज्मधून तपास केला असता मुलं झोपलेली आढळली. दोरोश्कोला अंगभर जखमा झाल्या होत्या. त्याला कॉलनीच्या दवाखान्यात ठेवण्यात आलं. डॉक्टरांना बोलावून दाखवलं असता त्यांनी काळजीचं कारण नाही असं सांगितलं. पण गोरोविचनं युरियेव्हला ही बातमी ताबडतोब कळवली.

ब्रेगेलबाई चौकशी समितीच्या मुख्य होत्या. त्यांना याच्यात फारच रस होता. आमची आघाडीची तुकडी शेतावरून परत बोलावण्यात आली होती; आणि एकेका मुलाला बोलावून त्याची कसून तपासणी, उलट तपासणी घेण्यात आली. क्ल्यामरला कुठूनतरी गॉर्कीईट्सपैकीच कुणीतरी हे मारण्याचं काम केलंय असं दाखवून द्यायचं होतं. आमच्या शिक्षकांपैकी कोणालाही बोलावलं नाही. उलट त्यांना यापासून बुद्धयाच दूर ठेवण्यात आलं. इकडच्या तिकडच्या काही व्यक्तींची तपासणी केली गेली. कुर्याझच्या मुलांमध्ये फक्त पैरट्स व खोव्हराख यांना बोलावून वेगवेगळया खोल्यात त्यांची जबानी घेण्यात आली. तेही ते खोलीच्या बाहेर खिडकीखाली उभे राहून ओरडले म्हणून.

'आम्हाला विचारा ! त्यांना (गॉर्कीईट्सना) कशाला विचारता. त्यांनी आम्हाला मारावं व आम्ही त्याबद्दल तक्रारसुद्धा करायची नाही काय ?'

दोराश्को बिचारा मार खाऊन हैराण झालेला, दवाखान्यात बिछान्यावर

पडलेला होता. तो माझ्याकडे व्याकुळ नजरेनं टक लावून पहात क्षीण आवाजात पुटपुटला, ' आंतोनसाहेब, मला तुम्हाला केव्हापासून सांगायचंय.'

' कुणी मारलं तुला कल्पना आहे ?'

' हे शहाणे (चौकशी समिती) कशाला आहेत मधे नाक खुपसायला. मला कोणी मारलं याच्याशी यांना काय करायचंय. तुमच्या मुलांनी (गॉर्काईट्सनी) मला मारलं नाही. पण त्या लोकांना असं सिद्ध करायचं होतं की गॉर्काईट्सनी मला मारलं. उलट तुमची मुलं नसती तर त्यांनी माझा जीव घेतला असता. तो कमांडर पुढे आला तेव्हा ते सारे पळून गेले...!'

' अरे पण कोण होते ते ?'

' मी तुम्हाला आज सांगणार नाही. बूट मी माझ्यासाठी चोरले नाहीत. त्यांनी सकाळी मला हे काम मी केलंच पाहिजे असं बजावलं. म्हणून ते मी केलं.'

' तो खोव्हराक होता का ?'

यावर काहीच जवाब नाही. परत मी तेच विचारलं, ' खोव्हराक होता का ?' जवाब नाही,

दोरोश्कोनं तोंड उशीत खुपसलं व तो रडू लागला. त्याच्या रडण्यात त्याचे शब्द मला नीट समजत नव्हते...' त्याला एक दिवस कळेल...मला वाटलं होतं की ही शेवटचीच वेळ असेल...' तो शांत होईपर्यंत मी थांबून राहिलो व मग त्याला विचारलं, ' तुला कुणी मारलं हे खरोखर तुला माहीत नाही ?'

तो एकाएकी बिछान्यावर उठून बसला. त्यानं आपलं डोकं दोन्ही हातांनी गच्च दाबून धरलं व इकडून तिकडे मान फिरवत राहिला. पुन्हा एकदा डोकं दाबून धरत भरल्या डोळ्यांनी त्रास होत असतानासुद्धा तो माझ्याकडे बघून हसला व म्हणाला,

' नाही ते गॉर्काईट्स नव्हतेच. त्यांनी मला असं कधीच मारलं नसतं, अशा तऱ्हेनं मारलं नसतं.'

' मग त्यांनी कसं मारलं असतं सांगशील का ?'

' ते मला सांगता येणार नाही पण त्यांनी कांबळ्यांनी झाकून टाकलं नसत. कधीच नसतं.'

' तू रडतोस का ? तुझं अंग फार दुखतंय का ?'

' तसं फार दुखत नाही. फक्त वाटतं की ती शेवटचीच वेळ ठरावी... तुम्हाला ते कधी कळू नये...'

' जाऊ दे तू बरा हो. आता विचार करू नकोस. आपण सारं काही विसरून जाऊ.'

' होय, आंतोनसाहेब खरंच तुम्ही सारं कृपा करून विसरून जा.'

तो एकदाचा कसाबसा शांत झाला.

मी स्वतःच आता काय झालं ते शोधून काढायच्या मागे लागलो. गोदोविच व किरगिझोव्ह हे एकाएकी चीडाचीड करायला लागले. इव्हान डेनिसोविचसुद्धा चेहरा लांब करून व कपाळाला आठ्या घालून बसू लागला. पण त्याचा मूळचा विनोदी स्वभाव यातूनही डोकावल्याखेरीज रहात नव्हता. शेवटी एक दिवस मी त्याला विचारलं, ' तुम्ही आजकाल एवढे रागावलेले का दिसता ?'

' मी नाही बुवा. त्यांना एकमेकांचा जीव का घ्यावासा वाटतो ते मला अजून समजत नाही. जुनं उट्टं काढायचा प्रकार आहे का हा ?'

' तसं असावं असं मला वाटत नाही.'

' मला वाटतं ही अलिकडचीच काहीतरी भानगड असावी ! '

' बरं. पण मला सांगा, आपल्या एखाद्या गॉर्काईट्सनी हे केलं नाही याबद्दल तुमची खात्री आहे ना ?'

' भलतंच काहीतरी बोलू नका. आपली मुलं असलं काही तरी कधीच करणार नाहीत,' असं इव्हान डेनिसोवचनं रागारागानं म्हटलं.

बाजूला व्होलकोव्ह उभा होता. तो डोळे लाल करून माझ्याकडे पाहू लागला.

'काय म्हणालात ? आपल्या मुलांची शंका घेता ? त्या तसल्या मुलाला मारणार ? आपल्या मुलांपैकी कुणी असलं भ्याडपणाचं कृत्य कशाला करतील ? त्यातूनही खोव्हराक, चुरीलो किंवा कोरोस्कोव्ह यापैकी कोणी असते तर मी त्यांना आतासुद्धा बडवीन. अर्थात तुम्ही परवानगी दिली तर. समजा त्या पोरानं बूट चोरले. रोजच रात्री काही मुलं काहीना काही चोरी करताहेत. आता चोरायला बूटसुद्धा राहिले नाहीत. आपली सारी मुलं इथं गोचेपर्यंत या मुलांच्याजवळ चोरण्यासारखं सुद्धा काही राहणार नाही. त्यांना काय हवं ते करू दे. चोरी करू दे नाहीतर मारामारी ! आम्ही त्याकडे मुळीच लक्ष देत नाही. पण ते काम करत नाहीत याबद्दल मात्र काहीतरी केलं पाहिजे.'

एकातेरीना ग्रीगोरयेवना व लिडोच्का त्यांच्या रिकाम्या खोलीत अगदी गोंधळलेल्या मनस्थितीत मला दिसल्या. चौकशी–समितीच्या येण्यानं त्या अगदी बेचैन झाल्या होत्या. लिडोच्का खिडकीबाहेर तोंड काढून बाहेरच्या मैदानात टक लावून पहात होती. एकातेरीना ग्रीगोरयेवना माझ्याकडे केविलवाणी बघत होती.

' झालं तुमचं समाधान ?' असं ती म्हणाली.

' कशाबद्दल ? कशामुळे ?'

' सगळ्याबद्दलच. ही मढी, ही मुलं, तुमचे ते अधिकारी ?'

मी क्षणभर विचार केला. मी समाधानी आहे का ? मला असमाधानी व्हायला काय खास कारणं झाली आहेत ? काही नाही. सर्व गोष्टी मी अपेक्षा केल्याप्रमाणेच घडल्या आहेत.

'होय. मी समाधानी आहे. शिवाय तुम्हाला माहीत आहे की मी कुरकूर करणारा नाही.' असं मी उत्तर दिले.

एकातेरीना न हसता किंवा चिडल्याचं जराही चिन्ह चेहऱ्यावर न दाखविता म्हणाली, 'हो, पण मी कुरकुरते आहे. मला समजत नाही की आम्हाला एकाकी का रहावं लागावं. इथं एवढी मोठी घटना घडते. बाहेरचे कुणी चार शिष्ट येऊन आम्हालाच तुच्छतेनं वागवतात. मी नाही असल्या एकलकोंड्या शिक्षा पत्करणार... नाही कधीच नाही...'

लिडोच्का खिडकीच्या तावदानावर टकटक करत होती. तिनं एकातेरिनाला शांत करण्याचा प्रयत्न केला. पण ती स्वतःच आपले अश्रू आवरु शकत नव्हती.

'मी नसेन कोणी मोठी. पण मला काम करायचंय. मला काम करायची अत्यंत आवड आहे. मी फार मोठं काम पार पाडू शकेन असं मी म्हणत नाही. पण मी माणूस आहे व कुणी नालायक नाही.'

ती परत खिडकीकडे वळली. मी खोलीतून बाहेर पडलो व माझ्या पाठोपाठ दरवाजा घट्ट लावून घेतला गेला. बाहेर सज्जात व्हान्का झायचेन्को आणि कोस्टचा व्हेट्कोव्हस्की उभे होते. कोस्टचा हसत होता.

'त्यांनी सारेच्या सारे खाऊन टाकले रे ?'

वान्यानं क्षितिजाच्या दिशेनं रेघ काढली व जरा ऐटीत म्हणाला, 'अगदी सर्व खाल्ले. त्यांनी शेकोट्या पेटवल्या व त्यात ते भाजले व खाऊन टाकले; कळलं ? मग ते सारेजण झोपण्यासाठी आडवे झाले. अर्थात त्यांना झोप लागली नव्हती. आम्ही त्यांच्या बाजूच्या जमिनीत काम करत होतो. आम्ही कलिंगडाचे बी पेरत होतो. त्यांचा तो कमांडर पेट्रूश्को. आम्ही हसलो म्हणून तोही हसला... ...असं झालं. बरं, तो म्हणाला, आम्हाला आज भाजलेल्या बटाट्यांची छान मेजवानी मिळाली.'

'म्हणतोस काय ? त्यांनी सारेच्या सारे बटाटे खाऊन टाकले ? किती होते माहीत आहे का ? चांगले चाळीस किलो होते.'

'होय रे बाबा, सगळे खाल्ले. त्यांनी भाजले व खाऊन टाकले. त्यांनी काही थोडे झुडपात लपवले असतील, किंवा थोडेबहुत जमिनीत टाकले असतील. मग ते झोपी गेले. ते रात्री जेवायला आले नाहीत. पेट्रूश्को म्हणाला, आम्हाला जेवणाची काय गरज ? आम्ही बटाटे पेरतो आहोत ना! ओडारयुक त्यांना म्हणाला, तुम्ही डुक्कर आहात. मग त्यांची मारामारी झाली. तुमचा मिशा प्रथम तिथं होता व त्यांना बटाटे कसे पेरावयाचे ते सांगत होता. मध्येच त्याला चौकशी आयोगानं बोलावलं.'

वान्या अलिकडं त्याच्या जुन्या ढगळ पाटलोणी घालत नसे, तर आता गॉर्की कॉलनीवाल्यांसाठी आम्ही शिवलेले कपडे होते, त्यातले तो घालत होता. बहुधा

शेलापुतीननं ते त्याला दिले असले पाहिजेत. कदाचित् टोस्कानंही दिले असतील. व्हेट्कोव्हस्कीबरोबर बोलत असताना वान्या मधूनमधून माझ्याकडे नजर टाकत होता. प्रत्येक वेळी त्याच्या चेहऱ्यावर उपरोधिक, पण गोडसं हसू चमकत होतं.

'वान्या तू बरा आहेस का ?' असं मी विचारलं.

आपल्या छातीवर थोपटत तो म्हणाला, 'होय तर, मी छान झालो आता. मी १–एम संमिश्र तुकडीत आहे. प्रथम डेनीस आमच्याबरोबर काम करत होता; पण त्याला कुणी बोलावून घेतलं. आम्ही राहिलेली सर्व पेरणी केली. पहाच आता कशी छान कलिंगडे येतील ते ! हो, पण गॉर्कीईट्स कधी येणार ? पाच दिवसात येतील ? त्यांना भेटण्यात खूप मजा येईल नाही. ते कसे दिसत असतील? मजा येईल एवढं खरं.'

'दोरोश्कोला कुणी मारलं असेल असं वाटतं वान्या ?'

वान्यानं आपली सीधी नजर माझ्याकडं वळवली व टक लावून माझ्या चष्म्याकडे पहात राहिला. त्याने ओठ आवळले, पुन्हा मोकळे केले, पुन्हा आवळले. त्यानं डोक्याला हिसडा दिला. त्यानं कानावरुन बोटं खाली आणली. किंचित हसला व म्हणाला, 'मला माहीत नाही.'

तो माझ्यापासून दूर जाण्यासाठी झपाट्यानं वळला.

'वान्या, थांब जाऊ नको. तुला माहीत आहे व तू मला ते सांगितलं पाहिजेस !'

वान्या चर्चच्या भिंतीजवळ थांबला. त्यानं दुरूनच माझ्याकडे पाहिलं. तो चपापला. पण स्वतःला सावरत तो अगदी शांतपणं, एखाद्या मोठ्या माणसा-प्रमाणं प्रत्येक शब्दावर जोर देत म्हणाला, 'मी तुम्हाला खरं सांगतो. मी तिथं होतो, पण बाकी कोण होते ते मी तुम्हाला सांगणार नाही. त्यानं चोरी करायला नको होती.'

आम्ही दोघंही शांत उभे होतो. कोस्ट्या तिथून कधीच निघून गेला होता. आम्ही दोघेही विचार करत होतो. अखेरीस मी वान्याला सांगितलं, 'तुला मी शिक्षा केली आहे. बालवीरांच्या खोलीत जाऊन बस. व्होलकोव्हला सांग की तुला संध्याकाळपर्यंत शिक्षा केली आहे.'

वान्यानं माझ्याकडे पाहून होकारार्थी मान हलवली व तो धावत बाल-वीरांच्या खोलीकडे गेला.

हे पाच दिवस माझ्या आयुष्यात एक लांबलचक पोकळी म्हणून राहिले. मला आता त्या पाच दिवसात काय काय केलं याची आठवण करणंही जड जातंय, कदाचित फारशा काही घडामोडी झाल्याच नसतील. किंवा चांगली कामं बाजूला ठेवली गेली असतील. त्यावेळी मला वाटायचं की मी खूप कामाच्या गडबडीत

आहे. निरनिराळे बेत व त्याची छाननी करत आहे. खरं म्हणजे मी माझे गॉर्की- ईट्स येण्याची वाट पहात होतो. अर्थात थोडंबहुत काम आम्ही केलं.

मला आठवतंय, आम्ही रोज पाच वाजतो उठत असू. ही (कुर्याझमधली) मुलं आमचं अनुकरण करत नाहीत म्हणून सात्विक संताप यायचा. आमची आघाडीची संमिश्र तुकडी या दिवसात जवळजवळ झोपलीच नाही. कारण सारखं काहीतरी तातडीचं काम निघत असे. मी आल्याच्या दुसऱ्या दिवशी शेरेसाहेब येऊन पोचले. दोन तास ते शेतमळा, बगीचा, बाजूची घरे, बांध या सर्वांची मोजणी पहाणी करत फिरत होते. ते जरा नाराजच दिसले. कमालीच्या गंभीरपणं ते फिरले व फिरत असताना शेतातले तण उपटून काढले. संध्याकाळी आमचे गॉर्कीइट्स आले. ते सगळेजण उन्हानं चांगलेच काळे दिसत होते व धुळीनं भरले होते. त्यांनी जमीन साफ करायला सुरवात केली, कारण आमच्या डुकरांना तिथं ठेवायचं होतं.

वाफे करण्यासाठी व उष्मागृह तयार करण्यासाठी जमीन उकरायला सुरुवात केली होती. व्होलकोव्हनं कमांडरच्या कामात संघटक म्हणून कौशल्य दाखवून दिलं. तो एकाला घोडयांच्या दोन जोडयांवर लक्ष ठेवायला सांगे व बाकीच्यांना दुसरं काम देई. प्योटोर इव्हानोविच गोरोविच सकाळी एक फावडे घेऊन बाहेर पडे व उगाचच चांभारचौकशा करणाऱ्या कुर्याझच्या मुलांना सांगे, 'या हो तुम्ही बहादूर मंडळी, माती उकरायला मदत करा.'

पण ही बहादूर मंडळी तोंड फिरवून पळून जात. ते त्यांच्या उद्योगाला जात. वाटेत त्यांना आमचा काळा, अर्धी पाटलोण घातलेला बुत्साई भेटला आणि त्यानं बोलावलं तर ते त्याला प्रतिसाद देत नसत. तो ओरडायचा, 'अरे मूर्खांनो, आम्ही तुमच्यासाठी किती दिवस काम करायचं ?'

काही राबफाकचे विद्यार्थी आम्हाला मदत करण्यासाठी आले होते, पण मी त्यांना लगेच परत खारकोव्हला पिटाळून लावलं. त्यांना वसंतऋतूच्या आधी परीक्षा होती व ती परीक्षा जास्त महत्वाची होती. राबफाकच्या विद्यार्थ्यांना आमचे पहिले 'वूझ' मिळणार होतं आणि माझ्या दृष्टीने कुर्याझपेक्षा ते जास्त महत्वाचं होतं.

पुन्हा एकदा वाटतं की बरंचसं काम मी त्या पाच दिवसात केलं होतं व काहींची नुसती सुरुवात आम्ही केली होती. बोरोव्हाय मोठे न्हाणीघर व शौचकूप यांची दुरुस्ती करत होता. त्याच्या हाताखाली खूपशी मुलं सुतारकामात मदत करण्यासाठी दिली होती. त्यातली काही तळघरात शीतगृह करण्यासाठी, काही शाळेची दुरुस्ती इत्यादी कामात भाग घेत होती. तीनजण वीजघरांची दुरुस्ती करण्यात गर्क होते. दुसरे तिघेजण जमिनीच्या खालून काही पाण्याचे नळ वगैरे आहेत का त्यासाठी जमीन उकरून बघत होते. कारण पोड्व्होरकीच्या लोकांनी सांगितलं की पाण्याचे नळ चर्च बांधल्यापासून आहेत. शोध घेता आम्हाला घंटा-घराच्यावर मोठी पाण्याची टाकी आढळली व पाण्याचे नळही सापडले.

कुर्याझचं सारं आवार लाकडं, खिळे, हत्यारं इत्यादी वस्तूंनी पसरलेलं होतं. कुर्याझच्या सर्व इमारती नीटनेटक्या करायचं काम जोरात चालू होतं.

कुर्याझच्या मुलांना स्वच्छतेचे धडे देण्याच्या बाबतीत आम्ही काही करु शकलो नाही, कारण आम्ही स्वतःच्या स्वच्छतेची फारशी काळजी करत नव्हतो. सकाळीच आमचा शेलापुतीन व सोलोव्हाय जवळच्या झऱ्यावर भांडी घेऊन पाणी आणायला जात. ते बिचारे पाणी घेऊन धडपडत येऊन पोचत, तोपर्यंत आम्ही सारेजण आपआपल्या कामाच्या ठिकाणी जात असू. मग दिवसभर पाण्याची भांडी बालवीरांच्या खोलीत तशीच पडून रहात. आमच्या अस्वच्छतेचं आणखी एक कारण होतं. वान्या झायचेन्कोची तुकडी; ती आता दहावी तुकडी होती. ती सर्व मुलं काही एक विचारण्यापूर्वी किंवा पूर्वसूचनेशिवाय आमच्या खोलीत येऊन दाखल झाली होती. त्यांनी आपली घोंगडी वगैरे आपल्याबरोबर आणली होती. त्यातून शेंकडो उवा आमच्या खोलीत येऊन पडल्या होत्या.

शिक्षणतंत्राच्या दृष्टीनं यात फारसं काही वावगं समजण्याचं कारण नाही. कारण त्या मुलांना आम्ही दूर लोटणं हे चुकीचं ठरलं असतं. लिडोच्का व एकातेरिना ग्रीगोरयेवना यांनी त्यांच्या खोलीत अगदी जरुरीशिवाय आम्हाला जाण्याची सक्त मनाई केली होती. शिवाय चुकूनमाकून आम्ही गेलोच तर त्यांच्या टेबल, खुर्ची, खाटा वगैरे कुठल्याही फर्निचरचा–ज्यात लवकर उवा वगैरे जाऊन बसतील–उपयोग करायला मनाई होती. त्या दोघी एवढा आव का आणत असत ते मला समजलं नाही. त्या दोघी सारा दिवस डॉरमिटरीत बसून कुर्याझच्या वसतीगृहासंबंधी माहिती काढत असत. ही माहिती काढण्याचा सर्व आराखडा आमच्या कोम्सोमोल संघटनेनं तयार केला होता.

मी कुर्याझच्या सबंध आवाराची पुनर्रचना करावी असा विचार केला होता. त्यांच्या जुन्या वसतीगृहाच्या मोठमोठ्या खोल्या होत्या. त्याला कुर्याझकर शाळा म्हणत असत. त्या खोल्यांचे डॉरमिटरीमध्ये रूपांतर करून सर्व चारशे मुलांना– आमची एकशेवीस व कुर्याझची दोनशेऐंशी–त्या ठिकाणी रहाण्याची सोय करावयाची. शाळेची जी काही राहिलीसाहिली चीजवस्तू होती ती भराभर काढून टाकली. त्या ठिकाणी सुतार, गवंडी, रंगवाले या सर्वांना ती इमारत ठाकठीक करायला सूचना दिल्या. शाळेसाठी दुसरी एक बिनादरवाजांची इमारत मोकळी केली. या ठिकाणी म्हणे पहिलं सामुदायिक रहात होतं. सध्या ती दुरुस्त करायचं लांबणीवर टाकलं, कारण सारी कुर्याझची मुलं तिथं राहिली होती.

पुष्कळ काम व पुष्कळ घडामोडी त्यावेळी झाल्या, पण शैक्षणिक दृष्टीनें काहीही हालचाल केली नव्हती. सबंध कॉलनीत अशी एकही जागा नव्हती जिथं काहीना काही काम चालू होतं. एकंदरीत सर्व बाजूना दुरुस्ती, रंगसफेती व साफ-सफाई चालू होती. या दिवसात आम्ही पुष्कळदा जेवणसुद्धा बाहेरच्या आवारात

घेत असू. जेवणाच्या खोलीच्या भिंतींवर असलेल्या संत व संतीणींची चित्रंही रंग लावताना पुसून टाकायची. आम्ही डॉरमिटरीजना मात्र अद्याप दुरुस्तीचा हातही लावला नव्हता.

या डॉरमिटरीजमधून कुर्याझची मुलं झोपत होती, खाल्लेलं अन्न पचवत होती, उवांना कायम आश्रय देऊन बसली होती. ती एकमेकांपासून बारीकसारीक गोष्टी लपवत, माझ्याबद्दल व माझ्या हालचालींबद्दल मनात विचार करत होती. मी त्या डॉरमिटरीजच्या बाजूला जायचंच सोडून दिलं होतं. खरं सांगायचं तर त्या सहा कुर्याझच्या तुकड्यांबद्दल, त्याच्या दैनंदिन कार्यक्रमाबद्दल मला काहीही आस्था वाटली नाही. माझा कुर्याझकरांशी संबंध अगदी सरळ काटेकोरपणे ठरला होता. जेवणघरं सकाळी सात वाजता, दुपारी बारा वाजता व संध्याकाळी सहा वाजता उघडी रहात असत. माझा एक मुलगा घंटा वाजवी व ही मुलं खाण्यासाठी धडपडत, जेवणघरात धाव घेत. हे त्यांना पाळावंच लागे, कारण जेवणघर ठराविक वेळी बंद होत असे. जे लवकर येत ते आपल्या वाट्याचं तसंच आणखीही आपल्या मित्रांच्या वाट्याचं खात. जे उशीरा येत त्यांना नीट खायला मिळालं नाही की ते जेवणघराचे कर्मचारी, मी डायरेक्टर व सोविएत सरकार यांना शिव्या घालत असत. या पलिकडे जाऊन आणखी कृती करण्याचं धाडस त्यांना झालं नाही, कारण आमच्या जेवणघराचा कमांडर मिशा ओव्हचारेन्को होता हेही असेल.

मी मनात गुप्त समाधान मानत होतो की कुर्याझकरांना आता जेवणघराकडे जाऊन आपली भूक भागविण्यासाठी हात मारणं शक्य नव्हतं. सारं आवार व जेवणघराकडे जाणारा रस्ता लाकडी वासे, करवती, कुऱ्हाडी, चिखल, पाण्याची डबकी, चुन्याच्या घाणी यांनी भरलेला होता व थोडीबहुत त्यांची सद्सद्विवेकबुद्धी. यातून पार करणं अशक्य होतं. या सगळ्या गोष्टींमुळे ती मुलं हैराण झाली होती हे मला समजत होतं. त्यात दिखाऊपणा नव्हता तर खरोखरीची दु:खद परिस्थिती झाली होती. शेक्सपियरच्या शोकपर्यवसानी नाटकात 'करावं का करू नये' असा प्रश्न आहे तसा तो त्यांचेपुढे होता.

जिथं काम चालू असे तिथं ही मुलं गटागटानं उभी रहात. इकडेतिकडे चौकसपणे पहात आणि डॉरमिटरीजकडे ओशाळी पावलं टाकत निघून जात. त्यांच्या डॉरमिटरीजमधून चोरण्यासारखंही आता काही राहिलं नव्हतं. थोड्या वेळानं ते परत बाहेर येऊन उभे रहात. परंतु आम्ही काही काम करतो असं म्हणायची त्यांना बुद्धी होत नसे. काम करतो म्हणून म्हणण्यात त्यांना कमीपणा वाटत असेल. गॉर्कीईट्स इकडून तिकडे जाताना झटपट चालत. वाटेत पडलेल्या सामानाची त्यांना कधी अडचण भासली नाही. कुर्याझकरांना हे सारं जमत नसे व

त्यांची परिस्थिती हॅम्लेटसारखी चिंताजनक होई. ते उभे राहिले तर कोणीतरी त्यांच्या वाटेतून बाजूला होण्यासाठी अंगावर खेकसत असे.

गॉर्कीवाल्यांबद्दल चांगलं बोललं की कुर्याझवाल्यांच्या पोटात दुखे, त्यामुळे मला खरोखर आनंद वाटायचा. आमच्या आघाडीच्या संमिश्र तुकडीची मुलं कुर्याझवाल्यांवर राग काढीत व त्यावेळी अतिशय वाईट शब्द वापरत. तसे त्यांनी करणं चुकीचं होतं, पण त्यांनी काही एखाद्या शिक्षकांच्या संस्थेत शिक्षण घेतलेलं नव्हतं.

गॉर्काईट्स म्हणत. 'तुम्ही थोडे थांबा. आमची बाकीची पलटण येऊ दे. मग तुम्हाला फुकट दुसऱ्यांच्या जिवावर खाता येतं का नाही, ते समजेल...'

त्यातल्या काही कुर्याझकरांना लवकरच येणाऱ्या घटनांची कल्पना करता येत नसे व ते उपरोधानं विचारत.

'ती मुलं आल्यानंतर काय विशेष घडणार आहे ते सांगाल का ?'

डेनिस कुठेतरी अशा प्रश्नाला उत्तर देई.

'तुम्हाला सांगतोच तर. ऐका. ते तुम्हाला असं करून सोडतील की तुमची आई इथं आली तरी ती तुम्हाला ओळखू शकणार नाही समजलात.'

आमच्या मिशाला असा नुसता कल्पनाविलास आवडत नसे. त्याने एकदा व्यवस्थितपणे काय होईल त्याची खरी जाणीव दिली.

'अरे बाबांनो, जे कोणी काम करणार नाहीत त्या प्रत्येकाचे डोळे चांगले उघडले जातील. तुम्ही दोनशे ऐंशीजण आहात नाही का ? तुमची तोंडं अशी होतील की त्याकडे कोणालाही बघवणार नाही.'

असं काही ऐकलं की खोव्हराक पचकन् थुंके व म्हणे, 'आमचे डोळे उघडणार काय ? ही तुमची जुनी गॉर्की कॉलनी नाही. आता इथे तुम्हाला प्रत्येक वेळी खारकोव्हला जाब द्यावा लागेल.

मिशा अशा बोलण्यावर जरा विचार करी व तो जरा आपलं हातातलं काम थांबवून अगदी खोटचा गोड शब्दांत विचारी, 'काय म्हणालास तू ? आता ही गॉर्की कॉलनी नाही तर खारकोव्ह आहे ? बरोबर आहे. पण तुला फुकट कोण खायला घालणार आहे? आणि असल्या फुकटचा उजाड निरुपयोगी लोकांची कोण पर्वा करील?'

असं बोलून मिशा परत आपलं हाती घेतलेलं काम करू लागे.

थोडचा वेळाने तो परत विचारी, 'काय रे, तुझं नाव काय ?'

खोव्हराक आश्चर्याने परत विचारी, 'काय म्हणालास ?'

'तुझं नाव मी विचारलं, बहुधा रानउंदीर किंवा डुक्कर असेल.'

खोव्हराक रागानं लाल झाला व म्हणाला,

'काय म्हणालास पुन्हा बोल... ...'

'मी तुला नाव विचारलं. सांगता येत नाही ?'

' माझं नांव खोव्ह्राक.'

'ओहो, खोव्ह्राक काय! मी तर विसरूनच जाईन. काहीतरी निरुपयोगी पायात अडकावं असं वाटतं. तू चुकून कधी काम करायला लागलास तर तुला प्रत्येक वेळी सांगावं लागेल, खोव्ह्राक मला ते दे पाहू, अरे खोव्ह्राक तू तयार झालास का? खोव्ह्राक ते पकड पाहू, वगैरे वगैरे. पण प्रत्येकजण विसरतच जाईल. तुझ्याबरोबर कोण रहाणार? चल बाजूला हो वाटेतून. मी काम करतोय दिसत नाही तुला? हे पिंप आज मला दुरुस्त केलंच पाहिजे. सध्या कोणी चहा, हात धुवायला पाणी एकाच भांड्यातून आणतात. तुम्हाला खायला घातलंच पाहिजे. तुम्हाला खायला दिलं नाही तर भांडी लाथेनं उडवाल व त्यात लोळाल. तुमच्या अंगाला घाण येईल व ते बरं नाही. शेवटी तुझ्यासाठी शवपेटी बनवावी लागेल. म्हणजे आणखी काम वाढलं......'

खोव्ह्राक शेवटी मिशाच्या प्रेमालापातून बाहेर जाण्यासाठी वळला. मिशानं परत त्याला प्रेमानं हाक मारुन सांगितलं,

'अरे बाहेर जाऊन जरा मोकळी हवा खाऊन ये. तुला जरा बरं वाटेल. त्यानं खरंच तुला खूप आराम वाटेल.'

खोव्ह्राकला जर मोकळ्या हवेचं महत्व पटलं तर साऱ्या कुर्याझची शिष्ट-मंडळी खरोखरच हवा खायला बाहेर जाऊ लागतील. अलिकडे ते माझ्यापासून दूर पळायला बघत–माझ्या नजरेआड राहण्यासाठी कुठेतरी भटकत रहात. तरीही मी कुर्याझमधल्या काही बड्या मंडळींशी परिचय करून घेतला होता. ते तसे अगदीच काही वाईट नव्हते. प्रत्येकाचे काही विशिष्ट व्यक्तिमत्व असते व ते असणं यात मला गैर असं कधी वाटलं नाही. त्यातला पेरेट्स मला आवडत असे. तो ताठ्यात इकडेतिकडे फिरत असे. तो आपले केसांचे एक झुलपं भिवयांपर्यंत भिडवी व व टोपी एका डोळ्यावर तिरपी घालत असे. सिगारेट नेहमी खालच्या ओठावर ठेवत असे व मधूनमधून थुंकत असे. मला माहीत होतं की त्याचा व्रण असलेला चेहरा मला शोधक नजरेनं न्याहाळत असे. ती नजर साधीसुधी नसून चुणचुणीत हुशार मुलाची नजर होती.

एक दिवस हे सारेजण संध्याकाळी डुकरांना रहाण्यासाठी इमारत बांधा-वयाची होती, तिथं गप्पा मारत व एकीकडे सिगारेटचा आस्वाद घेत बसले होते. मी तिथं थांबलो व माझ्यासाठी वर्तमानपत्राच्या कागदात सिगरेट वळली व त्यांच्याकडे ती पेटवण्यासाठी काडेपेटी मागितली. पेरेट्स माझ्याकडे उत्साहित व आपुलकीनं पहात मोठ्याने म्हणाला : 'कॉम्रेड डायरेक्टर, तुम्ही दिवसभर किती राबता व तुम्हाला असली निकृष्ट सिगारेट ओढावी लागते. सोविएत सरकारनं तुमच्यासारख्यांसाठी खास सिगारेट्स बनवायला पाहिजेत नाही का?' मी पेरेट्स-जवळ जाऊन माझी सिगारेट पेटवून घेतली. मी तितक्याच उत्साहानं मोठ्या

आवाजात शक्यतो अधिकारवाणीनं त्याला सांगितलं, 'हे पहा, ती तुझी टोपी काढून टाक पाहू.'

पेरेट्सच्या डोळ्यातलं हसू एकदम मावळलं, पण चेहरा हसरा ठेवण्याचा प्रयत्न करत तो म्हणाला :

'एकाएकी काय झालं ?'

'तुझी टोपी काढून टाक असं मी तुला सांगतोय. ऐकू येतंय की नाही ?'

'ठीक आहे. मी टोपी काढून टाकतो.'

मी माझ्या हातांनी त्याच्या केसांची झुलपं मागे केली व त्याच्या किंचित बावरलेल्या चेहऱ्याकडे शांतपणे पहात म्हटलं,

'आता ठीक झालं. असंच राहू दे.' पेरेट्स माझ्याकडे स्थिर नजरेनं पहात होता. माझी सिगारेट पेटलेली होती. त्याचे एकदोन झुरके घेऊन तोंड फिरवून सुतारखात्याकडे निघून गेलो.

त्यावेळी मला माझ्या शिक्षणतंत्राच्या कर्तव्याचा पुरेपूर परिणाम जाणवला. मी केलेल्या प्रत्येक हालचालीत, माझ्या संपूर्ण व्यक्तिमत्वात जाणीव झाली की या मुलांच्या मनात माझ्याबद्दल आवड निर्माण झाली पाहिजे. त्यांच्या मनात सहानुभुती निर्माण झाली पाहिजे. त्यांच्या मनात खोलवर ही जाणीव निर्माण झाली पाहिजे की मी त्यांच्याकडून कसलीही अपेक्षा करत नाही. त्यांना मी भलतंच महत्त्व देणार नाही. त्यांनी मला शिव्या द्याव्यात, माझ्यावर दात खावे, पण त्याचा माझ्यावर काडीमात्र परिणाम होणार नाही.

सुतारांचं दिवसाभराचं काम संपलं होतं व बोरोव्हाय चांगलं वंगण व वाईट वंगण यावर चर्चा करत होता. मला त्या चर्चेत खूपच रस वाटला व मी त्यात गर्क झालो होतो. तेवढ्यात माझ्या हाताला मागून कोणी खेचत असल्याचा मला भास झाला. प्रथम मी दुर्लक्ष केलं, पण परत हात खेचला गेल्यावर मी वळून पाहिलं तर पेरेट्स माझ्याकडे पहात होता. 'काय पाहिजे' असं मी विचारलं.

'तुम्ही माझ्याकडे मघा असं का पाहिलंत ?'

'काही खास कारण नाही' असं म्हणून मी परत बोरोव्हायकडे वळलो व त्याला सांगितलं की आपल्याला चांगलं वंगण तेल घेऊन ये.

बोरोव्हायनं उत्साहानं चांगल्या वंगण तेलाबद्दल आपली चर्चा चालू ठेवली. पेरेट्स रागानं बोरोव्हायकडे पहात होता व त्याचं बोलणं पुरं होण्याची वाट पहात होता. शेवटी एकदा बोरोव्हायनं आपली हत्यारांची पेटी उचलली व आम्ही चर्चच्या घंटाघराकडे गेलो. पेरेट्स आमच्या बाजूनं चालत होता व मधून वरचा ओठ चावत होता. बोरोव्हाय आपल्या गावच्या घराकडे गेला. माझे हात मी मागे केले होते. वळून मी पेरेट्सला विचारलं, 'तुला काय पाहिजे ?'

'तुम्ही माझ्याकडे असं का बघत होता ? सांगा मला.'

'तुझं नाव पेरेट्स आहे का ?'

'हो, मग त्याचं काय ?'

'तुझं पहिलं नाव स्टीफन आहे ?'

'तुम्हाला कसं माहीत ?'

'तू स्वेरड्लोव्हस्क रहिवासी आहेस, खरं ना ?'

'बरं. त्याचं काय ? तुम्हाला काय माहीत मी तियलाच आहे म्हणून ?'

'मला सारं काही माहीत आहे. तू चोरी करत होतास, खिसे कापत होतास. फक्त तू मूर्ख आहेस का शहाणा आहेस एवढंच मला माहीत नव्हतं.'

'बरं. मग '

'माझ्या सिगारेटबद्दलचा तुझा प्रश्न अगदी मूर्खपणाचा, महामूर्खपणाचा होता. माफ कर मला, तुला वाईट वाटेल. पण खरं सांगणं जरूर होतं.'

त्या संधीप्रकाशातसुद्धा पेरेट्सचा रागानं लाल झालेला चेहरा मला दिसत होता....तो जरा मागं वळला व इकडेतिकडे पाहू लागला.

'ते सारं ठीक आहे. मला काही वाईट वाटलं नाही. पण मी बोललो त्यात मूर्खपणा कसला झाला ?'

'अगदी उघड आहे. तुला माहीत आहे की मला किती काम आहे व शहरात जाऊन सिगारेट्स आणायला मला वेळ नाही. सोविएत सरकारनं मला तुमचं आयुष्य चांगलं व सुखी व्हावं या कामासाठी इथं नेमलं आहे. आता तरी समजलं का तुला ? याउप्परही तुला समजत नसेल तर तुझी कुवत नाही. तू झोपायला जा कसा.'

'मला समजलं,' असं पेरेट्स म्हणाला. एकीकडे तो पायांनी माती उकरत होता,

'तुला समजलं. मग चांगली गोष्ट आहे.'

मी पेरेट्सच्या डोळ्यात अगदी खोलवर तुच्छतेनं पाहिलं. माझं म्हणणं त्याच्या डोक्यात किती शिरलंय ते मला पहायचं होतं. पेरेट्सनं मान खाली घातली.

'मग शिरलं तुझ्या डोक्यात आणि तरीही तू सोविएत सरकारला शिव्या देत असतोस. तू मूर्ख, अगदी शतमूर्ख आहेस.'

मी बालवीरांच्या खोलीकडे जायला निघालो. पेरेट्स दोन्ही हात पसरून माझ्या वाटेत उभा राहिला.

'बरं मी मूर्ख आहे. मला मूर्ख म्हणा. पण म्हणून काय झालं ?'

'म्हणून तर मी तुझ्या चेहऱ्याकडे निरखून पाहिलं. तू खरोखरी मूर्ख आहेस का नाही हे मला पहायचं होतं.'

'मग तुम्हाला कळलं ना आता ?'

'होय. मला चांगलं कळलं.'

'पुढे काय ?'

'मग जा आणि आपला चेहरा नीट आरशात न्याहाळून घे.'

पेरेट्सच्या भावनात्मक प्रतिक्रिया आणखी पहायला मला वेळ नव्हता. मी सरळ घरी निघून गेलो.

माझा कुर्याझकरांशी जसा जास्त सहवास वाढत जात होता, तसतसं मला त्यांच्या वागण्यात होणारे फरक लक्षात येत होते.

काहीजण माझ्याकडे सहानुभूतीनं बघत. काहीजण मला बघून हसून प्रतिसाद देत असत. काहीजणांच्या चेहऱ्यावर निष्कपट लाजाळू हसू दिसत असे, ते बहुधा अगदी अनाथ असत. मला त्यातल्या काही जणांची नावं माहीत झाली होती व काही जणांचे आवाजही ओळखीचे झाले होते.

बसक्या नाकाचा व्होलोदचा झोरेन याचे गाल कसे गुलाबी होते, व त्याच्या डोळ्याखालचे स्नायू असे होते की त्याचा चेहरा कितीही घाण झाला तरी ते स्नायू झाकले जात नसत. हा व्होलोदचा सारखा मला वाटेत भरायचा. हा तेरा वर्षांचा होता. आपले दोन्ही हात पाठीमागे ठेवायची त्याला सवय होती. तो कमी बोलावयाचा, पण त्याचा चेहरा नेहमी हसरा होता. तो दिसायला चांगला होता. त्याचे डोळे काळेभोर असून भिवया अगदी कमानदार होत्या. तो आपल्या भिवया उंचावी व जणू काही बाहेरचा उजेड आत भरून घेतो आहे असं वाटे. तो आपल्या डोक्याला हिसका देई व गोडसं हसे. पण बोलत नसे.

मी त्याला विनंती करत असे, 'व्होलोदचा, बोल ना काही तरी. मला तुझा आवाज कसा आहे ते ऐकू दे !'

तो लाजून तोंड फिरवी. त्याला वाईट वाटे. तो घोगऱ्या आवाजात बोले, 'ठीक आहे.'

व्होलोदचाचा एक दोस्त होता, मिट्का निसिनोव्ह नावाचा. तो व्होलोदचा-सारखाच गोलमटोल गुलाबी गालांचा. तो स्वभावानं सरळ व साधा होता. पहिल्या कॉलनीच्या काळात असल्या मुलांना मोचीकाम शिकायला किंवा पाहुण्यांच्या सरबराईला ठेवलं होतं. मी मिट्काकडे पाहून विचार करी, 'मिट्का, तुला काय शिकवावं. सोविएत राज्याच्या पार्श्वभूमीवर तुझ्या आयुष्याला कसलं वळण देता येईल बरं !'

मिट्का लाजून दूर निघून जाई. तो कधी घोगऱ्या आवाजात कुजबुजत नसे. तो आपल्या भिवया आकसून ओठांची नुसती हालचाल करी. परंतु मला मिट्काचा आवाज माहीत होता. त्याचा आवाज अगदी बारीक– एखाद्या सुंदर सुखासीन परंतु लाडावलेल्या बाईच्या आवाजासारखा आवाज होता. त्यात मधूनच एखादा मंजुळ ध्वनी निघायचा.

मिट्काचा हा आवाज मला ऐकायला फार आवडायचा. मिट्का खुषीत कुर्याझमधल्या इतर रहिवाशांची माहिती द्यायचा.

'तो पहा हं. तो, तो पळतोय. कुठे पळतोय ? नीट हेरून ठेवा. व्होलोद्या बघ, अरे हा तर पुरयाक. हा बरका एका वेळी तीस पेले दूध पिऊ शकतो. तो पहा तिकडे गाईंच्या गोठ्याकडे गेला बघा ... तो दिसतोय. तो अगदी पक्का उंदीर आहे, तो खिडकीतून पहातो आहे तो. तो तसा बेडूक आहे. तुम्हाला कल्पना नाही तो अगदी तेलासारखा गुळगुळीत आहे. तुम्हाला तो चांगलं सतावीत असेल !'

'अरे हा तर वान्या झायचेन्को' झोरेन म्हणाला व त्यानं नाखुषीत तोंड फिरवलं. भलत्याचबद्दल बोललो यामुळे तो शरमिंदा झाला.

मिट्का वस्ताद होता. झोरेन आपल्या दोस्ताबद्दल जे बोलला त्याबद्दल त्याला लाज वाटली व वाईटही वाटलं. त्याची नजर आपल्या दोस्ताच्या अव्यवहारी बोलण्याबद्दल क्षमायाचना करत होती.

'तसं नव्हे, मी वान्याबद्दल नाही बोललो. त्याचं तसं नाही. त्यानं आपला मार्ग आखून ठेवलाय.'

'बरं, काय बरं त्याचा मार्ग आहे ?'

'त्याचा मार्ग अं...'

मिट्का मातीमध्ये पायांनी रेघोट्या काढत बसला.

'सांग ना. कसला मार्ग ?'

'तसं विशेष असं नाही त्यात. पण ज्या दिवशी वान्या या कॉलनीत आला तेव्हापासून त्यानं आपल्यासारख्या मुलांचा वेगळा कंपू तयार केला. खरं ना व्होलोद्या ? त्यांना मोठी मुलं कधीकधी बडवून काढतात, पण त्यांनी आपला मार्ग सोडला नाही.'

मला निसिनोव्हचं ते तत्वज्ञान समजलं. मोठ्या पंडितांनीही त्या तत्वज्ञानाची कधी फारशी कल्पना केली नसती.

कुर्याझमध्ये काही गोड मुलं होती. काही दिसायला छानच होती. तर काहींना ते भाग्य नव्हतं. काही थोड्यांना आपला स्वतःचा मार्ग सापडण्याचं भाग्य लाभलं नव्हतं. इतर काही भकास चेहरे होते. काहीजण कसेबसे जगत होते. त्यांना दुसऱ्यांच्या मर्जीप्रमाणे राहावं लागत होतं. पूर्वीच्या त्यांच्या कॉलनीच्या दिनक्रमात अवलंबून रहाणं ही अगदी अपरिहार्य गोष्ट होती.

झोरेन व निसिनोव्ह हे झिपऱ्या वाढलेले, सोबेहेन्को हा रडका परंतु आतल्या गाठीचा, वास्या गाडीनोव्ह शांत भुरकट चेहऱ्याचा, सर्जी ख्राब्रेन्को हे माझ्याभोवती भोवती रहात. खिन्न चेहऱ्यानं हसत. परंतु माझ्याकडे सरळसरळ येण्याची त्यांना हिंमत होत नव्हती. वान्या झायचेन्कोचा कंपू सरळसरळ माझ्याकडे

आला व त्यांनी नव्या आयुष्यात मिसळून जायचं ठरवलं, याबद्दल त्यावरील सर्वांना वाऱ्याचा हेवा वाटायचा. पण ते स्वत: मात्र वाट बघत थांबले होते ...

सारेच राहिलेले वाट बघत होते. ते कशासाठी थांबून राहिले होते हे कळण्यासारखं आहे. ते सारेजण गॉर्काईट्स येण्याची वाट पहात होते. खरं तर ह्यात फारसं महत्त्वाचं, दुर्बोध किंवा अनाकलनीय असं काहीच नव्हतं. प्रत्येक क्षण आनंदाचा ठरेल का दु:खाचा त्रासाचा ठरेल. मुलींच्या मध्येसुद्धा प्रत्येक दिवशी काही तरी नवीन व आनंददायक होतंय अशी भावना होती. ओल्गा लापोव्हा हिनं आपल्या साऱ्या मैत्रिणींना एकत्र केलं होतं. तिच्या तुकडीला सहावी तुकडी असं नाव दिलं होतं. त्यांच्यात भलताच उत्साह संचारला होता. त्या आपल्याच डॉरमिटरीत काहीतरी शिवत, दुरुस्त करत, धूत, रंगसफेदी करत होत्या. हे सारं करत असताना गाणी गात होत्या. गुलयाएवा सारखी काहीतरी करीत असे. तिचे चुरगळलेले कपडे आम्हाला दिसू नयेत म्हणून ती खूप काळजी घेई. कुडल्टी मुलींच्या डॉरमिटरीत बरेचदा जाई व त्यांना काय हवं नको याची नीट काळजी घेई. ही मुलींची सहावी तुकडी बगीच्यात किंवा शेतात काम करायला कधीही आली नाही, कारण मुलींनी असलं काम करणं हे कुर्याझच्या चालीरितीत बसणारं नव्हतं.

कोरोटकोव्हसुद्धा वाट पहात होता. तो कुर्याझच्या रीतीभातींचा केंद्रबिंदू समजला जाई. तो तसा फार चाणाक्ष होता. त्यानं कधीही शब्दानं, कृतीनं किंवा वागण्यात वाकडेपणा दाखवला नाही. इतरांच्याप्रमाणे दोष देण्यात काही अर्थ नव्हता. तो फक्त काम करायला जात नसे. आमची आघाडीची संमिश्र तुकडी त्याच्यावर चिडलेली होती, ते त्याचा द्वेष करत. त्यांची खात्री झाली होती की कुर्याझमध्ये कोरोटकोव्ह हाच आपला मुख्य शत्रू आहे.

मला असं कळलं की व्होलोकोव्ह, गोरोवस्की आणि झोरका वोलकोव्ह या सगळ्यांनी एकदा चर्चा करून या प्रश्नाचा कायमचा निकाल लावायचा असं ठरवलं. त्यांनी कोरोटकोव्हला भेटायला बोलावलं. ही बैठक तलावाच्या काठी झाली. त्यांनी कोरोटकोव्हला कॉलनी सोडून कुठेही बाहेर जावं असं सुचविलं. पण कोरोटकोव्ह तसा बेरकी. त्यानं सरळ सांगितलं, ' मी कॉलनी सोडून जाण्याचं मला काहीही कारण दिसत नाही. मी आहे तिथंच राहणार. '

ती गोष्ट तेवढ्यावरच राहिली. त्यातून निष्पन्न काही झालं नाही. कोरोटकोव्हनं त्याबद्दल माझ्याकडे कधी वाच्यता केली नाही. माझ्या कामात जराही रस घेतला नाही. जेव्हा जेव्हा आमची भेट होई त्या प्रत्येक वेळी तो आपली फिकट रंगाची झोकदार टोपी काढून मला अतिशय आदराने, नम्रतेने अभिवादन करत असे.

' कॉम्रेड डायरेक्टर, तुम्ही कसे आहात? ' त्याचा तरतरीत चेहरा व काळे लांब पापण्या असलेले डोळे माझ्याकडे वळवित असे. ती त्याची नजर न चुकता जणू काही मला सुचवत असे की, ' आपण एकमेकांच्या मार्गात येण्याचं कारण

नाही. तुम्ही तुमच्या मार्गानं जा, मी माझ्या मार्गानं जाईन ! मी तुम्हाला योग्य तो मान देईन. '

पेरेटस्‌बरोबर झालेल्या माझ्या संभाषणानंतर सकाळी न्याहारीच्या वेळी मला स्वयंपाकघराच्या खिडकीजवळ भेटला. मी काही तरी आदेश देत होतो, तेवढा वेळ तो बाजूला झाला व नंतर लगेच माझ्याकडे वळून म्हणाला,

' कॉम्रेड डायरेक्टर, मला माफ करा. पण तुमच्या गॉर्की कॉलनीत बंद कोठडी आहे का ? '

' नाही. तशी काही कोठडी वगैरे नाही,' असं मी त्याला तितक्याच गंभीरपणे उत्तर दिलं.

मी म्हणजे वस्तुसंग्रहालयातील एक वस्तू आहे अशा तऱ्हेने माझ्याकडे पहात तो सावकाश म्हणाला,

' मी ऐकलंय की तुम्ही मुलांना अटक करून ठेवता. '

'तुला तशी काळजी करण्याचं कारण नाही. मी फक्त माझ्या मित्रांनाच हा मान देतो.' असं मी त्याला तुटकपणं सांगितलं. एवढं बोलून आपल्याला त्याच्यात काहीही रस नाही, असं दाखवून मी निघून गेलो.

मेच्या १५ तारखेला मला तार मिळाली :

' उद्या सर्वजण संध्याकाळच्या गाडीनं निघत आहोत, लापोट.' संध्याकाळच्या जेवणाच्या वेळी ही बातमी मी सर्वांना सांगितली.

' परवा दिवशी आपण आपल्या कॉम्रेड्‌सना भेटणार. माझी मनापासून इच्छा आहे की तुम्ही सर्वजण त्यांना मित्रत्वाच्या नात्यानं भेटाल. इथून पुढे आपण सर्वजण एकत्र राहणार व एकत्र काम करणार आहोत. '

पाखरं वादळात जशी एकदम चिडीचूप होतात, तशा साऱ्या मुली एकदम गप्प झाल्या. काही लहान मुलं तिरकस चेहरे करून आपल्या सोबत्यांकडे पाहू लागली. काहीजणांचे चेहरे तोंड उघडे ठेवून कितीतरी वेळ तसेच राहिले.

खिडकीजवळच्या कोपऱ्यात बाकं नव्हती, तर टेबलाभोवती खुर्च्या मांडलेल्या होत्या. कोरोटकोव्ह व त्याचे मित्र एकाएकी अतिशय आनंदित झाले. ते मोठमोठ्याने हसून जणू काही कोट्या करत आहोत असं भासवत होते.

त्या रात्री आमच्या आघाडीच्या तुकडीनं गॉर्काईटसचं कसं स्वागत करायचं त्याची चर्चा केली. सारा तपशील कोम्सोमोलनं सांगितल्याप्रमाणे तयार करण्यात आला. कुडल्टीचा हात चर्चा करत असताना त्याच्या डोक्यावरुन एकसारखा फिरत होता.

'आपली सारी मुलं इथं येत आहे हा विचारही जरा मनाला बेचैन करतो. '

दरवाजा हळूच उघडला गेला व झोरका वोलकोव कसाबसा त्या फटीतून खोलीत आला. टेबलाचा आधार घेऊन तो कसाबसा बाकावर बसला व एका

डोळयानं आमच्याकडे टक लावून पाहू लागला. त्याच्या दुसऱ्या डोळयावर एक जखम झाली होती व चेहरा काळानिळा पडला होता.

'काय झालं रे ? ' असं सर्वांनी विचारलं.

'त्यांनी मला मारलं ' असं झोरका हळूच म्हणाला.

'त्यांनी म्हणजे कुणी ? '

'माहीत नाही. कुणी मुझिक असावेत. मी स्टेशनवरून परत येत होतो. त्यांनी मला रेल्वे फाटकापाशी गाठलं व मारलं. '

'थांब जरा. तुला मारलं हे आम्हाला दिसतंय; ते तू सांगायची जरूर नाही. पण काही बोलाचाली झाली का ? आणखी काही-झालं ? '

'तसं फारसं काही झालं नाही. त्यांच्यातला एकजण म्हणाला, 'ए, वारे काम्सोमोल !' असं बोलून त्यांनी माझ्या थोबाडीत मारली.' असं झोरकानं सागितलं.

'तू काय केलंस ? गप्प बसलास ? '

'नाही. मी पण परत त्याच्या थोबाडीत मारली. परंतु ते चौघेजण होते. '

'मग तू पळून जाण्याचा प्रयत्न केलास का ?'

'नाही. मी तसं काही केलं नाही. '

'मग तू केलंस काय ? '

'मी अजूनही रेल्वे फाटकाशी आहे. समजत नाही तुम्हाला ? ' मुलं एकदम मोठ्यांदा हसली. वोलकोव्ह रागानं आपल्या मित्राच्या दुबळ्या चेहऱ्याकडे पहात राहिला.

□

# ७

# तीनशे त्र्याहात्तर बी

सकाळी मी गॉर्काईट्सना भेटायला ल्यूबोटीन स्टेशनवर गेलो. हे स्टेशन खारकोव्हपासून तीस किलोमीटरवर आहे. स्टेशन तसं जुनाट असून त्याच्या फलाटावर अगदीच अपुरा उजेड होता. काही थकले भागलेले शेतकरी फलाटावर इकडून तिकडे फिरत होते. रेल्वेचे कर्मचारी व कामगार त्यांच्या तेलकट कपडयांमध्ये व जडबूट सावरत काही तरी ठाकठोक करत होते. मी अगदी साठणीचे नवे कपडे घातले होते. आजूबाजूचं वातावरण जणूकाही माझे कपडे अयोग्य आहेत असं दाखवण्याचा अट्टाहास करत होते. तसं पाहिलं तर ते माझे कपडे काही मोठे भारी किंमतीचे नव्हते. साधी हॅट व सैनिकाचा ओव्हरकोट होता...... तो दिवस जणूकाही मोठा धुमश्चक्रीचा होता. एक रेल्वे हमाल चुकून मला धक्के मारुन गेला. त्याला माझा पोशाख पाहून धक्का बसला नाहीच; पण त्यानं माझी दखलही घेतली नाही. त्या उर्मट स्टेशनमास्तरनं मला थोडाही आदर दाखवला नाही किंवा ३७३–बी ही गाडी कुठं आहे व किती वाजता येईल या माझ्या प्रश्नाला धड उत्तरही दिलं नाही. त्याचं मला फारसं आश्चर्य वाटण्याचं कारण नव्हतं. ह्या अडाणी लोकांना ३७३–बी ही गाडी माझी मुख्य राखीव फौज घेऊन येत आहे, मार्शल कोव्हल व मार्शल लापोट हे त्या फौजेचे सूत्रधार आहेत व या रद्दी आडवळणाच्या स्टेशनवर कुर्याझवर हल्ला करण्यासाठी मी माझी सारी शक्ती एकत्रित करणार आहे हे यांना कसं कळणार? आज माझा मान फार महत्वाचा व

धोक्यात आहे हे या लोकांना कसं समजावून देणार ! नेपोलियनचा मुलगाही आज माझं वैभव झाकळून टाकू शकला नसता. नेपोलियनला ती लढाई करणं कदाचित सोपं गेलं असतं. परंतु समाजशिक्षणाच्या पद्धतीमुळं मला बांधून टाकलं असतं तर त्यानं कसा मुकाबला केला असता ते पाहण्याची मला फार इच्छा झाली होती.

फलाटावर मी इकडून तिकडे येरझाऱ्या घालीत होतो. माझ्या मनात आलं की माझे शत्रू हळूहळू आपली ताकद गमावीत आहेत.

मी नेहमीप्रमाणे लवकर उठलो. आज कॉलनीत नेहमीपेक्षा बरीच हालचाल दिसत होती. पायोनियरच्या खोलीच्या खिडकीजवळ बरीच गर्दी जमलेली दिसत होती. इतर काहीजण बादल्या घेऊन झऱ्यावर पाणी आणायला गेलेले दिसत होते. झोरेन व निसिनोव्ह चर्चच्या घंटाघराजवळ उभे होते.

'गॉर्कीइट्स सकाळी किती वाजता येणार ?' असं मिट्कानं मला गंभीरपणे विचारलं.

'होय येणार. पण तुम्ही आज एवढ्या लवकर कसे उठलात ?'

'तसं काही नाही, पण झोप येत नव्हती. बरं. पण ते रायझोव्हवरुन येणार का ?'

'होय. पण तुम्हाला ते इथंच भेटतील.'

'ते लवकरच येतील का ?'

'तुम्हाला प्रातर्विधी उरकायला वेळ मिळेल.'

'चल मिट्का, आपण आटपून टाकू.'

झोरेन माझी सूचना अंमलात आणण्यासाठी निघून गेला. मी गोरोविचला सर्व कुर्याझच्या मुलांना मैदानात गॉर्कीइट्सना भेटण्यासाठी व आपल्या बावटचाला सलामी देण्यासाठी जमायला सांगितलं होतं. अर्थात आलंच पाहिजे अशी कोणावर सक्ती करू नका, नुसतं या, असं सांगितलं होतं.

शेवटी ल्युबोटीन स्टेशनच्या त्या मरगळलेल्या वातावरणात थोडं चैतन्य आलं. एका रेल्वेच्या माणसानं घंटा वाजवली. ते केल्यावर त्यानं आपल्या त्या कृतीची अटकळ सांगितली :

'तीनशे त्र्याहात्तर बी येण्याची ही पूर्वसूचना आहे. ती गाडी वीस मिनिटात इथं येऊन पोचेल.'

भेटण्याच्या ठरवलेल्या साऱ्या योजनेत एकाएकी काही फरक झाला व त्यानंतर सारा गोंधळ व पोरकटपणाच सुरू झाला.

तीनशे त्र्याहत्तर बी ही गाडी येण्याआधी एक उपनगरी गाडी मध्येच आली व त्यातून आमचे राबफाकचे विद्यार्थी बेलुखीन वगैरे कोम्सोमोल अचानक बाहेर पडले. बेलुखीनच्या हातात फुलांचा गुच्छ होता. त्यानं ओरडून सांगितलं की हे

पाचव्या तुकडीच्या स्वागतासाठी आणलंय. 'पाचवी तुकडी म्हणजे काय मोठ्या प्रतिष्ठीत महिला नाहीत ? त्यांचं स्वागत मी करु शकतो.'

त्या गर्दीत मला सोनेरी केसांची ओक्साना दिसली. राखीलचं शांत सौम्य हास्यही दिसलं. ब्रातचेन्को आपले हात जोरजोरानं हलवत होता; जणू काय त्याच्या हातात चाबूकच असावा. एकीकडे तो उगाचच ओरडत होता,

'मी एक कोसॅक सैनिक आहे व मी आज मोलोडेट्सवर बसणारच.'

इतक्यात कोणीतरी ओरडत आलं.

'आमची गाडी इथं येऊन युगे उलटली. ती दहाव्या रेलपट्टीवर आहे.'

'खरंच का ?'

'अहो होय, ती दहाव्या रेलपट्टीवर कित्येक तास उभी आहे.'

ही माहिती ऐकून आम्ही वळतो न वळतो तोच तिसऱ्या रेलपट्टीवर उभ्या असलेल्या मालगाडीच्या डब्यातून लापोटनं आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे आम्हा सर्वांवर नजर फिरवली.

'अरे तो पहा लापोट, त्या डब्यातून डोकावतोय.' असं काराबानोव म्हणाला.

आम्ही सारेजण त्याच्याकडे धावलो, पण तो डोकं आत घेत म्हणाला,

'तुम्ही तिथेच थांबा. मी सांगतो ते लक्षात ठेवा. मी फक्त ओक्साना व राखीलचं चुंबन घेईन. बाकी सर्वांशी हस्तांदोलन करीन.'

काराबानोवनं लापोटला त्याने पाय धरुन ओढले. त्याचे पायाचे तळवे हवेत जरा चकाकले.

यावर लापोट काराबानोवला म्हणाला 'बरं बरं तू सुद्धा माझं चुंबन घेऊ शकतोस.' असं म्हणून त्यानं आपला गाल काराबानोवच्या पुढं केला.

ओक्साना व राखीलनं पण लापोटचं चुंबन घेतलं व बाकी सारे गाडीकडे धावले.

लापोटनं माझा हात धरुन खूप वेळ तो दाबला. त्याच्या चेहऱ्यावर खराखुरा आनंद ओसांडत होता.

'प्रवास कसा झाला ?'

'एखाद्या यात्रेला जाण्यासारखं वाटलं' लापोट म्हणाला, 'मोलोडेट्सनं जरा गडबड केली—रात्रभर त्यानं डब्यात लाथाळी केली. त्याला केलेली पेटी सर्व मोडून गली. आपण इथं किती वेळ थांबणार ? बराच वेळ थांबणार असलो तर हातपाय धुवून बाकी काही उरकून घेऊ या......'

'जाऊन पाहून ये पाहू'

लापोट स्टेशनकडे धावला व मी गाडीकडे गेलो. त्या गाडीला एकूण पंचेचाळीस डबे होते. उघडया दरवाजातून व वरच्या बाजूनी गॉर्कीईटस्चे चेहरे हसत, ओरडत आणि आपल्या टोप्या हातात घेऊन हलवत माझ्याकडं पहात होते.

गुड खिडकीच्या मोकळ्या जागेतून कमरेएवढा भाग बाहेर काढून भरलेल्या आवाजात बोलला.

'आंतोन, सेमयानोविच आंतोन, हे बरोबर आहे का ? नाही, हे बरोबर नाही. हे कायदेशीर आहे का ? नाही, हे बेकायदेशीर आहे.'

'अरे गुड, तुझी काय तक्रार आहे ?'

'तो लापोट शिष्ट लेकाचा. सिग्नल देण्याआधी कुणी जर गाडीतून उतरलं तर त्याचं डोकं उडवलं जाईल. तुम्ही घ्या ना हातात सारं. लापोट आम्हाला त्रास देतो. लापोटला कशाला अधिकार दिला ? नको. त्याला बाजूला करा.'

लापोट माझ्या मागं येऊन उभा राहिला होता. त्यानं गुडचं बोलणं ऐकलं व म्हणाला :

'तू गाडीच्या बाहेर यायचा प्रयत्न कर ! सिग्नल पडण्यापूर्वी तू बाहेर यायचा प्रयत्न कर. तुमच्यासारख्या नाचऱ्या पोरांना सांभाळणं यात मला काही आनंद वाटत नाही. चल हो बाहेर.'

'तुला काय वाटलं बाहेर येण्यासाठी माझा जीव थोडाथोडा होतोय. मी आहे तिथं चांगला आहे. हा तत्वाचा प्रश्न आहे.'

'आता कसा वळणावर आलास ! सिनेन्कीला पाठव बरं', असं लापोट म्हणाला.

एक मिनिटभरानं लहान बालीश चेहऱ्याचा सिनेन्की गुडच्या खांद्यावरून वाकून पहात होता. तो नुकताच उठला असावा. त्याचे डोळे जड दिसत होते व तोंड तसंच उघडं ठेवलं होतं.

'आंतोन सेमयानोविच !'

'अरे नमस्ते म्हण वेड्या. रीतभात सारी विसरलास ?' असं गुड त्याला रागानं म्हणाला.

सिनेन्की लाजेनं लाल झाला व माझ्याकडे पहात राहिला. तो गोंधळून काहीतरी पुटपुटला.

'आंतोन सेमयानोविच काय झालं ? सांगा काय झालं ?' त्यानं आपले डोळे हातांनी चोळले आणि तो गुडवर खूप रागावला.

'तू मला उठवायचं कबूल केलं होतंस. होय की नाही ? तू कसला कमांडर, तू नुसता गुड आहेस. तू स्वतः उठलास. आपण कुर्याझला येऊन पोचलो का ? हेच कुर्याझ आहे का ?'

लापोट हसला व म्हणाला :

'अरे हे कुर्याझ नाही. हे ल्युबोटीन स्टेशन आहे. उठ बरं आणि आपला बिगुल वाजव.'

सिनेन्की आता खरोखर गंभीर झाला. त्याची झोप चांगलीच उडाली.

'बिगुल वाजवायचा ? वा छान!'

आता तो चांगला जागा झाला. माझ्याकडं बघून गोडसं हसला व आदरानं म्हणाला, 'आंतोन सेमयानोविच, नमस्ते, तुम्ही कसे आहात.' तो बाकावर बिगुल वाजविण्यासाठी उभा राहिला.

दोन मिनिटात त्यानं बिगूल काढलं. माझ्याकडे पाहून पुन्हा हसला. हातानं ओठ पुसले व बिगुल ओठांना लावलं. क्षणार्धात ते स्टेशन आमच्या नेहमीच्या आवाजानं भरुन गेलं.

पोरं भराभर गाडीच्या खाली उतरली व माझ्याशी हस्तांदोलन करत होती. लापोट गाडीच्या टपावर उभा राहून आम्हा सर्वांकडे विचित्र हावभाव करत होता.

'तुम्ही कशासाठी इथं आला आहात ? प्रेम करायला आला ? तुम्ही गाडीचे डबे केव्हा धुऊन स्वच्छ करणार ? आपण हे असेच घाणेरडे डबे ठेऊन जाऊ असं तुम्हाला वाटत असेल. आता नीट लक्ष द्या नाहीतर समजेल मग. तुमच्या नव्या पाटलोणी घाला. तुमचा कमांडर कुठं आहे ?'

एवढ्यात तारानेट्सनं शेजारच्या ब्रेकडब्यातून वाकून पाहिलं. तो नुसती एक जुनी चुरगळलेली पाटलोण घालून बसला होता व दंडावर मात्र लाल रंगाचा एक पट्टा अडकवला होता.

'अरे मी इथं आहे ना ?'

'हीच शिस्त पाळता होय ?' लापोट ओरडला. पाणी कुठाय माहीत आहे ? आपण इथे किती वेळ थांबणार माहीत आहे ? आपली न्याहारी कधी तयार होणार ? काय काय माहीत आहे सांग बरं मला.'

तारानेट्स लापोटच्या जवळ डब्याच्या टपावर चढला व बोट घालून लापोटच्या प्रत्येक प्रश्नाला उत्तर दिलं, 'गाडी इथं चाळीस मिनिटं थांबेल. त्या मनोऱ्यापलीकडें जाऊन ते हातपाय धुवू शकतात. फ्रेडरेन्कोनं न्याहारी तयार ठेवली आहे. जेव्हा पाहिजे तेव्हा तुम्ही न्याहारी करायला सुरवात करू शकता.'

'तुम्ही साऱ्यांनी ऐकलं ना. मग जर तुम्ही ऐकलंय तर इकडे तिकडे बघत कशाला राहिलात ?'

लापोट जरा रागानं सर्वांना उद्देशून बोलला.

मुलांचे उन्हात रापलेले पाय ल्युबोटीन स्टेशनच्या फलाटावर फिरत असता चकाकत होते. बरेचसे झाडू गाडीच्या डब्यातून फिरताना दिसले. चौथी संमिश्र तुकडी प्रत्येक डब्याजवळ जाऊन कचरा गोळा करत होती. शेरश्नेव व असादची यांनी गाडीच्या शेवटच्या डब्यातून झोपलेल्या कोव्हलला तसाच बाहेर काढून रेल्वे सिग्नलच्या खाली बसवलं.

कोव्हलच्या पुढ्यात बसत लापोट म्हणाला, 'अहो आमची झोप अजून झाली नाही.'

कोव्हल एकदम उठला.

'आता आमची झोप संपली,' असं परत लापोटनं कोव्हलला चिडवलं.

'मला तुझा अगदी वीट आलाय बघ,' असं कोव्हल अगदी गंभीरपणे म्हणाला. आपला हात माझ्याकडे करत कोव्हल म्हणाला, 'याला वेळेचं भान नाही. हा सारी रात्र इकडून तिकडे उड्या मारत होता. कधी गाडीच्या टपावर, कधी इंजिनडब्यात, कधी डुकरांना ठेवलेल्या डब्यात. त्याचं म्हणणं कुठे तरी काही तरी चुकलंय. याच्यामुळं मला गेले चार पाच दिवस झोप नाही व मी थकून गेलोय. आपण हातपाय कुठे धुवायचे ?'

असादची पुढे झाला व म्हणाला, 'चल, मला माहीत आहे. कोटका आपण याला घेऊन जाऊ.'

त्यांनी कोव्हलला अक्षरशः आपल्या खांद्यावर उचलून टॉवरजवळ नेलं.

'याला तरी कुठे चैन पडतंय आंतोन ! खरं सांगू हा गेला सबंध आठवडा झोपला नाही. कालच हा प्रथम झोपला' लापोटनं तक्रार केली.

अर्ध्या तासात सारे डबे झाडून पुसून स्वच्छ केले व सारी मुलं गडद निळ्या पाटलोणी व पांढरे सदरे घालून न्याहारी करायला बसली. मला त्यांनी कर्मचाऱ्यांच्या डब्यात न्याहारीसाठी नेलं.

गाडीच्या खालून कुणीतरी मोठ्यादा ओरडलं. 'लापोट स्टेशनमास्तर सांगतो की आपण आणखी पाच मिनिटांनी निघणार.'

मला आवाज ओळखीचा वाटला व वळून पहातो तो मार्क शैनहौस माझ्याकडं टक लावून पहात होता. त्याच्या डोळ्यात अजूनही ती झलक दिसत होती.

'मार्क तू कसा आहेस ? मला कसा तू दिसला नाहीस ?'

'मी आपला बावटा सांभाळत होतो,' असं मार्कनं सांगितलं.

'तुझं कसं काय चाललंय. तुला आता एकंदर बरं वाटतं ना ?'

मी गाडीतून रुळावर उडी मारली. मार्कनं मला चटकन् धरलं व हळू आवाजात म्हणाला,

'मला अजूनही माझ्याबद्दल समाधान वाटत नाही. खरंच आंतोन तुम्हाला मी फसवत नाही, पण मला खरंच समाधान नाही.'

'बरं, जाऊ दे'

'ते सारेजण साऱ्या रस्त्यानं येताना गाणी म्हणत होते. ते सारेजण अतिशय आनंदी आहेत. मी मात्र सारखा विचार करतो. मला त्यांच्याबरोबर गाता येत नाही. मी समाधानी नाही. खरं ना ?'

'तू कसला एवढा विचार करतोस ?'

'त्यांना भीती वाटत नाही. मला कसली व का भीती वाटते ?'

'तुला तुझी स्वतःची भीती वाटते का ?'

'नाही, नाही. मला स्वतःला घाबरण्यासारखं काही वाटत नाही. माझ्या स्वतःची मला मुळीच भीती वाटत नाही. मला तुमची व इतरांची काळजी वाटते. मला एकंदर सर्वसाधारण भीती वाटते. तिकडे आयुष्य कसं छान शिस्तबद्ध होते तसं कुर्याझला गेल्यावर राहणार नाही असं वाटतं आणि या सर्वाचा शेवट काय होईल याची भीती वाटते.'

'हे सारेजण धडपड करायला जात आहेत. धडपडण्यात खूप आनंद व समाधान असतं. हे बघ मार्क, जेव्हा आहे यापेक्षा चांगल्या सुखी आयुष्यासाठी धडपड असते त्यात जरुर भाग घेतला पाहिजे.'

'तसं मी स्वतःला बजावण्याचा प्रयत्न करतो हो. ती सारीजण आनंदात आहेत व गाणी गातात. मला मात्र त्यांच्यात का मिसळता येत नाही ? विचार करत बसायची माझ्यावर कशाला पाळी येते ?'

सिनेन्कीनं बिगुल अगदी माझ्या कानाशी वाजवून सभेची आठवण करून दिली.

'हा (सिग्नल) बिगुल म्हणजे जणूकाही आता हल्ला चढवायचा आहे' असं समजून मी लवकर गाडीच्या डब्यात शिरलो. मी बाहेर वाकून पाहिलं तेव्हा मार्क धावत आपल्या डब्याकडे जाताना दिसला. माझ्या मनात विचार आला की आज या तरुण पोराला जिंकणं किंवा हरणं याचा खरा अर्थ कळेल व मगच तो खरा बोल्शेविक होऊ शकेल.

इंजिननं शिटी दिली. लापोट कोणावर तरी ओरडलेला ऐकला. गाडी सुरू झाली एकदाची.

चाळीस मिनिटांनी ती गाडी रायझोव स्टेशनात सावकाश शिरली व तिसऱ्या फलाटाला लागली. फलाटावर एकातेरिना लिडोचका व गुलयेवना उभ्या होत्या. आनंदाने त्यांचे चेहरे फुलून गेले होते.

कोव्हल माझ्याकडे आला व म्हणाला, 'आपण वेळ कशाला फुकट घालवायचा ? आपण सामान उतरवायला लागू या.'

कोव्हल स्टेशनमास्तरकडे चौकशीला गेला. तो आल्यावर असं कळलं की गाडी तिसऱ्या फलाटीवरुन सामान उतरवण्यासाठी पहिल्या फलाटावर न्यावी लागेल, पण ते करण्यासाठी त्यांच्याकडे इंजिन नव्हतं. एक इंजिन खारकोव्हला गेलं होतं व एखादं खास इंजिन त्यासाठी कुठून तरी मागवावं लागेल. अशा तऱ्हेची गाडी रायझोव स्टेशनवर यापूर्वी कधीच आली नव्हती. त्यामुळं शंटींगसाठी त्यांच्याकडे इंजिन नव्हतं.

प्रथम थोडावेळ ही बातमी ऐकून आम्ही फारसे गडबडलो नाही. असाच अर्धातास निघून गेला. एक तास गेला. गाडी शेजारी फलाटावर उभं राहून आम्ही कंटाळून गेलो. मोलोडेट्स जास्तीत जास्त बेचेन व्हायला लागली. सूर्य वर

यायला लागला होता व त्यामुळं आम्हाला मोलोडेट्सची काळजी वाटू लागली-तिनं केलेली पेटी तिनं केव्हाच मोडून टाकली होती व राहिलेलं साहित्य मोडून तोडून टाकण्याची क्रिया चालू होती. निरनिराळे कर्मचारी फलाटावर इकडून तिकडे मोलोडेट्सच्या डब्यापुढून जात येत व त्याच्या मळकट वह्यातून काहीतरी लिहून घेत होते. स्टेशनमास्तरही रेलपट्टीवर येरझाऱ्या घालत होता व मधूनमधून मुलांना गाडीतून न उतरण्याबद्दल दम घेत होता. त्याचं म्हणणं होतं की त्या रेलपट्टीवर प्रवासी गाड्या, उपनगरीत व मालगाड्या सारख्या धावत असतात.

'अहो तुमचं इंजिन येणार तरी केव्हा ?' असं तारानेट्स स्टेशन मास्तरला विचारुन सतावत होता.

'तुझ्याइतकंच मलाही ते माहीत नाही. येईल उद्या फार तर !' असं चिडून तो म्हणाला.

'उद्या येईल काय ? बरं, मग ऐका तर. मला तुमच्यापेक्षा जास्त माहीत आहे.'

'काय माहीत आहे तुला ?'

'तुमच्यापेक्षा जास्त माहीत आहे मला.'

'तुझ्या बोलण्याचा अर्थ काय सांग पाहू.'

'सांगतो. इंजिन जर मिळणार नसेल तर आम्ही सारी मुलं मिळून गाडी पहिल्या रेलपट्टीवर ओढून (शंट करून) नेऊ.' स्टेशनमास्तर तारानेट्सला तिथेच सोडून घाबऱ्या घाबऱ्या निघून गेला. मग तारानेट्स माझ्यामागे लागला.

'आंतोनसर आम्ही ते काम करू शकतो. तुम्ही पहाच.'

'हे डबे सामानासकट आम्ही ढकलू शकतो. आम्ही तिघे गाडीत राहू. चला तुम्ही स्टेशनमास्तरजवळ बोला.'

'काहीतरी काय वेडेपणा हा तारानेट्स.'

काराबानोवनं आपले हात पसरले व म्हणाला.

'त्याला वाटतं की आपण आता गाडी ढकलू (शंट करु) शकू. त्या पुढच्या सिग्नलपर्यंत सगळे बाजूला ठेऊन न्यावे लागेल.'

तारानेट्स हट्ट धरुन बसला व बऱ्याच मुलांनी त्याला पाठिंबा दिला.

'चर्चा कशाला' लापोटचं म्हणणं पडलं, 'आपण सिग्नल देऊ व कामाला लागू. जमले नाही तर त्यात काही नुकसान नाही. आपण शंट करू शकलो तर उत्तमच. नाही करू शकलो तर नाही. आपण रात्र गाडीतच काढू.'

'हो. पण त्या स्टेशनमास्तरचं काय ?' काराबानोव म्हणाला. त्याचेही डोळे या कल्पनेनं चमकू लागले.

'स्टेशनमास्तरचं काय?' लापोटनं उत्तर दिलं 'त्या स्टेशनमास्तरला दोन हात व लांब जीभ आहे. तो आपले हात हलवत बसेल व तोंडानं ओरडत बसेल.'

'नाही रे बाबांनो, समजा, दुसऱ्या येणाऱ्या गाडीखाली आपण गेलो तर काय होईल माहीत आहे ?'

'ते आम्हाला माहीत आहे. आपण सिग्नल खाली करुन ठेवायचे म्हणजे प्रश्न मिटला.'

'तसं काही नको.'

पण हे सारे कुठे ऐकतात. सारी पोरं माझ्याभोवती गोळा झाली. जी दूर होती ती काही गाडीत चढली. काही गाडीच्या टपावर चढलो व मला समजावून सांगू लागली. दोन मीटर गाडी पुढं ढकलायची परवानगी द्या.

'प्रथम फक्त दोन मीटरच आम्ही पुढे नेऊ व थांबू. त्याच्यात काही धोका नाही. फक्त दोन मीटर न्यायची. मग पुढं काय करायचं ते तुम्ही ठरवा.'

शेवटी माझा नाइलाज झाला. मी परवानगी देऊन टाकली. सिनेन्कीनं बिगुल वाजवला. पण यावेळी हा कामाचा इशारा होता. सारी मुलं बरोबर काय करायचं हे समजली. ती डब्याच्या बाजूला ओळीनं उभी राहिली. पुढच्या बाजूला कुठून तरी मुली किंचाळल्या. लापोटनं गाडीतून फलाटावर उडी मारली आणि आपली टोपी फिरवली.

'थांब जरा. एक मिनिट थांबा.' तारानेट्स ओरडला. मी स्टेशनमास्तरला घेऊन येतो. त्याला माझ्यापेक्षा जास्त माहिती आहे ना.'

स्टेशनमास्तर फलाटावर धावत आला. त्यानं आपले दोन्ही हात डोक्यावर दाबले.

'अरे तुम्ही काय करताहात ? काय करताहात तुम्ही,' असं तो ओरडला.

'फक्त दोन मीटर आम्ही गाडी पुढे ढकलणार !'

'नाही. मुळीच नाही. बिल्कुल नाही. असं करण्यात काय धोका आहे माहीत आहे का ?'

'फक्त दोन मीटर म्हणून सांगितले, समजलं का' असं कोव्हल ओरडला.

स्टेशनमास्तरनं आपली नजर कोव्हलवर रोखली. त्याचे हात तसेच हवेत राहिले. मुले खुषीनं गाडीच्या बाजूला उभी राहून हसत होती. लापोटनं पुन्हा एकदा आपली टोपी उडविली आणि सारेजण गाडीवर आपला भार टाकून व पाय वाळूत घट्ट रोवून, ओठ घट्ट मिटून लापोटकडे इषाऱ्यासाठी नजर लावली. लापोटनं आपली टोपी हलवली. स्टेशनमास्तरनं नकळत लापोटचं अनुकरण केलं. त्याचं तोंड उघडंच राहिलं व तो नुसतं डोकं हलवत राहिला. 'ढकला' असं कुणीतरी मागून ओरडलं.

एकदोन सेकंद मला वाटलं की काही होणार नाही. गाडी तशीच उभी आहे असं वाटलं. चाकाकडे नजर गेली तेव्हा ती हळूहळू फिरत असलेली दिसली व दुसऱ्याच क्षणी गाडी सरकताना दिसली लापोट काहीतरी ओरडला आणि मुलं

एकदम थांबली. स्टेशनमास्तरनं माझ्याकडे पाहिलं व आपल्या टकलावरुन हात फिरवला. तो एकाएकी हसला. त्याचं दंतविहीन तोंड हसताना मजेदार दिसलं.

'हलवा. ठीक चाललंय... कोणीही गाडीखाली येणार नाही एवढं पहा म्हणजे झालं.'

त्यानं आपली मान हलवली व खो खो हसायला सुरुवात केली.

'काय भयंकर कार्टी आहेत. याला काय म्हणाल तुम्ही. चला जाऊ दे पुढे ! ढकला जाऊ दे......'

'सिग्नलच काय ?'

'त्याची तुम्ही काळजी करू नका.'

'तयार. चला' असं तारानेट्स ओरडला व पुन्हा एकदा लापोटनं आपली टोपी उडविली.

एक मिनिटानंतर गाडी सुरळीत सिग्नलकडे जाऊ लागली. जणू काही एखादं इंजिनच ती ओढीत असावं. मुलं फक्त गाडीच्या बाजूनं चालत असावी, असा भास होत होता. ब्रेक फलकावर मुलं होती. व जरुर तेव्हा ब्रेक लावत होती.

जाणाऱ्या दुसऱ्या बाजूनं गाडी दुसऱ्या रेलपट्टीवर स्टेशनच्या शेवटच्या टोकाला नेऊन मग परत ठरलेल्या फलाटावर येणार होती. गाडी चालू होती व आम्ही उभे होतो तो फलाट सोडून ती पुढं गेली. मी त्या घाईच्या वातावरणात एक दीर्घ श्वास सोडला. इतक्यात मला कुणी तरी मागून हाक मारली. 'कॉम्रेड मॅकारेन्को !'

मी वळून पाहिलं. ब्रेगेल खालाबुडा व कॉम्रेड झोया उभे होते. ब्रेगेल आपल्या सैलसर करड्या रंगाच्या कपड्यात ताठ उभी होती. तिला बघून मला कॅथॅरीन दी ग्रेटची आठवण झाली. एवढी ती रुबाबदार दिसत होती.

तिनं जणू काही आपल्या आसनावरूनच मला हाक मारली असं वाटलं.

'कॉम्रेड माकारेन्को, हे तुमचे विद्यार्थी का ?' मी जरा अपराधी नजरेनं ब्रेगेलकडे पाहिलं. पण परत तिचा करडा आवाज माझ्या कानात घुमला.

'प्रत्येक दुखावलेल्या किंवा तुटलेल्या पायाबद्दल तुम्हाला जाब द्यावा लागेल.'

ब्रेगेलच्या आवाजात अशी काही धार होती की एखाद्या महाराणीलासुद्धा ते ऐकून हेवा वाटला असता. महाराणीला शोभेल अशा थाटात उजव्या हाताचं बोट गाडीच्या एका विशिष्ट चाकाकडे दाखवून ती बोलत होती.

मी उत्तर द्यायची तयारी करत होतो. मुलं सारं काळजीपूर्वक करत होते. परंतु ती झोया फलाटाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन आपलं मोठं डोकं हलवित जोरजोरात काही तरी बडबडली. माझी उत्तर द्यायची इच्छा तिथंच दबली.

‘ ही मुलं बडबडताहेत. कॉम्रेड माकारेन्कोचे सर्व विद्यार्थी लाडके आहेत. ते आपल्यावर किती माया करतात ते दाखविण्याची या मुलांची धडपड आहे. ’

माझ्या छातीत काही तरी हालचाल झाली व घशात काही येतंय असं वाट लागलं. एखादा कुत्रा कुणावर गुरगुरण्यापूर्वी त्याला असंच होत असावं आणि मग तो एकदम तुटून पडत असावा. मी सुद्धा गुरगुरलो असेन, पण प्रत्यक्षात मी अतिशय शांतपणं उत्तर दिलं.

‘ कॉम्रेड झोया, तुम्हाला कुणीतरी माझ्याबद्दल चुकीची माहिती दिली आहे. मी असा भणंग माणूस आहे की साधी वागणूक मी आत्यंतिक प्रेमापेक्षा जास्त मोलाची समजतो.’

कॉम्रेड झोयाच्या गहिऱ्या डोळ्यात माझ्या उत्तरानं एकदम तिरस्काराची भावना दाट झाली. पण ती माघार घ्यायला तयार नव्हती.

‘ अस्सं होय. तुमचं हे समाजशिक्षण तारतम्यावर आधारलेलं आहे का ?’ असं ती फुत्कारुन म्हणाली.

‘ आम्हाला शक्य तेवढं आम्ही करतोच, कॉम्रेड झोया,’ असं मी पोक्तपणानं उत्तर दिलं.

कॉम्रेड झोया, फलाटाच्या दुसऱ्या टोकाकडून माझ्यावर धावून आली असती. माझ्या शिक्षणविरोधी चाललेल्या कार्यक्रमाचं महाकाव्य तिथेच संपलं असतं. एवढ्यात खालाबुडा एखाद्या साध्या कामगाराप्रमाणे बोलले,

‘ पहा, ते गाडी किती सहजपणं ढकलताहेत. पक्की बनेल कार्टी आहेत. ब्रेगेल, पहा पहा तरी तो गोटया माकड आहे ! ’

खालाबुडा आता व्हास्का अॅलेक्सेयेवच्या जवळ गेला होता. हा मुलगा साऱ्या बाजूनी अनाथ होता. खालाबुडा व व्हास्का यांचं काही संभाषण झालं. आमचा राग विरघळायला लागला तोच खालाबुडा गाडीवर काहीतरी चाचपून पहात होता. मी त्या पहाडमूर्ती कॅथॅरीनकडे एक ओझरती नजर टाकली. जणू पित्तप्रकोप झालेल्या कॉम्रेड झोयाला तिथेच सोडून मी गाडीकडे धाव घेतली.

वीस मिनिटांनी मोलोडेट्सला डब्यातून बाहेर काढण्यात आलं. तिनं सारा पेटारा मोडून टाकला होता. अँटन ब्रातचेन्को स्वार झाला व दौड करत कुर्याझच्या वाटेला लागला. मागे धुळीचा लोट व मस्ती जिरलेले रायझोयचे कुत्रे तेवढे राहिले.

फलाटावर असादचीच्या हाताखाली संमिश्र तुकडी राहिली. आम्ही स्टेशनच्या छोट्या चौकात आमची जमवाजमव केली. ब्रेगेल व तिचे दोस्त गाडीमध्ये चढत होते. आमच्या बिगूलच्या आवाजानं व ढोलकीच्या गडगडण्यानं त्यांचे चेहरे कडवट झालेलं पहायचं भाग्य पुन्हा एकदा मला मिळालं. आम्ही आमच्या बावट्याला सलामी देत होतो. बावटा व्यवस्थित आपल्या जागी धरून ठेवला. मी पण

त्या शिस्तबद्ध ओळीत माझी जागा घेतली. कोव्हलनं हुकूम व दिला आमचे गॉर्की-ईट्स शिस्तबद्ध ओळीत कुर्याझकडे निघाले. स्टेशनच्या आजूबाजूची काही पोरंही आमच्या बाजूबाजूनं येत होती. ब्रेगेलची गाडी आमच्यापुढं गेली. जाताजाता तिनं मला गाडीत बसण्याची विनंती केली.

मी आश्चयानं माझे खांदे उडविले, पण एका हातानं मी काळीज दाबून धरलं.

हवा शांत परंतु थंड नव्हती. आमची वाट एका छोटया दरीतून जात होती. इथं एक झरा होता व त्याचं पाणी येऊन एक ओहोळ तयार झाला होता. त्यावर एक छोटा पूल होता. आम्ही सहा जणांची ओळ करून चालली होतो. सर्वात पुढं सहा बिगूल वाजवणारे व आठ ढोलकीवाले होते. त्यानंतर त्या दिवशी ड्युटीवर असलेला कमांडर तारानेट्स व मी होतो. त्यानंतर आमची सारी मुलं रांगेनं चालत होती. आमचा बावटा अजून उघडला नव्हता. त्याचं गोंडे असलेलं वरचं टोक चकाकत होतं व मधूनच लापोटच्या डोक्यावर स्पर्श करत होतं. लापोटच्या मागे पांढरे शर्ट घातलेली मुलं अगदी ताजीतवानी दिसत होती. त्यांचे उघडे पाय तालावर पडताना हलत होते. मुलींनी निळे झगे घातले होते व त्यांच्या चार रांगा मधोमध चालल्या होत्या.

मी मध्येच एकदा रांगेतून बाहेर पडून पाहिलं. मुलं अगदी मध्येच ताठ व मध्येच जरा लवचिकपणे परंतु शिस्तीत चालली होती. आम्ही चाललो होतो तो दरीतला रस्ता तसा सारखा नव्हता, तरीसुद्धा मुलांनी आपली रांग कायम ठेवली होती. चुकून एखादा मागे राहिलाच तर चटकन् रांगेत येत होता. आवाज येत होता तो फक्त आमच्या ढोलक्यांचा प्रचंड आवाज. तो आवाज कुर्याझमधील चर्चच्या भिंतींवर आदळून परत प्रतिध्वनित होत असावा. ढोलकीच्या आवाजामुळे आमची कर्तव्याची जाण आजसुद्धा काही कमी झाली नव्हती. याउलट, जसजसे आम्ही कुर्याझच्या जवळजवळ जात होतो तसतसं आमच्या ढोलकीचा आवाज जास्तीत जास्त उत्साही व बरोबर असला पाहिजे ज्यायोगे कडक शिस्तीला मान तुकवणारा—नुसत्या पायांवरच नव्हे तर मनावरही—असा असला पाहिजे.

आम्ही पोडव्होस्की गावात प्रवेश केला. तिथले रहिवाशी आपल्या दरवाजातून कंपाऊंडजवळ येऊन कौतुकानं बघत होते. गावातली कुत्री मोठमोठ्यानं भुंकत होती. त्या कुत्र्यांच्या पूर्वजांनी एकेकाळी त्या चर्चच्या संपत्तीचं रक्षण केलं होतं. त्या गावात लोक व त्याच गावातली कुत्री त्या चर्चच्या शेतीवाडीवर पोसली होती. ते सर्वजण त्याच ठिकाणी जन्मले होते, वाढले होते व मोठे झाले होते. मुक्ती मिळण्यासाठी, आजार बरा होण्यासाठी, मनोकामना पुरी होण्यासाठी तसंच कुमारी मेरीचे अश्रू पुसले जाण्यासाठी, तांब्याच्या नाण्यांची देवघेव पाळकासमोर याच चर्चमध्ये केली जात असे.

पोडव्होस्की गावात चर्चचे पाळक, पाद्री, नवरे, चर्चचे आचारी, माळी व वेश्या हे सर्वलोक तिथं विखुरले होते.

त्या गावातून जात असता चिडलेले दृष्टिक्षेप व त्या लोकांची धुसफूस आपआपसात चालू असावी व आमच्याबद्दल काही गैरसमज त्यांच्या मनात असावे असा भास होत होता.

पोडव्होस्की गावाच्या रस्त्यातून आमची कूच चालली असताना मला अचानक जाणीव झाली की, या आमच्या कृतीला फार मोठा अर्थ आहे. ही जणू काही नव्या युगाची नांदीच आहे, असं समजायला हरकत नाही. बाहेरचे उपचार व शिक्षणतंत्रातले निरनिराळे यापासून गॉर्की कॉलनीची माझी कल्पना अचानक वेगळी झाली. कोलोमॅक नदीची ती नजर वेधून घेणारी वळणं, ट्रेपकेवाडीच्या भव्य इमारती, दोनशे गुलाबांची झाडं, डुकरांसाठी बांधलेलं ते व्यवस्थित घर ही सारी एकदम मनातून निघून गेली शिक्षणतंत्राचे सूक्ष्म प्रश्न वाळून साऱ्या वाटभर जणू विखुरले आहेत असं वाटू लागलं. या पृथ्वीवर नवी माणसं नवे अनुभव व नव्या जागा सतत घेत असतात. मला एकाएकी जाणीव झाली की आमची कॉलनी एक कर्तव्य बजावत आहे. ते त्या मानानं लहान असेल, परंतु त्याला राजकीय महत्व होतं; कारण ते समाजसत्तावादी कर्तव्य होतं.

पोडव्होस्की गावातले लोक त्यांच्या इच्छा, आवडीनिवडी, त्यांची कोळचा-सारखी कशाहीबरोबर जुळवून घ्यायची सवय, जुनाट परंपरागत जगण्याची व जुन्याला चिकटून रहाण्याची धडपड, यामुळे त्या गावातून जाताना आपण जणूकाही शत्रूच्या मुलखातून जात आहोत असं मला वाटतं होतं.

चर्चच्या भिंती हळूहळू दिसू लागल्या होत्या. त्या भिंतींच्या आतील वेडगळ कल्पना, पूर्वग्रह याची मला फार चीड होती–बुद्धीवाद्यांचे भावनाप्रधान तत्वज्ञान, अगदी नीरस, सुमार औपचारिकपणा, सहजी येणारे अश्रू, खोटया हुद्याच्या कल्पना या सर्वांचे ढीग भरले आहेत. माझ्या डोळ्यासमोर चित्र उभं झालं की या साऱ्या घाणीचे ढीग आम्ही वर्षानुवर्षे हजारो मैल ओलांडून पलिकडे जात आहोत, तरीही ते आमच्या उजव्या डाव्या बाजूला अजूनही कुजत पडले आहेत. इतकंच नव्हे तर साऱ्या बाजूनी वेढून टाकलं आहे. या सगळ्यातून या छोटया गॉर्की कॉलनीचा उदय झाला. आता ती ऐहिक बंधने, बाहेरच्या जगाशी दळणवळण, तिचा पाया व गोतावळा या सगळ्यातून बाहेर निघाली व त्यामुळं एकदम छोटी दिसू लागली. ट्रेपकेवाडी कायमची सोडली व कुर्याझवर अजून ताबा मिळवायचा आहे.

पुढचे टोळकीवाले हळूहळू टेकडी उतरु लागले होते. चर्चचं मोठं फाटक दिसू लागलं होतं. वान्या झायचेन्को अर्धी पाटलोण घालून त्या फाटकात जणूकाही रोपटयासारखा उभा होता. दुसऱ्याच क्षणी तो तीरासारखा धावत आमच्या दिशेने

येऊ लागला. त्याला धावताना पाहून काही विपरीत घडलं असावं अशी मला शंका आली. पण वान्या माझ्यासमोर येऊन उभा ठाकला.

त्याच्या डोळ्यातून गालावर अश्रू ओघळत होते व तो ते बोटांनी पुसण्याचा निष्फळ प्रयत्न करत होता. मला उद्देशून तो म्हणाला : आंतोन, मला तुमच्याबरोबर जायचंय. मला तिथं उभं रहायला आवडत नाही.'

'ठीक आहे. चल ये.'

वान्या माझ्या बाजूला रांगेत आला व आनंदानं त्यानं आपल्या डोक्याला एक हिसका दिला. माझ्याकडे त्यानं टक लावून पाहिलं व आपले डोळे कोरडे केले. त्यानं एक दीर्घ श्वास सोडला व गोंडसपणे हसला.

ढोलकी कानठळ्या बसतील एवढ्या मोठ्यानं फाटकात शिरताना वाजवली. कुर्याझमधील मुलांना बऱ्याचशा ओळींमध्ये उभं केलं होतं व गोरोविच त्यांच्यापुढं उभा होता. त्याचा एक हात सलामीसाठी वर केलेला होता.

□

८

# होपाक–एक नृत्यप्रकार

आमची गॉर्की कॉलनीची मुलं व कुर्याझची मुलं एकमेकांसमोर सातआठ मीटर अंतरावर उभी होती. प्योटम इव्हानोवियनं कुर्याझकरांच्या रांगा घाईघाईनं उभ्या केल्यामुळे त्या तेवढ्या व्यवस्थित नव्हत्या. आम्ही उभे राहिल्याबरोबर कुर्याझकरांच्या रांगा फाकल्या. त्यांनी दोन्ही बाजूला सरकून आम्हाला जणू घेराव करायलाच निघाल्या असं वाटलं.

कुर्याझकर व गॉर्काईट्स एकमेकांसमोर शांतपणे उभे राहिले होते–कुर्याझकर गोंधळून गेल्यामुळे गप्प होते तर गॉर्काईट्स बावट्यासमोर शिस्तीत उभे राहण्याची सवय असल्यामुळे गप्प उभे होते. कुर्याझच्या मुलांनी आत्तापर्यंत आमची आघाडीच्या तुकडीतील मुलं सतत कामाच्या कपड्यात–मळक्या कपड्यात अंगावर धूळ बसलेली, उन्हानं अंग करपलेली, थकलेली अशा अवस्थेत पाहिली होती. आज त्यांच्यासमोर गंभीर शांत चेहऱ्याची, पांढरे शुभ्र सदरे, चकचकीत बकल्स असलेल्या कमरपट्ट्यांनी व्यवस्थित घातलेल्या अर्ध्या पाटलोणी या थाटात उभी असलेली पाहून कुर्याझची मुलं हरखून गेली.

मी अगदी जास्तीत जास्त लक्षपूर्वक माझी दृष्टी, कुर्याझच्या मुलांच्या चेहऱ्यावर खिळवून, त्यांच्या चेहऱ्यावर होणारे बदल मिनिटभरात न्याहाळायचा प्रयत्न केला. पण मला फारसं यश आलं नाही. पहिल्या दिवशी कुर्याझमधील मुलांच्या चेहऱ्यावर कोठलीच भावभावना नव्हती. याउलट आज निरनिराळ्या

गटांकडे पहाताना वेगळ्या भावनांचं चित्र दिसत होतं. फारच थोड्याजणांनी तटस्थतेची किंवा त्रयस्थाची भूमिका घेतली होती. बऱ्याचशा छोट्या मंडळींनी फारच उत्साह दाखविला. एखादे नवीन खेळणं हातात मिळावं व ते मिळाल्यामुळं दुसऱ्यांच्या मनात हेवा उत्पन्न व्हावा, अशा तऱ्हेची भावना त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होती. निसिनोव्ह व झोरेन एकमेकांच्या गळ्यात हात टाकून उभे होते. ते गॉर्काईट्सकडे कुतुहलानं बघताना जणू काही दिवास्वप्नात दंग असावेत की आपणही असेच एक दिवस उभे राहू व इतर लोक आपलं कौतुक करतील. काही काही चेहरे अगदी गंभीरपणे एकटक पहाण्याचा प्रयत्न करत होते व नेमकी कशावर नजर स्थिर करावी अशी त्यांची पंचाईत झाली होती. हे असले चेहरे म्हणजे भडक भावनांची जागा—एका क्षणात ते पसंत नापसंत समाधान—शंका, हेवा इत्यादी भावना बोलून गेल्याचं दर्शवित होते. खुनशी चेहरे जे प्रथम पुढे येत असत तसंच कुजकट भाव दर्शविणारे चेहरे हळूहळू विरघळायला लागलेले दिसत होते. आमच्या ढोलक्याचे लांबून येणारे आवाज ऐकून काही जणांनी आपले हात खिशात घालून चेहऱ्यावर मोठा संभावितपणाचा आव आणला होता. त्यातलेही काहीजण आमच्या पहिल्या रांगेतल्या फेडरेन्को, कोटर्यो नेचीतायलो वगैरे गॉर्काईट्सची भरदार छाती व रुबाबदार देहयष्टी वगैरे बघून, त्याच ठिकाणी ते जिंकले गेले होते व राहिलेले काही पार कुठल्याकुठे नाहीसे झाले. बाकीच्यांच्या हे लवकरच लक्षात आलं की हे एकशेवीस असले तरीही त्यांना कुठल्याही तऱ्हेनं धक्का लावणं इतकं सोपे नाही. त्यातला सर्वात लहान व्हान्का सिनेन्की सर्वात पुढे उभा होता. त्याचे बिगूल ऐटीत त्याच्या पायावर टेकलेलं होतं. त्याचे डोळे निर्भयपणे चकाकत होते व दर्शवित होते की, तो काल रस्त्यात फिरणारा अनाथ बेवारशी मुलगा नसून जणूकाही एखादा छोटा राजकुमार आहे व त्याच्या बापानं ही सारी फौज त्याच्या दिमतीला दिली असून ती ठामपणे त्याच्या पाठीशी उभी आहे.

ही मूकपणाने चाललेली एकमेकांची पहाणी एक क्षणभर चालली. दोन्ही फळ्यांमधलं सात मीटर अंतर व एकमेकांची परीक्षा ही मला झटकन् मोडायची होती.

'कॉम्रेडस्, आपण चारशेजण आजपासून एकच सामुदायिक झालो आहोत व आपल्या सामुदायिकाचं नाव गॉर्की लेबर कॉलनी असं राहील. तुमच्यापैकी प्रत्येकानं आजपासून आपण गॉर्काईट आहोत व दुसरा गॉर्काईट आपला जीवाभावाचा दोस्त, उत्तम मित्र मानायचा व त्याला ज्या ज्या वेळी जरूर असेल तो चुकला तर त्याची चूक दाखवून ती सुधारायचा प्रयत्न करायचा, त्यावेळी त्याला मदत करायची. संकटाच्या वेळी त्याची बाजू घ्यायची. त्याचा योग्य तो मान ठेवायचा व सर्वतोपरी एकमेकांना सहाय्य करायचं. आपली शिस्त कडक राहील. कडक शिस्तीची आपल्याला फार जरूरी आहे, कारण आपल्यापुढे फार मोठं कार्य आहे. शिस्तीशिवाय आपण ते काम करू शकणार नाही.'

'आपल्यापुढे अनेक प्रश्न उभे आहेत. आपल्याला खूप शिकायचंय, चांगलं सुखी आयुष्य घालवायचंय व भविष्यात येणाऱ्या गॉर्कीइट्सचा मार्ग सुलभ करायचा आहे. आपण खऱ्या अर्थानं कामगारासारखे रहायला शिकलं पाहिजे. तसेच उत्तम बालवीर बनून कॉलनीत व कॉलनीबाहेरही आपलं कामगारांचं राज्य बळकट करायला मदत करायची आहे.' असं बरंच बरंच मी त्यांना ऐकवलं.

कुर्याझच्या मुलांनी माझं बोलणं अतिशय शांतपणं ऐकून घेतलं. ते पाहून मला जरा आश्चर्य वाटलं. याउलट गॉर्कीइट्सनीच आज फारसं लक्ष दिलं नाही. कदाचित हे त्यांनी अनेकदा ऐकून ते त्यांच्या दैनंदिन आयुष्यात पक्केपणी रुजलेलं होतं.

एक पंधरवड्यापूर्वी या कुर्याझकरांना मी किती जीव तोडून समजावून सांगत होतो. परंतु त्यांनी माझ्या बोलण्याकडे कधीही लक्ष दिलं नाही. हे शिक्षणतंत्र म्हणजे एक कठीण शास्त्र आहे ! माझ्यामागं आज गॉर्कीइट्सची ताकद उभी आहे म्हणून असं झालं असेल का ? वेष्टनात गुंडाळलेला बावटा तिथं उंच उभा आहे. त्यामुळे हा चमत्कार झाला असेल ? नाही. यापैकी कोणचंही कारण नसणार. कारण अशी मीमांसा ही शिक्षणतंत्रातल्या आडाखे व प्रमेये यांच्या विरुद्ध जातील !

आणखी अर्ध्या तासानं संबंध गार्की कॉलनीची सर्वसाधारण सभा होईल, मधल्या अर्ध्या तासात सगळ्या मुलांनी एकमेकांची ओळख करून घ्यावी व त्यानंतर सभेला सर्वांनी बरोबर यावं असं मी जाहीर केलं. आम्ही आमचा बावटा इमारतीच्या आत नेऊन ठेवला.

'सर्वजण मोकळे आहात.'

गॉर्कीइट्स पुढं होऊन कुर्याझकरांशी हस्तांदोलन करतील अशी माझी अपेक्षा होती, पण ती पुरी झाली नाही. ते सारेजण रांगा मोडून सुटले ते डॉरमिटरी, क्लब व वर्कशॉपकडे धावले. आपल्याकडे दुर्लक्ष केल्याबद्दल कुर्याझकरांना फारसं वाईट वाटलेलं दिसलं नाही. तीही त्यांच्या पाठोपाठ धावली. एकटा कोरोटकोव्ह त्याच्या कंपूसह तिथंच उभा राहून काहीतरी आपसात कुजबुजत होता. ब्रेगेल व झोया या चर्चजवळ एका थडग्यावर बसल्या होत्या. मी त्यांच्याजवळ गेलो.

'तुझी मुलं म्हणजे पक्की गुंड आहेत' असं ब्रेगेल म्हणाला.

'डॉरमिटरी व्यवस्थित तयार झाल्या का ?' असं झोयानं विचारलं.

'डॉरमिटरी तयार नसल्या तर आम्ही तसंच चालवून घेऊ' असं मी म्हटलं व नवीनच उपस्थित झालेल्या एका गोष्टीकडे मला लक्ष वळवावं लागलं.

स्टुपिदसिनची तुकडी आमची सारी डुकरांची प्रजा घेऊन फाटकात शिरत होती. ती सारीजण अगदी हळूहळू चालत होती. ती सारी तीन गटात विभागली होती. प्रथम डुकरीणी आल्या, मग छोटी प्रजा, सर्वात शेवटी कुटुंबप्रमुख.

व्होलकोव्ह कौतुकानं हसत आपल्या सोबत्यांना घेऊन त्यांच्या स्वागताला पुढं गेला' डेनिस कुडल्टीने प्रेमभरानं आमच्या पाच महिन्यांच्या चंबरलेनला उचलून त्याचे कान खाजवायला सुरुवात केली होती. हे नाव देण्याचं कारण असं की चेंबरलेन मोठा राजकारणी पुरूष. त्यानं त्याचा प्रसिद्ध निर्वाणीचा खलिता पाठविला होता तेव्हा जन्मलेलं ते पिलू होतं.

डुकरांचा तो ताफा त्यांच्यासाठी केलेल्या खास जागेकडे घेऊन जाण्यात आला. स्टुपिदसीन, शेरे व खालाबुडा हे कसल्यातरी गंभीर विषयावर चर्चा करत फाटकातून आत शिरले. खालाबुडानं एका अगदी लहान डुकराला आपल्या हाता-खाली घेतलं होतं व दुसऱ्या हातानं तो काहीतरी दाखवत होता.

'पहा, त्यांची डुकरंसुद्धा कशी व्यवस्थित आहेत.' असं आमच्याजवळ येत खालाबुडा म्हणाले, 'ही कुर्याझमधली मुलं या डुकरांच्या निम्म्याहून जरी शहाणी झाली तरी मी म्हणेन सार्थक झालं.'

ब्रेगेलबाई ताडकन् बसल्या जागेवरुन उठल्या व म्हणाल्या, 'मला वाटतं, कॉ.माकारेन्को माणसांचा विचार प्रथम करत असतील'

'मला याबद्दल शंका वाटते.' असं कॉ. झोया म्हणाली, 'कारण डुकरां-साठी इथं जागा तयार झाली आहे. पण मुलं मात्र कसंही चालवून घेतील.'

ब्रेगेलला झोयाचं उत्तर फार अर्थपूर्ण वाटलं.

ती लगेच म्हणाली, 'झोयाचं उत्तर अगदी समर्पक आहे. कॉ. माकारेन्कोना यावर काय म्हणायचं आहे ? कॉ. माकारेन्को शिक्षणतज्ञ व कॉ. माकारेन्को डुकरं राखणारे व वाढविणारे.'

त्या बाई हसल्या. उघडउघड कुसक्या बोलण्याला तितकंच तिखट उत्तर देऊन दिवस खराब करायची माझी तयार नव्हती. म्हणून मी खालबुडाला उद्दे-शून म्हणालो की 'या दोन मोठ्या शिक्षणतज्ञांना मी एकच उत्तर देऊ का?'
'अगदी बेशक' असं खालाबुडा म्हणाले.

'मुलं ही कॉलनीची मालक आहेत व डुकरं ही त्यांनी पाळलेले प्राणी आहेत.'

'तुम्ही कोण आहात?' असं माझ्याकडे न बघता ब्रेगेलने प्रश्न विचारला.

'मला वाटतं मी मालकमंडळींच्या जवळ आहे.'

'तुमच्यासाठी इथं झोपायची खोली आहे असं वाटतं.'

'अहो, मला वेगळी खोली झोपायला नसली तरी चालेल.'

'जाऊ द्या. आता हा विषय इथंच संपवू या. कारण कॉ. माकारेन्कोना अतिशयोक्ती करायची फार सवय दिसते,' असं ब्रेगेल कॉ. झोयाकडे वळून म्हणाली.

खालाबुडा नुसते मोठ्यांदा हसले.

मी सुद्धा अगदी सहज हसलो, पण त्यामुळं कॉ. झोया परत एकदा माझ्यावर तुटून पडली.

'डुकरांना वाढवणं हे माणसांच्या शिक्षणाचा भाग असू शकतो का ? ह्याला तुम्ही गंमत म्हणाल का ?'

कॉम्रेड झोयाच्या रागाचं इंजिन जणू काही सुरू झालं. तिचे वटारलेले डोळे दर सेकंदाला वीस हजार कोती या वेगानं माझं शरीर भेदून जात आहे असं वाटत होतं. मी तर काय होणार म्हणून घाबरून गेलो होतो. इतक्यात आमचा गुलाबी गालांचा सिनेन्की उत्साहानं धावत बिगूल घेऊन माझ्याकडे आला.

'लापोट म्हणतो... आणि कोव्हल म्हणतो, थांब जरा. लापोट रागावला आणि म्हणाला, तुला काय हवं ते कर. एवढंच... आणि मुलं पण तेच म्हणतात... बाप रे, त्या डॉरमिटरीज भयानक... मुलं म्हणतात, आम्ही असल्या ठिकाणी नाही राहणार. कोव्हल म्हणतो, तो तुम्हाला विचारणार आहे.'

'मुलं काय म्हणतात, कोव्हल काय म्हणतो मला समजलं; पण तुला काय म्हणायचंय ते मात्र मला अद्याप समजलं नाही.'

सिनेन्की एकदम बुचकळ्यात पडला.

'तुम्ही काही करावं असं माझं म्हणणं नाही, पण लापोट म्हणतो... '

'बरं पुढं.'

'कोव्हल म्हणतो की आपण सारे चर्चा करू.'

'कॉम्रेड सिनेन्की, लापोट नक्की काय म्हणतो बरं ? ते फार महत्वाचं आहे.'

सिनेन्कीला मी असं बहुमानार्थी संबोधलं म्हणून एवढा आनंद झाला की त्यातला खरा अर्थ त्याला समजला नाही.

'काय बरं.'

'बरं आता सांग लापोट काय म्हणाला ?'

'लापोट म्हणाला की सर्वसाधारण सभेसाठी आपला बिगुलचा इशारा कर.'

'हेच खरं प्रथम तू मला सांगायला पाहिजे होतंस.'

'अहो पण मी सांगितलं.'

कॉम्रेड झोयानं दोन्ही हातांनी सिनेन्कीचे गुलाबी गाल असे पकडले की त्याचं तोंड एखाद्या गुलाबाच्या कळीसारखं झालं.

'काय गोड मुलगा आहे !'

सिनेन्कीनं झोयाच्या हातून घुश्यातच सुटका करून घेतली. आपलं तोंड सदऱ्याच्या बाहीला पुसलं व डोळे तिरके करून नाखुषीत झोयाकडे पाहिलं.

'बाबा ! ठीक आहे ! पण समजा मी तुम्हाला असं केलं असतं तर ! मी काही छोटा बाबा नाही. मी या कॉलनीचा एक घटक आहे समजलं का ?'

खालाबुडानं सिनेन्कीला त्याच्या बिगुलासकट सहजपणे वर उचललं.

'छान, छान केलंस. मी अगदी मनापासून सांगतो. पण खरं सांगू, तू अजून बच्चा आहेस. तू कितीही नाही म्हणालास तरी ते चालणार नाही.'

सिनेन्कीनं खालाबुडाच्या म्हणण्याला विरोध केला नाही. तसंच त्याला बच्चा म्हणून म्हटलं म्हणूनही राग आला नाही. ही गोष्ट झोयाच्या नजरेतून सुटली नाही.

'एकंदरीत डुक्कर म्हणून संबोधणं या कॉलनीत बहुमानाचं समजलं जातं असं दिसतंय.'

'ठीक आहे हो!' असं म्हणून खालाबुडानं सिनेन्कीला खाली ठेवलं.

कोव्हल व लापोट काहीतरी विषयावर जोरजोरात वाद घालत धापा टाकत आम्ही उभे होतो तिथे आले.

कोव्हलला जरा अधिकारी लोकांबद्दल एक प्रकारचा दरारा वाटत असे म्हणून त्यानं ब्रेगेलच्या मागं उभं राहून मला डोळ्यांनी खूण केली. मी जरा बाजूला जाऊन त्याच्याशी बोलावं अशी त्याची अपेक्षा होती. पण लापोट उगाच कुणाला असा तसा घाबरत नसे.

'कोव्हलला वाटत होतं की इथं आपल्या स्वागताची जय्यत तयारी असेल. पण मला वाटतं तसं नाही व आपल्याला ज्या गोष्टी करायच्या आहेत त्या लांबणीवर कशाला टाकायच्या. आपण साऱ्यांची सभा घेऊन आपला जाहीरनामा वाचून दाखवू.'

लापोटच्या या उद्गारानं कोव्हल जरा लाजला. कारण त्याला अधिकाऱ्यां-समोर त्यातल्या त्यात स्त्रीअधिकारीसमोर बोलावं लागलं. स्त्रीजातीबद्दल त्याच्या मनात फारशी आदरणीय भावना नव्हती. लापोटच्या बोलण्यामुळे त्याला उत्तर देणं भाग पडलं.

'अरे, मला तुझ्या ते परोच्च यादीशी काही कर्तव्य नाही बरं का. उगाच काहीतरी बडबडू नकोस. मला एवढंच विचारायचं आहे की आपल्या जाहीर-नाम्याप्रमाणे आपण या मुलांना जबरदस्तीनं वागायला लावायचं का ? तसं असेल तर ते कसं करायचं ? त्यांना एकत्र कसं आणायचं ? प्रत्येकाची मानगूट पकडून का सदऱ्यांच्या कॉलरी खेचून ?'

एवढं कसंबसं बोलून कोव्हलनं बावरलेल्या चेहऱ्यानं ब्रेगेलबाईकडे पाहिलं. पण प्रतिक्रिया दुसऱ्याच बाजूनं आली.

'त्यांच्या कॉलर्स पकडून तुम्ही त्यांना जबरदस्तीनं एकत्र आणणार ?' असं कॉम्रेड झोयानं रागावून विचारलं.

'अहो ती आपली माझी बोलायची पद्धत झाली.' असं जास्तच गांगरून जाऊन कोव्हल बोलला, 'मला काय करायचंय त्यांच्याशी. मी उद्या शहर समिती-कडे जाऊन त्यांना मला परत माझ्या मुलखाला पाठवायला सांगेन !'

'पण तू आत्ताच म्हणालास की त्यांच्यावर आपण जबरदस्ती करायची का व ती जबरदस्ती तुम्ही कशी करणार ?'

या साऱ्या कटकटीत कोव्हलची एकाएकी अधिकारीबद्दलची भीती गेली व तो एकदम दुसऱ्या टोकाला गेला. तो काहीतरी असंबद्ध बोलला व त्यात त्या बायकांची बडबड कुठेच विरली. नंतर तो बाजूला झाला व घुश्शातच क्लबकडे पाय आपटतच गेला; जगू काही त्या चर्चच्या भिंती तो पायाखाली तुडवत होता.

लापोट आपले हातवारे करत झोयाकडे बघून म्हणाला, 'मी तुम्हाला सांगतो. त्याचा अर्थ म्हणजे जबरदस्ती करायचीच.'

'ऐकलंस ब्रेगेल याचं बोलणं. आता तुला काय म्हणायचंय यावर ?' असं बोलत झोया ब्रेगेलपुढं येऊन उभी राहिली.

'सिनेन्की सभेच्या इशाऱ्याचा बिगुल वाजव' असं मी सिनेन्कीला सांगितलं.

सिनेन्कीनं आपला बिगुल खालाबुडाच्या हातातून घेतला. चर्चच्या घुमटावर असलेल्या क्रूसाकडे बिगुलाचं टोक करून तो जोरात वाजवला की काॅ. झोयानं आपले कान दोन्ही हातांनी झाकून घेतले.

'अरे बापरे, हे इशारे, हे कमांडर्स व बराकी सारे विचित्रच आहे !'

'जाऊ द्या. मुद्दा असा आहे की तुम्हाला आमच्या शब्दांचे अर्थ समजले.'

'घंटेचा आवाज यापेक्षा बरा वाटला असता.' असं ब्रेगेलबाई हळू आवाजात म्हणाल्या.

'नाही ! मुळीच नाही ! घंटा काही बरोबर इशारा देत नाही. ती फक्त एकाच प्रकारचा तोचतो आवाज देते. याउलट आमचं बिगुल समजून इशारा देतं. सभेसाठी एक प्रकारचा इशारा, कमांडर्स कौन्सिलसाठी दुसऱ्या प्रकारचा इशारा, रात्री पहारा करतानाचा इशारा, एखाद्या संकटाची सूचना देणारा वेगळा इशारा वगैरे वगैरे. वाऱ्यानं जर धोक्याच्या सूचनेचा इशारा दिला तर या चर्च-मधले मेलेले लोक थडग्यातून उठून बाहेर येतील. तुम्ही तर घाबरून पळाल !'

मुलांचे घोळके सगळीकडून क्लबच्या बाजूला जमा होत होते. छोटी मुलं मधूनच पळत, तर मधूनच भराभर येत होती व केव्हा केव्हा मधेच अडवली जात होती. मूळचे गॉर्काईट्स व कुर्याझाईट्स हळूहळू एकमेकांत मिसळून गप्पागोष्टी करत आहेत असं दिसत होतं. तरीसुद्धा अजून बरेच कुर्याझकर दूरदूर रहाताना दिसत होते.

सर्वजण रिकाम्या व थंड असलेल्या क्लबरुममध्ये जमा झाले. गॉर्काईट्सचे पांढरे शुभ्र सदरे व्यासपीठावर उठून दिसत होते. गॉर्काईट्सना व्यासपीठावर एकत्र बसवायची कल्पना तारानेट्सच्या डोक्यातील असावी असा माझ्या मनात विचार आला. न जाणो काही घडलंच तर आपली सारी फौज आपल्या जवळ एकत्र असावी असा विचार त्यानं केला असेल.

गॉर्काईट्स या घटकेला संख्येनं कमी होते हे अगदी सहज लक्षात येत होतं. आमची दुसरी, तिसरी व दहावी या तुकड्या बरोबर आणलेल्या गोराढोरांची

नव्या जागेत व्यवस्था लावण्यात गुंतल्या होत्या. त्याशिवाय आणखी पंचवीस जण व राबफाकचे विद्यार्थी असादचीच्या नेतृत्वाखाली रायझोव्ह स्टेशनवर अडकले होते. त्यामुळे प्रत्यक्ष सभेला पन्नासजणच हजर होते. आमच्या मुलींचं कुर्याझ-मधील मुलींनी अतिशय प्रेमानं व आदरानं स्वागत केलं होतं व त्यांना आपल्या डॉरमिटरीत ओल्गा लापोटनं व्यवस्थित जागा करून ठेवून घेतलं होतं.

सभा सुरू होण्यापूर्वी झोरका व्होलकोव्हनं मला हळूच विचारलं की 'आपण सरळ सर्व सांगायचं ना ?'

'हो, अगदी सरळ सर्व सांगायचं.'

झोरका व्यासपीठावरून खाली उतरला व आम्ही गंमतीनं 'जाहीरनामा' म्हणत असू तो वाचायला सुरवात करणार होता. हा जाहीरनामा तयार करायचा ठराव आमच्या कोम्सोमोल संघटनेत पास झाला होता. त्या ठरावाप्रमाणे झोरका व्होल्कोव्ह, कुडलटी, झेलवी व गोरोवस्की या सर्वांनी खूप परिश्रम घेऊन तो तयार केला होता. त्यात रशियन विशाल दृष्टिकोन, व्यवस्थित यांकी (अमेरिकन) हिशेबी दृष्टी, गॉर्कीईट्सचा सढळ हातानं घातलेला मालमसाला, एकमेकांबद्दल प्रेम, तसंच एकमेकांबद्दल रागलोभ वगैरे बऱ्यावाईट गोष्टींचा समावेश केला होता.

हा 'जाहीरनामा' म्हणजे एक गुप्त पत्रक असं समजलं जात होतं. वास्तविक यात चर्चा करायला अनेक जणांनी भाग घेतला होता. अनेकांनी अनेकदा चर्चा सभेमधून केली होती. तसंच कुर्याझला आल्यावरसुद्धा यावर कोव्हल व कोम्सोमोल यांनी पुन्हापुन्हा तो तपासून पाहिला होता.

झोरकानं सुरुवातीचं प्रास्ताविक भाषण केलं. 'कॉम्रेड कॉलनीस्ट, आपण उगाच इकडे तिकडे बोलण्यात वेळ न घालविता सरळ मुद्याला हात घालू या. कुठे सुरुवात करावी ते मला समजत नाही. पण मी प्रथम कोम्सोमोल संघटनेनं केलेला ठराव वाचून दाखवतो, म्हणजे आपण कुठे व कशी सुरुवात करायची व परिणाम काय होईल ते तुमचं तुम्हाला समजेल. तुम्ही काम केलं नाही तर तुम्ही कोम्सोमोल किंवा पायोनियर होणार नाही. तुम्ही घाणीतच लोळत रहाल. तर तुम्हाला काय म्हणायचंय ते सांगा ! तुमची गणना कोणत्या प्रतीत करावी. तुम्ही म्हणजे ढेकूण, झुरळ, उवा, माशा व अनेक जंतूंचं माहेरघर बनाल.'

'हा आमचा दोष आहे का ?' असं कोणी तरी ओरडलं. झोरकानं ते सूत्र मोठ्या तत्परतेनं पकडलं.

'होय, तुम्हीच याला जबाबदार आहात. हा तुमचाच दोष आहे. अशा तऱ्हेनं घाणीत रहाण्याला व कुजण्याला तुम्हाला कुणी सांगितलं ? काहीच कारण नाही. तसं रहाण्याचं काहीच कारण नव्हतं. अरे आम्ही आमची डुकरं, ज्यांचा खानेऱ्यात लोळण्याबद्दल ख्याती आहे, त्यांनासुद्धा दर आठवड्याला आम्ही साबण

लावून आंघोळ घालतो. तुम्ही पहा. तुम्हाला असं वाटतं का की त्या प्रत्येक डुकराला धुवून घ्यायला आवडत नाही ! तुमचा साबण घेऊन इथून निघून जा कसे ! तसं होत नाही. ते मुकाटयानं ऐकतात व उलट आम्हाला 'धन्यवाद' देतात ! तुम्हाला कित्येक महिने साबण मिळालाच नाही.'

'आम्हाला कुणी साबण दिला नाही त्याला आम्ही काय करणार ?' असं कुर्याझकरांच्या घोळक्यातून कुणीतरी ओरडला.

झोरकाच्या गोल चेहऱ्यावर त्याला मार पडलेल्या खुणा होत्या. तो आवाज ऐकून त्याचा चेहरा जरा ताठ व लाल झाला.

'तुम्हाला साबण कोण आणि कुठून आणून देणार ? तुम्ही तर इथले मालक ! तुम्हाला काय हवं नको ते ठरवायचा तुमचा अधिकार होता !'

'आणि तुझा मालक कोण ? माकारेन्को का ?' असा एक आवाज उठला व आवाज करणाऱ्या व्यक्तीनं स्वतःला त्या घोळक्यात लपवायचा प्रयत्न केला.

सर्वजण आवाज आलेल्या दिशेला मान वळवून पाहू लागले. परंतु कोणी हे भाष्य केलं हे कळणं कठीण होतं. सगळेच नुसते माना वळवून बघत होते. परंतु त्यातल्या काही चेहऱ्यांवर उपहास केल्याचं समाधान दिसलं.

झोरका मनापासून हसला.

'तुम्ही सारे किती महामूर्ख आहात. आंतोन आमच्यापैकी एक आहेत याचा आम्हाला पूर्ण विश्वास आहे व आम्ही सारे एकत्र काम करतो. ज्याला हा प्रश्न पडला असेल तो माणूस नसून गधा आहे. काही हरकत नाही. आम्ही असल्या गध्यांना शिकवू. असली व्यक्ती स्वतः काही न करता आपला मालक शोधण्याचाच प्रयत्न करत राहील !'

सारी क्लबरूम हास्याच्या आवाजात भरून गेली. झोरकानं मालक शोध-ण्यात गुंतलेल्या मूर्ख माणसाची फार सुंदर नक्कल करून दाखवली.

झोरकानं पुढं चालू केलं, 'आपल्या सोविएत देशात कामगार–शेतकरी हे मालक आहेत. तुम्ही आपल्या राष्ट्राच्या संपत्तीवर, राष्ट्रानं दिलेल्या अन्नावर जगत होतात व त्याचाही तुम्ही सपशेल दुरुपयोग केलात. तुम्हाला एखाद्या वट-वाघुळाइतकासुद्धा सामाजिक राजकीय दृष्टिकोन नाही !'

मला जरा बैचेन वाटायला लागलं होतं. कुर्याझकरांवर झोरका एकंदर फारच कडक बोलतोय असे मला वाटलं. त्यांना जरा हळुवारपणे समजावून सांगता आलं असतं. इतक्यात तो मघाचाच आवाज पुन्हा एकदा उमटला.

'आता तुम्ही काय दिवे लावता ते पाहूच आम्ही!'

एक प्रकारचं कुत्सित हास्य साऱ्या खोलीभर पसरलं. त्याचबरोबर समज-दार हास्याची भर पडली होती.

'तुम्हाला हवं तर तुम्ही ते जरूर करू शकता.' असं झोरका गंभीर पण

मनापासून बोलला. मी एक आरामखुर्ची घेऊन शौचकुपाजवळ बसेन, तुम्ही तिथे बसून बघा. तुम्हाला एक नवीन माहिती होईल. तुम्हाला तो शौचकूप कसा वापरायचा हेसुद्धा समजणार नाही. ती काय मोठी कला नसली तरीही ती प्रत्येकानं शिकणं आवश्यक आहे. तीसुद्धा जरूर पडल्यावर आम्ही शिकवू.'

कुर्याझकरांना लाज वाटली. परंतु त्यांना हसूही आवरेना. एकमेकांना धरून ते मनापासून हसत होते. मुली जरा किंचाळल्या व त्यांनी आपली नापसंती दर्शवण्यासाठी व्यासपीठाकडे पाठ फिरवली. गॉर्कीईटस्नी झोरकाकडे जरा अभिमानानं पाहिलं व त्यांनी आपलं हसू जरा दाबलं.

कुर्याझकरांनी खूपसं मनापासून हसून घेतलं. पण आता झोरकाकडे पहाण्याचा त्यांचा दृष्टिकोन थोडा बदलला असावा असं वाटलं. त्यांची नजर जरा झोरकाबद्दल आदरयुक्त अशी वाटली. त्याच्या तोंडून जे त्यांनी ऐकलं होतं ते उपयुक्त व शिकण्याजोगं आहे असं त्यांना वाटत असावं.

कार्यक्रम आखणं ही माणसाच्या आयुष्यात अतिशय महत्वाची गोष्ट आहे. एखादा साधाभोळा माणूस कुठे जायला निघाला असताना पाण्याची डबकी, खाचखळगे, मातीचा ढीग व अनेक पाऊलवाटा याच्या भोवऱ्यात सापडला तर निराश होतो. परंतु रस्ता दर्शवणारी एवढीशी खूण जरी त्याला दिसली तरी आनंदानं तो वाट पकडायला जातो. हा रस्ता छोटीशी पाऊलवाट असो अगर मोठा रस्ता, वळण, पूल, बाजूला छान झाडी व मार्गदर्शक पाटचा दिसल्या की तो उत्साहानं आपला मार्ग आक्रमणाचा निश्चित आराखडा तयार करतो. निसर्गच त्याला डावी बाजू, उजवी बाजू, लांबचा किंवा जवळचा मार्ग समजून घ्यायला मदत करतो.

आम्ही एकंदरीने कुठचाही एक दृष्टिकोन महत्वाचा धरला होता असं नव्हे. त्यामध्ये उगाच तिखटपणा किंवा फाजील गोडपणा आणला नव्हता. अशा तऱ्हेनं कोम्सोमोल संघटनेनं बनवलेला तो जाहीरनामा झोरकानं वाचायला सुरूवात केली. एल्. वाय्. सी. एल् या गॉर्की लेबर कॉलनीच्या मध्यवर्ती समितीनं हा ठराव पास केला आहे.

(१) गॉर्की कॉलनीच्या पहिल्या बनवलेल्या तुकडचा व कुर्याझच्या अलीकडे बनवलेल्या तुकडचा या बरखास्त करून, नवीन वीस तुकडचा बनवायच्या. त्या प्रत्येकात खालीलप्रमाणे मुलांची संख्या राहील. (झोरकानं या ठिकाणी प्रत्येक तुकडीतील मुलांची नावे व कमांडर्सची नावे वाचून दाखवली.)

(२) कॉम्रेड लापोट हा कमांडर्स कौन्सिलचा चिटणीस, डेनिस कुडल्टी हा पुरवठा अधिकारी, व ॲलेक्झी व्होल्कोव्ह भांडार अधिकारी राहील.

(३) या ठरावाची अंमलबजावणी बरोबर होते हे पहाण्याची जबाबदारी कमांडर कौन्सिलची राहील. तसेच पहिल्या दिवसाचा समारंभ नीट पार पाडायचा व ही कॉलनी अतिशय उत्तम अवस्थेत शिक्षणखात्याच्या प्रतिनिधींच्या व जिल्हा

कमिटीच्या प्रतिनिधींच्या स्वाधीन करायची जबाबदारी उत्तम तऱ्हेनं पारं पाडली पाहिजे.

(४) कुर्याझ कॉलनीतले सर्व प्रकारचे कपडे, टॉवेल, चादरी, शाली, चड्ड्या, गाद्या, स्वतःच्या मालकीच्या किंवा शिक्षणखात्यानं दिलेल्या, कुर्याझकरांनी निर्जंतूक करण्यासाठी ताबडतोब स्वाधीन कराव्या व नंतर त्या दुरुस्त केल्या जातील.

(५) सर्व मुलांना मूळच्या गॉर्की कॉलनीच्या मुलींनी शिवलेले सदरे व चड्ड्या देण्यात येतील. दुसरी जोडी एक आठवड्यानं येईल. त्यावेळी पहिली धुवायला द्यावयाची.

(६) मुलींखेरीज सर्व मुलांचे केस कापले जातील व त्यांना जांभळ्या मखमली टोप्या दिल्या जातील.

(७) सगळ्या मुलांनी आज पाणी मिळेल तिथे आंघोळ केलीच पाहिजे. कपडे धुवायचं काम मुलींकडे सोपवलं आहे.

(८) सर्व तुकड्यातील मुलांनी इमारतीबाहेर झुडुपाखाली जिथे आवडेल तिथे अर्थात कमांडरच्या परवानगीने झोपायचं. आपल्या जुन्या शाळेतल्या डॉर-मिटरीज दुरुस्त होईपर्यंत ही व्यवस्था राहील.

(९) जुन्या गॉर्की कॉलनीतून आणलेल्या गाद्या, उशा व पांघरुणे यावर सध्या सर्व तुकड्यांतील मुलांनी झोपायचं. हे सर्व साऱ्यांनी न कुरकरता अगर तक्रार न करता वापरायची.

(१०) झोपायला जागा नाही अशी कोणीही, केव्हाही तक्रार करता कामा नये. उलट त्यासाठी व्यवस्थित मार्ग काढायची तयारी ठेवा.

(११) सगळ्या मुलांनी दोन पाळ्यांमध्ये आपल्या तुकड्या विभागून घेऊन त्याप्रमाणे जेवावयास जावे. लवकर जेवण मिळावे म्हणून पाळी बदलून दिली जाणार नाही.

(१२) स्वच्छतेकडे अतिशय काटेकोरपणे लक्ष पुरविले पाहिजे.

(१३) शिवणकामाशिवाय कुठचंही काम एक ऑगस्टशिवाय सुरु होणार नाही. परंतु काम मात्र वाटून दिलं जाणार आहे. ते प्रत्येकानं केलं पाहिजे.

'चर्चभोवतीची भिंत पाडायची आहे व त्या विटांचा उपयोग करून तीनशे डुकरं राहू शकतील एवढं डुकरांचं घर बांधायचं आहे.'

'सर्व खिडक्यांची दारं, इतर दारं, खाटा व सभोवतालचं कुंपण याला रंग द्यायचं काम करायचं आहे.'

'फर्निचर दुरुस्त करायचं आहे.'

'शेतात व बगीचात काम करायचं आहे.'

'सबंध मोकळी जागा व टेकडीचे उतार नको असलेली झुडपं वगैरे काढून

स्वच्छ करायची. तसेच मधूनमधून व्यवस्थित पाऊलवाट काढणे, फुलझाडे लावण्यासाठी वाफे तयार करणे, औष्णिक घर बांधणं ही काम पण करायची आहेत.'

'प्रत्येक मुलाला चांगला सूट शिवायचा आहे व नवे बूट घ्यायचे आहेत, तोपर्यंत सर्वच मुलांनी कुठच्याही तऱ्हेचं पायताण वापरायचं नाही. अनवाणी चालायचं.'

'आपल्या आवारात असलेलं तळे स्वच्छ करायचं म्हणजे त्याचा उपयोग पोहण्यासाठी करता येईल.'

'नवीन फळझाडं लावणे.'

'टेकडीच्या दक्षिणेच्या बाजूला नवीन बगीचा लावण्याची तयारी करणे.'

'एक ऑगस्टपासून आपल्या वर्कशॉपमध्ये यंत्र, यंत्राचे निरनिराळे सुटे भाग व हत्यारे तयार करण्यास सुरुवात करायची आहे.'

हा जाहीरनामा वरवर दिसायला तसा अगदी साधाच होता. पण त्याचा सर्वांच्या मनावर खोल परिणाम झाला. जाहीरनामा करणारे, तसंच त्याचं निश्चित कडक स्वरूप व बरोबर मांडणी याचं आम्हालाही कौतुक वाटलं. कुर्याझकरांना विशेषतः जास्तच आश्चर्य वाटलं. मूळ गॉर्की कॉलनीची सारी फौज येण्यापूर्वी आमचं अलिप्त वर्तन हे सर्व माहिती गोळा करून पुढची तयारी व त्याची नीट आखणी करता यावी यासाठी मुद्दामच घेतलेला तो बहाणा होता हे कुर्याझकरांच्या चांगलं लक्षात आलं.

कोम्सोमोलनी नवीन तुकड्या फार हुशारीनं बनवल्या होत्या. झोरका, गोरकोव्हस्की व झेलवी या तिघांनी आपली सारी बुद्धी खर्च करून कुर्याझकर मुलांची आपसातली दोस्ती किंवा एकमेकांबद्दल वैयक्तिक कल, आकांक्षा, स्वभाववैचित्र्य वगैरे गोष्टी लक्षात घेऊन प्रत्येक तुकडीत मुलांची व्यवस्थित वाटणी केली होती. आमच्या आघाडीच्या संमिश्र तुकडीनं पहिले पंधरा दिवस साऱ्या डॉरमिटरीत फिरून वेळ फुकट घालविला नव्हता तर त्याचा उपयोग अत्यंत महत्वाची माहिती गोळा करण्यात व त्याचा व्यवस्थित उपयोग करण्यात केला होता.

मूळच्या गॉर्काईट्सची विभागणी निरनिराळ्या तुकड्यांमधून करतानासुद्धा तगडे व नरम, जरा आळशी व उत्साही, गंभीर व आनंदी, हुशार व कमी बुद्धीचे, वगैरे वगैरे गोष्टी लक्षात घेतल्या होत्या.

जाहीरनाम्यातली काही विशेष कलमे ऐकून मूळचे गॉर्काईट्ससुद्धा अचंबा व्यक्त करत होते व कुर्याझकर तर झोरकाच्या निवेदनामुळं आवाक् झाले होते. जाहीरनाम्याचं वाचन चालू असता एखादा शब्द नीट ऐकू आला नाही तर काही जण शेजाऱ्याला विचारत होते. काही जण अगदी निश्चल उभे राहून ऐकत असता मध्येच मागे बघत होते. एखाद्या विशेष वाक्याला 'ओ हो!' असा प्रतिसादही मिळत होता. झोरकाचं वाचन पूर्ण झाल्यावर त्या ठिकाणी एकदम शांतता पसरली होती, पण ती शांतता न विचारलेल्या प्रश्नांनी खरी म्हणजे दुमदुमत होती. आपण

काय करायचं ? याविरुद्ध आवाज उठवायचा का बंड करायचं का टाळ्या द्यायच्या, हसायचं का शिव्या द्यायच्या, का मुकाट्यानं याला मान तुकवायची, याचा ते विचार करत होते.

झोरकानं वाचन संपवल्यावर कागद गुंडाळून ठेवले. लापोट त्याच्या फुगीर पापण्यांखालून आपली उपरोधिक नजर साऱ्या जमावावर फिरवत तोंडावर जळजळीत हसू आणत म्हणाला,

'मी जुना गॉर्काईट आहे. मला नाही आवडली ही कल्पना. मला माझ्या बिछाना पांघरुणाची सवय आहे. आता म्हणे मी एखाद्या झुडपाखाली झोपायचं! अहो, पण हे झुडुप तरी आहे कुठे ? कुडल्टी, तू माझ्या तुकडीचा कमांडर. हे झुडुप कुठे आहे ते दाखवशील का !'

'अरे मी केव्हापासून तुझ्यासाठी एक खास झुडुप शोधून ठेवलंय !'

'त्या झाडावर काही येतं का रे ? कदाचित ते चेरीचं झुडुप असावं. का सफरचंदाचं झाड आहे ? मला वाटतं, तिथे नाईटिंगेल्स असाव्या... कुडल्टी, आहेत का रे त्यावर नाईटिंगेल्स ?'

'नाईटिंगेल्स नाहीत, पण तिथे चिमण्या आहेत.'

'चिमण्या ? छे. मला स्वतःला चिमण्या मुळीच आवडत नाहीत. त्यांचा आवाजही गोड नसतो आणि त्या इतक्या निष्काळजी असतात. त्यापेक्षा तू एखादा गोल्डफिंच पक्षी वगैरे सोड त्या झुडपावर.'

'बरं बाबा तुझ्यासाठी आम्ही गोल्डफिंच पक्षी सोडू मग तर झालं.' असं हसून कुडल्टी म्हणाला. लापोटनं सभोवताली सहानुभूतीदार मिळतात का ते पाहिलं व म्हणाला, 'आमची तिसरी तुकडी आहे नाही का ? हं हं... कोण कोण आहेत आपल्या तुकडीत ? त्यांची नावं यादीत पाहू या... एक दोन तीन... आठ जुने गॉर्काईट्स आहेत. म्हणजे आपल्याजवळ आठ पांघरुणं, आठ उशा व आठ आहेत; गाद्या आणि आपण सारेजण मिळून बावीसजण आहोत. हे एकंदर बरं नाही. इथं कोण कोण आहे बरं. एक नाव मिळालं स्टेंजी ! कुठं आहे हा स्टेंजी ? हात वर कर पाहू. तू इथे ये पाहू. ये लवकर ये. घाबरू नकोस !'

व्यासपीठावर सावकाशपणे एक मुलगा येत होता. त्याच्याकडे बघून त्यानं जणू काही अश्मयुगापासून आंघोळ केलेली नाही किंवा केसही कापलेले नाहीत असं वाटत होतं. त्याच्या केसांचा रंग उन्हानं रंगविल्यासारखा होता व त्याचा मूळचा रंग उन्हानं करपल्यासारखा झाला होता. घाणीचे थर त्याच्या गालावर चढले होते व त्याला चिरा पडल्या होत्या. स्टेंजी कमालीचा गोंधळला होता. तो कसाबसा व्यासपीठावर चढला. त्याचे पाय धुळीनं भरलेले होते. त्यानं विचित्रपणे हसत सगळ्या जमावाकडे पाहिलं. आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्याचे पांढरे शुभ्र दात दिसले.

'हं, मग मला व तुला एक पांघरूण वापरायचं आहे. तू लोळत नसावास असं मी धरून चालतो.'

स्टेंजीच्या ओठावर बरीचशी लाळ आली होती व ती अगदी गळण्याच्या बेतात होती. हात इतके काळे झाले होते की, त्याला लाळ हातांनी पुसायला लाज वाटली. म्हणून त्यानं आपलं तोंड अंगात घातलेल्या सैल सदऱ्याच्या बाहीवर पुसलं. त्यानं कसंबसं आपण लोळत नाही असं उत्तर दिलं.

'चांगली गोष्ट आहे. पण कॉम्रेड स्टेंजी, मला सांग, पाऊस पडायला लागला तर आपण काय करायचं ?'

'पळून जायचं !'

'पण आपण कुठं पळून जायचं ?'

जरा विचार करुन स्टेंजी म्हणाला, 'ते मला माहीत नाही.'

लापोटन डेनिसकडे एक प्रश्नार्थक दृष्टी वळवली.

'डेनिस, अरे पाऊस आला तर आम्ही कुठे जायचं ?'

डेनिस व्यासपीठावर जरा पुढे आला. आपले डोळे बारीक करून सर्वांकडे मिस्किलपणं पहात म्हणाला.

'तसं झालं म्हणजे पाऊस आला तर काय करायचं ? बाकीच्या कमांडर्सनी काय ठरवलं आहे हे मला माहीत नाही. आणि खरं सांगायचं तर आपल्या जाहीरनाम्यात आपण याला उत्तर दिलंच नाही. पण मी सांगतो काय करायचं. समजा पाऊस आलाच तर आपल्या तिसऱ्या तुकडीला घाबरायचं कारण नाही. नदी आपल्याजवळ आहे. व मी तिसऱ्या तुकडीला सरळ नदीकडे घेऊन जाईन. एकदा तुम्ही नदीच्या पाण्यात शिरलात की पावसाचा तुम्हाला काही त्रास होणार नाही. तुम्ही बुडी मारलीत की तुम्ही अगदी सुरक्षित व आरोग्याच्या दृष्टीनं पण ते चांगलं.'

डेनिसनं सहजपणं लापोटकडे पाहिलं व तो बाजूला गेला. लापोट एकाएकी चिडला व त्या स्टेंजीवर रागावला. स्टेंजी बिचारा आणखी काय नवीन ऐकायला मिळणार याचा विचार करत उभा होता.

'ऐकलंस का तू ?'

'होय, ऐकलं' असं स्टेजी म्हणाला.

'तू व मी माझ्या पांघरुणावर झोपू. पण प्रथम मी तुला नदीवर नेऊन चांगली आंघोळ घालणार आहे व तुझे सारे केस कापून टाकणार आहे. समजलं ?

'समजलं मला,' हसून स्टेंजीनं उत्तर दिलं. लापोटनं आपला साधेपणाचा आणलेला आव सोडून देऊन तो व्यासपीठावर पुढे आला.

'सर्वांना सर्व गोष्टी नीट कळल्या ?'

'होय, सर्व काही नीट कळले.' असं सर्व बाजूंनी आवाज आले.

'ठीक आहे. सर्व समजलंय, तेव्हा आता आम्हाला बोलायला हरकत नाही.

हा ठराव फारसा आवडणारा नाही. परंतु आपल्या या सर्वसाधारण सभेनं तो पास केलाच पाहिजे. आपल्याला दुसरा मार्ग नाही. '

त्यानं तोंड अगदी वाकडं केलं व गदगदून आलेल्या आवाजात तो म्हणाला·

' झोरका, ठराव मताला टाक पाहू.'

सर्व सभा जोरात हसली झोरकानं हात वर केला.

' मी आता ठराव मताला टाकला आहे. जे जे कोणी ठरावाच्या बाजूनं असतील त्यांनी हात वर करा ! '

खूपसे हात वर गेलेले दिसले. मी सर्व ओळीवर चहूबाजूंनी नजर टाकली. सर्वांनी हात वर करून मत दिलं. कोरोटकोव्हचा गट दरवाजाजवळ उभा होता. त्यांनी सुद्धा मत दिलं, मुलींनी सुद्धा आपल्या माना तिरक्या करुन मत द्यायला हात वर केले होते. मला आश्चर्य वाटलं की, कोरोटकोव्हच्या गटानं ठरावाच्या बाजूनं कसं मत दिलं. कोरोटकोव्ह भिंतीला टेकून शांतपणं उभा होता व व्यासपीठावर असलेल्या आमच्या पहिल्या गॉर्काईट्सकडे शांतपणे बघत होता.

या साऱ्या गंभीर वातावरणाचा भंग बोरोव्हायनं अचानक येऊन केला. तो सगळ्या रांगामधून धक्के देत आपल्या भलं मोठं ॲकॉर्डीयनमधून जरा कर्कश आवाज काढत आत घुसला.

' वा वा ! आज पाहुणेमंडळी आली. थांबा, मला एक स्वागतपर गीत येतं. मी ते वाजवून त्यांचं स्वागत करतो ! '

कोरोटकोव्हनं आपला हात बोरोव्हायच्या खांद्यावर ठेवला व विशिष्ट नजरेनं त्याच्याकडे पाहिलं. तो काहीतरी संकेत होता. बोरोव्हायनं डोक्याला एक हिसका दिला व तो एकदम गप्प झाला. त्याच ॲकॉर्डीयन हातात तसंच होतं. कुठच्याही क्षणी वाजविता यावं असं त्यानं ते हातात तयार ठेवलं होतं.

झोरकानं मतदानाचा परिणाम घोषित केला.

' कोम्सोमोल संघटनेनं मांडलेल्या ठरावाला तीनशे चौपन्न जणांनी त्याच्या बाजूला मत दिलं आहे. विरूद्ध मत एकही नाही. तेव्हा हा ठराव सर्वानुमते पास झाला आहे असं मी जाहीर करतो.'

गॉर्काईट्सनी एकमेकांकडे आनंदानं बघत जोरात टाळ्या वाजवून ठरावाचं स्वागत केलं. कुर्याझाईट्स तर अत्यानंदानं फुलून गेले होते. ती जोगीणींची इमारत बांधल्यापासून प्रथमच मला वाटतं माणसांच्या आवाजाचा व टाळ्यांचा कडकडाट त्यात घुमला असेल. छोटी मुलं जोरजोरात टाळ्या वाजवत होती. इतक्यात झादारोव्ह कुठूनतरी व्यासपीठावर आला.

तो केव्हा आला ते मला कळलंच नाही. त्यानं रायझोव्ह स्टेशनवरून काही तरी वाहन आणलं असलं पाहिजे कारण त्याच्या चेहऱ्यावर व कपड्यांवर काही

तरी पांढरं सांडलेलं दिसत होतं. नेहमीप्रमाणे त्यानं मला निर्मळ, मोकळ्या आनंदाद्वारे सूचना केली. सभेत भाषण करण्यापूर्वी आपल्या गोड हसण्यानं सर्वांना आकर्षित करून घेतलं.

'मित्रहो, मी चार शब्द बोलणार आहे. मी पहिला गॉर्की कॉलनीचा विद्यार्थी. सगळ्यात जुना व एकेकाळी अतिशय द्वाड असलेला. आंतोनना अजूनही त्या सर्वांची आठवण असेलच. मी आता 'टेक्नॉलॉजिकल इन्स्टिटयूट'चा विद्यार्थी आहे. समजलं? मी सांगतो ते तुम्ही ऐका. तुम्ही एक चांगला ठराव पास केला आहे. खरोखरच फार चांगला आहे तो. त्याचं पालन करणं हे मात्र कठीण आहे. एवढं लक्षात ठेवा.'

एवढं बोलून त्यानं जोरानं आपली मान हलवली. जणूकाही त्या ठरावाचा प्रत्यक्षातला कठीणपणा त्याला दर्शवायचा होता. सबंध हॉलमध्ये एक मजेदार हसू उमटलं.

कठीण हा 'कितीही ठराव असला तरी तो तुम्ही मंजूर केला आहे आणि तुम्ही मंजूर केलात म्हणजे पालन करायला पाहिजे. एक गोष्ट लक्षात ठेवा. काही जण विचार करतील की ठराव मंजूर केला आहे. तो अंमलात आणायचा की नाही हे सावकाश ठरवू. असा जो कोणी विचार करत असेल तो माणूस नव्हेच. तो एक उंदीर. आमच्या कॉलनीच्या कायद्याप्रमाणे सर्वसाधारण सभेनं मंजूर केलेला ठराव जो कोणी पाळणार नाही त्याची कॉलनीबाहेर रवानगी होते. तो जाऊ शकतो.'

झादारोव्हनं आपले पांढरेशुभ्र दात आवळले व मूठ वळवून आपल्या डोक्यावर हात धरला.

तो पुन्हा एकदा कडक शब्दात बोलला, 'नियम पाळणारा बाहेरच घालवला जातो.' असं म्हणून त्यानं त्याचा मूठ वळलेला हात खाली केला.

सर्व सभा अगदी तटस्थ झाली. आणखी नवीन काय ऐकायला मिळतंय त्याची वाट पहात राहिली. इतक्यात काराबानोव मुलांच्या घोळक्यातून पुढे येताना दिसला. त्याच्याही अंगावर काहीतरी पडलेलं होतं. परंतु ते काळ्या रंगाचं होतं. त्या विचित्र स्तब्धतेत काराबानोवचा आवाज उमटला.

'कुणाला बाहेर घालवून द्यायचंय सांगा पाहू. मी ते काम अगदी ताबडतोब करतो.'

लापोट मध्येच म्हणाला, 'अरे, झादारोवनं सर्वसाधारण नियम सांगितला.'

'ठीक आहे. मी पण सर्वसाधारणपणेच घालवून द्यायचं काम करीन. किंवा तुम्हाला पाहिजे तसं करीन. अरे पण तुम्ही सारेजण खेडेगावातल्या जत्रेतल्या पाद्र्याप्रमाणे अशी तोंडे लांब करून एका जागी चिकटून काय उभे राहिलात?'

'आम्ही सर्वजण ठीक आहोत' असा कुठून तरी आवाज आला.

'तुम्ही सर्वजण ठीक आहात. मग असे माना खाली घालून का उभे राहिलात ? आणि मघाचचं ते संगीत कुठे गेलं ?'

'अहो, संगीत इथं आहे.' असं मोठ्यानं म्हणत अतिशय आनंदाने बोरोव्हाय आपलं ॲकॉर्डीयन घेऊन पुढे सरसावला.

'ठीक आहे. इथे एकंदर संगीत वगैरे आहे तर. चला, सर्वजण मोठं वर्तुळ बनवा. चला ग पोरींनो. तुम्ही काय उगाचच उभ्या राहिल्या आहात ? होपाक नृत्य कोणाला येतंय ? नातालका, ये पुढं. पोरांनो, आमची नातालका कशी गोड आहे, पाहिलीत ?'

सर्व नजरा पेट्रोनकोच्या सुंदर डोळ्यांकडे, लांबसडक केसांकडे व किंचित पुढे असलेल्या दातांतून उमटणाऱ्या स्मितहास्याकडे वळल्या.

'कॉम्रेड्स, तुम्हाला होपाक नृत्य पाहिजे होतं काय ?' असं बोरोव्हायनं हसून विचारलं व आपल्या ॲकॉर्डियनमधून मोठा आवाज काढला.

'तुला काय येतंय वाजवता ?'

'मी ना ? वाल्टस्, स्टेपडान्स, स्पॅनिश डान्स काहीही वाजवू शकतो.'

'आपण स्टेपडान्स नंतर करू. प्रथम आपण होपाक नृत्य करू या.'

काराबानोवच्या संगीताच्या व नृत्याच्या साध्या आवडीचं हसून कौतुक करत बोरोव्हायनं आपलं डोकं एका बाजूला कलतं ठेवून एक क्षण विचार केला. आपलं वाद्य हातात सरसावून त्यानं चाचरत नृत्याचा सूर काढायला सुरुवात केली. काराबानोवनं आपले दोन्ही हात पसरले व एकाच वेळी उकीडवं बसून, उठून युक्रेनियन पद्धतीनं दोन्ही पाय जोरात मागेपुढे टाकायला सुरुवात केली. नताशाच्या डोळ्यांची एक क्षणभर उघडझाप झाली व नजर स्थिरावली. ती कोणाकडेही न बघता एखादी बोट पाण्यात सहजी फिरावी तशी ती त्या जमिनीवर नाचताना दिसत होती. तिच्या झग्याच्या चुण्या पसरत होत्या. काराबानोवनं एक जोराचा झटका पायाच्या टाचेनं दिला व तो नताशाच्या भोवती गोलगोल फिरायला लागला. त्याच्या भराभर हलणाऱ्या पायांचा आवाज साऱ्या खोलीभर दुमदुमत होता. त्याचे ते पाय इतक्या जोराने फिरत होते की ते जणू काही दोन पाय नसून एक डझन पाय फिरताहेत असं वाटत होतं. नताशानं डोळे वर करून आपल्या सोबत्याकडे पाहिलं. अशी नजर होपाक नृत्यात आपल्या सहकाऱ्याकडेच फक्त टाकली जाते. त्या नजरेचा अर्थ असा की 'तू सुंदर मुलगा आहेस. तुला नृत्यही चांगलं करता येतं. पण जरा सबूर.'

बोरोव्हायनं आपलं संगीत जरा आणखी चांगलं केलं. सेमयान खूप रंगात आला. नताशापण खुषीत आली. तिचा झगा तिच्या कमरेभोवती नुसताच फिरत नव्हता तर एखाद्या भोवऱ्याप्रमाणं गरगर फिरत होता. कुर्याझकरांनी वर्तुळ आणखी मोठं करण्यासाठी मागे सरून जागा केली व त्याच वेळी आपली नाकं

सदऱ्याच्या बाहीला पुसून साफ केली. ॲकॉर्डियनचा लयबद्ध आवाज व होपाक नृत्याच्या जोरदार हालचाली यामुळं त्या ठिकाणी आपोआप वर्तुळ वाढत गेलं व आवाजानं खोली सर्व बाजूंनी भरून गेली.

एकाएकी दाट घोळक्यातून दोन पसरलेले हात मध्ये येणाऱ्यांना बाजूला करत येताना दिसले. तो होता पेरेट्स. कमरेवर हात ठेऊन अप्रत्यक्षपणे नृत्याची इच्छा आहे असं सुचवत आपले पाय उडवत व नताशाकडे डोळे उडवत पुढं आला. नताशानं शांतपणं, अर्धवट मिटल्या डोळ्यांनी पेरेट्सकडे पाहिलं. आपली फुगीर पांढरी शुभ्र झग्याची बाही पेरेट्सच्या नाकाखाली धरून अगदी मोकळेपणी मैत्रीचे हसू, असं हास्य करुन एखादा हुशार समजूतदार कोम्सोमोलप्रमाणे पेरेट्सला मदतीचा हात दिला.

पेरेट्सला त्या नजरेला विरुद्ध असं काही करता येईना, एक क्षणभर त्यान आपली अस्थिर नजर सगळीकडे फिरवली. मग आपले सारे अंतर्गत विरोध बाजूला ठेवून तो एकदम पुढे आला. त्यानं आपली टोपी खाली फेकली व नृत्याच्या आखाड्यात स्वतःला झोकून दिलं. सेमयोन दात विचकून हसला. नताशा नृत्य करत भराभर कुर्याझकरांच्या पुढून फिरत होती. पेरेट्सनं स्वतःच तयार केलेले काही पदन्यास केले. काही मजेदार तर काही चिडविणारे असे होते. थोडक्यात गुन्हेगारी जगातले प्रकार तो दाखवत होता.

माझं लक्ष सहज कोरोटकोव्ह होता त्या बाजूला गेलं. तो आपले डोळे किलकिले करून सावधपणे पहात होता. पहाण्याजोग्या आकृती त्याच्या गोऱ्या कपाळावरून भरकन् जात होत्या ते त्याच्या थरथरणाऱ्या ओठांवरून दिसत होतं. त्यानं आपला घसा साफ केला. सगळीकडे नजर फिरवली. इतक्यात त्याचं माझ्याकडे लक्ष गेलं व तो गर्दीतून वाट काढत माझ्याकडे येऊ लागला. अजून माझ्यापासून थोडं दूर असतानाच त्यानं आपला हात माझ्याकडे पसरला व कर्कश आवाजात म्हणाला, 'आंतोन, आज मी तुम्हाला कसं काय म्हणून विचारलं नाही.'

मी पण त्याच्या डोळ्यांकडे बघत 'कसं काय आहे' म्हणून हसून विचारलं.

त्यानं आपली दृष्टी नृत्याकडे वळवली. परत जबरदस्तीनं माझ्याकडे दृष्टी वळवली. डोक्याला तर हिसका दिला. उत्साही आवाज काढण्याचा प्रयत्न केला. पण तो घोगऱ्या आवाजात म्हणाला, 'यांना नाचता येतं का ?'

□

९

## रूपांतर

सर्वसाधारण सभा संपली व लगेचच बदल व्हायला सुरुवात झाली. एकूण तीन तासात बदल घडून आला. इतक्या कमी वेळात कुठेही बदल घडून आला नसेल.

झोरकानं सभा संपल्याचा हातानं इशारा केला व सगळीकडे एकदम गडबड सुरू झाली. कमांडर्स मोठमोठ्यानं आपल्या तुकडीतल्या मुलांना नावं घेऊन एकत्र करू लागले. या गडबडीत मुलं इकडून तिकडे आपआपल्या तुकडीत जाण्यासाठी फिरत होती. सर्व तुकड्यांतील मुलं कमांडरच्या भोवती जमून चर्चच्या निरनिराळ्या भागात गट करून उभी राहिली. प्रत्येक तुकडीत बरेचसे कुर्याझमधले मूळचे गुंड होते. मध्येच पांढरेशुभ्र कपडे घातलेले मूळचे गॉकॉइट्स शांतपणे फिरताना दिसत होते.

सर्व तुकड्या बाहेर मैदानात गेल्या व नंतर डॉरमिटरीजकडे गेल्या. पाच मिनिटानंतर त्या क्लबमध्ये व सबंध आवारात एकदम शांतता झाली. मधूनच एखाद्या तुकडीतला मुलगा काही निरोप इकडून तिकडे देण्यासाठी पळताना दिसत होता.

मला जरा हायसं वाटलं व श्वास घ्यायला फुरसद मिळाली.

आमच्या कॉलनीच्या स्त्री शिक्षिका चर्चच्या पायरीवर उभ्या होत्या त्यांच्याकडे गेलो. झालेल्या सर्व प्रक्रियांवर त्यांचं मत अजमावयाचं होतं. मला मनापासून चर्चा व विचार यापासून विश्रांती हवी होती. एकातेरिना व लिडोच्का कॉम्रेड झोयाच्या प्रश्नांना संथपणे, निष्फळपणे उत्तरे देत होत्या.

ब्रेगेल चर्चच्या पायऱ्यांच्या रेलींगला टेकून उभी होती. ती गुलयेवनाला म्हणाली :

'हा सर्व देखावा शिस्त असल्याचा भास निर्माण करतो. पण यात तथ्य नाही. हे सारं वरवरचं वाटतं.'

गुलयेवनानं वळून माझ्याकडे पाहिलं.

'आंतोन, तुम्ही मला उत्तर द्या. मला यात काही समजत नाही.'

'मीसुद्धा सिद्धांताच्या बाबतीत तसा मागेच पडेन,' असं मी जरा निष्काळजी-पणे उत्तर दिलं.

यावर कोणीच बोललं नाही. त्यामुळे मला क्षणाची उसंत मिळाली व जग ही काय अपूर्व चीज आहे ते बघायची संधी मिळाली. आता दोन वाजले होते. तळ्याच्या पलीकडे गावातल्या झोपड्यांची छपरं उन्हं खात होती. लहान ढगांचे पुंजके कुर्याझवर नुसते संथ लटकत होते. त्यांना जणू काही खास जरूर लागली तर म्हणून ठेवले होते, असं वाटावं.

कॉलनीत आता काय चाललं असेल त्याची मला कल्पना होती. मुलं बिछाने गुंडाळून डॉरमिटरीत ठेवत असतील. गाद्या, उशा वगैरे झाकून त्यांची बंडले बांधून ठेवत असतील. पांघरुण, चादरी, जुने नवे बूट, सर्व बंडले बांधून ठेवत असतील. तबेल्यात आल्योशा व्होलकोव्ह या सर्व गोष्टी ताब्यात घेऊन त्यांची नोंद करून त्या निर्जंतुकी-करणासाठी पाठवत होता. हे निर्जंतुकीकरणाचं यंत्र जवळच्या शहरातून आणवलं होते. त्याला चाक असल्यामुळे ते कुठेही फिरवता येत हातं. ते सध्या खळ्यावर उभं केलं होतं व डेनिस कुडल्टीच्या ते ताब्यात होतं... चर्चच्या दुसऱ्या बाजूला डिमिट्री झेलवी मुलांच्या नावांची यादी हातात घेऊन नवीन कपड्यांचे जोड व साबण निरनिराळ्या तुकड्यांच्या कमांडर्स किंवा त्यांच्या दुय्यम कमांडर्सना देत होता.

अचानक सिनेन्की डोक्यावर जणू काही जबाबदारीचा फार मोठा भार घेऊन धावत चर्चच्या भिंतीकडे आला.

'तारानेट्स म्हणतो की कमांडर्सची सभा जेवणाच्या खोलीत बोलवायची आहे व त्यासाठी मला इशाऱ्याचा बिगुल वाजवायला सांगितलं आहे.'

'ठीक आहे. सांगितल्याप्रमाणे कर.'

सिनेन्कीनं आपले अदृश्य पंख पसरले व धावत जेवणघराच्या घरात जाऊन उभा राहिला. त्यानं इशाऱ्याचा बिगुल वाजविला या इशाऱ्याला तीन आवाज होते.

ब्रेगेलला सिनेन्कीबद्दल जरा जास्त आस्था वाटत असे. ती माझ्याकडे वळून म्हणाली :

'हा मुलगा प्रत्येक वेळी तुमची परवानगी बिगुल वाजविण्यासाठी कशाला घेतो ? ही तर अगदीच क्षुल्लक गोष्ट आहे.'

'हा आमचा नियम आहे. अचानक द्यायचा कोणताही इशारा मला सांगितल्याशिवाय द्यायचा नाही.'

'ते सारं ठीक आहे म्हणा. एकंदर छाप पाडणारं आहे. मला म्हणायचंय हा सारा देखावा नाही का? तुमचं काय म्हणणं आहे?'

मला राग आला होता. या लोकांनी काय म्हणून मला असा त्रास द्यावा? यांच्या मनात तरी काय आहे? कदाचित त्यांना जुनी कुर्याझ कॉलनी उगाच दिली असा पश्चाताप होत असेल.

'तुमचे बावटे, ढोलकी, सलामी वगैरे सर्व काही या लहान मुलांना वरवर तात्पुरती संघटना करतात असं वाटतं.'

मला त्या बाईला 'चूप कर' असं म्हणावसं वाटत होतं. पण मी राग आवरलाच व शक्य तितक्या मृदू आवाजात उत्तर दिलं.

'तरुण मुलांना किंवा लहान मुलांना तुम्ही लोक जणू काही पेटी आहे असं समजता. त्याची बाहेरची बाजू म्हणजे वरचं वेष्टन आणि आतमध्ये फक्त काही तरी मौल्यवान वस्तू. आपण त्या मौल्यवान वस्तूची काळजी घ्यायची. पण ती मौल्यवान वस्तू जर नीट गुंडाळून ठेवली नाही तर ती फुकट जाईल. बाह्य उपचारांचीच फक्त तुम्ही काळजी घेता.'

ब्रेगेल रागारागानं जेवणघराकडे धावत जाणाऱ्या व्हेटकोव्हस्कीकडे बघत होती.

'तुम्ही काही म्हणा, हे सारं तुमचं म्हणजे सैनिकी शाळेचं शिक्षण वाटतं.'

'हे पहा व्हेरवाय व्हिक्टोरोव्हना, मला वाटतं आपण ही सारी चर्चा थांबवू या. आपण नुसतंच बोलणं बरं नव्हे' असं मी अगदी शक्य तितक्या सौम्य शब्दांत सांगितलं.

'कोणाची मदत घ्यायची?'

'दुभाषाच्या मदतीशिवाय बोलण्याला अर्थ नाही' ब्रेगेलबाई चर्चच्या रेलींग-जवळून उठली व जणू काही माझ्यावर तुटून पडायला आली. मी माझे दोन्ही हात एकमेकात अडकवून पाठीमागे घेतले. तिनं आपल्या तोंडावर कुठून तरी हसू आणायचा प्रयत्न केला व एखादा कमी दिसणारा माणूस ज्याप्रमाणे सावकाश चष्मा चढवतो व टक लावून बघतो तसं बघत ती मला म्हणाली.

'दुभाषे आपण शोधून काढू शकतो, कॉम्रेड माकारेन्को.'

'तर मग ते मिळेपर्यंत आपण चर्चा थांबवावी.' पहिल्या तुकडीचा कमांडर गुड होता. तो भराभर चर्चच्या पायऱ्यांकडे येत होता. तिथं पोचल्यावर तो मोठ्यांदा म्हणाला : 'उस्टीमेंको, हा दरवाजा कधीच वापरला नव्हता?'

एक सावळ्या वर्णाचा सुमारे पंधरा वर्षांचा उस्टीमेंको नावाचा मुलगा दरवाजाकडे बोट दाखवत बोलला.

'नाही. हा दरवाजा कधीच वापरत नसत. मी सांगतो ना. याला नेहमी कुलुप घातलेलं असे. ते त्या बाजूचा व ह्या बाजूचा दरवाजा वापरत. पण विश्वास ठेवा ते हा दरवाजा कधीच वापरत नसत.'

'तिथं कपाट वगैरे आहेत व त्यात मेणबत्त्या वगैरे वस्तू असत...' असा एक आवाज आला.

गुड सर्वात वरच्या पायरीवर गेला व मोठ्यांदा हसला.

काय बरं असेल. इथं छान होईल. कुणालाही हा पोर्च नको आहे. शिवाय त्याच्यावर छप्पर पण आहे. पाऊस आला तरी चिंता नाही. झोपायला अर्थात ही जागा तशी चांगली नाही. ठीक आहे. तशी वाईटही नाही.

कार्पिनस्की हा जुना गॉर्काईट गुडच्या तुकडीतला. उत्तम बूट बनविणारा. त्यानं त्या दगडी जमिनीकडे मजेत पाहिलं.

'अरे ही जमीन काही फारशी कठीण किंवा खडबडीत नाही. आपल्याकडे सहा गाद्या व सहा कांबळी आहेत आणि जरूर पडल्यास आपल्याला आणखी थोडी मिळतील.'

'कदाचित मिळतील' असं गुड म्हणाला. गुड तळ्याच्या बाजूला गेला व त्यानं तिथून एक घोषणा केली.

'सर्वजण लक्ष देऊन ऐका. ही पोर्चची जागा आहे. ती पहिल्या तुकडीनं कबजा केलेली आहे. आंतोन, तुम्ही याला साक्षी आहात. सर्वांना समजलं असेल.'

'ठीक आहे !' असं मी म्हटलं.

'चला, आपण सुरुवात करू या. कोण कोण आहेत इथं? एक मिनिट थांबा.'

गुडनं आपल्या खिशातून तुकडीतल्या मुलांची यादी बाहेर काढली. 'स्लीव्हा व ख्लेबेहेन्को जरा पुढं या बरं तुम्ही !'

ख्लेबेहेन्को हा अगदी लहान हडकुळा व जरा अशक्त मुलगा होता. त्याचे काळेभोर केस त्याच्या कपाळावर सरळरेषेत आले होते. त्याच्या नाकावर काही चिकट पदार्थ लागलेला होता. त्याचा मळका सदरा त्याच्या गुडघ्यापर्यंत लांब होता. मधूनमधून तो फाटलेला होता. त्यामुळे जास्तच लोंबत होता. तो कसंतरी हसत होता. गुडनं त्याच्याकडे नीट न्याहाळून पाहिलं व आपली नजर दुसरा मुलगा स्लीव्हा, त्याच्याकडे वळविली. स्लीव्हाही तसाच अशक्त होता, पण हा बराच उंच होता. त्याचं लहानसं डोकं त्याच्या कमालीच्या हाडकुळ्या मानेवर ठेवलेलं होतं. त्याचे ओठ मात्र अतिशय जड व लाल होते. स्लीव्हा हसत पायऱ्यांकडे नजर लावून उभा होता.

'तुम्हाला काय खायला घालत होते इथे पूर्वी हेच आम्हाला समजत नाही,' असं गुड म्हणाला, 'तुम्ही सारेजण असे हाडकुळे कसे आहात रे? तुम्ही रस्त्यावर फिरणाऱ्या कुत्र्यासारखे बारीक आहात. यांना खूप खायला घातलं पाहिजे. आंतोन याला काय तुम्ही तुकडी म्हणणार? पहिली तुकडी अशी हाडकुळी घाणेरडी असून नाही चालणार. आपल्याकडे भरपूर अन्नसामुग्री आहे. शिवाय बाजूला काढून कसं ठेवायचं ते तुम्हाला चांगलं माहित आहे.'

सगळी मुलं एकदम हसली. गुडनं एकदा अनिश्चितपणे स्लीव्हा व ख्लेबेहेन्कोच्या चेहऱ्यांकडे पाहिलं व जरा समजावणीच्या स्वरात म्हणाला,

'स्लीव्हा ख्वेबेहेन्को, आपल्याला ही पोर्चची जमीन धुवून काढायची आहे! या क्षणाला. जमीन कशानं धुतात ते तुम्हाला माहीत आहे का? पाण्यानं धुतात व पाणी ओतावं लागतं. कारपिन्स्की, पळ व मिट्काकडून आपल्याला कटका, बादली व खराटा घेऊन ये पाहू!'

तो परत स्लीव्हा व ख्लेबेहेन्कोकडे वळून म्हणाला, 'जमीन कशी धुतात माहीत आहे का तुम्हाला?

त्या दोघांनी मान हलवून 'होय' सांगितलं. गुडनं आमच्याकडे वळून पाहिलं, आपली टोपी काढून हातात घेतली व एक हात वर करून सर्वांना उद्देशून बोलला,

'कॉम्रेड्स, क्षमा करा; पण ही जागा पहिल्या तुकडीनं घेतली आहे. लवकरच ती तुकडी-त्यातली मुलं-साफसफाईला लागणार आहेत. तुम्हाला बसायला मी दुसरी जागा दाखवतो. तिथे छान बाकं टाकलेली आहेत, त्यावर तुम्ही बसा. पण ही जागा पहिल्या तुकडीची आहे.

पहिल्या तुकडीनं हे सारं अगदी नाट्यपूर्ण रीतीने केलं. आम्हाला बसायला बाक दाखविल्याबद्दल मी गुडचे आभार मानले. पण त्याचा मात्र उपयोग केला नाही.

कार्पिन्स्की बादल्या घेऊन आला. गुडनं सर्व सूचना देऊन ठेवल्या व आपला हात हलवून इशारा केला.

'चला रे, केस कापायला.'

चर्चच्या पायऱ्या उतरुन ब्रेगेल सावकाश पावलं टाकत चालली होती. ही मंडळी केव्हा एकदा जातात याची मी वाट पहात होतो.

पोर्चच्या पुढं झेलवी आपलं दुकान मांडून बसला होता. प्रत्येक तुकडीचे प्रमुख व त्यांचे मदतनीस ओळीनं त्याच्यापुढे उभे होते. प्रत्येकजण निळ्या चड्ड्या, पांढरे सदरे, बादल्या व तपकीरी रंगाच्या साबणाच्या पेट्या घेऊन जाताना दिसत होता. इथंसुद्धा जिल्हा परिषदेनं आपली गाडी आणली. बिचारा ड्रायव्हर कंटाळला होता व त्रासिक नजरेनं ब्रेगेलकडे बघत होता.

आम्ही फाटकापर्यंत एकमेकांशी न बोलता चालत गेलो. कुठं जावं हे काही मी ठरवलं नव्हतं. मी एकटा असतो तर चर्चच्या भिंतीजवळच्या गवतावर स्वतःला झोकून देऊन या जगातल्या आकर्षक वस्तूंचा विचार करत पडलो असतो. सध्या चाललेली मुलांची ही कामं कमीत कमी दोन तास तरी संपणार नव्हती. त्यानंतरच मला खरं काम करायचं होतं. त्या बिचाऱ्या ड्रायव्हरची मला फार फार कीव येत होती.

इतक्यात मुलांचा एक गट हसत, गप्पा मारत फाटकाच्या बाहेर जाताना दिसला आणि मला पुन्हा एकदा खूप हलकं वाटलं. ती आठवी तुकडी होती हे मी

ओळखलं. सर्वात पुढे आमच्या फ्रेडरेन्कोची रेखीव आकृती व मधे कोटर्चो, नेचौतायलो, ओलेग ओग्नेव वगैरे दिसत होते. माझी नजर जरा काही अनोळखी व्यक्तींवर पडली. अर्थात् त्यांच्या अंगावर गॉर्की कॉलनीचे कपडे होते. मग माझ्या लक्षात आलं की ते पहिले कुर्याझकर. पंधरा दिवस आम्ही खपून हा त्यांच्यात झालेला बदल दिसत होता. स्वच्छ धुतलेले चेहरे होते, केस कापून त्यावर बसविलेल्या नुकत्याच घडया उलगडलेल्या व्हेलवेटच्या टोप्या चढविलेल्या दिसत होत्या. सर्वात महत्वाची व समाधानाची गोष्ट म्हणजे त्यांची आनंदी व उत्साही नजर. हे सर्व प्रथमच चांगल्या स्वच्छ कपडयांमुळे डौलदार दिसत होते. असे जंतूविरहीत कपडे ब्ऱ्याच जणांनी प्रथमच आयुष्यात घातले असतील.

फ्रेडरेन्को त्याच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे जरा बाजूला होऊन त्याच्या भरदार आवाजात म्हणाला :

'आंतोन सेमयानोविच, फ्रेडरेन्कोची आठवी तुकडी अगदी एकदम व्यवस्थित आहे. ती तुम्ही स्वीकारा.'

त्याच्या बाजूला ओलेग ओग्नेव्ह उभा होता. त्याचे ओठ जरा थरथरले. त्यानं हळूच मला अभिवादन केलं.

मी ओलेगचे खांदे प्रेमभराने दाबले. मला त्याला अगदी मिठी मारायची तीव्र इच्छा झाली होती. त्यालाच काय, पण फ्रेडरेन्को वगैरे सर्वच माझ्या मुलांना जवळ घ्यावं असं वाटत होतं. मला त्यावेळी कुठल्याही गोष्टीची त्या क्षणी माझ्या हृदयात नोंद करावी हे अवघड वाटलं होतं. कागदावर नोंद करून ठेवणं तर सोडाच. माझ्या मनात एकाएकी अनेक कल्पना, आकृत्या, विचार, वक्तृत्व, नृत्याचे ताल या सर्वांनी एकच गर्दी केली होती. त्यातल्या एखाद्याला जर पकडलं —म्हणजे त्यावर विचार करायला लागलं—तर ते पटकन् बाकीच्यात मिसळून जाई व मध्येच काहीतरी नवीन उपटून माझं लक्ष वेधून घेई. बाप्तिस्मा किंवा धर्मांतर या दोन्ही शब्दांना धार्मिक अर्थ आहे असा विचार चालता चालता मनात येऊन गेला. पण कोरोटकोव्हचा हसरा चेहरा पाहिला व हे विचार कुठल्याकुठे लुप्त झाले. कोरोटकोव्हची आठव्या तुकडीत भरती व्हावी म्हणून मीच खरा आग्रह धरला होता. आमच्या चाणाक्ष फ्रेडरेन्कोनं माझी नजर कोरोटकोव्हवर पडली आहे असं पहाताच, आपले हात कोरोटकोव्हच्या खांद्यावर टाकून आपली नजर त्याच्यावर फिरवत म्हणाला :

'आंतोन सेमयानोविच, तुम्ही एक उत्तम कॉलनीस्ट आमच्या तुकडीला दिला आहे. माझं त्याचं बोलणं झालं आहे. एक दिवस हा उत्तम कमांडर होईल.'

माझ्याकडे गंभीर नजरेनं बघत कोरोटकोव्ह मनापासून म्हणाला :

'मला तुमच्याशी नंतर काही बोलायचं आहे. मी बोलू शकतो का ?'

'तू तरी मजेदार आहेस,' कोरोटकोव्हच्या चेहऱ्याकडे गंमतीने उपरोधिक-

पणे पहात म्हणाला, 'काय असं बोलायचंय तुला ? बोलण्याचा फारसा उपयोग नाही. लोकांना कशासाठी बोलायचं असतं ?'

कोरोटकोव्ह व फ्रेडरेन्कोकडे उत्तरादाखल बघितलं.

'मला काही खास खाजगी बोलायचंय तुमच्याशी.'

'नाही रे, उगाच काहीतरी तसं काही बोलायला नाही ये.'

'मला तुम्ही अटक करून ठेवा, अशी मी विनंती करतो !'

फ्रेडरेन्को एकदम मोठ्यांदा हसला.

'अस्सं, तुला हे सांगायचंय. तू फार घाई करतोयस बाबा ! तुला प्रथम कॉलनीस्ट असल्याचा मान कमवावा लागतो. हा पाहिलास बिल्ला ? तोपर्यंत तुला अटक करून ठेवता येत नाही. समज तुला जर सांगितलं की तुला अटक केली आहे, तर उलट प्रश्न विचारशील. तू म्हणशील : कशासाठी अटक ? मी काहीच केलं नाही !'

'आणि मी खरोखरच काही केलं नसेल तर ?'

'हे पहा, तुला अजून समजत नाही ! तुला चुकून जरी दोषी ठरवणं हे तू फार महत्वाचं समजतोस. पण तू जेव्हा खरा कॉलनीस्ट होशील त्यावेळी तू याच गोष्टीकडे वेगळ्या दृष्टिकोनातून पाहशील. आता कसं सांगू बरं तुला ? असं पहा. महत्वाची गोष्ट म्हणजे शिस्त पाहिजे. तू काही केलं आहेस किंवा केलं नाहीस, याला तितकंसं महत्व नाही. आंतोन, मी म्हणतो ते बरोबर आहे ना ?'

मी फ्रेडरेन्कोच्या बोलण्याला मान हलवून संमती दिली. ब्रेगेल आमच्याकडे, आम्ही म्हणजे कसले तरी विचित्र नमुने आहोत, अशा तऱ्हेने पहात होती. तिचे गाल जरा फुरफुरायला लागले होते. तिचं लक्ष दुसरीकडे वळवावं नाहीतर परत काही अप्रिय गोष्टीची चर्चा करायचा प्रसंग येईल, म्हणून मी फ्रेडरेन्कोकडे वळून म्हटलं :

'तिकडे ते कोण आहेत रे ? कोण असावं बरं ?'

'ती लहान मुलं म्हणता काय?' फ्रेडरेन्कोनं विचारलं, 'तो लहानगा आनंदी मुलगा. त्याला म्हणे खूप मार पडला होता.'

'बरोबर आहे. ती झायचेन्कोची तुकडी,' असं मी म्हटलं.

'कोणी मारलं होतं त्याला ?' ब्रेगेलबाईनी पुढे सरसावून विचारलं.

'एके रात्री त्याला इथल्याच लोकांनी खूप मारलं होतं.'

'कशासाठी मारलं होतं ? केव्हा मारलं होतं ? तुम्ही आम्हाला याची खबर का दिली नाही ?'

'व्हारव्हारा, व्हिक्टोर्येव्हना, या कुर्याझमध्ये अनेक वर्षे लहान मुलांना अतिशय वाईट तऱ्हेनं वागवलं जात होतं. तुम्ही लोकांनी यात फारसं लक्ष कधीच

घातलं नाही. ही घटनासुद्धा तुमच्या नजरेखालीच झाली होती. परंतु मी मात्र याच्यात व्यक्तिशः लक्ष घातलं.' असं मी रागारागानं म्हटलं.

याचा परिणाम म्हणजे ब्रेगेलबाईनं जाण्यासाठी आपला मोर्चा वळवला.

'ठीक आहे.' असं तिनं अगदी निर्विकारपणे म्हटले आणि आपला मोर्चा गाडीकडे वळवला. गाडीमध्ये कॉम्रेड झोया तिची वाटच पहात होती.

मी एक दीर्घ निःश्वास सोडला व वान्या झायचेन्कोच्या अठराव्या तुकडीचा समाचार घेण्यासाठी गेलो.

वान्या आपली तुकडी मोठ्या अभिमानानं माझ्यापुढे घेऊन आला. या अठराव्या तुकडीत आम्ही फक्त कुर्याझमधलीच मुलं घातली होती. हेतू हा होता की त्या तुकडीच्या कमांडरला व मुलांना जरा स्वतःचं महत्व वाटावं आणि वान्यानं हे बरोबर ताडलं होतं. फ्रेडरेन्को त्यांना पाहून मोठ्यांदा हसला.

'अरे वा रे, तुम्ही छोटे कॉलनीस्ट.'

अठरावी तुकडी एखाद्या सैनिकी तुकडीप्रमाणे चालली होती. वीस छोटी छोटी मुलं सैनिकी थाटात पाय आपटत व हात हलवत खऱ्याखुऱ्या सैनिकांप्रमाणे चालत होती. या छोट्या झायचेन्कोनं इतक्या थोड्या वेळात ही चालण्याची सैनिकी शिस्त संपूर्णपणे आत्मसात केली होती. त्यांच्या त्या सैनिकी शिस्तीचं कौतुक करण्यासाठी मी पण माझा हात सलामी देण्याच्या थाटात माझ्या टोपीवर ठेवला व त्यांना म्हटलं,

'एके रात्री त्याला इथल्याच लोकांनी खूप शिस्त संपूर्णपणे आत्मसात केली होती. त्यांचं ते सैनिकी शिस्तीचं कौतुक करण्यासाठी मी पण माझा हात सलामी देण्याच्या थाटात माझ्या टोपीवर ठेवला व त्यांना म्हटलं,

'कॉम्रेड, तुम्हाला आमची सलामी.'

परंतु त्या अठराव्या तुकडीला अशा तऱ्हेची सवय नव्हती. त्यामुळे त्या सर्व मुलांनी एकदम गोंधळ केला व वान्या जरासा चिडला.

'अहो, ते सारे अजूनही अडाणीच आहेत.'

फ्रेडरेन्कोला जरा आनंद वाटला. त्यानं आपल्या पायावर थाप मारली व म्हणाला, 'अरे वा, यानं एवढ्यातच ही भाषा शिकून घेतली हं.'

त्यांचा गोंधळ जरा आवरण्यासाठी मी विचारलं, 'अठराव्या तुकडीचं काय म्हणणं आहे? तुम्हाला आंघोळ कशी काय वाटली?'

प्योट्र मालिकोव्ह आनंदानं हसला.

'आमची आंघोळ म्हणता होय? वा, फारच छान होती.'

ओडारयूकनं आपलं डोकं दुसऱ्या बाजूला वळवलं व एका मुलाच्या खांद्यावरून हळू आवाजात म्हणाला, 'आणि आंघोळीला साबणसुद्धा मिळाला होता.'

झायचेन्कोनं अभिमानानं माझ्याकडं पाहिलं.

'आम्ही आता दररोज साबण लावून आंघोळ करणार आहोस. हा ओडारयूक आहे ना ? हा आमचा पुरवठा अधिकारी.' असं म्हणून ओडारयूकच्या हातात असलेल्या साबणाच्या पेटीकडे बोट दाखवलं.

'आज आम्ही साबणाचे दोन बार वापरलेत. आख्खे दोन बार बरं. पण आज पहिलाच दिवस होता ना ? आता उद्यापासून मात्र आम्ही बेतानं वापरू. आम्हाला आणखीन काहीतरी तुम्हाला विचारायचंय हं. आम्हाला कुरकुर नाही करायची.'

वान्यानं आपल्या सवंगड्यांकडे पाहिलं. 'आपल्याला कुरकुर करायची नाही. होय की नाही रे ?'

'काय वात्रट आहात रे तुम्ही ?' फ्रेडरेन्को म्हणाला.

'आम्ही काही कुरकुर करत नाही. खरंच नाही.' असं सारेजण एकदम ओरडले.

वान्यानं बराच वेळ इकडे तिकडे पाहिलं. नंतर म्हणाला, 'पण तरीसुद्धा आम्हाला काही तरी विचारायचं आहे तुम्हाला.'

'मला कळलं रे. तुम्हाला कुरकुर करायची नाही. पण तुम्हाला काहीतरी विचारायचंय.'

'अगदी बरोबर.' वान्या म्हणाला, 'तुम्हाला जरूर काही विचारायचंय. बाकी सर्व तुकड्यांमध्ये जुने गॉर्काईट्स घातलेले आहेत. ते ३ ते ४ आहेत आणि आमच्या तुकडीत मात्र एकसुद्धा का नाही ?'

वान्यानं एकदा नाही हे शब्द दोन वेळा उच्चारले. त्यानं आपल्या उजव्या हाताचं बोट कानाजवळ नेलं व एकदम मोठ्यानं हसायला सुरवात केली.

'मला एक ब्लँकेट पण नाही. एक गादीसुद्धा नाही. आम्हाला मात्र काहीच नाही.' असं म्हणून वान्या जोरजोरानं हसू लागला व त्याची सारी अठरावी तुकडी त्याच्याबरोबर हसू लागली.

अठराव्या तुकडीच्या कमांडरला, आल्योशा व्होल्कोव्हला चिठ्ठी दिली. 'यांना ताबडतोब सहा गाद्या व सहा कांबळ्या देऊन टाका.'

नदीकडे जाणाऱ्या रस्त्यावर बरीच हालचाल दिसत होती. निरनिराळ्या तुकड्या त्या बाजूला फिरत होत्या.

तबेल्याच्या पाठीमागे वाढलेल्या गवतावर चार न्हावी बसलेले होते. ते सकाळपासूनच जवळच्या शहरातून आले होते.

कुर्याझकरांच्या केसांचे गठ्ठे जमा झाले होते. माझी अशी खात्री झाली होती की कुर्याझची मुलं ही इतर चारचौघांसारखीच आनंदी, बडबडी व एकंदर तरतरीत असतील. नवीन कपड्यांमुळे ते अगदी आनंदी दिसत होते. सदऱ्याच्या चुण्या छानपैकी लावल्या होत्या व नव्या टोप्या हातावर घेऊन गरगर फिरवत होते. आमच्या आल्योशा व्होल्कोव्हनं ज्या अनेक वस्तूंचे ढीग चर्चच्या बाजूला पडले होते त्यातून एकुलता एक मोठा आरसा बाहेर काढला व तो व्यासपीठा-

वर दोन मुलांनी नेऊन ठेवला. त्या आरशाभोवती अनेकजण जमून आपला नवा अवतार कसा काय दिसतोय ते मोठ्या कौतुकानं बघत होते. कुर्याझकरांच्या मध्येसुद्धा बरीचशी मुलं दिसायला देखणी होती. बाकीचीही त्यांचं पाहून आपणही चांगलं दिसावं म्हणून सुधारणा करण्याची बरीच शक्यता होती. सौंदर्य हे शेवटी काम व चांगलं खाणं यावरच अवलंबून असतं.

मुली तर एकंदर फारच खूष होत्या. मूळच्या गॉर्की कॉलनीच्या मुलींनी कुर्याझच्या मुलींसाठी खास कपडे शिवून आणले हाते. निळ्या सॅटिनचा परकर व पांढऱ्या कापडाचा पोलका. निळ्या रंगाचे मोजे व त्यावर छोटे पायतण. कुडल्टीनं सगळी शिवणयंत्रं मुलींना त्यांच्या डॉरमिटरीत नेऊन दिली होती. त्यामुळे कपडे घट्ट, सैल करणं हे बायकांचे नेहमीचे काम चालू झालं होतं. कुर्याझची लाँड्री एक दिवसासाठी मुलींच्या स्वाधीन केली हाती. पेरेट्स मला भेटला तेव्हा त्याला मी पुढील सूचना दिली,

'तुझे कामातले कपडे घाल व लाँड्रीला लागणारं पाणी तापवायची व्यवस्था कर. गडबड करू नको. ताबडतोब कामाला सुरुवात कर.'

पेरेट्सनं चेहरा कसातरी केला. छातीवर हात फिरवत मला विचारलं, 'म्हणजे मी मुलींसाठी पाणी तापवून देऊ काय ? '

'होय ' मी त्याला सांगितलं.

पेरेट्सनं आपलं पोट पुढे काढलं, गाल फुगवले व एखाद्या सैनिकाप्रमाणे सलाम करत भसाड्या आवाजात सबंध आवारात ऐकू जाईल एवढ्या मोठ्यानं म्हटलं,

'मुलींच्यासाठी पाणी तापवा. ठीक आहे.'

जरा विक्षिप्त असला तरी तो तसा उत्साही होता. या सर्व वरील अभिनयानंतर तो एकाएकी कळवळून म्हणाला, 'पण मला कामाचे कपडे कुठे मिळतील ? नवव्या तुकडीनं ते अजून दिलेले नाहीत.'

'हे बघ बाळा, मी तुला हाताला धरुन जाऊन कसे कपडे बदलायचे ते दाखवायला पाहिजे काय, सांग. इथे असा नुसता बडबडत तू किती थांबणार आहेस ?'

आमच्या सभोवती उभी असलेली मुलं एकदम मोठ्यानं हसली; त्यामुळे पेरेट्सनं आपलं डोकं हलवत मोठ्यांदा सांगितलं.

'बरं मी करतो, मी करतो. तुम्ही काही काळजी करु नका.' असं म्हणून तो पळाला.

लापोटनं कमांडर कौन्सिलसाठी इशारा दिला. यावेळेस चर्चच्या पोर्चमध्ये गुडच्या तुकडीनं ती आपली झोपण्यासाठी जागा पक्की केली होती.

चर्चच्या पायरीवर उभा राहून लापोटनं भाषण केलं.

'कमांडर्स, बसायची काही जरुरी नाही. मी दोनच मिनिटात संपवणार

आहे. तुमच्या तुकडीतल्या मुलांना नाक साफ करायला सांगा. सबंध आवारात कुठेही नाक शिंकरत फिरायचं नाही. तसंच शौचकूपाबद्दल झोर्कानं तुम्हाला सर्वसाधारण सभेत सांगितलंच आहे. तिसरी गोष्ट आल्योष्कानं कचरा जमा करण्यासाठी डबे ठेवलेले आहेत. तरीसुद्धा मुलं सबंध कंपौंडभर कचरा फेकताहेत. हे चालणार नाही.'

यावर व्हेट्कोव्हस्की हसत म्हणाला, 'अरे, एवढी घाई कशाला करतोस ? आधी सारी घाण जमा करु या. आणि मग डब्यांचं बघू या.'

'कोस्टचा, ते काही चालणार नाही हं. साफसफाई करणं ही एक गोष्ट आहे व नियम पाळणं ही अजिबात वेगळी गोष्ट आहे. तेव्हा विसरू नका. प्रत्येकाला आपला नियम कळलाच पाहिजे. मागाहून ते म्हणतील, आम्हाला माहीत नव्हतं हो. आम्हाला कसं कळणार ? '

'कसला नियम ?'

'आपला थुंकण्याबद्दलचा नियम. तुम्ही सारेजण एकदम म्हणा, '

लापोटनं आपल्या हातानं दाखवलं व साऱ्या कमांडर्सनी त्याच्या पाठोपाठ ते म्हटलं.

'एकदा थुंका व तीन वेळा ती जमीन धुवून काढा. '

काही भटकी मुलं कमांडर्स कोन्सिलकडे जरा भीती व दरारा वाटून त्यांच्याकडे तोंड उघडी टाकून बघत होते. लापोटनं कमांडर्स कौन्सिल बरखास्त केलं. मुलांनी या नव्या घोषणा प्रत्येक तुकडीच्या तात्पुरत्या राहण्याच्या जागी पोजत्या केल्या. त्या पार खालाबुडापर्यंत पोचल्या. खालाबुडा गुरांच्या गोठ्यातून बाहेर येत होता.

त्याच्या साऱ्या अंगावर धूळ, गवताच्या काड्या व इतर घाण पडलेली होती.

'ह्या शहाण्या बायका मला एकट्याला इथं सोडून निघून गेल्या आणि आता मला स्टेशनपर्यंत चालत जायला पाहिजे. एकदा थुंका व तीन वेळा ती जागा पाण्याने धुवा. उत्तम नियम आहे. व्हिटकाबाबा या म्हाताऱ्या माणसावर दया करा. काहीतरी करा आणि मला स्टेशनपर्यंत पोचवा.' असे खालाबुडा म्हणाला.

व्हिटकानं आमचा अँटन ब्रातचेन्कोकडे पाहिलं. अँटनचा पण आवाज भरडा होता. तो म्हणाला, 'भाडोत्री कशाला ? आपल्या मोलोडेट्सला गाडीला जोड व यांना पोचवून देऊ. त्यांनी आज डॉनला खरारा केला.' असं म्हणून ब्रातचेन्को खालाबुडाकडे वळून म्हणाला, 'तुम्हाला जरा स्वच्छ करू या.'

एवढ्यात मॉनिटरच्या कपड्यात तारानेट्स आला. तो जरा त्रासलेला दिसत होता.

'तिकडे कोणी शेतकीतज्ञ राहतात म्हणे. ते आपली खोली सोडायला तयार नाहीत व ते म्हणतात, आम्ही तुमच्या तुकडीत वगैरे सामील होणार नाही.'

'तिथं सारं स्वच्छ आहे होय ना ?'

'मी आता तिकडे गेलो होतो. त्यांचे बिछाने पाहिले. बऱ्याच वस्तू त्यांच्याकडे आहेत. त्यात खूप उवा व ढेकूण आहेत.'

'चल, आपण जाऊन पाहू या.'

त्या शेतकीतज्ञांची खोली संपूर्णपणे घाणेरडी होती. बरेच दिवसात त्या खोलीला कुणी झाडू वगैरे लावलेला दिसत नव्हता. व्होसकोवौनिकोव्ह याला गुरांच्या गोठ्यावर तुकडीचा कमांडर नेमलं होतं. तो व आणखी त्याच्याबरोबरचे दुसरे दोघे यांनी आपल्या वस्तू निर्जंतुक करण्यासाठी दिलेल्या सूचना पाळल्या होत्या. परंतु त्यांनी खोली सोडून दिली होती. राहण्याची जागा सोडल्यावर जसा सगळा कचरा व घाण राहते तशी तिथे राहिली होती. तिथे अजून अनेकजण होते. त्यांनी थंड स्वागत केलं. त्यांना व मला दोघांनाही कोण जिंकणार याची पक्की खात्री होती. फक्त शरणागतीचा मार्ग कोणता ते त्यांनी ठरवायचं होतं.

'सर्वसाधारण सभेत पास झालेल्या ठरावाला तुमची संमती नाही काय ?' असं मी विचारलं.

उत्तर नाही.

'तुम्ही त्या सभेला हजर होतात काय ?'

उत्तर नाही. पण तारानेट्सनं त्याच्या बदली उत्तर दिलं. 'ते हजर नव्हते.'

'मी तुम्हाला तुमचा विचार ठरविण्यासाठी भरपूर वेळ दिला होता. तुम्ही स्वतःला कोण समजता ? कॉलनीस्ट का खाणावळे ?'

उत्तर नाही.

'तुम्ही स्वतःला जर खाणावळे समजत असाल तर तुम्हाला इथं दहा दिवसांपेक्षा जास्त दिवस राहता येणार नाही. तुम्हाला आमच्याकडे जेवण मिळणार नाही.'

'मग आम्हाला जेवण कोण देईल ?' असं स्वारकोनं विचारलं.

तारानेट्स हटला, 'काय विक्षिप्त लोक आहेत.'

'आजही तुम्ही आम्हाला जेवण देणार नाही काय ?'

'नाही'

'तुम्हाला असं करायचा अधिकार आहे का ?'

'अर्थात् आहे.'

'समजा, आम्ही काम केलं तर ?'

'फक्त कॉलनीस्ट इथं काम करू शकतात.'

'बरं, आम्ही कॉलनीस्ट म्हणून राहू. पण आम्ही ही खोली सोडणार नाही.'

'नाही ते चालणार नाही.'

'मग, आम्ही करायचं तरी काय ?'

' मी तुम्हाला पाच मिनिटं वेळ देतो. तुम्ही काय ते ठरवा व मॉनिटरला सांगा.'

' ठीक आहे ' असं तारानेट्स म्हणाला.

अर्ध्यातासानंतर मी त्या शेतकीतज्ज्ञांच्या खोलीकडे चक्कर टाकली. आल्योष्का व्होलकोव्ह खोलीला कुलुप घालत होता. तारानेट्स तिथे उभा होता.

' ते गेले काय ?' असं मी विचारलं.

' कसे गेले माहीत आहे ? ' असं म्हणून तारानेट्स हसला.

' ते सर्व निरनिराळ्या तुकड्यांत सामावले का ?'

' होय सर्वजण प्रत्येक तुकडीत एक याप्रमाणे मिसळले.'

दीड तासाने जेवणाच्या खोलीत टेबले लावून त्यांच्यावरून पांढऱ्या चादरी पसरलेल्या होत्या व मोठ्या जेवणसमारंभाची तयारी केलेली होती. जेवणघराचा संपूर्ण कायापालट करण्यात आला होता. आमच्या आघाडीच्या तुकडीने सकाळी लवकर उठून जेवणघराच्या भिंती व जमीन घासूनपुसून स्वच्छ केली होती. भिंतीवर झाडाच्या लहान लहान फांद्या लावून त्या सुशोभित केल्या होत्या. गॉर्काईटस् स्टेशनवरून येऊन पोचल्यानंतर आल्योष्का व्होल्कोव्हनं आधी ठरल्याप्रमाणे लेनिन, स्टालीन, व्होराशिला व गॉर्की यांचे मोठे फोटो भिंतीवर लावले होते. शेल्यापुतीन व होस्का यांनी निरनिराळ्या घोषणा व शुभेच्छा मधूनमधून चिकटवल्या होत्या. तसंच आश्चर्याची गोष्ट म्हणजे 'कुरकुर नाही' ही घोषणाही मधूनच लटकत होती.

कुर्याझकर केस कापलेले, स्वच्छ आंघोळ करून नवीन कपडे घालून अगदी कमालीचे बावरलेले असे गॉर्काईट्सच्या बरोबर बसलेले दिसत होते. ते अगदी मुकाट्याने आपआपल्या जागेवर हाताच्या घड्या घालून बसले होते व भाकरीचे टेबलावरचे ढिग पाहून बावरून गेले होते.

काही मुली एप्रन वगैरे लावून तसेच झेल्वी, शेल्यापुतीन व बेलुखीन पांढरे स्वच्छ कोट घालून इकडून तिकडे आवाज न करता मधूनच आपसात कुजबुजत फिरत होते. सुऱ्या, काटे, चमचे व्यवस्थित लावण्याचं त्यांचं काम चालू होतं. कुर्याझकर एखाद्या सॅनिटोरीयममधल्या पेशंटप्रमाणे नाखुषीनेच बसलेले दिसत होते. बेलुखीन त्यांना खरोखरच एखाद्या पेशंटप्रमाणे हळुवारपणे हाताळत होता.

मी माझ्यासाठी त्या तैलचित्रांच्या बाजूला बसण्यासाठी जागा पंतली होती. तिथून मला लांबवर, बाद झालेल्या मोनास्ट्रीच्या मोकळ्या पडलेल्या जागेत एका-एकी चमत्कार घेऊन ओयासीस तयार व्हावं असं दिसत होतं. कमालीची शांतता खोलीत पसरलेली दिसत होती. ती शांतता, उजळलेले गाल, लकाकणारे डोळे, भीडस्त सौंदर्य, चांगल्याची कल्पना व नवीन आयुष्याचं गूढ त्यामधून उमटत होत्या.

आमचे बिगुल व ढोलकी वाजविणारे आवाज न करता व शक्यतो कुणाच्या दृष्टीस न पडता आतमध्ये येऊन ओळीनं भिंतीच्या बाजूला उभे राहिले. आता मात्र सर्वांचं लक्ष त्यांच्याकडे गेलं. जेवणावरचं लक्ष उडून सारं लक्ष त्यांच्यावर

केंद्रित झालं. तारानेटस् येऊन दरवाजात उभा राहिला व सर्वांना उद्देशून म्हणाला.

'सर्वजण उभे रहा व बावट्याला अभिवादन करा.'

मूळचे गॉर्काईट्स नेहमीच्या सवयीप्रमाणे उभे राहिले. कुर्याझकरांना एकदम आश्चर्य वाटलं. त्यांना बिचाऱ्यांना उभे रहाण्यासाठी टेबलावर हात टेकावे लागले. आमचा ऑर्केस्ट्रा सुरु झाला व पुन्हा एकदा त्यांना आश्चर्याचा धक्का बसला.

तारानेट्सने आमचा बावटा आणला. तो त्यानं वेस्टनावरुन काढला व धरला. हा बावटा तैलचित्राच्या खाली उभा करण्यास आला.

'खाली बसा' इशारा देण्यात आला.

मी कॉलनिस्टांच्यासाठी एक छोटंसं भाषण केलं. त्या भाषणामध्ये मी शिस्त किंवा काम या गोष्टींचा उल्लेख कटाक्षाने टाळला. तसंच त्यांच्याकडून काय अपेक्षा आहेत किंवा त्यांच्या मनात काय शंका आहेत याबद्दल काहीही संशय व्यक्त केला नाही. त्यांच्या नव्या आयुष्याबद्दल त्यांचं अभिनंदन केलं. व हे त्यांचं नवं आयुष्य खऱ्या माणुसकीचं आयुष्य जाईल अशी आशा व्यक्त केली.

'आपण यापुढे उत्तम रितीनं, आनंदानं सुज्ञ आयुष्य जगणार आहोत. आपण माणसं आहोत व आपल्या खांद्यावर डोकं आहे आणि त्याचाच आपल्याला उपयोग करायचा आहे. यामध्ये आपल्याला कोण अडवणार आहे ? आपलं काम व नवीन शिक्षण याच्याआड जे येतील ते शिल्लक रहाणार नाहीत. अशा तऱ्हेचे लोक आपल्यामध्ये नाहीत. आजूबाजूला जरा पहा. कशा तऱ्हेचे लोक आपल्या बाजूला आहेत बरं ? आपल्यामध्ये एक अतिशय उत्तम कारागीर, गनिमी पद्धतीने लढणारा असा कॉम्रेड खालाबुडा आहे. त्यांनी तुम्हाला गाडी ढकलायला मदत केली. तसंच सामान उतरवायला व तबेले साफ करायलाही मदत केली. चांगल्या लोकांची जर आपण जर यादी करायला बसला तर ती संपणारच नाही. आपले लोक, आपले पुढारी व आपले बोल्शेविक हे आपल्याबद्दल सतत विचार करत असतात व आपल्याला मदत करायला त्यांची इच्छा आहे. मी तुम्हाला दोन पत्रे वाचून दाखवणार आहे. त्यावरून तुम्ही एकटेच नाही याची तुम्हाला कल्पना येईल. तुमची काळजी घेतली जाते व तुमच्यावर प्रेम केलं जातं हेही तुम्हाला कळेल. हे पहा मॅक्झिम गॉर्कीचं पत्र. हे पत्र त्यांनी खार्कोव्हच्या कार्यकारी समितीच्या मुख्याला लिहिलेलं पत्र आहे.

'गॉर्की कॉलनीला तुम्ही मदत करता व लक्ष ठेवता याबद्दल मी तुमचा अत्यंत आभारी आहे.'

'मला ही कॉलनी, त्यातील मुलामुलींनी व डायरेक्टरनी पाठविलेल्या पत्रामुळे माहिती आहे. परंतु या कॉलनीवर लक्ष द्यायला पाहिजे व त्याला सर्व प्रकारे मदत केली पाहिजे अशी मी इच्छा करतो.'

'सध्या आपल्याकडे गुन्हेगारीचं प्रमाण बेवारशी मुलांच्यात वाढत आहे व हा रोग चांगल्या मुलांच्यात पसरायला वेळ लागणार नाही. आपण अशी आशा

करू या की अशा तऱ्हेच्या कॉलनींना तुम्ही मदत करता त्यामुळे समाजातल्या अपप्रवृत्तींना आळा बसेल व या वाईटातून नवीन चांगलं उदयाला येईल.'

'कॉम्रेड, या कामात तुम्हाला यश येवो व हे काम करण्यासाठी तुम्हाला आरोग्य व उत्साह वाढो अशी मी आशा करतो. तुमचा मॅक्झिम गॉर्की.'

खार्कोव्ह कार्यकारी समितीच्या अध्यक्षांचं गॉर्कीच्या पत्राला उत्तर.

'प्रिय कॉम्रेड्स,

खार्कोव्ह जिल्हा कार्यकारी समितीचं मंडळ आपलं नाव असलेल्या या कॉलनीकडे लक्ष वेधलं याबद्दल अत्यंत आभारी आहे. अनाथ व उन्मार्गी मुलांच्या समस्या सोडविण्याकडे आमचं लक्ष आम्ही केंद्रीत केलं आहे. त्यांना शिक्षण, घर व आईवडिलांचं प्रेम मिळावं यासाठी जास्तीत जास्त काळजी घेण्याची तजवीज करत आहोत.

'हे काम अतिशय अवघड आहे व ते उत्तम तऱ्हेने पूर्ण व्हायला काही काळ जावा जावा लागेल. परंतु ते आम्ही हाती घेतले आहे. आमच्या कार्यकारी मंडळाची खात्री आहे की या नव्या परिस्थितीत कॉलनीचं काम उत्तम तऱ्हेने चालेल व नजिकच्या भविष्यकाळात आमच्या सर्वांच्या सहकार्यानं आपलं नाव धारण करणारी ही कॉलनी फार मोठं यश संपादन करील अशी आम्हाला खात्री वाटते.'

'आपल्या हातून जास्तीत जास्त साहित्यनिर्मिती व्हावी यासाठी आम्ही आपल्याला दीर्घ आयुष्य व उत्तम आरोग्य चिंतितो.'

ही पत्रे वाचत असताना मी मधूनमधून मुलांच्याकडे हळूच नजर फिरवत होतो. ते सारेजण अगदी शांत चित्तानं ऐकत होते. त्यांच्या मनात कुठल्याही तऱ्हेनं किंतु नसावा असं त्यांच्या आनंदी नजरेत दिसून येत होतं. त्याच वेळी या नव्या जगाचं गूढ व वाव या गोष्टी पकडण्याची त्यांची कुवत नव्हती. बरेच जण आपल्या जागी अर्धवट उभे राहून किंवा हातावर ओळंबून लांब माना करून माझ्या दिशेनं पहात होते. आमचे राबफॅकचे विद्यार्थी भिंतीला टेकून उभे होते व मजेनं हसत होते. मुली त्यांच्याकडे डोळे वटारून बघत होत्या व आमची छोटी मंडळी त्यांच्याकडे कौतुकाने बघत होते. माझ्या उजव्या हाताच्या टेबलाबर कोरोट्कोव्ह कपाळाला आठ्या घालून विचारात गर्क झालेला दिसत होता. खोव्हराक दोन्ही गाल हातामध्ये पकडून खिडकीच्या बाहेर बघत बसला होता.

माझं वाचन संपल्याबरोबर अनेक ठिकाणांहून बोलण्याचे आवाज उमटले पण काराबानोव्हने हात वर करून सगळ्यांना थांबवलं.

'आता काय करायचं माहित आहे? काय बोलायचं माहीत आहे का? आपण आता काय करावं...आपण बोलायचं नाही, तर आपण गाऊ या. चला, सुरुवात करा. व्यवस्थितपणे सुरुवात करा. कशाला? आंतरराष्ट्रीय म्हणायला.'

मुलांना आनंद झाला. पुष्कळसे कुर्याझकर गोंधळून गप्प बसले. मला वाटतं त्यांना आंतरराष्ट्रीयाचे शब्द माहीत नसावेत.

लापोट एका बाकावर चढला.

'चला ग मुलींनो, म्हणायला सुरुवात करा.' त्यानं आपला हात हलवला व आम्ही म्हणायला सुरुवात केली.

आंतरराष्ट्रीय गीताची प्रत्येक ओळ आमच्या आयुष्यातल्या घडामोडींशी इतकी निगडीत झाली होती की त्यामुळे कदाचित आम्ही ते अतिशय आनंदाने व हसतहसत म्हटलं. मुलं लापोटच्या हावभावाकडे बघून त्याचं अनुकरण करायचा प्रयत्न करत होती. लापोट प्रत्येक शब्दन शब्द आपल्या हावभावाने प्रतिबिंबित करत होता. शेवटी आम्ही ...

'आंतरराष्ट्रीय जगातल्या सर्व मानवजातीला एकत्र आणो.'

लापोटनं बिगुल वाजवणारे व आमचे ऑर्केस्ट्रावाले यांना आपल्या हाव-भावांनी बरोबर सूर काढायला दाखवलं.

आमचं गाणं संपलं. माटवई, बेलुखिन यांनी स्वयंपाकघराच्या खिडकीकडे पांढऱ्या हातरुमालांचा इशारा केला व ओरडले,

'अरे, कोंबडी, खीर, व्होडका व खाण्याच्या उत्तमोत्तम वस्तू व आई-स्क्रीमच्या बशा प्रत्येकासाठी घेऊन या.'

मुलं मोठ्यानं हसली. माटवई आणि बेलुखिनकडे ती उत्सुकतेने बघत होती. त्या दोघांनी पण हसून प्रतिसाद दिला. माटवाईनं जरा नरम आवाजात म्हटलं,

'मित्रहो, त्यांनी व्होडका व इतर चमचमीत पदार्थ आणलेले दिसत नाहीत. पण एवढं खात्रीनं सांगतो की प्रत्येकाला बशीभर आईस्क्रीम नक्कीच मिळणार आहे. आता तुम्ही तुमची खीर खायला सुरुवात करा.'

सर्व मुलं आनंदानं एकमेकांकडे बघत होती. त्यांच्याकडे बघता बघता अचानक माझं लक्ष झुरिन्स्काया उभी होती तिच्याकडे गेलं. ती दारामध्ये उभी होती व तिच्या पाठीमागे हसऱ्या चेहऱ्यानं युरियेव्ह उभा होता. मी त्या दोघांच्या जवळ गेलो.

मी झुरिन्स्कायाशी हस्तांदोलन केलं, पण तिचं सारं लक्ष स्वच्छ डोकी केलेल्या, पांढरे स्वच्छ कपडे घातलेल्या व हसऱ्या चेहऱ्याच्या मुलांच्या ओळीकडे होतं.

'अ‍ॅन्टन, हे मी काय बघते आहे?' तिचे ओठ थरथरले, 'ही सगळी तुमचीच मुलं काय? मग ती पूर्वीची कुठे गेली? हे काय चाललंय ते सांगा पाहू मला.'

'काय चाललंय? देवाला माहितो काय चाललंय ते? याला म्हणतात धर्मांतर, रुपांतर वगैरे वगैरे... पण ही सर्व मुले माझीच आहेत एवढे लक्षात ठेवा.'

☐

१०

# स्वर्गाच्या पायथ्याशी

मे व जून हे दोन महिने कुर्याझमध्ये जीवापाड काम करण्यात गेले. त्या कामाबद्दल आता मोठ्या उत्साहानं बोलावं अशी माझी इच्छा नाही.

कामाकडे जर थंडपणानं पाहिलं तर बरंचसं काम हे कठीण, नावडतं, निरस, खूप धीर धरायला लावणारं, त्रास आणि कटकट अंगावर काढायला लावणारं असं असतं हे आपल्याला मान्य करावं लागेल. बरंचसं काम केलं जातं, कारण माणूस त्रास व दुःख सहन करायला शिकला आहे म्हणूनच होऊ शकते.

माणसं अनादी कालापासून कामाचा त्रास व त्यापासून होणारा शारीरिक कंटाळा याच्याशी जमवून घ्यायला शिकली आहेत. या जमवून घेण्यासाठी जी कारणं पुढे केली जातात ती आपल्या मनाला फारशी पटण्यासारखी नाहीत. मनुष्य-स्वभावाचा कमकुवतपणा लक्षात घेऊन सुद्धा आम्ही पुष्कळदा व्यक्तिशः फायदा व स्वतःचं समाधान या हेतुकडे दुर्लक्ष करून त्याच्या बदल्यात सामुदायिक फायद्याला जास्त उत्तेजन देण्यासाठी दीर्घ प्रयत्न करत होतो. या संबंधात खूपच समस्या निर्माण झाल्या आणि कुर्याझमध्ये कुठल्याही तऱ्हेची बाहेरची मदत न घेता आम्हाला त्या सोडवाव्या लागल्या.

कधीकाळी शिक्षणतज्ञ या सर्व समस्यांचा विचार करतील, तसंच माणसाच्या धडपडीच्या तंत्राचं विश्लेषण, इच्छा, गर्व, लाज, संकेत, अनुकरण, भीती, स्पर्धा, गुंतवणूक इत्यादीचं प्रमाण, सर्वांची खरी जाणीव, विश्वास व कारणे यांची सांगड

घालतील. खरी जाणीव व कणखरपणा यातील तफावत ही फार मोठी आहे हा सिद्धांत आहे. माझा अनुभवही तीच गोष्ट पक्की करतो. तसंच साधी तत्वे ही दोन्ही जोडण्यासाठी जरूरीची आहेत.

गॉर्काईट्स कुर्याझला पोचल्याच्या दिवशी जाणीव असण्याची समस्या उत्तम तऱ्हेनं सोडवली गेली. एकाच दिवसात कुर्याझमधील मुलांची, या नवीन आलेल्या तुकड्यांनी आपल्याला नवं आयुष्य आणलं आहे, याबद्दल खात्री झाली. ही अनुभवी मुलं आपल्याला मदत करणार आहेत व यांच्या सहाय्यानं आपण पुढे जाणार आहोत व प्रगती करून घेणार आहोत, यामध्ये काही विशिष्ट फायदा आहे, ही बाब महत्वाची नव्हती तर—सामूहिक सूचना—डोळे, कान, आवाज, हास्य यातून मिळणारी सामूहिक सूचना होती, मोजदाद नव्हती. आणि या सर्वाचा परिणाम म्हणूनच कुर्याझची मुलं गॉर्गी सामुदायिकात मिसळून जायला तयार झाली. कारण एक तर ते सामुदायिक होतं व यापूर्वी न अनुभवलेल्या आयुष्याची गोडी चाखण्यासाठी ती मिसळून जाण्यास तयार झाली.

आतापर्यंत मी फक्त त्यांच्यात जाणीव उत्पन्न करू शकलो होतो व ती तशी फारच कमी होती. दुसऱ्याच दिवशी ही कमतरता सर्व तऱ्हेनं माझ्यासमोर उभी राहिली. आदल्या दिवशी संध्याकाळी सर्व समिश्र तुकड्यांना निरनिराळी कामं जाहीरनाम्याप्रमाणे वाटून दिली होती. प्रत्येक तुकडीत शिक्षक व गॉर्काईट्स नेमलेले होते. कुर्याझकरांचा उत्साह सकाळी अगदी उत्तम तऱ्हेनं दिसला आणि जेवणाचे वेळी लक्षात आलं की त्यांनी काम अतिशय वाईट तऱ्हेनं केलं आहे. जेवणानंतर कित्येक जण काम करायला गेलेच नाहीत तर कुठं कुठं लपून बसले. काही जण नेहमीच्या सवयीप्रमाणे रायझोव्ह स्टेशनकडे निघून गेले.

मी स्वतः काही संमिश्र तुकड्यांची पहाणी केली. पण प्रत्येक ठिकाणी तेच निराशाजनक चित्र दिसलं. प्रत्येक तुकडीत जास्त संख्या कुर्याझकरांची व थोडी संख्या गॉर्काईट्सची होती. कुर्याझकरांच्या अशा या कामाचा जुन्या मुलांवर परिणाम झाला तर काय करायचं ? खुद्द जुन्या गॉर्काईट्समध्येसुद्धा काही नवीन भरती कुर्याझला येण्यापूर्वी झालेली होती. तसंच आमची जुनी मुलंसुद्धा कुर्याझकरांच्या या वागण्याला बळी पडली तर काय करायचं. सारंच काम करणारा संच बिघडून जायचा.

एवढ्या चांगल्या सामुदायिकात बाहेरून शिस्तीचा बडगा लावणं हे काही उपयोगी व प्रभावी ठरलं नसतं. तिथं बरेच नियम मोडणारे गुन्हेगार होते आणि त्यांना शिक्षा करणं म्हणजे एकतर ते कठीण होतं व निरुपयोगी ठरलं असतं. त्याला वेळही बराच लागला असता. एखाद्यालाच योग्य शिक्षा देऊन सामुदायिकातून काढायचं असलं तरी सर्व लोकांची त्याला संमती घ्यावी लागते. शरीराने ताकदवान असलेल्यांच्यात बाहेरच्या उपायांचा उपयोग होत नाही.

एखाद्या कमी अनुभवी माणसानं खालील गोष्टी मनाशी ठरवून स्वतःचं समाधान करून घेतलं असतं. या मुलांना अजून कामाची शिस्त लागली नाही. त्यांना अजून कामाची कल्पना आली नाही. त्यांना काम करायची सवय नाही. त्यांना आपल्या सोबत्यांबरोबर भराभर काम करणं जमत नाही. सामुदायिकपणे काम करणं हे मानाचं समजलं जातं याची त्यांना अजून जाणीव नसावी. हे सारं एका दिवसात येणार आहे का ? त्याला थोडा वेळ हा लागणारच. दुर्दैवानं मी असलं खोटं समाधान मानून घेणाऱ्यांपैकी नव्हतो. मला कडक कायद्याची चांगली जाणीव होती. शिक्षणतंत्रात चमत्कारावर अवलंबून रहाणं, किंवा अनुमान काढणं अथवा मागे पाय घेणं केव्हाही समर्थनीय नाही.

मे महिन्यात कुर्याझमध्ये पूर्वीसारखीच परिस्थिती होती. त्यामुळे एकंदर कामावर दोघांच्या मिळून चाललेल्या सावकाश, संथ कामाचा आमच्या नेहमीच्या पद्धतीवर परिणाम होऊ लागला. आमच्या मूळच्या गॉर्कीइट्सच्या नेहमीच्या उत्साही धडाडीच्या कामात खंड पडला नाही तरी त्यावर बराच परिणाम झाला.

शिक्षणशास्त्राच्या सिद्धांतात शैली व सुधारणा या दोन्ही गोष्टी दुर्लक्षिल्या जातात. परंतु सामुदायिक शिक्षणात या दोन्ही गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत. शैली ही अत्यंत नाजूक व नाश पावणारी बाब असते. शैलीची उत्तम काळजी घ्यावी लागते व सतत लक्ष पुरवावं लागतं. एखाद्या फुलाच्या ताटव्याची जशी काळजी घेऊ तशीच याची काळजी करावी लागते. शैली अशी कधी ताबडतोब बांधता येत नाही. शैली म्हणजे आपल्या रूढींचं एकत्रीकरण; म्हणजेच जुन्या पिढीच्या जाणीवांना मान देऊन तसेच कल्पना व सवयी यांची व आपल्या या मोठ्या सामुदायिकाच्या अधिकाराची जाणीव ठेवणे. पुष्कळशा मुलांच्या संस्थांचं अपयश हे, त्या कुठल्याही तऱ्हेची शैली किंवा सवयी किंवा रूढी या तयार करत नाहीत आणि जिथं हा प्रयत्न केला गेला त्या ठिकाणी सतत बदली होणारे शाळा तपासनीस पद्धतशीरपणं ते मोडून काढत. समाजशिक्षण संस्थेत शिक्षण घेणारी मुलं यांना कुठल्याही युगाच्या किंवा वर्षाच्या रूढी नव्हत्या ही एक समाधानाची गोष्ट होती.

कुर्याझकरांच्या जाणीवा मी समजू शकलो व त्यांच्या जास्तीत जास्त जवळ जाण्याचा प्रयत्न करून त्यांच्या मनामध्ये विश्वास निर्माण केला ही सत्य गोष्ट होती. खरंखुरं यशस्वी होण्यासाठी शिक्षणशास्त्राच्या तंत्रावर प्रभुत्व असलं पाहिजे. १९२० साली या तंत्रामध्ये मी अनभिज्ञ होतो तितकाच आजही या क्षेत्रात एकाकी आहे. माझा एकाकीपणा हा विशिष्ट प्रकारचा आहे. आज मला पाठिंबा देणारे शिक्षक वर्गात व मुलांच्या सामुदायिकात अनेकजण आहेत. ही सगळी मंडळी हाताशी असल्यामुळे मी कुठलंही गुंतागुंतीचं काम पार पाडू शकतो. तरीही हे सर्व अजून खालच्या पातळीवरच आहे.

वरच्या भागात व त्याच्या लगोलग खाली असणारं क्षेत्र, शिक्षणशास्त्रात स्वर्गाच्या पातळीवरचे कुठलंही शिक्षणशास्त्रातलं तंत्र हे थोतांड समजावं.

त्या उंचीवर बालक हे एक हवेच्या कणानं भरलेला प्राणी आहे, त्याला काय नाव द्यावं हे अजूनही कोणाला समजलेलं नाही. याच समजुतीवर जुन्या मताच्या धर्मप्रचारकांनी आपल्या कौशल्याचा वापर केला. ही वस्तू स्वतःची वाढ एकटं सोडल्यास करून घेऊ शकते अशी समजूत होती. अनेक पुस्तकं या विषयावर लिहिली गेली आहेत. या सर्वांचं सार म्हणजे रूसोनं केलेले लेखन; बाकीच्यांनी त्याचाच पुनरुच्चार केला आहे...

'बालपणाची गांभीर्यानं दखल घेतली गेली पाहिजे ...'

'निसर्गाशी खेळ करण्याचा प्रयत्न करू नका.'

वर निर्देशिल्याप्रमाणे निसर्गाचा योग्य मान व दखल जर घेतली गेली, तर साम्यवादी व्यक्तिमत्वात त्या व्यक्तीचं रूपांतर होईल. हे वरील निवेदनाचं एक प्रमुख तत्व आहे. वस्तुतः नैसर्गिक परिस्थितीमध्ये जे काय उगवतं–निसर्गाच्या आड आलो नाही तर–ते फक्त रानटी गवत उगवतं. अर्थात याचा कुणालाही त्रास होत नाही. जशा अमूर्त कल्पना व तत्व हीच ग्रीक लोकांना आवडत होती.

मी ज्या वेळी ही रानटी वनस्पती व आपल्या साम्यवादी व्यक्तिमत्वाचा आदर्श यातील फरक दाखविण्याचा प्रयत्न केला, त्यावेळी मला लुडबुड्या म्हणण्यात आलं व माझा स्वतःचा खरा स्वभाव दिसून आला. त्यावेळी काही जणांनी म्हटलं,

'माकारेन्को, हा त्याच्या कामामध्ये वाकबगार असला तरी त्याला सैद्धांतिक म्हणता येणार नाही.'

शिस्त हाही चर्चेचा विषय झाला. एखाद्या सिद्धांताच्या पायावर कुठलीही समस्या सोडविताना लेनिनच्या लिखाणात दोन शब्दांचा वापर केला जात असे : 'जाणीवपूर्वक शिस्त', ज्याला सर्वसाधारण ज्ञान आहे त्या व्यक्तीला वरील शब्दांचा अर्थ, साधा, स्पष्ट, प्रत्यक्ष संपूर्ण कल्पना देणारा, जरूरी, उपयोगी, आवश्यक चारित्र्य, वर्गसंदर्भ व दिलेल्या शिस्तीचं माप संपूर्णपणे विषद केल पाहिजे. परंतु शिक्षणशास्त्राच्या सिद्धांताप्रमाणे या शब्दांचा अर्थ निराळ्या तऱ्हेनं लावला जातो. त्यांच्याप्रमाणे शिस्त ही सामुदायिक अनुभवातून वाढू नये, किंवा सामुदायिकातील मित्रत्वाच्या दबावाचाही परिणाम असू नये, परंतु तो खऱ्या जाणीवेतून किंवा बुद्धीला पटून किंवा आपल्या अंतःकरणातील कल्पनातून निर्माण झाला पाहिजे. हा सिद्धांत मांडणारे याच्याही पुढे जाऊन असं ठरवतात की शिस्तीची जाणीव ही मोठ्यांच्या दबावामुळे येत असेल तर ते योग्य नाही. त्याला ते शिस्तीची जाणीव म्हणत नाहीत, तर ती निव्वळ कवाईत असं म्हणतात. आत्म्यावर ती एकंदर जबरदस्ती आहे. खरं तर शिस्तीची जाणीव असण्यापेक्षा स्वयंशिस्त असणं जास्त जरुरीचं आहे. अशा तऱ्हेनं मुलांसाठी म्हणून कुठच्याही

संघटनेची जरुरी नाही. ती धोकादायक आहे, निरुपयोगी आहे. त्यासाठी स्वयंसिद्ध असणं जरुरीचं आहे.

मी परत माझ्या साध्या निवासस्थानी बसून विचार करू लागलो. आपल्या सर्वांना चांगलंच माहिती आहे की आपल्याला कशा तऱ्हेचा माणूस घडवायचा आहे. कोणतंही शिक्षण घेतलेल्या प्रत्येक वर्गजागृत कामगाराला ही गोष्ट चांगली माहीत आहे. प्रत्येक वर्गसभासदालाही ही गोष्ट चांगली माहितीची आहे. म्हणून काय करायला पाहिजे ही समस्या नसून कसं केलं पाहिजे ही खरी समस्या आहे, आणि हे शिक्षणशास्त्राचं तंत्र आहे.

कुठचंही तंत्र हे अनुभवातून तयार झालं पाहिजे. कुठच्याही धातूचं काम कशा तऱ्हेनं झालं पाहिजे हे मनुष्यानं त्यावर काम केल्यानंतरच ते इतिहासात नमूद झालं. तेव्हा कुठलाही तांत्रिक अनुभव हा नवीन शोध, सुधारणा, निवड यांनीच शक्य होतो.

आमच्या शिक्षणशास्त्राचा व्यवसाय हा तंत्राच्या तर्कशास्त्रावर आधारलेला नसून नैतिक बदलावर आधारलेला होता. विशेषतः वर्गातल्या शिक्षणापेक्षा ही गोष्ट एकंदर शिक्षणाच्या परिसरात लक्षात येते.

म्हणून आम्ही सर्व प्रकारच्या व्यवसायांच्या शाखांमध्ये कमी पडतो. तांत्रिक पद्धती, कामाचा आराखडा, बांधणी, मार्गदर्शन व उपकरणं यांचा उपयोग, प्रत ठरविणे, मर्यादा, सहनशक्ती, बाद करणं इत्यादी...

मी जेव्हा नम्रपणानं या गोष्टी विद्वानांपुढे मांडायचा प्रयत्न करतो त्यावेळी ते माझ्यावर हल्ला करतात : 'ही यांत्रिक पद्धती झाली.' पण मी जसजसा या बाबतीत जास्त विचार करतो तसतसा मला शिक्षणपद्धती व सर्वसाधारण व्यवसायपद्धती याच्यात साधर्म्य आहे असं वाटतं. अशा तऱ्हेचं साधर्म्य काढण्यात यांत्रिकीकरण आहे असं मला वाटत नाही. अजूनही मनुष्याचं व्यक्तिमत्व हे अनेक तऱ्हेनं बनलेलं आहे यावर माझा दृढ विश्वास आहे. उदा. संपत्ती, सौंदर्य. परंतु मला असं वाटतं की मुख्यत्वेकरून आपण ठराविक प्रमाण ठेवूनच त्याकडे पाहिलं पाहिजे. जबाबदारीची आत्यंतिक जाणीव, शास्त्र. एखाद्या म्हातारीच्या भाकडकथा इथं चालणार नाहीत. शैक्षणिक व व्यावसायिक पद्धत यातलं साधर्म्य हे मनुष्याच्या व्यक्तिमत्वाची कल्पना कमी करणारं आहे असं मला वाटत नाही याउलट त्याबद्दल जास्त आदर वाटतो. एखाद्या उत्तम, उपयुक्त यंत्राची कदर करणं अयोग्य आहे असं मला वाटत नाही.

अशा तऱ्हेनं एक गोष्ट मला स्पष्ट झाली की मनुष्याच्या व्यक्तिमत्वाचे व वर्तणुकीचे अनेक पैलू एकाच साच्यातून तयार करून त्याचे नुसते शिक्के मारणेर व अशा तऱ्हेचे शिक्के अतिशय उत्तम वर्णनाचे, आस्था व अचूकपणा यांची अपेक्षा, असणारे असावेत. त्या ठिकाणी व्यक्तिशः लक्ष असणारा, एखादा उत्तम शिक्षक–

ज्याचे हात कुशल आहेत व दृष्टी तीक्ष्ण आहे, आणि दुसरे ज्यांना खास जमवून घेणं जरूरीचं आहे–त्याच्या बदल्यात ते अत्यंत कुशल व अलौकिक बुद्धिमत्तेची अपेक्षा करतात. म्हणून शिक्षण देणाऱ्याला एक खास शास्त्राची तपशीलवार माहिती असणं जरूर आहे. निरनिराळ्या पदार्थांच्या एकमेकांना होणाऱ्या अडथळ्यांचा उच्च तांत्रिक संस्थांतून अभ्यास केला जातो. उलट शिक्षणसंस्थातून मात्र व्यक्तीचा एकमेकांना होणाऱ्या शैक्षणिक बाबतीतल्या अडथळ्यांचा अभ्यास केला जात नाही. अशा तऱ्हेचा अडथळा असतो हे काही गुपित नाही. अरेरे ! आपल्याकडे शैक्षणिक बिगुलाला ऑर्गनची जोड का दिली जात नाही?

'नव्वद टक्के तुमचा माल हा फुकट जातो ! तुम्ही साम्यवादी व्यक्ती तयार करत नाही तर दारूडे, आळशी, निरुपयोगी, कामचुकार व स्वार्थीजन तयार करता. तेव्हा तुम्ही याची भरपाई तुमच्या पगारातून करून द्या.'

'आपल्याकडे कच्च्या मालाचं शास्त्र का नाही? हाताशी असलेल्या सामानातून आपण काड्याची पेटी किंवा विमान का करू शकत नाही हे कुणाला माहीत आहे का ?'

कुठल्याही कामाचा तपशील आपल्याला उच्च पातळीवरून दिसणार नाही. त्या पातळीवरून दुसरं काहीही न दिसता फक्त लांबवर पसरलेला बालकांचा अमूत मेळावा दिसेल व खुद्द त्या कचेरीमध्ये कुठल्यातरी नाजूक वस्तूपासून बनवलेला अमूर्त नमुना जो छापील मसुदा व कल्पनाविलास यापासून बनवलेला असेल. अशा तऱ्हेचे उच्चभ्रू जेव्हा माझ्याकडे कॉलनीमध्ये आले तेव्हा त्यांचे डोळे उघडले नाहीत. त्या मुलांचं जिवंत सामुदायिक पाहून त्यात त्यांना काहीच नाविन्य वाटलं नाही. त्यांना तांत्रिक ज्ञानाची ओळख करून देण्याची जरूरी भासली नाही. मी ज्यावेळी त्यांना कॉलनीत घेऊन फिरतो त्यावेळी माझे, त्यांचे सैद्धांतिक मतभेद झाले व काही तांत्रिक तपशील देणं मला शक्य झालं नाही.

चौथ्या तुकडीच्या डॉरमिटरीची जमीन आज पुसली गेली नव्हती, कारण त्यांची बादली म्हणे नाहीशी झाली होती. मला बादलीची किंमत, तिचे नाहीसे होण्याचं तंत्र या दोन्ही गोष्टी महत्वाच्या वाटत होत्या. बादल्या प्रत्येक तुकडीच्या दुय्यम कमांडरच्या जबाबदारीवर दिलेल्या होत्या व ती पाळीपाळीने स्वच्छ करण्याचं काम करुन घेत असे. परंतु या सामानाची जबाबदारी ही वैयक्तिक जबाबदारी अशा तऱ्हेची क्षुल्लक गोष्ट–स्वच्छतेची तसेच बादली, कपडा सांभाळायची जबाबदारी या माझ्या दृष्टीने तांत्रिक महत्वाच्या होत्या.

ही क्षुल्लक गोष्ट म्हणजे एखाद्या जुन्या कारखान्यातल्या चरकयंत्रावर तयार करणाऱ्याचं नाव किंवा तयार झालेली तारीख नसण्यासारखंच आहे. अशा तऱ्हेचे चरक एखाद्या दुकानाच्या कोपऱ्यात गंजून पडतात. अशा तऱ्हेचे हे चरकयंत्र दुय्यम प्रकारची कामं लहान लहान वस्तू बनविण्यासाठी उपयोगात आणतात. अशा

तऱ्हेचं एखादं यंत्र कारखान्यात जेव्हा बरोबर काम करत नाही त्यावेळी कारखान्यात एक प्रकारची विचित्र उदासिनता उत्पन्न होते. कारखान्याच्या जुळणी करण्याच्या खात्यात फक्त नमुन्याच्याच वस्तू बनविल्या जातात व कारखान्यातल्या गुदामात अपूर्ण वस्तूंची गर्दी होते.

बाटलीची व जमीन पुसायच्या कपड्याची जबाबदारी म्हणजे जणू मला त्या चरकयंत्रासारखीच वाटते. ती जबाबदारी कदाचित शेवटची असेल. परंतु माणसाचे विशेष गुणधर्म, त्याला लागणाऱ्या लहानसहान गोष्टीच, त्याची जबाबदारीची जाणीव त्यांच्यात निर्माण करतात. या विशेष गुणधर्माशिवाय साम्यवादी व्यक्तिमत्व तयार होत नाही. तयार होतं तो एक अर्धवट माल.

आमची विद्वानमंडळी तंत्राला महत्व देत नाहीत. त्यांच्या सत्तेला धन्यवाद. शिक्षणशास्त्राच्या तंत्राचा विचार हा शिक्षण व्यवसायाचा प्रांत, विशेषतः आमच्या शिक्षणसंस्थातून फार पूर्वीच नाहीसा झाला आहे. शिक्षण एकंदरीनं सोविएत जगात तांत्रिक दृष्टीनं अतिशय मागासलेलं, शिक्षण म्हणजे जणू काही एखादी हस्तकला व इतर कुठल्याही हस्तकलेपेक्षा अतिशय कमी दर्जाची. सफरचंदाचा रस काढण्याचं तंत्रसुद्धा त्यापेक्षा जास्त पुढारलेलं. त्याच कारणामुळे गोगोललिखित ' इन्स्पेक्टर जनरल ' हा नाटकात ल्यूका तक्रार करतो ती आजही बरोबर वाटते.

एखाद्या विद्वान लोकांच्या खात्यात काम करण्याइतकं वाईट दुसरं काही नसेल. प्रत्येकजण लुडबूड करतो व प्रत्येकाला वाटतं की आपणच जास्त हुशार आहोत व ते दाखवायची त्याची धडपड चालू असते.

ही थट्टा नाही किंवा गमतदार अतिशयोक्ती नाही. पण हे एक सत्य आहे. कुठचीही आणि कसलीही शैक्षणिक समस्या सोडवून दाखविणारा एखादा मंदबुद्धीचा माणूस दाखवा पाहू ! त्याकाळी एखाद्याला कुठे जागा मिळाली की तो लगेच निकाल तपासायला लागे. कारण शोधायचे व धागे सोडायचे. त्याला ठिकाणावर आणायला कुठलं पुस्तक तुम्ही देणार आणि त्याला पुस्तकाची जरूरच काय ? त्याला स्वतःचं मूल असतंच की. पण इथं एक शिक्षणशास्त्राचे आचार्य आहेत. ते शैक्षणिक क्षेत्रात तरवेज आहेत. ते जीपायू किंवा एन के. व्हिडीला लिहतील :

' माझ्या मुलानं घरातून बरेच वेळा चोरी केली आहे. तो रात्री बाहेर राहतो. म्हणून मी आपल्याला कळवळून विनंती करतो ... '

एखादा प्रश्न करील की आमचे पोलीस (चेका) हे शिक्षणतंत्र जाणतात, शिक्षणतंत्रज्ञांपेक्षा जास्त चांगले शिक्षणतंत्र जाणतात.

मला या प्रश्नाचं उत्तर लगेच मिळेना. १९२६ साली तंत्राच्या दृष्टीनं पाहिलं तर गॅलिलिओ जितका आपल्या टेलिस्कोपबरोबर होता तितकाच मी जाणकार होतो. माझ्यापुढे दोनच पर्याय होते : एक, कुर्झला तरी आपत्ती आणायची किंवा वरच्या अधिकाऱ्यांना संकटात आणायचं आणि दुसरा, झालंच तर माझी तिथून, या

स्वर्गातून हकालपट्टी. परंतु मी दुसऱ्या गोष्टीची पसंती केली. सप्तरंगी सिद्धांताच्या पताका असलेला स्वर्ग माझ्या डोक्यावर तळपत होता. मी कुर्याझच्या संमिश्र तुकडीकडे गेलो व मुलांना म्हटलं :

'मुलांनो, तुमचं काम अगदी रद्दी आहे. आज मी सर्वसाधारण सभेत हे सांगणार आहे. तुमचं काम आणि तुम्ही खड्डयात जा.'

मुलं जरा रागावलीच. त्यातला एक जरा उंचेला मुलगा हातातलं फावडं माझ्याकडे दाखवत रागानं म्हणाला :

'अहो ही फावडी अगदी बोथट आहेत, पहा जरा हातात घेऊन.'

'हे साफ खोटं आहे. अगदी खोटं आहे हे. हे तुम्हाला माहीत आहे.' असं टोस्का सोलोवयेव म्हणाला.

'मग ती चांगली धारदार आहेत ?'

'तू त्या वाळूच्या ढिगावर एक तास बसून काढलास, खरं की नाही ?'

'माझं ऐका ! तुम्हाला दिलेलं काम संध्याकाळच्या जेवणाच्या वेळपर्यंत संपवलं पाहिजे. तुम्ही जर ते संपवलं नाही तर त्यानंतर ते तुम्हाला संपवावं लागेल. तुम्ही जर ते संपवलं नाही तर तुम्हाला जेवणानंतर ते करावं लागेल. मी सुद्धा तुमच्याबरोबर काम करीन.' असं मी सांगितलं.

मघाचा तो फावडी बोथट आहेत असं म्हणणारा मुलगा म्हणाला, 'नाही, आम्ही ते संपवू. एवढं काही ते जास्त काम नाही.'

यावर टोस्का हसला व म्हणाला 'लबाड आहे तो.'

अशा वेळी निराश व्हायचं कारण नाही. जेव्हा माणसं काम करताना, दमतात तेव्हा तो त्या वेळ घालविण्याला किंवा दमण्याला काहीतरी कारण शोधून काढतात. याचा अर्थ त्यांच्यात पुढाकार घ्यायची किंवा नवीन काही करायची आवड नसते व असल्या गोष्टी वरच्या विद्वानांकडून खपवून घेतल्या जातात. माझ्या तंत्राप्रमाणे फक्त कल्पकता जागी करायला हवी; दुसरं काही नको. मग काम न करण्याचं प्रात्यक्षिक बघायची मला कधीही वेळ येणार नाही. काही जण मुकाट्यानं कुठे तरी लपून बसतील. परंतु मला याची काही काळजी वाटत नाही. कारण मुलांनी अशा गोष्टींचा कसा समाचार घ्यायचा ते चांगलं ठाऊक झालंय. कामचुकार मुलगा कुठेही निसटला तरी जेवणाचे वेळी त्याला त्याच्या तुकडीतल्या मुलांबरोबरच आवडो अगर न आवडो जेवण घ्यावं लागतं. कुर्याझकर त्याला फारसं उघडं न पाडता नुसतं विचारीत,

'आम्हाला वाटलं तू पळून गेलास म्हणून.'

आमच्या गॉर्काईटस्च्या जीभा (त्यांचे हातसुद्धा) हे जास्त परिणामकारक होते. एखादा पळपुट्या जेवणाच्या टेबलावर अगदी साध्यासुध्या माणसाप्रमाणे कोणाचंही लक्ष फारसं वेधून न घेता येऊन बसला, तर प्रत्येकाला व्यवस्थित

जेवायला मिळावं हे पहाणं कमांडरचं काम असे. तो मग मोठ्याने म्हणे : कोल्का, लक्ष आहे का ? अरे तुला दिसत नाही ? क्रिवोरिचको आलाय ! त्याला ताबडतोब जागा करून दे पाहू. त्याला चांगली स्वच्छ थाळी दे. कसला चमचा देतोयस त्याला ? चांगला चमचा आण पाहू.

मग तो चमचा स्वयंपाकघराच्या खिडकीतून नाहीसा होत असे.

'हे बघ, त्याला अगदी चांगल्यापैकी खूप वाढ. अगदी उत्तमपैकी हं ! पेटका पळ पाहू. आणि स्वयंपाक्याकडून चांगल्यापैकी चमचा घेऊन ये. जा लवकर. स्टोपका त्याच्यासाठी चांगला पाव काप पाहू. चांगले बारीक तुकडे काढ रे. गावंढळ लोक असे मोठे मोठे तुकडे कापतात. पण आपल्या क्रिवोरिचकोला एकदम पातळ तुकडे आवडतात. हा पेटका आता कुठून चमचा तयार करून आणतोय ? वानका, जा पाहू, त्या पेटक्याला लवकर चमचा घेऊन यायला सांग.'

क्रिवोरिचको हा खरोखरच थाळी भरून वाढलेला सूप पुढ्यात घेऊन बसलाय. त्याचा चेहरा लाजेने लाल झालाय. शेजारच्या टेबलावर बसलेलं कोणीतरी त्याला विचारतं,

'ए तेरा नंबर, तू काय आज पाहुणा आहेस काय इथं ?'

'होय रे. खाशी स्वारी आली आहे व त्यांना जेवण घ्यायचंय. पेट्का, चमचा आणलास का ? उगाच वेळ घालवू नको रे.'

पेटका धावत पळत अतिशय महत्वाच्या कामासाठी यावा त्याप्रमाणे खोलीत प्रवेश करतो. त्यानं दोन्ही हातात चमचे धरले आहेत. जणू काही एखादी मौल्यवान वस्तू आणावी अशा थाटात. पण प्रत्यक्षात ते कॉलनीमध्येच वापरायचे साधे चमचे आहेत. ते पाहून कमांडर रागावतो.

'अरे, याला काय चमचा म्हणतात ? मी तुला काय सांगितलं होतं ? सर्वात मोठा चमचा घेऊन ये.'

पेटका आपण अगदी फार कामात आहोत असा आव आणून वेड्यासारखा इकडून तिकडे धावत असतो. खिडकीजवळ जाऊन जणूकाही आपण दारातच आलोय असं भासवतो. अशा तऱ्हेनं या नाटकात स्वयंपाकघरात काम करणारे लोकही भाग घेतात. काही प्रेक्षक श्वास रोखून बघत असतात व आपल्याला या पाहुणचाराची चव मिळाली नाही म्हणून मनातल्या मनात आभार मानतात. पेटका पुन्हा एकदा जेवण्याच्या खोलीत हातात सूपाने बरबटलेली चाळणी घेऊन येतो. याच सुमारास लापोट आपल्या तुकडीच्या टेबलावरून उठून हे नाटक चाललेल्या टेबलाजवळ येतो. तो सावकाशपणे या नाटकात भाग घेणाऱ्या सर्वांच्या चेहऱ्यावर न बोलता शांतपणे बघतो व आपली कडक नजर कमांडरच्या चेहऱ्यावर स्थिरावतो. नंतर त्याच्या त्या रागावलेल्या चेहऱ्यावरचे भावनेचे हळूहळू दयेच्या भावनेत रुपांतर होतं. दया व कळवळा यांचा भाव चेहऱ्यावर आणतो. पण

हे भाव काही लापोटचे खरे भाव नव्हेत हे सर्वांना माहीत असतं. जेवत असलेले सर्वजण श्वास रोखून आता हा पुढे काय अभिनय करणार याची वाट पहातात. लापोट क्रिवोरिचकोच्या डोक्यावर हात ठेवून व आवाजात शक्य तितका मृदूपणा आणून हळू आवाजात म्हणतो,

' तू जेव रे. घाबरू नकोस. तुम्ही सर्वजण त्याच्यावर का तुटून पडलात ? तुला अजून चमचा मिळाला नाही ? त्याला चमचा द्या रे ? हा चालेल ना ?'

परंतु तो बिचारा छोटा खाऊच शकत नाही. हुंदके देत तो आपल्या जागेवरून कसाबसा उठतो व जेवण्याची थाळी न चाखता तशीच ठेवून देतो. लापोट त्या दुःखी मुलाकडे बघतो व आपल्या चेहऱ्यावर शक्य तितके करूण भाव आणतो. डोळ्यात पाणी आणून तो त्या मुलाला विचारतो,

' अरे, हे काय, तू जेवणार नाहीस ? तुम्ही काय केलंत पहा बरं !'

लापोट आवाज न करता हसणाऱ्या इतर मुलांकडे पहातो. मग तो क्रिवोरिचकोच्या खांद्यावर हात ठेवून जेवणघराच्या बाहेर घेऊन जातो.सर्व मुलं मोठमोठ्यानं हसतात. आता दुसरं नाटक सुरू होणार असतं. त्याचं बाहेरच्या लोकांना काही सोयरसुतक नसतं. लापोट पाहुण्याला घेऊन स्वयंपाकघरात जातो व स्वयंपाक्याला 'या मुलाला पोटभर जेवण दे' असं सांगतो. कारण त्याला बाकीच्यांनी फार वाईट वागवलेलं आहे. क्रिवोरिचको हुंदके देत देत आपलं जेवण संपवतो. आता कुठे त्याला आपल्या नाकाडोळ्यांच्याकडे लक्ष द्यायला वेळ मिळतो. लापोट जुडासपणे त्याला ऐकवतो.

' हे सारेजण तुझ्यावर का रे तुटून पडले होते ? तू कामाला गेला नव्हतास वाटतं. हो ना ?

क्रिवोरिचको मानेनंच हो म्हणतो, उचकी देतो, निःश्वास सोडतो. तसं करून आपली चूक मान्य करतो.

' हे बघ, ती सगळी विचित्र पोरं आहेत. तू विचार कर. कामावर न जाण्याची ही शेवटचीच वेळ. एकदाच झालं आणि सारेजण कसे तुटून पडले. हे कोणाच्याही बाबतीत होऊ शकेल. मला आठवतं की मी जेव्हा कॉलनीत आलो तेव्हा मी सबंध आठवडाभर कामाला गेलो नव्हतो. तू फक्त दोनच दिवस बुडवलेस. मला तुझे हात दाखव पाहू. असे हात असणाऱ्यानं खूप काम केलं पाहिजे. होय नाही सांग पाहू ?'

क्रिवोरिचको पुन्हा एकदा मान हलवून संमती देतो. मग आपलं खाणं चालू करतो. लापोट स्वयंपाकघरातून परत जेवणघरात जातो व क्रिवोरिचकोची स्तुती करतो,

' मी जेव्हा तुला पाहिलं ना तेव्हा तू एक चांगला मुलगा आहेस हे मी ताबडतोब ओळखलं. '

अशा तऱ्हेचे काही प्रसंग घडल्यावर साहजिकच कामाच्या वेळी तुकडीतून पळून जाणं आपोआप बंद होत असे व काही दिवसांनी ही सवयच अजिबात नष्ट झाली. अर्थात खोवराकसारख्या ढोंगी मुलाला दोन दिवस काम केलं की तिसऱ्या दिवशी उष्माघाताचा त्रास व्हायचा व कण्हत कुंथत तो एखाद्या झुडुपाखाली जाऊन विश्रांती घ्यायला बसायचा. पण अशा मुलांना वठणीवर आणायला तारानेट्स फार हुशार होता. तो अँटन ब्रातचेन्कोला सांगून मोलोडेट्सला गाडीला जुंपायचा व औषधाची पेटी घेऊन तो गाडीला रेडक्रॉसची चिन्हं असलेल्या पताका लावून, कामाच्या जागी जायचा. आपल्याबरोबर तो कुझमा लेशीला घ्यायचा. कुझमा लोहाराचा भाता वगैरे घेऊन जायचा. खोवराक नुकताच कुठे झुडुपाच्या सावलीत आराम करायला लागे, तोच ही प्रथमोपचाराची फौज त्याच्यावर तुटून पडे. लेशी आपला भाता व्यवस्थित लावून पेशंटच्या समोर बसे व भराभर हवा काढायला सुरुवात करी. ते त्याला जिथे उष्माघाताचा तडाखा बसला असेल तेथे भराभर वारा घालत व त्याला हळूच गाडीत ठेवत. पण एव्हाना खोवराक पूर्णपणे ठीक होऊन जात असे व ती गाडी खडखडत रिकामी कॉलनीत परत येई. खोवराकला या औषधोपचारांना तोंड देणं कठीण जात असेच; त्याहीपेक्षा संमिश्र तुकडीत परत येणं जड जाई. कारण अजाणतेपणे इतरांकडून केल्या जाणाऱ्या चौकशीचा डोस मुकाट्यानं सहन करावा लागे : 'खोवराक आता बरं वाटतंय ? औषध लागू पडलं का ? ते तसं चांगलंच औषध आहे.' वगैरे शेरे मारले जात.

या सगळ्या पद्धती गनिमी काव्याच्या युद्धातल्याप्रमाणे असत. परंतु त्या सर्व त्याच वातावरणातून तयार झालेल्या व सामुदायिकाचं काम व्यवस्थित चालावं या उदात्त हेतूनं वापरल्या जात. वातावरण व महत्वाकांक्षा हे दोन माझ्या औद्योगिक कलाशास्त्राच्या प्रयत्नाचे मूल हेतू होते. तुकडी ही नेहमी औद्योगिक शास्त्राची मूळ बैठक. त्या उच्च पातळीवर तुकडी म्हणजे काय व तिचे स्थान काय हे समजले नाही. त्याचा अर्थ समजावून सांगण्याचा व शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनं आमच्या विद्वान मंडळींना त्याचा अर्थ व महत्व काय हे समजावून सांगण्याचा मी प्रयत्न केला. परंतु आमची भाषा निराळी होती व तो समजावून सांगणं फार कठीण होतं. माझ्यात व एका शिक्षणतज्ञात काय संभाषण झालं तेच आपल्याला सर्व सांगतो. हे गृहस्थ उत्तम कपडे करून, डोळ्याला चष्मा वगैरे लावलेले असे एकदा कॉलनी बघायला आले. जेवणघरातली टेबलं ही प्रत्येक तुकडीला त्या त्या कमांडरनं आखून दिली; ती एखाद्या शिक्षकानं का दिली नाहीत, याबद्दल त्यांना फार मोठं कुतूहल वाटलं.

'कॉम्रेड, मला अगदी खरंखुरं सांगा. तुम्ही थट्टा तर करत नाही ! तसं करू नका. एक मॉनिटर मुलगा जेवणघरातली सारी व्यवस्था राखतो व तुम्ही

नुसते बाजूला उभे राहता ? तो सारं व्यवस्थित करील अशी तुमची पक्की खात्री आहे. तो कुणावर अन्याय करणार नाही. एखादे वेळी तो चूकही करील !'

'जेवणघराची व्यवस्था नीट ठेवणं हे काही तितकंसं अवघड नाही.' असं मी त्या गृहस्थांना सांगितलं, 'शिवाय आमच्याकडे एक जुना व उत्तम नियम आहे.'

'तुमच्याकडे नियम आहे ?'

'होय नियम आहे. तो असा की कोणतंही चांगलं अगर वाईट काम, सोपं किंवा कठीण काम हे नंबराप्रमाणे प्रत्येक तुकडीनं पाळीपाळीनं करायचं.'

'तुम्ही काय म्हणालात ते मला नीटसं समजलं नाही ...'

'अहो अगदी सोपं व साधं आहे. पहिली तुकडी ही जेवणघरात चांगली जागा पकडते. एक महिन्यानंतर दुसऱ्या तुकडीला ती जागा मिळते, अशा तऱ्हेनं ते चालतं.'

'आणि वाईट काम कशाला म्हणता जरा सांगा पाहू.'

'अनेकदा तसं पाहिलं तर वाईट काम असतंच. उदा. एखादं अत्यंत जरुरीचं काम निघालं तर पहिली तुकडी ते काम करायला पुढे येईल. दुसऱ्या वेळी असंच असेल तेव्हा दुसरी तुकडी बोलावली जाईल. स्वच्छतेचं काम करायचं असेल त्यावेळी पहिल्या तुकडीला ते करावं लागेल. समजा शौचकूप साफ करायचे असतील तर पहिल्या तुकडीला ते करावे लागतील आणि अशा तऱ्हेनं दैनंदिन कामं वाटली व पार पाडली जातात.'

'आणि हा भयंकर नियम तुमच्या कल्पनेतून निघाला आहे ?'

'नाही मुळीच नाही. मुलांनीच हा नियम घालून घेतलाय. यामुळे त्यांना काम करणं जास्त सोयीस्कर पडतं. अशा तऱ्हेनं कोणीतरी कामाची वाटणी करून देणं तसं फार कठीण. कारण कोणीतरी त्यात असमाधानी रहाण्याचा धोका असतो. परंतु आता हे मुलांनीच बसविल्यामुळे न चुकता व्यवस्थित होतं. प्रत्ये-काची पाळी एक महिना असते.'

'म्हणजे तुमच्या विसाव्या तुकडीला शौचकूप साफ करायचं काम विसाव्या महिन्यात येईल खरं ना ?'

'अर्थात, त्याचप्रमाणे जेवणघरात उत्तम व पहिली जागा मिळण्याचा मानही त्यांना वीस महिन्यांनीच मिळेल.'

'हे सारं भयानकच आहे हं ! वीस महिन्याच्या काळात विसाव्या तुकडीत नवीन भरती झाली तर ? त्याला काय करणार ?'

'नाही. तुकड्यांची रचना फार क्वचितच बदलते. आमचा पक्क्या सामु-दायिकावर विश्वास आहे. एखाद्या वेळी एखादा जाईल किंवा एक दोन नवीन भरती होतील. तरीसुद्धा सबंध तुकडीची नव्यानंच रचना केलेली असली तरी फारसं बिघडत नाही. कारण प्रत्येक तुकडी ही एक सामुदायिक आहे. त्याला

त्याची रूढी, इतिहास, चांगुलपणा व कीर्ती असते. आता नुकत्याच आम्ही तुकड्यांची रचना केली आहे परंतु तरीही मूळ कल्पना तीच आहे.'

'खरं म्हणाल तर मला काही समजतच नाही ! मला यात काहीतरी गंमत असावी असं वाटतंय. याच्यात काही गांभीर्य नाही. ही तुकडी आणि त्याची कीर्ती याच्यात जर नवीन लोक आले तर त्याचा काय संदर्भ राहिला ? असं काही पृथ्वीवर शक्यच नाही.'

'हे म्हणजे एक चापायेव विभागासारखंच आहे,' असं मी उत्तर दिलं.

'पहा. तुम्ही पुन्हा तुमच्या त्या सैनिकीकरणाकडे चालला आहात. चापायेवचा याच्याशी काय संबंध आहे बरं ?'

'त्या विभागात तेच लोक नेहमी असतील असं नाही. आणि तिथे चापायेवपण नाही. नवे लोक परंतु ते चापायेवच्या तुकडीचा मान व कीर्ती कायम ठेवतात असं नाही का तुम्हाला वाटत ? चापायेवच्या कीर्तीसाठी त्यांना जाब द्यावा लागेल. पुढच्या ५ किंवा १० वर्षांत जर त्यांना काळीमा लावायचा त्यांनी प्रयत्न केला तर त्या नव्या लोकांना त्याचा जाब द्यावा लागेल.'

'या साऱ्याची तुम्हाला काय जरूरी आहे ते मला काही समजतच नाही आणि त्या प्रोफेसरला ते कधीच समजलं नाही. मी यापेक्षा काय करू शकलो असतो ?'

पहिल्या काही दिवसात बरंचसं काम कुर्याझमधल्या तुकड्यांकडून करवून घेता आलं. दोन किंवा तीन तुकड्यांच्या मागे एका शिक्षकाची नेमणूक केली होती. या शिक्षकांचं मुख्य काम म्हणजे त्या त्या तुकडीमध्ये सामुदायिकाबद्दल आदर व कॉलनीत सर्वांत उत्तम तुकडी म्हणून म्हणवून घ्यायचा मान मिळविण्यासाठी त्या मुलांना उद्युक्त करायचं. अर्थातच सामुदायिकाची आवड ही एक महान कल्पना एका दिवसात त्यांच्यात रुजणं शक्य नव्हतं. त्या मानानं ती बरीच लवकर वाढीला लागली. आम्ही जर एकेका व्यक्तीला हाताशी धरून हे शिकवायचं ठरवलं असतं, तर ते लवकर साध्य झालं नसतं.'

दुसरी अत्यंत महत्वाची पायरी म्हणजे त्यांच्यात नवीन आकांक्षा निर्माण करणं. यासाठी दोन प्रकारचे मार्ग आहेत. व दोन प्रकारचे जास्तीत जास्त प्रयत्न करायचे हे सर्वसाधारणपणे ठरलेलं असतं. एखाद्या व्यक्तीला ज्या गोष्टीमध्ये जास्त आवड असेल त्यावर भर देऊन त्या व्यक्तीच्या मनात आकांक्षा निर्माण करणं, हा एक मार्ग झाला. परंतु ही पद्धत शिक्षणशास्त्रातल्या विचारवंतांना पसंत नव्हती व त्यावर त्यांनी बंदी घातली होती. एखाद्या मुलानं केलेल्या कामासाठी त्याचा मोबदला किंवा बक्षीस म्हणून छोटीसी रक्कम त्याला द्यावी या गोष्टीला विद्वान मंडळींचा विरोध होता—पैसा हा विनाशकारी असतो अशी शिक्षणशास्त्रातल्या विचारवंतांची पक्की समजूत होती. मेफिस्टोफेलेस म्हणतो की, 'माणसं सोन्यासाठी स्वतःचा नाश करून घेतील.' हे त्यांनी कधीकाळी ऐकलं असेल.

थोडासा मेहनताना पैशाच्या रुपानं द्यावा, हा विषय त्यांच्यासमोर काढणं सुद्धा मुश्किलीचं होतं. फक्त पवित्र पाणी त्यांच्यावर टाकावं म्हणजे ठीक होईल. पण तेच नेमकं माझ्याजवळ नव्हतं.

थोडासा मेहनताना फार मोठी कामगिरी करतो. मेहनताना, नवीन माणसाला व्यक्ती व समाज या दोहोंच्या हिताची सांगड घालायला शिकवतो. तो सोविएत व्यावसायिक–आर्थिक योजना, तसंच आर्थिक योजना व आखणी या गुंतागुंतीच्या जाळ्यात अडकतो. त्याला सोविएत कारखान्याच्या आर्थिक परिस्थितीचा अभ्यास करायची संधी मिळते व सैद्धांतिकदृष्टया इतर कामगारांबरोबरचे आपण आहोत असं त्याला वाटतं. काही नाही तरी कमाई करण्याची किंमत त्याला समजते. एखादी मुलगी वसतीगृहात राहून फारसं काही न शिकता फक्त आदर्श शिकते तसंच या मुलांचं बालसुधारगृहे सोडताना होत नाही.

परंतु या बाबतीत काहीही होऊ शकले नाही. कारण मनाईहुकूम या बाबतीत फार कडक होता. फक्त दुसरा मार्गच माझ्यापुढे मोकळा होता. तो म्हणजे सामुदायिकाचं महत्त्व वाढवायचं व सामुदायिकरित्या आकांक्षा निर्माण करण्याची जोपासना करायची. ही कमी घातक पद्धती असल्यामुळे आमच्या विद्वानमंडळींनी ती मान्य केली होती. तरीही मधूनमधून संशयित कुरकुर डोकं वर काढत असे.

माणसाला जगण्यासाठी काहीतरी आकर्षण असायला पाहिजे. उद्याचा आनंद हाच माणसाला खरा उद्युक्त करतो. शिक्षणशास्त्राच्या तंत्रात हा पुढचा आनंद अतिशय महत्त्वाचा असून त्यावर भर दिला पाहिजे. प्रथम आनंद हा निर्माण केला पाहिजे व प्रत्यक्षात जीवनात आणण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. दुसरं, समाधानाच्या या साध्यासुध्या गोष्टींचं हळूहळू जास्त गुंतागुंतीच्या व सार्थ आनंद देणाऱ्या गोष्टीत रुपांतर झालं पाहिजे. आता एक गमतीदार उदाहरण घेऊ. एखादं बिस्कीट खाण्यापासून मिळणारा आनंद हा कर्तव्यतत्परतेच्या आनंदासारखाच असला पाहिजे.

शक्ती व सौंदर्य हे दोन मानवी गुण आकर्षित करणारे आढळतात. आणि हे दोन्ही गुण त्याच्या भविष्याकडे पाहण्याच्या दृष्टिकोनावर अवलंबून असतात. माणसाचे वर्तन ताबडतोब मिळणाऱ्या समाधानात–उदा. आजचं चांगलं जेवण– आनंद मानणारं असेल तर तो मनुष्य कमकुवत समाजावा किंवा समजा तो एखाद्या दूरचा, जरासा स्वार्थी उद्देश बाळगणारा असला तर त्याला निग्रही समजला पाहिजे. पण तो इतरांच्यात सौंदर्याची आस किंवा खऱ्या व्यक्तिमत्वाची किंमत निर्माण करू शकणार नाही. सामुदायिक जितकं व्यापक तितकी त्यातली व्यक्ती स्वतः त्याच्या दृष्टिकोनाशी एकरूप असेल, तर ती जास्त सुंदर व आदरणीय भासते.

माणसाला शिक्षण देणं म्हणजे उद्याच्या आनंदाकडे नेणारा दृष्टिकोन देण्यासारखं आहे. यावर एक फार मोठा ग्रंथ लिहिता येईल. त्याच्यात नवीन दृष्टिकोन

व सध्या असलेल्या दृष्टिकोनांचा उपयोग याचं संकलन करणे ज्यायोगे चांगल्या व्यक्ती निर्माण करता येतील. सुखात चांगलं जेवण, एखादा सर्कसचा खेळ पहाणं किंवा तळं साफ करणं वगैरे क्रियांनी करून करून सामुदायिकाचा दृष्टिकोन परिणामकारक करून तो हळूहळू वाढवून तो शेवटी सबंध सोविएत युनियनचाच दृष्टिकोन बनेल.

कुर्याझला आल्यानंतर पहिल्या दिवसाची कापणी हे आमच्या सामुदायिकाचं ध्येय होतं. मी एका अविस्मरणीय संध्याकाळचा येथे उल्लेख करतो. काही कारणानं ती संध्याकाळ कुर्याझकरांच्या काम करण्याच्या धडपडीला एक वेगळंच वळण देऊन गेली. अशा परिणामांची मी कधीच फारशी अपेक्षा केली नव्हती. कुठच्याही तऱ्हेनं उपयुक्ततेचा हेतू मनात न धरता जे करता येईल ते करण्याचा प्रयत्न करत होतो.

नवीन कॉलनीतल्या मुलांना गॉर्की म्हणजे कोण हे माहित नव्हतं. म्हणून आम्ही या कॉलनीत आल्यावर एक 'गॉर्की संध्याकाळ' आयोजित केली. या संध्याकाळी शक्य तितका साधा कार्यक्रम आम्ही ठेवला होता. त्याला एखाद्या संगीत किंवा साहित्यिक कार्यक्रमाचं स्वरूप द्यावं अशी माझी इच्छा नव्हती. आम्ही त्या दिवशी बाहेरून कोणालाही बोलावत नसू. थोडयाशा सुशोभित केलेल्या मंचकावर आम्ही अलेक्सी मॅक्सिमोविचचा मोठा फोटो ठेवत असू.

मुलांना गॉर्कीच्या आयुष्याबद्दल व त्याच्या साहित्याबद्दल माहिती सांगितली. हे मात्र शक्य तितकं तपशीलवार सांगितलं. काही जुनी मुलं गॉर्कीच्या 'लहानपण' या पुस्तकातून उतारे वाचून दाखवत असत.

नवी मुलं डोळे मोठे करून या गोष्टी ऐकत. अशा तऱ्हेचं आयुष्य असू शकतं याची त्यांना कल्पनाच करता येत नव्हती. ते काही प्रश्न विचारत नसत किंवा काही भावना व्यक्त करत नसत. पण एकदा लापोटनं गॉर्कीच्या पत्रांचं बंडल बाहेर काढलं.

'ही पत्रे त्यानं स्वत: लिहिली आहेत ? कॉलनीतल्या मुलांना ? दाखवा पाहू आम्हाला.'

लापोट पत्र उघडून काळजीपूर्वक मुलांच्या हातात देई. कधी कधी एखादा मुलगा लापोटचा हात धरुन जास्त बारकाईने काय आहे ते पहायचा प्रयत्न करी.

'ते पहा, ते पहा. माझ्या प्रिय मित्रांनो, हेच ते शब्द.'

अशा तऱ्हेनं सर्व पत्रं सभेमध्ये वाचली जात. त्यानंतर मी विचारी.

'कोणाला याबद्दल काही म्हणायचं आहे का ?'

त्या दिवशी एक मिनिट कोणीही प्रतिसाद दिला नाही. अचानक लाजत कोरोटकोव्ह मंचकाजवळ आला व म्हणाला.

'मला नव्या गॉर्काईट्सजवळ बोलायचे आहे...माझ्यासारख्या... पण मला चांगलं भाषण करता येत नाही. तरीपण ऐका. मित्रहो, आपण इथं रहात आहोत.

आपल्याला डोळे आहेत; पण आपल्याला काही गोष्टी दिसल्या नाहीत...आपण एखाद्या आंधळ्यासारखे होतो. खरोखरच मी म्हणतो तसंच आहे. ही लाजिरवाणी गोष्ट आहे. अनेक वर्षे वाया गेली. आणि आता आपल्याला गॉर्कीची ओळख करून देण्यात आली. मला असं वाटतं की आपण सगळे उत्साहित झालो. मी तरी उत्साहित झालो. तुम्ही झालात की नाही मला माहित नाही...'

कोरोटकोव्ह मंचकाच्या टोकावर येऊन उभा राहिला. त्याचे पाणीदार डोळे बारीक करून तो म्हणाला,

'मुलांनो आपल्याला काम केलं पाहिजे. समजलं का तुम्हाला ? '

'आम्हाला समजलं, समजलं.' अशी सर्व मुलांनी ग्वाही दिली. कोरोटकोव्ह टाळ्यांच्या गजरात खाली उतरला.

त्यांनी दुसऱ्या दिवशी स्वतःची डोकी जोरात उडवत, हलवत अतिशय प्रामाणिक व जोराचे प्रयत्न करून माणसाचा जुना वारसा-आळस-त्यावर मात केली.

त्यांना माणसाच्या व्यक्तिमत्वाचं महत्व व नव्या दृष्टिकोनाची ओळख पटली.

□

११

# पहिली सुगी

मे महिन्याच्या शेवटच्या दिवसात बऱ्याच नवीन गोष्टी घडल्या. आवारात झाडझूड होऊन ते स्वच्छ झालं. इमारतीला नवीन दारं व खिडक्या लागल्या. बाहेर जरा चांगला वास येऊ लागला व सगळीकडे नवा उत्साह दिसू लागला. आम्हाला आमच्या यशाचा समारंभ करण्याची आशा दूरवर का होईना पण दिसू लागली. मठाजवळ असलेल्या टेकडीच्या आतून व मठाच्या निरनिराळ्या खोल्यांतून राहिलीसाहिली घाण वरती नेऊन ती उन्हाळ्यातल्या तत्पर हवेत दूरवर नेऊन ती दूरवर टाकली; अगदी इतिहासजमा झाली. त्या मठाच्या जुन्या भिंती पाडून टाकण्याचं काम संमिश्र तुकडीनं पंधरा दिवसात केलं. त्यामुळे मोकळी हवा खेळू लागली. फालकन मेरी ही आमची जुनी घोडी तसंच कुर्याझमधली मरतुकडी घोडी–यांना कमांडर्स कौन्सिलनं कॉर्नफ्लावर मेक व इग्लेट अशी नावे दिली होती–यांच्या सहाय्याने विटा व माती वाहून नेण्याचं काम करण्यात आलं. चांगल्या विटा होत्या, त्याचा डुकरांसाठी घर बांधायला उपयोग करायचं ठरलं व लहान लहान तुकड्यांनी आवारात जाण्यायेण्यासाठी पाऊलवाटा तयार करायला उपयोग केला व राहिलेसाहीले खाचखळगे भरून काढण्यासाठी उपयोगात आणण्यात आलं. इतर संमिश्र तुकड्यांनी फावडी, कुदळी, हातगाड्या वगैरे घेऊन उतारावर लहान ओटे जरा रुंद व स्वच्छ केले व उतरणीवर पायऱ्या तयार केल्या. तसंच बोरोव्हायच्या हाताखाली काम करणाऱ्यांनी लाकडाच्या

उरल्यासुरल्या सामानातून ओट्यावर व कोपऱ्यांवर ठेवायला बाकं तयार केली. आता आवारात खूप मोकळेपणा व उजेड दिसू लागला. आभाळाचा जास्त भाग दिसू लागला. आजूबाजूच्या हिरव्या झुडपांमुळे, क्षितिजाच्या निळ्या रंगामुळं आमची कॉलनी जणू एखाद्या चौकटीत बसवल्याप्रमाणे दिसू लागली.

आमचं आवार व बाजूचे उतार अगदी स्वच्छ करण्यात आले. आमचा माळी अबोल होता, बरेचदा सुंदर बायकांचे नवरे असेच अबोल असतात—ह्याने आवाराच्या बाजूंना आकार दिला. मोडक्या मठाच्या निघालेल्या मोडक्या विटांचे व्यवस्थित ढीग घालून ठेवले.

आवाराच्या उत्तरेच्या बाजूला डुकरांसाठी बांधावयाचा घराचा पाया घालण्यात आला. हे डुकरांचं घर चांगलं तयार होणार असं वाटलं. आता शेरे आपलं सर्वस्व आगीत खलास झाल्यासारखा दिसत नसे. त्यालाही आता आर्किमिडीजसारखा आनंद होत होता. कारण तीस संमिश्र तुकड्या त्याच्या हाताखाली काम करत होत्या व आमच्याजवळ मोठं मनुष्यबळ आहे याची आम्हाला पूर्ण कल्पना होती. त्यावेळी शेरेचा काम करण्याचा हव्यास किती आहे याची मला चांगली कल्पना आली. तो या काम करण्याच्या अतिउत्साहामुळे बारीक झाला होता. काम व कामगार पुरेसे होते. आमचा व्यवस्थापकच त्या मानानं कमी पडत होता. एडवर्ड निकोलायेविच यानं आपली झोप कमी केली, आपली चालण्याची गती वाढवली. रोजच्या कार्यक्रमातून अनावश्यक गोष्टी—नाश्ता, रात्रीचं, दुपारचं जेवण यांचा वेळ कमी केला. तरीही काही काही गोष्टी करायला त्याला वेळ मिळत नसे.

जुन्या जागेत सहा वर्षात जे काम आम्ही केलं होतं तेच काम शेरे इथं सहा आठवड्यात पूर्ण करायची आकांक्षा धरून बसला होता. शेतातले तण काढण्यासाठी गवताच्या काड्या तसंच, मनासारखं न आलेलं एखादं पीक उपटून काढण्यासाठी किंवा नवीन लवकर तयार होणारं पीक घेण्यासाठी शेरे मोठ्या तुकड्या पाठवत असे. शेताच्या जमिनीचा काही भाग अगदी जमिनीच्या तणासहित साफ झाला होता. रस्त्याच्या बाजूला मध्यभागी शेरेनं कलिंगडाचे वाफे, माझ्या शिक्षणशास्त्राच्या दृष्टीचं समाधान करण्यासाठी तयार केले होते. कमांडर कौन्सिलनं याचं मोठ्या आनंदानं स्वागत केलं. लापोटनं ताबडतोब कलिंगडाच्या वाफ्यात काम करण्यासाठी एक खास तुकडी तयार केली.

शेरेच्या डोक्यावर कामाचा एवढा बोजा असताना व बरीचशी मुलं त्याच्या बरोबर काम करत असतानासुद्धा तळं साफ करण्यासाठी, आम्ही एक संमिश्र तुकडी तयार केली. काराबानोव त्या तुकडीचा कमांडर होता. ४० मुलं डेनिस कुडल्टीनं अगदी जुने लहान कपडे घालायला दिलेले असतानासुद्धा जवळजवळ

संपूर्ण नग्न अवस्थेत तळ्यातली घाण काढायला लावले होते. तळ्यातल्या चिखलातून अनेक गोष्टी बाहेर यायला लागल्या.

चिखलातून ही शस्त्रं बाहेर काढणं फारसं कठीण गेलं नाही. परंतु चिखल बाजूला काढणं फारच कठीण होतं. तसं ते तळं काही अगदीच लहान नव्हतं व व बादल्यातून चिखल काढून तो संपणारा नव्हता. शेवटी चार घोड्यांना एक लाकडाची मोठी वल्ही तयार करून जोडली तेव्हा तो चिखल बाहेर ओढून काढणं शक्य झालं.

काराबानोवची ती खास संमिश्र तुकडी हे काम करताना अगदी पहाण्यालायक दिसत होती. ती मुलं डोक्यापासून पायापर्यंत चिखलानं भरलेली, जणू एखाद्या काळ्याकुट्ट निग्रोसारखी दिसत. त्यांना एकमेकांपासून वेगळं ओळखतासुद्धा येत नसे. ती कुठल्यातरी फार दूरच्या देशातून आल्यासारखी दिसत. तिसऱ्या दिवशी त्यांच्या या कामात, आमच्या अक्षवृत्तात बघायला मिळालं नसतं असं एक विचित्र दृश्य बघायला मिळालं. त्यांनी आकासी या जातीच्या झाडांची पानं, कमरेभोवती गुंडाळली होती. गळ्यात, हातात व पायात तारेचे दागिने घातले होते. लोखंडी व जस्ताच्या पट्ट्या अंगाभोवती गुंडाळल्या होत्या. काहीजणांनी आपल्या नाकात व कानात कुंडलं घातली होती. ती लहान खिळे वगैरेपासून बनवलेली होती.

या निग्रो लोकांना रशियन किंवा युक्रेनियन भाषा येत नव्हती व ते आपसात कुठल्यातरी स्थानिक बोलीभाषेत बोलत असत. ती भाषा इतरांना कळत नसे. ते घशातून काहीतरी कर्कश्श आवाज काढत. असे आवाज युरोपियन लोकांना ऐकायची सवय नव्हती. आश्चर्याची गोष्ट म्हणजे या खास संमिश्र तुकडीतल्या मुलांना एकमेकांना समजावून घेता येत असे. दिवसभर त्यांची वटवट चालत असे व तो तळ्याचा परिसर एकसारखा त्या आवाजाने घुमत असे. हे निग्रो कमरेपर्यंत चिखलात उभे रहात व मोठमोठ्यानं ओरडत आणि एखाद्या कीटकाच्या मागे त्या चिखलामध्ये पाठलाग करत.

काराबानोव चिखलानं भरल्यामुळे त्याचं शरीर चकाकत असे. त्याचे केस विचित्रपणे पाठीमागे चिकटलेले असत. त्याचे मोठेमोठे डोळे गरागरा फिरवत व आपले मोठे दात दाखवत तो मोठ्यानं 'करामा' म्हणून ओरडत असे. त्याच्यासारखी डझनावारी मुलं, काराबानोवनं दाखवलेल्या जागेकडे पहात व माना हलवत. पुन्हा काराबानोव ओरडे, 'ही ऽ......हो......' मग ही सारी निग्रोंची फौज ते वल्हं आतपर्यंत खुपसून ढिगावारी चिखल किनाऱ्यावर आणून टाकत. अशा तऱ्हेची ही विचित्र जातीची गडबड संध्याकाळच्या वेळेला जोरात चालत असे. कॉलनीची सर्व मुलं टेकडीच्या उतारावर बसत व गंमत पहात. अशा वेळी काराबानोव मोठ्याने ओरडे,

' त्यांचे गळे कापून टाका. '

ते निग्रो भयानक चेहरे करून रक्तपिपासूंप्रमाणे या गोऱ्या लोकांवर तुटून पडण्याचा आव आणत. ही गोरी मुलं भीतीनं धावत आवारामध्ये येत व इमारतीत शिरून दरवाजातून वगैरे डोकावून बघत. पण या काळ्या लोकांनी या गोऱ्या लोकांना कधीच पकडलं नाही; किंवा माणसं खाण्याचा प्रकारही कधी घडला नाही. रानटी लोकांना रशियन भाषा येत नसली तरी ती चिखलाची घाण घरात आणली तर आपल्याला अटक होईल याची त्यांना जाणीव होती. एकदाच या रानटी लोकांना युक्रेनची राजधानी खारकोव्ह येथील लोकांवर आपला दबाव आणायची संधी मिळाली.

पाऊस नसलेल्या उन्हाळ्याच्या एका संध्याकाळी पश्चिमेला अचानक एक वादळी ढग आला. हा ढग बघता बघता आभाळात पसरला. मोठ्यानं आवाज करून आमच्या टेकडीवर कोसळायला आला. आमच्या दुसऱ्या संमिश्र तुकडीनं त्याचं खास आनंदानं स्वागत केलं. त्या तलावाच्या तळातून जोरजोराचे आवाज आले. तो ढग कुर्याझवरच येऊन ठेपला व जोरजोराने स्फोटासारखे आवाज व्हायला लागले. फार वेळ तसाच न रहाता वाऱ्याबरोबर गिरकी घेत घेत तो ढग खाली आला व अचानक पाऊस, वादळ व विजांचा कडकडाट होऊ लागला. दुसऱ्या खास संमिश्र तुकडीतील मुलांनी किंकाळ्या मारून त्याचं स्वागत केलं व त्या गडबडीत वेडवाकडं नाचायला सुरुवात केली.

अशा या विचित्र वेळी आमच्या सिनेन्कीनं टेकडीच्या उतारावर तशा पावसात उभं राहून त्याच्या बिगुलाचा खास धोक्याच्या इशाऱ्याचा आवाज काढला. ते रानटी लोक नाचायचे एकाएकी थांबले व रशियन भाषा त्यांना आठवली. त्यांनी सिनेन्कीला विचारलं,

'तू बिगुल कशासाठी वाजवलास ? कुठे काय झालं ?'

सिनेन्कीनं पॉडव्हर्की गावाच्या बाजूला बोट दाखवलं. काही मुलं आवारामध्ये येऊन आधीच तलावाच्या किनाऱ्यावर येऊन उभी राहिली होती. तिथून शंभर मीटर अंतरावर एका झोपडीला आग लागली होती व गावातले लोक त्या झोपडीभोवती फेऱ्या मारत होते. हे आमचे ४० निग्रो त्यांच्या म्होरक्यासह त्या जळणाऱ्या झोपडीकडे धावले. त्यांना बघून घाबरलेल्या बायका, म्हातारे लोक बाजूला गेले व त्यांनी निरनिराळ्या मूर्ती आजूबाजूला लावून अडथळा निर्माण केला. त्यातला एक दाढीवाला म्हातारा ओरडला,

'तुम्हाला इथं येण्याचं कारण काय ? देवानंच ही आग लावली आहे व देवच ती विझवेल.'

परंतु इकडे तिकडे पहात असताना त्या दाढीवाल्या म्हाताऱ्याला व इतर साऱ्या श्रद्धाळूंना लवकर कळून आलं की त्यांच्या परमेश्वराची आग विझवण्याची

इच्छा नाही. याउलट परमेश्वरानं दुर्लक्ष करून जास्तीत जास्त वाईट होईल अशीच भूमिका घेतली. हा निग्रोंचा घोळका त्यांचे फाटके कपडे इतस्ततः उडवत होता व तो धातूच्या दागिन्यांचा आवाज करत तिथे तुटून पडला. लोखंडी पट्ट्या बांधल्यामुळे त्यांचे घाणेरडे दिसणारे चेहरे व डोक्यावरचे केस वेडेवाकडे वळवल्यामुळे कुणाच्याही मनात शंका राहिली नाही की हे प्राणी कुठल्यातरी विचित्र प्रदेशातून येऊन त्या मिरवणुकीवर तुटून पडणार आहेत. म्हातारे पुरुष व बायका आरडाओरडा करत आपल्या हातातल्या मूर्ती घट्ट पकडून रस्त्यावरून सैरावैरा इकडेतिकडे धावत सुटल्या. ही मुलं (निग्रो) गाईचा गोठा व तबेला प्रथम धुंडाळायला गेले. पण ती जनावरं केव्हाच खलास झाली होती. काराबानोव्हनं चिडून एक खिडकी लाकडाच्या ओंडक्याने तोडली व तो त्या झोपडीच्या आत उतरला. एक मिनिटभरानं त्या खिडकीजवळ एक दाढीमिशाचा चेहरा दिसला व सेमियान त्या झोपडीतून ओरडला,

'या म्हाताऱ्याला ताबडतोब बाहेर घ्या.'

मुलांनी त्या माणसाला हातात घेतला. सेमियान दुसऱ्या खिडकीतून जाळातून कसाबसा बाहेर आला. एक मुलगा गाडी आणण्यासाठी कॉलनीत धावत आला. तो ढग एव्हाना पूर्वेच्या बाजूला गेला होता व त्याचबरोबर तो काळाकुट्ट अंधारही पलिकडे गेला. अँटन ब्रातचिन्को मोलोडेटवर स्वार होऊन त्या ठिकाणी जाऊन पोहोचला.

'गाडी एक मिनिटात इथं येईल,' तो म्हणाला, हे गावातले सगळे लोक कुठे पळाले? शिवाय इथं तर कोणीच दिसत नाही.'

आम्ही त्या माणसाला गाडीत ठेवला व ती गाडी कॉलनीकडे आणली. घराच्या दाराआडून व कुंपणावरून निरनिराळे भीतीनं ताठ झालेले चेहरे आम्हाला मनातल्या मनात शिव्याशाप देत बघत होते.

एकंदरीत त्या गावातले लोक आमच्याशी जरा थंडपणानं वागत. कधीकधी आम्ही बातमी ऐकत असू की आमच्या कॉलनीत बसू लागलेली शिस्त त्यांना पसंत पडत होती.

शनिवारी व रविवारी भाविक लोकांची आमच्या आवारात गर्दी होत असे. म्हातारी मंडळी जास्त करून चर्चमध्ये जात असत व तरुण मंडळी चर्चच्या भिंतीच्या बाहेर हिरवळीवर फेऱ्या मारत असत. आमच्या पहाऱ्यावरच्या संमिश्र तुकडीनं या प्रकाराला मज्जाव केला. आमचे पहारेकरी निळे कपडे घालून पहारा करत. एके दिवशी त्यांनी या भाविक लोकांना ताकीद दिली की, 'तुम्ही एकतर त्या चर्चमध्ये जाऊन बसा किंवा आमच्या आवारातून बाहेर जा. ही काही सहल करायची जागा नाही.'

बहुतेकजणांनी आमच्या आवारात यायचं बंद केलं. कुठच्याही तऱ्हेनं

आम्ही धर्माविरुद्ध प्रचार केला नाही. याउलट आदर्शवादी व भौतिकवादीच्या प्रतिनिधींबरोबर बऱ्याच वेळा चर्चा होई.

कधीकधी त्या चर्च–कौन्सिलचे लोक आम्हा दोघांनाही येणाऱ्या समस्यांच्या बाबतीत बोलायला येत. मीही माझे विचार बोलून दाखवल्याशिवाय रहात नसे.

'हे बघा बाबांनो, ते पलिकडे एक चर्च आहे. तिथं तुम्ही का जात नाही? तेही चांगलं आहे. तिथं आता आजूबाजूला सर्व काही स्वच्छ केलेलं आहे.'

यावर त्यांनी उत्तर दिलं, 'आम्ही तिथं कसं जावं बरं ? ते काय चर्च आहे का ? ते अगदी लहानसं चर्च आहे व तिथं वेदी पण नाही... ...आम्ही तुमच्या आड येतो काय ?'

'अहो, पण मला सर्व आवाराची जरूरी आहे. ही सर्व जागा अजूनही आम्हाला पुरत नाही. दुसरं असं की आम्ही सर्व इमारतींना रंगसफेदी दिली आहे व त्या व्यवस्थित केल्या आहेत. हे मोडकळीस आलेलं तुमचं चर्च डोळ्याला कसंसंच दिसतं. तुम्ही हरकत घेतली नसती तर मी ते केव्हाच पाडून टाकलं असतं आणि पंधरा दिवसात तिथे सुंदर फुलांचे ताटवे लावले असते.'

ते सर्व दाढीवाले म्हातारे हसले. माझी योजना त्यांना आता आवडली असावी.

'कोणत्याही गोष्टीचा नाश करणं फार सोपं असतं. परंतु त्या बांधणं फार कठीण', असं ते हसत हसत म्हणाले, 'हे चर्च ३०० वर्षांपूर्वी बांधलेले आहे, अनेक लोकांनी कष्ट करून मिळविलेले शेकडो कोपेक त्यासाठी खर्ची पडले आहेत. तुम्ही ते पाडून टाकणार? म्हणजे माणसांचा परमेश्वरावरचा विश्वास उडत चालला आहे असं समजायला पाहिजे. तुम्ही थोडं थांबा. लवकरच तुम्हाला कळेल की विश्वास उडत नाही... हे लोकांना माहित आहे......'

चर्चचे वृद्ध गृहस्थ आपल्या खुर्चीत नीट सावरून वसले. ख्रिश्चन धर्माच्या सुरुवातीचेच दिवस जणू काही पुन्हा आल्यासारख्या आवाजात ते बोलत होते. परंतु दुसऱ्या एका माणसानं त्याचं वक्तृत्व मध्येच थांबवलं.

'इव्हान अखिमोविच, अशा तऱ्हेने बोलू नकोस. हा डायरेक्टर आपल्या कामाच्या दृष्टीनं बोलत आहे. परंतु तिकडे तुम्ही आम्हाला जायला सांगता ते तर लहानसं चर्च आहे. मी सांगतो ती जागा खराब झालेली आहे.'

'अहो, तुम्ही त्या जागेवर पवित्र पाणी टाका व ती पवित्र करा,' लापोटनं सूचित केलं.

हे ऐकून तो म्हातारा मनुष्य एकदम दचकला. आपली दाढी कुरवाळत तो म्हणाला,

'अरे बाळ, पवित्र जलाने नेहमीच काम होतं असं नाही.'

'तुम्ही असं म्हणता ? का बरं होणार नाही ?'

'बाळ, ते कुठंही टाकून चालत नाही. आम्ही जर ते तुझ्यावर शिंपडलं तर त्याचा काही उपयोग होणार नाही. खरं की नाही ? '

'होय. उपयोग होणार नाही हे खरं. ' असं लागोटनं कबूल केलं.

'आता कसं बरं बोललास ? त्याचा उपयोग होणार नाही. पवित्र जलाचा कुठं उपयोग करायचा हे नीट समजून घेतलं पाहिजे.'

'तुमच्या पुरोहितांना तरी ते माहीत आहे का ? '

'होय, अर्थातच बाळ. त्यांना पण ते माहीत आहे. '

'तुम्हाला वाटतं त्यापेक्षा काय चांगलं आहे तेवढंच त्यांना माहीत असतं.'

'कालच जवळच्या गावात आग लागली होती. आमची मुलं गेली नसती तर तो म्हातारा मनुष्य झोपडीसकट जळून खाक झाला असता. त्याची अगदी राख झाली असती.'

'असं आहे बाळ. तो म्हातारा जळून मरावा अशी कदाचित परमेश्वराचीच इच्छा असेल. '

'आमची मुलं मध्ये पडली तर...... ' त्या म्हाताऱ्यानं आपला गळा साफ केला.

'अशा गोष्टींची चर्चा करायला तू फार लहान आहेस बाळ. '

'मी लहान आहे म्हणता ? '

'हो आणि आपण काय म्हणत होतो की त्या टेकडीच्या पायथ्याशी असलेल्या चर्चमध्ये वेदी नाही.'

तो म्हातारा जास्त काही न बोलता आपला ख्रिस्ती विनय दाखवत निघून गेला. पण दुसऱ्या दिवशी पाहिलं तर फळ्या व दोर चर्चच्या भोवती बांधलेल्या दिसल्या. बरेचसे कामगार रंगाचे डबे वगैरे घेऊन फळ्यावर उभे होते. माझ्या बोलण्यामुळे त्याना कदाचित लाज वाटली असावी. कारण त्या भिंती वाईट दिसतात असं मी म्हटलं होतं. किंवा आपल्या देवावरच्या भक्तीचा बडेजाव दाखवायचा असेल म्हणून म्हणा, चर्चच्या कमिटीनं चर्चला रंग देण्यासाठी चारशे रुबलची रक्कम मंजूर केली होती.

आमच्या मुलांना चर्चबद्दल अतिशय उत्सुकता होती. लहान मुलं तर मला चैन पडू देईनात. शेवटी एकदा मी त्यांना चर्चच्या आत जाऊन पहायची परवानगी दिली.

'एक गोष्ट लक्षात ठेवा की आत जाऊन कोणत्याही प्रकारे दंगामस्ती करायची नाही,' असं झोरकानं त्यांना बजावलं. 'आपण माणसांना समजावून सांगून त्यांचं मन वळवावं. तेच खरं आयुष्याच्या पुनर्रचनेचं काम आहे. धांगडधिंगा नव्हे. '

हे ऐकून मुलांना जरा राग आला होता.

'आम्ही काय गुंड आहोत काय ?'

'तसं नाही. तुम्ही कुणाच्या भावना दुखावता कामा नये. तुम्ही मोठ्या धोरणानं वागलं पाहिजे समजलं का......असं मला म्हणायचय.'

झोरकाचं म्हणणं मुख्यत्वे करुन हावभावावरून त्यांना समजावण्याचा प्रयत्न केला तरी त्याला प्रत्यक्षात काय म्हणायचंय हे त्यांना बरोबर समजलं.

'आम्हाला समजलं ...आणि सर्व काही ठीक होईल.'

एक आठवड्यानं एक म्हातारा पाद्री माझ्याकडे येऊन अगदी माझ्या कानात सांगू लागला :

'तुमच्याशी बोलायचंय डायरेक्टरसाहेब; मला काही तक्रार करावयाची नाही. तुमची मुलं तसं काही करीत नाहीत. पण ते आमची धार्मिक सभा बिघडवातात. मी त्यांना दोष देत नाही, पण तुम्ही त्यांना चर्चमध्ये जायची मनाई केलीत तर फार बरं होईल.'

'ते वाईट वागले काय ? '

'नाही नाही. ते वाईट वागले नाहीत. देवाशपथ वाईट वागले नाहीत. पण ते अर्ध्या चड्या घालून येतात व टोप्या तशाच टोक्यावर ठेऊन येतात. काहीजण छातीवर क्रूसाची खूण करतात. पण ते ती डाव्या हातानं करतात. त्यातही ते ती बरोबर करत नाहीत. ते आपल्या आजूबाजूला बघत राहतात. कुठं बघायचं ते त्यांना माहित नाही आणि कधीकधी ते मागे वळतात. कधी वेदीच्या आजूबाजूला बघत राहतात. तर कधी वेदीकडे पाठ फिरवतात. त्यांना त्यात गंमत वाटते हो. पण शेवटी ती प्रार्थनेची जागा आहे. आलं लक्षात ? त्यांना प्रार्थनेचा अर्थच माहीत नाही. त्याचं महत्व वाटत नाही. देवाची भीती वाटत नाही. ते अगदी सभ्यपणे वेदीजवळ येतात. ते सगळीकडे पाहतात, मूर्तींना हात लावतात आणि त्या खास खुर्चीवर बसतात. त्या पवित्र दरवाजात उभे रहातात व प्रार्थना करणाऱ्या लोकांकडे पहात बसतात. ते सारं विचित्र वाटतं ना ? समजलं का ? '

मी त्या म्हाताऱ्या पाद्र्याची समजूत घातली व आमची मुलं त्यांच्या चर्चमध्ये जाणार नाहीत अशी हमी दिली. कॉलनीच्या सर्वसाधारण सभेत मी सांगितलं,

'मुलांनो चर्चमध्ये जाऊ नका. तो पाद्री तक्रार करत होता.'

मुलं जरा रागावलीच.

'आम्ही का जायचं नाही ? आम्ही तिथं जाऊन काहीही गडबड केली नाही. आमच्यापैकी कोणी तिथे आत गेलाच, तर ते इकडेतिकडे पहातात आणि बाहेर जातात. तो पाद्री खोटं बोलतोय.'

'तुम्ही क्रूसाची खूण कशासाठी करता ? तुम्हाला अशी खूण करायचं कारण काय ? तुमचा देवावर विश्वास नाही. खरं ना ?'

'कुठच्याही तऱ्हेनं त्यांना दुखवू नका असं सांगितलं होतं. आत कसं वागायचं ते आम्हाला कसं कळणार ? ते लोक खूप वेळ उभे राहतात आणि एकदम खाली

गुडघ्यावर बसतात व क्रूसाची खूण करतात. म्हणून आपल्या छोटया मुलांना वाटलं त्यांनी पण तसंच केलं पाहिजे म्हणजे त्या लोकांना दुखावल्यासारखं होणार नाही.'

'ठीक आहे. जाऊ द्या. इथून पुढं तिथं तुम्ही जाऊ नका.'

'ठीक आहे. आम्ही जाणार नाही......पण ते किती मजेदार बोलतात. किती वेळ तरी नुसते उभे रहातात, ते कशासाठी ? आणि त्या कोनाडयात...... त्याला काय म्हणता तुम्ही...वेदी...ती अगदी स्वच्छ असते. त्याच्यावर गालीचा असतो व सुंदर सुवास येतो आणि तो पाद्री तिथं काय घेऊन जातो ? त्याचे हात तो वर उडवतो. तुम्ही ते पाहिलंच पाहिजे एकदा !'

'तुम्ही कधी त्या वेदीच्या दरवाजात गेलात काय ?'

'मी तिकडे जात होतो, त्यावेळी त्या पाद्रयानं आपले हात उडवले व काही बोलला. मी तिथंच उभा राहिलो. मी काहीच केलं नाही. तरी तो म्हणाला, 'ए मुला, इथून निघून जा. ताबडतोब निघून जा.' मी परत आलो. यात मी काय केलं ?'

जूनच्या मध्यास कॉलनीचं बरचसं काम पूर्ण झालं. दहा तारखेला विजेचं केंद्र सुरू झालं. आम्ही तेलाचे दिवे अडगळीच्या खोलीत सारून दिले. थोडयाच दिवसात आमचे पाण्याचे नळ व्यवस्थित चालू झाले.

इतका वेळपर्यंत मुलं आपापल्या डॉरमिटरीत जाऊ शकली होती. आमच्या लोखंडाच्या वर्कशॉपमध्ये आम्ही नवीन खाटा बनवून घेतल्या होत्या व त्यावर नवीन गाद्या व उशा आल्या होत्या. परंतु अद्याप आम्हाला ब्लँकेट्स घेणं काही परवडलं नव्हतं आणि ती जुनी, फाटकीतुटकी वापरायचं आमच्या जीवावर आलं होतं. एवढया मुलांना ब्लँकेट्स घ्यायची म्हणजे जवळजवळ दहा हजार रुबल्स लागणार होते. कमांडरचं कौन्सिल नेहमी नेहमी याच प्रश्नावर अडकत असे व याच्या पलिकडे ते जाऊच शकत नसत. लापोट बजावत असे,

'आपण जर ब्लँकेट्स घेतली तर आपण डुकरांचं घर तयार करू शकणार नाही आणि ब्लँकेटांपेक्षा डुकरं जास्त महत्वाची आहेत.'

उन्हाळयाच्या दिवसात ब्लँकेट्स, बिछाने चांगले दिसावेत एवढयासाठीच आली होती. परंतु प्रत्येकाची मनोमन इच्छा होती की सुगीच्या समारंभापूर्वी आपल्या झोपण्याच्या खोल्या व्यवस्थित व छान दिसाव्या. ब्लँकेट्सची उणीव आमच्या त्या एकंदर थाटात आम्हाला फारच भासत होती. अचानक एके दिवशी आमचं नशीब उघडलं. खालाबुडा हा वरचेवर कॉलनीला भेट देत असे. तो डॉरमिटरीजमध्ये जात होता, दुरुस्तीचं काम बघायचा व आमच्या मुलांशी मना-पासून गप्पा मारायचा. त्यानं लावायला सांगितलेल्या रायच्या पीकाची कापणी

लवकरच होणार आहे हे ऐकून तो खूष झाला होता. खालाबुडाला कॉलनीबद्दल एकंदरीत फारच आवड निर्माण झाली होती.

'आमच्या त्या बायका उगाच तिकडे बडबडत बसतात, हे चुकीचे आहे, ते चुकीचं आहे व असंच झालं पाहिजे. त्यांना खरोखरच काय पाहिजे आहे ते मला कोणी समजावून सांगेल, तर बरं होईल. ही मुलं काम करतात व ते जास्तीत जास्त चांगल्या तऱ्हेनं करण्याचा प्रयत्न करतात. ही मुलं तर उत्तम कोम्सोमोल आहेत. मला वाटतं तुम्हीच (मॅकॅरेन्को) त्या बायकांना निष्कारण बिघडवता.

पण इतर अनेक गोष्टींवर व घडामोडीवर मोठ्या उत्साहानं बोलणारा खालाबुडा ब्लँकेटचा प्रश्न निघाला की एकदम थंड होतो. लापोटनं अनेक तऱ्हांनी हा प्रश्न खालाबुडाच्या पुढे मांडायचा व पटवून द्यायचा प्रयत्न केला.

'काय सांगावं,' लापोट निःश्वास सोडून म्हणायचा, 'सगळ्यांनाच ब्लँकेटं आहेत. आम्हाला मात्र नाहीत. एक गोष्ट चांगली की खालाबुडा आपल्या बाजूचे आहेत व एकना एक दिवस ते नक्कीच आपल्याला ब्लँकेट्स देतील.'

खालाबुडा तोंड फिरवून जरा मोठ्यानंच पुटपुटत असे, 'पोरट्यांनो, तुम्ही हुशार आहात. म्हणे खालाबुडा आपल्याला ब्लँकेट देणार.'

दुसऱ्या एकावेळी लापोटनं दुसराच सूर लावला, 'बिचारे खालाबुडाही आपल्याला मदत करू शकत नाहीत. बिचारे गॉर्काईट्स.'

हा उपायही फारसा लागू पडला नाही. पण या प्रश्नावर खालाबुडा नेहमी अस्वस्थ होत.

एका संध्याकाळी खालाबुडा मोठ्या खुषीत कॉलनीत आले होते. त्यांनी आमच्या शेतीची, डुकरांच्या घराची, डुकरांची व एकंदर आजूबाजूच्या परिसराची खूप स्तुती केली. डॉरमिटरीत नव्या खाटा, जिकडे तिकडे स्वच्छता, खाटांवरील व्यवस्थित बिछाने, सबंध खोलीची स्वच्छता, धुवून पुसून काढलेली खिडक्यांची तावदाने, स्वच्छ पुसलेली जमीन व बिछान्यावर ठेवलेल्या झकास उशा हे सर्व पाहून ते बेहद्द खूष झाले. आमचे बिछाने व त्यावर घातलेल्या पांढऱ्या स्वच्छ चादरी ब्लँकेटांशिवाय ओकेबोके दिसत होते. परंतु त्या बिचाऱ्याला ब्लँकेटसाठी नेहमी नेहमी त्रास देण्याचा मला कंटाळा आला. डॉरमिटरीतून बाहेर पडताना त्यांनाही खूप वाईट वाटलेलं दिसलं.

'बरोबर आहे. त्यांना खरोखरच ब्लँकेटं पाहिजेत. पण ती कुठून मिळवायची?'

मी व खालाबुडा बाहेरच्या आवारात गेलो व सगळी चारशेच्या चारशे मुलं आमच्या पाठोपाठ बाहेर आली. ती आमची कवायतीची वेळ होती. प्योतोर इव्हानोविच गोरोविच यानं कवायतीच्या नियमाप्रमाणे इशारा दिला.

'कॉम्रेड कॉलनिस्ट, हुश्शार! सलामी.'

चारशे हात एकदम हालचाल करू लागले. व एकदम थांबले. ओळीनं उभे

राहिलेले गंभीर चेहरे आमच्या बाजूला वळले. आमच्या ढोलकीवाल्यांनी जोरात वाजवून सलामी दिली. गोरोविच ताठ चालत आपला अहवाल घेऊन आमच्याकडे आला, 'चिल्ड्रेन्स एड सोसायटी'चे अध्यक्ष महाराज, गॉर्की कॉलनीची ३२९ मुलं कवायत करत आहेत. त्यातील ११ नाही आलेत, तीन कामावर आहेत, सहा जण पहारा करण्याच्या कामावर आहेत व दोघं आजारी आहेत.'

घोडदलात काम केलेला तो अनुभवी प्योतोर इव्हानोविच बाजूला झाला व कवाईत करण्यासाठी पवित्र्यात उभ्या असलेल्या गॉर्काईट्सच्या रांगा खालाबुडाला बघायला मिळाल्या. खालाबुडानं आपल्या मिशावरून हात फिरवला. ते जरा भावनाप्रधान झाले. एकाएकी गंभीर होऊन त्यांनी आपल्या हातातल्या काठीच्या टोकानं जमिनीवर टक् टक् केलं.

'नमस्ते, पोरांनो !'

त्यांनी आपल्या डोळ्यांची जोरानं उघडझाप केली. त्याचवेळी ३८० मुलांनी आनंदी व उत्साही आवाजात त्यांना प्रत्युत्तर दिलं,

'नमस्ते कॉम्रेड !'

खालाबुडाला आता अगदी राहवेना. हसून त्यांनी इकडे तिकडं पाहिलं व जरा हलक्या आवाजात बोलले : 'खट्याळ पोरांनो ! ही एकंदर फारच हुशार झाली आहेत हं ! मी यांच्याशी काही बोलू इच्छितो.'

'विश्राम,' असा मुलांना इशारा करण्यात आला. मुलांनी आपला उजवा पाय उचलला व दोन्ही हात पाठीमागे घेतले. हसून खालाबुडाकडे बघितलं. पुन्हा एकदा खालाबुडानं आपली काठी जमिनीवर आपटली व मिशा कुरवाळल्या. 'मला भाषणं ठोकायची आवड नाही. समजलात का पोरांनो ! पण मी आज तुमच्याशी बोलणार आहे. तुम्ही चांगली मुलं आहात. हे मी मनापासून सांगतोय. आणि तुम्ही आमच्यासारखे म्हणजे कामगारांसारखे वागता. त्यामुळेच हे सर्व काही व्यवस्थित चाललेलं आहे. मला जर मुलगा असता तर त्यानं तुमच्यासारखंच रहावं असा आग्रह मी केला असता. त्या बायका काय बोलतात त्याकडे तुम्ही लक्ष देऊ नका हं ! मी तुम्हाला सरळ सांगतो. तुम्ही तुमच्या नियमाप्रमाणेच वागा. मी जुना बोल्शेव्हिक आहे व जुना कामगारही आहे. हे सर्व काही आपल्या मनाप्रमाणे केलेलं आहे. कोणी जर म्हटलं ते बरोबर नाही तर त्याकडे लक्ष देऊ नका, आणि हे चांगलं नाही असं कोणी म्हटलं तर तुम्ही आपल्या मार्गाने पुढे चला. समजलं ? हे मी सारं अगदी मनापासून सांगतोय हं. आणि मी आता तुम्हाला खरं सांगतो की मी तुम्हाला, अंगावर घेण्यासाठी ब्लँकेटस् देईन.'

सारी पोरं आपली रांग सोडून धावत आमच्याकडे आली. लापोट सर्वात पुढे होता. त्याने आपले हात हवेत उडवले व मोठ्यानं ओरडला.

'हुराऽऽ, सीडर कारपोविच खालाबुडा.'

गोरोविच व मी कसेबसे बाजूला झालो. बऱ्याच हातांनी खालाबुडाला उचलून बऱ्याच वेळा हवेत उडवलं व त्याला शेवटी क्लबकडे नेलं. त्याची ती काठी मुलांनी उंच धरली होती.

क्लबच्या दारामध्ये मुलांनी त्याला जमिनीवर ठेवलं. त्याचे सारे केस विस्कटले. तो तसा उत्तेजित झाला होता. त्यानं कापले कपडे कसेबसे सारखे केले व एका हातानं कोटाचे खिसे चाचपले. याच वेळी तारानेट्स पुढे आला व नम्रतेने म्हणाला,

'हे तुमचं घड्याळ, पाकिट व या तुमच्या किल्ल्या'.

'हे सारं खिशातून खाली पडलं होतं?' खालाबुडानं आश्चर्यानं विचारलं.

'ते खाली पडलं नाही तर खाली पडेल असं वाटल्यावरून मी त्या सगळ्या वस्तू हस्तगत केल्या होत्या. नाहीतर त्या खाली पडल्याच असत्या,' तारानेट म्हणाला.

खालाबुडानं तारानेट्सच्या हातातून आपल्या वस्तू हातात घेतल्या. ताबडतोब तारानेट्स मुलांच्या घोळक्यात जाऊन मिसळला.

'खरोखर काय पोरं आहेत!'

एकाएकी तो मोठ्यानं हसायला लागला.

'महाभयंकर पोरं आहात रे तुम्ही. काय वाटतं तुम्हाला सांगा पाहू. अरे ज्यानं माझ्या वस्तू ताब्यात घेतल्या होत्या तो गेला कुठे?'

थोड्या वेळानं भारावलेल्या मन:स्थितीत खालाबुडा शहराकडे निघून गेला. दुसऱ्या दिवशी त्याच सीडर कारपोविच खालाबुडानं त्याच्या अतिशय उत्तमपैकी सजवलेल्या ऑफिसात माझं अगदी थंड स्वागत केलं. ते पाहून मी चक्रावूनच गेलो. माझ्याशी कसंबसं बोलताना त्यानं टेबलाचे खण उघडले, मिटले, पुढच्यातल्या पुस्तकाची पानं चाळली व आपलं नाकही साफ केलं व हळूच म्हणाले,

'आपल्याकडे ब्लँकेटस् नाहीत. खरोखरच आपल्याकडे ब्लँकेटस् नाहीत.'

'ठीक आहे. तुम्ही आम्हाला पैसे द्या. आम्ही विकत घेऊ.'

'आपल्याकडे पैसे पण नाहीत. खरोखरच नाहीत. शिवाय तुमच्या खर्चाच्या अंदाजात ते नव्हतंच.'

'मग तुम्ही काल काय कबूल केलंत?'

'हो. काल बोललो. म्हणून काय झालं? पण काहीच नाही त्याला मी तरी काय करणार?'

खालाबुडा ज्या वातावरणात काम करत होता ते मला साधारण आठवलं व डार्विनचीही आठवण झाली. मी माझ्या टोपीच्या टोकाला हात लावला व परत फिरलो.

खालाबुडाच्या या शब्द बदलण्याच्या बातमीचा मुलांनी धिक्कार केला. आमचा गॅलॅटेन्कोसुद्धा आडमुठेपणानं म्हणाला,

'काय विक्षिप्त माणूस आहे. आता तो काही दिवस कॉलनीत येणारच नाही. म्हणे मला बोलला होता की कलिंगडं पिकली की मी खायला येईन व ती राखायला मी मदत करीन.'

दुसऱ्या दिवशी 'आर्बिट्रेशन कमिटी'कडे 'चिल्ड्रेन्स एड कमिटी'च्या चेअरमनच्याविरुद्ध तक्रार नोंदविली. यामध्ये माझा काही कायदेशीर हेतू नव्हता. परंतु राजकीय पातळीवरुन मी तक्रार केलेली होती. उद्देश असा की एका बोल्शेविकाला दिलेला शब्द पाळता न येण्याचं दु:ख भोगावं लागावं.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे दोन दिवसांनी मला व लापोटला 'आर्बिट्रेशन कमिटी'पुढे हजर रहायला सांगण्यात आलं. जज्जच्या टेबलापुढे खालाबुडा काहीतरी समजावून देत असलेले दिसले. त्यांच्या पाठीमागे त्यांच्या खात्यातले त्यांचे चष्मे व कडक इस्त्रीचे कपडे व टोकदार मिशावाले प्रतिनिधी आपसात काहीतरी कुजबुजत होते. घारे डोळे व जाड भुवया असलेले अध्यक्षसाहेब काळ्या रंगाचा कुडता घालून आले होते. त्यांनी आपली बोटं फाकवलेला हात टेबलावरच्या कागदावर ठेवला होता.

'थांबा जरा ! सीडर खरं सांगा तुम्ही यांना ब्लॅंकेट्स द्यायचं कबूल केलं होतं ?'

खालाबुडा लाल झाले व आपले हात पसरून म्हणाले,

'हो, असं बोलणं झालं होतं; पण म्हणून काय झालं.'

'सर्व मुलं एकत्र उभी असताना असं झालं होतं ?'

'होय, सर्व मुलं कवाईतीसाठी उभी असताना असं बोलणं झालं, हे खरं आहे.'

'त्यांनी तुम्हाला वर उंच उडवलं होत का ?'

'होय, पोरंच ती. त्यांनी मला वर उडवलं, त्याला मी काय करणार ?'

'मग आता पैसे भरा.'

'काय म्हणता ?'

'पैसे भरा. कबूल केल्याप्रमाणे त्यांना ब्लॅंकेट्स दिली पाहिजेत.'

न्यायाधीश हसू लागले. खालाबुडा आपल्या सहकाऱ्याकडे बघून धमकावणीच्या आवाजात कुजबुजत राहिले.

आम्ही थोडे दिवस वाट पाहिली व एके दिवशी झादारोव्ह ब्लॅंकेट्स किंवा पैसे आणण्यासाठी खालाबुडाच्या ऑफीसमध्ये गेला. त्यानी झादारोव्हला कचेरीत येऊ दिलं नाहीच, उलट त्यांचा पुरवठा अधिकारी म्हणाला :

'आम्हाला कायद्याच्या कचाट्यात अडकवायची तुम्हाला का बुद्धी झाली ?

तुम्ही अशीच कामं करता काय ? हे पहा हा आर्बिट्रेशन कमिशनचा अहवाल आहे. हा इथं आहे तो पहा.'

'असं आहे ? '

'होय, असं आहे. पुन्हा कृपा करून आमच्याकडे येऊ नका. आम्ही वरती आणखी अर्जविनंत्या करू. फार तर आम्ही पुढच्या वर्षीच्या अंदाजपत्रकात ते घालू. तुम्हाला काम वाटतं आम्ही सरळ बाजारात जाऊन चारशे ब्लँकेट्स खरेदी करू शकतो काय ? ह्याला वरून परवानगी असावी लागते '

झादारोव्ह कमालीचा चिडूनच परत आला. सबंध दिवस कमांडर्स कौन्सिलच्या सभेत गरमागरम चर्चा झाली व शेवटी असं ठरलं की आपणच युक्रेनियन सरकारकडे सरळ लेखी अर्ज करावयाचा. दुसऱ्याच दिवशी या सगळ्यातून एक मार्ग निघाला. तो इतका साधा, सरळ, मजेदार व अगदी अनपेक्षित असा होता. मुलं मोठ्या आनंदानं अगदी अक्षरश: नाचली. खालाबुडा परत कॉलनीत येतो केव्हा व प्रत्यक्ष आपण त्यांच्याशी बोलतो केव्हा याची वाट पहात राहिली. हा मार्ग असा होता की चिल्ड्रेन्स एड कमिटीच्या बँकेतील चालू खात्यावर जप्ती आणली होती. दोन दिवस गेले. परत मला त्या मोठ्या कचेरीतून बोलावणं आलं. तिथं एका आरामखुर्चीत एक व्यवस्थित पोशाख केलेले गृहस्थ बसले होते. त्यांनाच मी चाळीस रुबल पगारवाले शिक्षक का पसंत करत नाही ते माहीत करून घ्यायचं होतं. ते गृहस्थ खुषीत दिसत होते व त्यांचे गाल लाल झाले होते. ते खालाबुडाकडे बघत होते. खालाबुडाचे गालही लाल दिसत होते. पण ते फारसे खुषीत दिसले नाहीत.

मी मुकाट्यानं दारात उभा होतो. त्या गृहस्थांनी मोठ्या मुष्किलीनं आपलं हसू दाबत मला आत यायची खूण केली.

'आत या, बसा. काय आहे काम ? तुम्ही अस काय केलंत ? हे बरं नाही हं ! ...ही जप्ती उठवलीच पाहिजे. ते लोक या बिचाऱ्याला आपल्या स्वत:च्या खिशात हात घालू देत नाहीत. ते तुमच्याविरुद्ध तक्रार करायला आले आहेत. ते म्हणतात, गॉर्की कॉलनीचे डायरेक्टर माझ्याशी वाईट वागले. मला आता इथं काम करायचं नाही. '

ह्या गृहस्थांना काय म्हणायचं आहे त्याचा अंदाज न लागल्यामुळे मी गप्पच बसलो होतो.

'ही जप्ती ताबडतोब उठवली पाहिजे असं ते गंभीरपणे म्हणाले. अशी जप्ती मी कधी ऐकलीच नव्हती.'

त्यांचा गंभीरपणा कुठल्याकुठं पळाला व ते मोठमोठ्यानं हसत सुटले. खालाबुडा आपले हात खिशात घालून खिडकीतून बाहेर पहात होते.

'ही जप्ती उठवावी असा तुम्ही हुकूम देता का ?' असं मी विचारलं.

'त्याचं असं आहे. असा हुकूम देण्याचा मला अधिकार नाही. मी फार तर यांना, खालाबुडाला, सांगू शकतो की जप्ती उठवा. कदाचित ते नाही म्हणतील. हे पहा खालाबुडा तुमच्या खिशात चेकबुक आहे. तुम्ही जरुर तेवढ्या रकमेचा चेक लिहा पाहू. किती ? दहा हजार ना आणि संपवा...'

खालाबुडा खिडकीजवळून मागे आले. त्यांनी खिशातून आपले हात काढले व आपल्या मिशावर फिरविले. ते हसले :

'काय कार्टी आहेत तुमची ! आहेत का नाही ?' असं म्हणून ते माझ्या-जवळ येऊन खांद्यावर थाप मारून म्हणाले,

'भल्या गृहस्था ! आम्हाला असाच धडा शिकवला पाहिजे. आम्ही सारे नोकरशहा असेच असतो. आम्हाला अद्दल घडलीच पाहिजे !'

ते गृहस्थ पुन्हा एकदा मनापासून खूप हसले. खिशातून रूमाल काढून त्यांनी आपले डोळे टिपले. खालाबुडानी खिशातून चेकबुक काढलं व ताबडतोब जरूर तो चेक लिहिला.

५ जुलैला सुगीचा समारंभ आम्ही साजरा केला. हा आमचा नेहमीचा जुनाच सुट्टीचा दिवस असे. हा एक महत्वाचा दिवस म्हणून आमच्या दिनदर्शिके-वर दाखवण्यात येत असे. हा दिवस कशा तऱ्हेनं पाळायचा हेही आमचं सर्व फार पूर्वीपासून ठरलेलं होतं. यावेळेस मात्र कॉलनीचं एकंदर दर्शन घडवायचं अशी आमची मुख्य कल्पना होती. आमची इतर सारी बहुतेक कामं संपलेली होती. या कल्पनेनं आमच्या मुलांना अगदी पक्कं घेरलेलं होतं. त्यामुळे त्याच्या तयारी-साठी काही खास हुकूम काढावे लागले नाहीत. तर आपोआपच सगळ्यांनी निश्चयपूर्वक भाग घेतला. असं ठरवलं की सर्व काही अगदी उत्तम तऱ्हेनं झालं पाहिजे. आता तशा काही उणीवा आमच्या कॉलनीत राहिल्या नव्हत्या. बिछान्या-वर लाल रंगाची ब्लँकेट्स आली होती. आमच्या बाजूच्या तलावातलं पाणी स्वच्छ झाल्यामुळे लकाकत होतं. बाजूच्या टेकडीच्या उतारावर पुढे फळबागा लावण्यासाठी आम्ही नवीन सात ओटे तयार करून ठेवले होते. अशी एकंदर व्यवस्था झाली होती. सिलँटी डुकरांना मारत होता. बुत्साईच्या संमिश्र तुकडीनं जागजागी माळा व घोषणा लावल्या होत्या. कोस्टचा व्हेटकोव्हस्कीनं मुख्य दरवाजाच्या कमानीवर अतिशय कुशलपणानं खालील अक्षरं रंगवली होती :

'जगातील सर्व देशांवर राबणाऱ्या लोकांचा लाल झेंडा फडकू दे.'

दुसऱ्या बाजूला 'फारच छान' असे शब्द लिहिले होते.

२ तारखेला तेरावी संमिश्र तुकडी चांगले कपडे करून झेबेलच्या नेतृत्वाखाली समारंभाची बोलावणी करण्यासाठी शहरात गेली.

त्या दिवशी रायच्या शेतातल्या अर्ध्या एकरातली कापणी करायची म्हणून तेवढी जागा लाल छोटे बावटे लावून आखून ठेवली होती. तिकडे जाणारा रस्ता

पताका व माळांनी सुशोभित केला होता. प्रवेशद्वाराशी एक टेबल स्वागत समिती-साठी ठेवण्यात आलं होतं. सहाशे पाहुण्यांना मेजवानीसाठी बसता यावं अशा तऱ्हेनं तलावाच्या वरच्या बाजूला टेबलांची मांडणी करण्यात आली होती. टेबला-वर पांढऱ्या शुभ्र चादरी पसरल्या होत्या व त्यावर फुलं भरलेल्या फुलदाण्या ठेव-लेल्या होत्या. जेवणघरात काम करणारे पांढरे कपडे घालून तिथं वावरत होते.

सिलेन्की व झायचेन्को यांनी लाल रंगाची अर्धी चड्डी, त्यावर पांढरा शर्ट व डोक्यावर कॉकेशियन पद्धतीची टोपी असा वेष केला होता. दोघेही मोलोडेट्स् आणि मेरी यांच्यावर स्वार होऊन मोठ्या प्रवेशद्वाराच्या बाहेर रस्त्यावर उभे होते. दोघांच्याही खांद्यावरुन सशाच्या कातडीपासून बनविलेली झूल घातलेली होती. वान्या झायचेन्कोनं एका आठवड्यात आमचे सगळे १९ बिगुलचे इशारे शिकून घेतले होते. आमच्या बिगुलच्या तुकडीचा कमांडर गॉर्कोव्हस्की यानं वान्या हा सगळ्यात हुशार झाला आहे म्हणून त्याला समारंभाच्या दिवशी बिगुल वाज-वायच्या कामावर ठेवण्याची शिफारस केली होती. या दोघांनी आपले बिगुल रिब-नने बांधून खांद्यावरुन सोडले होते.

१० वाजता रायझोव स्टेशनकडून आमचे पहिले पाहुणे हजर झाले. हे खार-कोव्ह कोम्सोमोल संघटनेचे प्रतिनिधी होते. आमच्या दोघा घोडेस्वारांनी रिकिबीत व्यवस्थित पाय ठेवून बिगुल तोंडाला लावून स्वागताचा इशारा तीन वेळा दिला.

समारंभाला हळूहळू सुरवात झाली होती. मुख्य प्रवेशद्वाराजवळ स्वागत समितीच्या मुलांनी पाहुण्याचं स्वागत केलं. यांनी पाहुण्यांच्या सदऱ्यावर लाल रिबनने बांधलेल्या रायच्या तीन ओंब्या पिनने टोचल्या. तसंच प्रत्येकाला तिकिट देण्यात आलं. या तिकीटावर अत्यंत आदरणीय भाषेत तुकडीचा आकडा व कमांडरचं नाव लिहीलेलं होतं. त्या पाहुण्यांनी कुठल्या टेबलावर मेजवानीसाठी बसावं हेही त्यावर दर्शवण्यात आलं होतं.

पाहुण्यांना कॉलनीमध्ये फिरायला नेण्यात आलं. एवढ्यात पुन्हा एकदा दुसरे पाहुणे आल्याचा इशाऱ्याचा बिगुल वाजला.

हळूहळू कॉलनीचं आवार पाहुण्यांनी भरू लागलं. खार्कोव्हच्या कारखान्या-तले प्रतिनिधी, जिल्हा कार्यकारी समितीचे कर्मचारी, शिक्षणखात्याचे प्रमुख शेजारच्या गावातले गावकमिटीचे लोक, वार्ताहर वगैरे मंडळी पायीपायीच आली होती. झुरिन्स्काया, युरियेव्ह, क्लॅमेर, ब्रेगेल, कॉ. झोया व इतर पार्टी संघटनेची मंडळी व आमचा व्यवस्थित रहाणारा दोस्त हे सर्व मोटारगाड्यांतून आले. खाला-बुडाही आपल्या जुन्या फोर्ड गाडीतून आला. त्याचं स्वागत कमांडर कौन्सिलने केलं. सबंध कमांडर कौन्सिल त्याला भेटलं. ते सारेजण मुद्दामच तिथे जमा झाले होते. त्यांनी त्याला गाडीतून एकदम ओढून हवेत उडवलं. आमचा तो व्यवस्थित

कपडयातला मित्र गाडीच्या दुसऱ्या बाजूला उभा राहून हसत गंमत पहात होता. खालाबुडाला मुलांनी जमिनीवर ठेवल्यावर ते महाशय पुढे आले व म्हणाले,

'यावेळी तुझ्याकडून काय उपटायचं त्यांनी ठरवलंय ?'

खालाबुडाला जरा रागच आला. तो म्हणाला, 'माझ्याकडून ते काही उपटणार नाहीत असं तुला वाटतं का ? काहीतरी उपटायचं हे त्यांचं कामच आहे.'

'तू सांग पाहू, यावेळी काय मागितलंस ते ?'

'यावेळी त्यांनी माझ्याकडून ट्रॅक्टर उपटला. फोर्डसनचा ट्रॅक्टर, समजलं ? आता आणखीन उडवलंत म्हणून दुसरं काही मिळणार नाही हं !'

खालाबुडाला पुन्हा एकदा मुलांनी हवेत उडवला आणि मग मुलं त्याला कुठेतरी दूर घेऊन गेली. कॉलनीचं सबंध आवार माणसांनी फुलून गेलं होतं. एखाद्या शहराच्या मोठया रस्त्याचं स्वरूप त्याला आलं होतं. कॉलनीतली मुलं छोटी छोटी फुलं आपल्या सदऱ्यांवर खोचून बाजारातल्या छोटया छोटया रस्त्यांवरून फिरत होती. आलेल्या पाहुण्यांकडे हसून बघत व कॉलनीमध्ये इकडेतिकडे फिरवून त्यांना दाखवत होती.

बारा वाजता सिलेन्की व झायचेन्को मुख्य प्रवेशद्वार सोडून आत आले व घोडयावरून खाली उतरून नताशा पेट्रेन्कोच्या कानात काहीतरी कुजबुजले. त्यानंतर सिनेन्की हसणाऱ्या पाहुण्यांच्या व मुलांच्या घोळक्यातून दौडत आमच्या शेताकडे गेला. एकदोन मिनिटांनी शेताच्या बाजूने सिनेन्कीचा बिगुल सर्वसाधारण सभेचा इशारा देण्यासाठी वाजला व वाऱ्या झायचेन्कोच्या बिगुलानं त्याला प्रतिसाद दिला. साऱ्या कॉलनीची मुलं मधल्या चौकात जमा झाली. सर्वजण ओळीनं आपापल्या जागी उभे राहिले. मिटया मिसीनोव्ह एक हिरवी पताका घेऊन डाव्या बाजूला जाऊन उभा राहिला. हे सर्व पाहून मला मनोमन आनंद वाटला. त्या आनंदी व उत्साहानं मुसमुसणाऱ्या मुलांच्या ओळी त्यांच्या निळया व पांढऱ्या गणवेशात उभ्या होत्या व जणूकाही आलेल्या पाहुण्यांची दृष्टी, आवडनिवड व सवय या कल्पनांना आव्हान दिलं व त्यांच्याकडून वाहव्वा मिळवली. इतका वेळ मुलांशी मिसळून हसत असलेले व मुलांचे लाड करणं चांगलं असं समजणाऱ्या पाहुण्यांचे चेहरे एकाएकी गंभीर व तटस्थ झाले. माझ्या पाठीमागे यूरियेव्ह उभा होता. तो मोठयानं म्हणाला,

'अँटन सेमियानोविच, उत्तम. असंच पाहिजे.'

मुलं ओळीत सरळ उभी राहिली. ती राहून राहून माझ्याकडे बघत होती. त्यांना पूर्ण विश्वास होता की सर्व काही व्यवस्थित झालंय व पुढच्या सूचना द्यायला मी उशीर करू नये.

'सावधान ! बावटयाला सलाम करा.'

भिंतीच्या मागच्या बाजूने आपली पावलं अतिशय तालबद्ध रितीने टाकत नताशा तिच्या तुकडीसह उजव्या बाजूला येऊन उभी राहिली.

मी दोन शब्द मुलांना सांगितले. त्यांना सुट्टीबद्दल शुभेच्छा दिल्या व त्यांच्या आजच्या विजयाबद्दल अभिनंदन केलं.

'आता आपण बुरुनच्या नेतृत्वाखाली असलेल्या पहिलं सुगीचं काम करणाऱ्या आठव्या संमिश्र तुकडीला सलामी देऊ या.'

पुन्हा एकदा शुभेच्छा देणारा बिगुल वाजला व आठवी संमिश्र तुकडी आमच्या मळ्याच्या बाजूनं गेली. आमच्या पाहुण्यांनो, मला तुमच्या भावना समजतात. तुमच्या विस्मयचकीत रोखलेल्या नजरा मला दिसताहेत. आज मलासुद्धा, कधी नव्हे तो, प्रथमच आठव्या संमिश्र तुकडीच्या या भरीव कामगिरीबद्दल फार कौतुक वाटत आहे. कदाचित तुमच्यापेक्षा मला हे सर्व पहायची संधी जास्त मिळाली असेल.

ती तुकडी बुरुनच्या नेतृत्वाखाली होती. बुरुन, आमचा अनुभवी, हा कॉलनीचं काम करणाऱ्या तुकडीचं प्रथमच नेतृत्व करत होता असं नाही. त्याच्या हातात चकाकणारं डेझीच्या रानफुलांनी सजवलेलं ते दाताळ खुरपं त्यानं त्याच्या मजबूत खांद्यावर धरलेलं होतं. आज बुरुन राजबिंडा दिसत होता व हे त्याचं सौंदर्य फक्त मीच ओळखू शकत होतो. कारण मला माहीत होतं की ही काही नाट्यदृश्यातली व्यक्ती नव्हे. किंवा चांगला दिसणारा नुसताच एक चांगला मुलगा नव्हे तर मुख्यत्वेकरून तो एक उत्साही कमांडर आहे, आपण कुणाचं नेतृत्व करतो व ते कशा तऱ्हेनं करायचं हे जाणणारा. बुरुनच्या त्या शांत, गंभीर चेहऱ्यावर त्याच्यासमोर असलेल्या कामाबद्दलचे विचार मी समजू शकतो. कारण अर्ध्या तासाच्या वेळात त्याला अर्ध्या एकरातील रायच्या पिकाची कापणी करायची होती. आमच्या आलेल्या पाहुण्यांना हे दिसत नव्हतं व आणखीही याच्याही पलिकडे त्यांना असलेलं माहीत नव्हतं. आजची कापणी करणाऱ्या तुकडीचा कमांडर हा एक वैद्यकीय विद्यार्थी होता. अशा तऱ्हेच्या दुहेरी कामगिरीतून आमची सोविएत शैली उत्तम रितीने दिसून येत होती. होय. अशा अनेक गोष्टी आमच्या पाहुण्यांना दिसत नव्हत्या व ते पाहूही शकणार नव्हते. फक्त ते आता बुरुनकडे पहात होते एवढीच सत्य गोष्ट होती. चार हातावर बुरुनच्या पाठीमागे आणखी १६ जण पांढरे स्वच्छ सदरे घातलेले व फुलांनी सजविलेले विळे घेऊन जात होते. १६ जण. त्यांना मोजणं सोपं होतं आणि त्याच्यात एकएक कितीतरी यशस्वी नावं होती. काराबानोव, झादारोव्ह, बेलुखीन, शैनेडर, जॉर्जीयोव्हस्की वगैरे......शेवटच्या बाजूला नवे गॉर्कीइट्स, व्होस्कोबॉयनिकोव्ह, स्त्राटकोव्ह, पेरेट्स व कोरोटकोव्ह हे होते.

या कापणी करणाऱ्यांच्या मागून १६ मुली गेल्या. त्यांनी आपल्या डोक्यात

फुलं भरलेली होती व प्रत्येकीच्या हृदयात सोविएतबद्दलचा आदर भरलेला होता. या मुली कापलेल्या रायचे जुडगे बांधणार होत्या.

आठवी संमिश्र तुकडी आमच्याकडे येत असताना, कापणी करणारी दोन यंत्रे दोन घोड्यांनी ओढत आणली. घोड्यांच्या आयाळी व त्या कापणी यंत्रांची पाती ही फुलांनी सजविलेली होती. प्रत्येक घोड्यावर एकेकजण बसला होता. अॅन्टन ब्रातचिन्को हा एका यंत्राच्या बैठकीवर बसला होता व गॉर्कोव्हस्की दुसऱ्या यंत्राच्या बैठकीवर. या कापणी करणाऱ्यांच्या पाठीमागे घोडे जोडलेले फाळ व त्याच्या पाठीमागून पाणी भरलेलं पिंप गॅलॅटेन्को नेत होता. हा मुलगा कॉलनीतला सर्वात आळशी. असं असूनही त्याला कमांडर्स कौन्सिलनं आठव्या तुकडीत जागा दिली होती. यावेळी सगळा आळस टाकून देऊन खूप परिश्रम घेऊन गॅलॅटेन्कोनं ती पाण्याची पिंपं फुलांनी सजविली होती. ती पाण्याची पिंपं दिसत नसून जणू फुलांचे ताटवेच वाटत होते. इतकंच काय पण त्यांनी गाडीची चाकंसुद्धा फुलांनी मढविली होती. गॅलॅटेन्कोच्या मागून 'रेड क्रॉस'ची गाडी चालली होती. त्याच्यामध्ये एलेना मिखायलोवना ही जुनी परिचारिका व रमेना बसल्या होत्या. ही सर्व व्यवस्था काही अनुचित प्रकार घडल्यास तयार ठेवण्यात आली होती. आठवी संमिश्र तुकडी मुलांच्या समोर येऊन ठाकली. लापोट आपल्या ओळीमधून बाहेर आला व त्यानं त्यांना उद्देशून भाषण केलं :

'आठवी संमिश्र तुकडी. तुम्ही उत्तम कोम्सोमोल आहात, उत्तम कॉलनीस्ट आहात, उत्तम कॉम्रेडस आहात. म्हणून आम्ही सर्व कॉलनीतल्या लोकांनी पहिली कापणी करण्याचा मान तुम्हाला दिलेला आहे. तुम्ही ते उत्तम प्रकारे पार पाडा व आपल्या कॉलनिस्टांना कसं काम करायचं व कसं रहायचं ते दाखवून द्या. कमांडर कौन्सिल तुमचं अभिनंदन करत आहे व तुमचा कमांडर कॉ. बुरुन यानं सर्वांचं नेतृत्व करावं अशी अपेक्षा करत आहे.'

आज करण्यात आलेली भाषणं कोणी तयार केली होती हे कोणालाच माहीत नव्हतं. अशा तऱ्हेची भाषणं दरवर्षी केली जात व ती बहुधा कमांडर्स कौन्सिलमध्ये तयार केली जात असावी. त्यासाठी ती भाषणं सर्व मुलं अगदी मनोभावे ऐकत असत. आज सर्वजण अगदी श्वास रोखून पहात व ऐकत होते. बुरुन माझ्याजवळ येऊन त्यानं माझा हात आदरानं दाबला व नेहमीचे ते रूढ शब्द म्हणाला,

'कॉम्रेड डायरेक्टर मला आठव्या संमिश्र तुकडीबरोबर काम करायला तुम्ही परवानगी द्यावी. बाकी इतर मुलांना मला मदत करू द्यावी.'

याला मी पण आमचं ठरलेलं उत्तर दिलं.

'कॉम्रेड बुरुन, आठव्या संमिश्र तुकडीचं तू पुढारीपण कर व बाकीची मुलं तुम्हाला मदत करतील'

त्यावेळेपासून बुरुन कॉलनीचा कमांडर झाला. त्यानं इकडेतिकडे जरा व्यव-

स्थित करण्यात फरक केले व दुसऱ्याच क्षणी सर्व कॉलनी मुलं त्याच्यामागे जाऊ लागली. कापणी व मळणी करणारी यंत्रे बँडच्या व बावटयाच्या मागून चालली होती व त्यांच्या मागून सारी मुलं जाऊ लागली. पाहुणेमंडळीही त्यांच्या पाठोपाठ जाऊ लागली. ही मंडळीसुद्धा बरोबर शिस्तीत जात होती. ती पण दोन दोन तीन-तीनच्या ओळी करून ती बरोबर तालात जात होती. खालाबुडा माझ्या बाजूनं चालत होता. तो त्या आमच्या त्या निनावी मित्राला सांगत होता :

' लक्षात ठेवा, त्या ब्लँकेटस्चं प्रकरण जर झालं नसतं तर आज मी सुद्धा विळा माझ्या खांद्यावर घेऊन त्यांच्याबरोबर कापणी करायला गेलो असतो. '

मी सिलांटीला मानेनं खूण केली. तो लगेच शेताकडे गेला. अर्धा एकर झाल्यावर बुरून थांबला व बाकीची मुलंही थांबली. बुरून नेहमीच्या पद्धतीप्रमाणे कॉलनीच्या मुलांना उद्देशून म्हणाला,

' सीडर कार्पोविच खालाबुडा यांना झादारोव्हच्या छोटया तुकडीत पाचवा कापणीदार म्हणून घ्यावं अशी एक सूचना आली आहे. आठव्या संमिश्र तुकडीची याला काही हरकत आहे काय ? '

मुलं हसली व त्यांनी टाळ्या वाजविल्या. बुरूननं फुलांनी सजविलेला विळा सिलांटीच्या हातून घेतला व तो खालाबुडाच्या हातात दिला. सीडर कार्पोविचनं आपलं जाकिट काढून ते जवळच्या गवतावर मोठ्या उत्साहानं फेकलं व विळा हातात घेतला.

' आभारी आहे ' असं विळा घेऊन ते म्हणाले. खालाबुडानं झादारोव्हच्या ओळीत पाचवा नंबर घेतला. झादारोव्हनं आपलं बोट धरून त्याला सांगितलं,

' हे पहा, तुमचा विळा जमिनीला टेकता कामा नये. नाहीतर आपल्या रांगेची बदनामी होईल. '

' अरे, तसं काही होणार नाही. मी बघ कसं करतो ते. तुम्हालाही दाखवतो.'

मुलांच्या रांगा शेताच्या एका बाजूला उभ्या होत्या. ज्या जागेवर प्रथम रायच्या ओंब्यांची पेंढी बांधायची होती, त्या जागी बावटा फडकत होता. बुरुन व नताशा दोघेही बावटयाजवळ आले व झोरेन ती पेंढी हातात घेण्यासाठी तयारीत उभा होता.

' सावधान '

बुरुननं कापणीला सुरुवात केली. थोडयाशाच फटक्यात त्यानं नताशाच्या पायाशी कापलेल्या रायच्या लांब ओंब्यांचा ढिग ठेवला. नताशानं एक दोरी घेतली. तिनं ती रायची पेंढी बांधली. दुसऱ्या दोन मुलींनी त्याला हार घातला. तेवढया श्रमानं लाल झालेल्या नताशानं ती बांधलेली पेंढी बुरुनच्या हातात दिली। बुरुननं ती पेंढी उंच हात करून खांद्यावर धरली व आमच्या नकटया झोरेनच्या हातात दिली. झोरेननं आपली मान उंच करून बुरुनचं बोलणं लक्षपूर्वक ऐकलं :

‘ ही पेंढी माझ्या हातातून घे. काम आणि शिक्षण हे दोन्ही करायचं. जेव्हा तू मोठा होशील, तेव्हा तू पण एक कोम्सोमोल हो. माझ्यासारखा पहिलं पीक कापण्याचा मान मिळव.’

झोरेनचा हा मोठा गौरव होता. त्यानं बुरुननं सांगितलेल्या वचनाला त्याच्या किणकिणत्या आवाजात उत्तर दिलं,

‘ ग्रिशा, मी तुझा फार फार आभारी आहे. मी शिकेन व कामही करीन. मोठा झालो की मी पण कोम्सोमोल होईन. मी प्रयत्न करोन व पहिल्या पिकाच्या कापणीचा मान मिळवीन व कॉलनीतल्या लहान मुलाला ती पेंडी देईन.’

झोरेननं ती पेंढी घेतली व त्याच्यामागे पार दडून गेला. दुसरी मुलं फुलांनी सजविलेली छोटी गाडी घेऊन त्याच्याकडे धावली. झोरेननं ती पेंढी गाडीवर ठेवली.

हे झाल्यावर ती पहिली पेंढी व बावटा दोन्हीही उजव्या बाजूला नेऊन ठवली.

बुरूननं पुन्हा हुकूम केला.

‘ कापणी करणारे व पेंढया बांधणारे यांनी आपली जागा घ्यावी. ’

सर्व मुलं भराभर शेताच्या चारी बाजूना, त्यांना नेमून दिलेल्या जागेकडे धावली. आपल्या रिकीबीत पाय ठेऊन सिनेन्कीनं बिगुल वाजवून इशारा दिला. लगेच ते सतरा जण कापणी करणारे शेतात सारीकडे फिरले. त्यांनी कापणी यंत्रे मागून यावीत म्हणून एका गवताचा पट्टा काढला.

मी माझं घडयाळ पाहिलं. कापणी करणारे हात चालत होते व पेंढया बांधणारे त्या भराभर बांधून बाजूला ठेवत होते. आता मात्र खरी परीक्षेची वेळ होती. आंतोन व विट्का हे चांगल्या धष्टपुष्ट व भरपूर विश्रांती घेतलेल्या घोडयावर स्वार झाले होते.

‘ चला पळा ’ असा त्यांनी घोडयांना इशारा दिला.

कापणी यंत्रे गवत कापून काढलेल्या पट्टयावर आणली. दुसऱ्याच क्षणी ती यंत्रे रायच्या पिकातून नागमोडी वळणानं जाणार होती. बुरून त्या यंत्रांची प्रगती डोळे व कान एक करून बघत होता. गेल्या काही दिवसात ॲन्टन व शेरे यांच्याबरोबर अनेकदा याची चर्चा झाली होती. तसेच त्या यंत्रांची पण दुरूस्ती झाली होती. त्यांची शेतात दोन वेळा चाचणी पण झाली होती. घोडे जर नीट धावले नाहीत, कापणी मध्येच अडली किंवा थांबली तर आमच्या फजितीला पारावार नव्हता.

पण बुरुनचा चेहरा हळूहळू निवळू लागला. कापणी यंत्रे आवाज करत हळूहळू व्यवस्थित पुढे चालली होती. घोडेही खुशीत येऊन योग्यप्रकारे धावत होते. वळणावरसुद्धा त्यांचा वेग कमी झाला नाही. मुलंही त्यांच्या जागेवर हालचाल

न करता ताठ बसून होती. एकापाठी एक फेऱ्या चालू होत्या. तिसऱ्या फेरीच्या वेळी ती यंत्रे मोठ्या थाटात आमच्याजवळून गेली. अँटननं बुरूनला हाक मारली.

' कॉम्रेड कमांडर, सर्व काही ठीक आहे. ' बुरूननं मुलांच्या रांगांकडे वळून विळा वर धरून म्हटलं : ' सावधान '

मुलांनी त्यांचे हात खाली नेले. पण त्यांच्यातला उत्साह उसळून वर येत होता व त्यांना स्नायूंना आवरून आणणं कठीण झालं होतं.

' चला, शेतात पळा. '

बुरूननं आपला विळा खाली केला. तीनशे पन्नास मुलं शेतात धावली. त्यांचे हात व पाय पडणाऱ्या कणसांमधून चमकत होते. हसत खिदळत एकमेकांना धक्के देत मुलं ती पडणारी कणसं बांधत होती. त्या कापणीयंत्राच्या मागे धावत होती. दोन-दोन तीन-तीन जण कणसांच्या ढिगावर तुटून पडत होती. प्रत्येकजण एकेक-ढिगावर आपल्या तुकडीसाठी हक्क सांगत होते.

' हा ढिग पंधराव्या तुकडीला, हा ढिग नवव्या तुकडीला वगैरे... '

पाहुणे या सर्वांकडे कौतुकानं पहात हसत होते. खालाबुडा आता आमच्या-जवळ परत आला होता. तो ब्रेगेलकडे डोळे वटारून पहात म्हणाला,

' पहा, पहा जरा, आणि तुम्ही नुसती नावं ठेवा ! ' ब्रेगेल नुसती हसली.

' ठीक आहे. मी पहात आहे. ही मुलं खरोखर आनंदानं उत्तम काम करताहेत. पण फक्त हे कामंच होतंय नुसतं !'

खालाबुडानं विचित्र आवाज काढला. ब्रेगेलशी तो आणखी काही बोलला नाही. उलट त्या निनावी गृहस्थाकडे रागानं बघत म्हणाला : ' या बाईशी बोल-ण्यात काही अर्थ नाही. '

युरयेव्ह अगदी खुषीत होता. त्यानं माझा हात दाबला व झुरीन्स्कायाला उद्देशून तो म्हणाला :

' खरोखर हे पाहून विचार येतो. मी तर हेलावूनच गेलोय. मला समजत नाही. आज सुट्टीचा दिवस आहे, कामाचा नाही. पण मला वाटतं हा सारा कष्टाचा गूढपणा आहे. मला काय म्हणायचंय ते समजलं ना ?'

तो निनावी मित्र युरयेव्हकडे एकाग्रतेनं बघत म्हणाला : ' त्यात गूढ कसलं हो ! कदाचित असेलही. पण उगाच शब्दजंजाळ कशाला वाढविता ? मला यात काय आवडलं ते सांगतो. ती मुलं आनंदी आहेत, समाधानी दिसताहेत. ती चांगली संघटित आहेत व काम कसं करायचं ते त्यांना बरोबर कळलंय. सुरुवातीला हे इतकं खूप झालं. खरोखर मला असं वाटतं. ब्रेगेलबाई तुम्हाला काय वाटतं ?'

ब्रेगेलला विचार करायला वेळ नव्हता. एवढ्यात सिनेन्की मोलोडेट्स्चा लगाम धरून आमच्यापुढे आला व बोलला.

'बुरुननं मला पाठवलंय. ते आता कणसाची रास करताहेत. सर्वांनी तिकडे चला.'

त्या राशीभोवती बावटयाजवळ उभं राहून आम्ही 'आंतरराष्ट्रीय गीत' म्हटलं. त्यानंतर भाषणं झाली. काही चांगली काही वाईट. पण सर्व अगदी मनापासून केलेली होती. ती सारी माणसं चांगली व संवेदनाशील. कष्टकरी देशाचे नागरिक. समारंभ पाहून त्यांचं मन भरून आलं होतं. त्यातच निरभ्र आकाश व रातकीडे यांचा आवाज आनंद देत होता.

शेतातून परत आल्यावर सर्वजण जेवायला बसले. कोण किती महत्वाचा किंवा कोण लहान मोठा असा भेदभाव कुणाच्याही मनात आला नाही. आज कॉम्रेड झोयासुद्धा हसत होती व विनोदात भाग घेत होती.

समारंभ खूप उशीरापर्यंत चालला होता. त्यानंतर खूप खेळ वगैरे झाले. एका खेळात खालाबुडाचे डोळे बांधले होते व त्याच्या हातात एक दोरी दिली होती. एक लहान मुलगा घंटा वाजवत पळत होता. पण खालाबुडा काही त्याला पकडू शकला नाही. पाहुण्यांना त्यानंतर तलावावर हातपाय धुण्यासाठी नेलं होतं. त्यानंतर मधल्या चौकात मुलांनी छोटासा करमणुकीचा कार्यक्रम केला. याची सुरुवात भावनाप्रचूर संगीतानं झाली. ते अगदी लयबद्ध होतं. पुढील पाच वर्षांत त्यांना काय काय पाहिजे आहे; त्यांना स्वतःचं एक सोविएत, आवारात एक नवा वर्कशॉप, जवळच्या टेकडीवर एक फळबाग, वीजेवर चालणारी बोट. ह्या कवितेचा शेवट खालील शब्दांनी केला होता :

'आमचे स्नायू येत्या पाच वर्षात पोलादाचा कणखरपणा घेतील, रबरी धावांचा नाही.'

रात्री आम्ही तलावाच्या काठी दारूकाम केलं. फटाके चंद्रज्योती वगैरे उडवल्या. त्यानंतर आमचे पाहुणे रायझोव स्टेशनकडे गेले. मोटारगाड्याही निघून गेल्या. आमचा निनावी दोस्त जाण्यापूर्वी मला म्हणाला.

'कॉम्रेड माकारेन्को, हे असंच चालू ठेवा. फारच छान आहे.' मी फक्त नमस्ते केलं.

□

# १२

# जीवनाचा प्रवाह

असेच दिवस चालले होते. काही चांगल्या तऱ्हेनं तर काही वाईट तऱ्हेनं. काही दिवस काळजीचे असत, तर काही दिवस यशाचे असत. काही काही अडचणी अशा येत की ज्यामुळे पावलं पुढं कशी टाकावी व पुढच्या आयुष्याची कशी जडण-घडण करावी त्यावर आम्हाला लक्ष केंद्रित करता येत नसे. नेहमीप्रमाणे या दिवसातही आमचे कष्ट चालूच होते आणि कधीकधी संध्याकाळच्या शांत वेळी आमचे विचार पक्के होत. आमच्या मनात दिवसा घोळणारे विचार आम्ही व्यव-स्थित एकत्र करून आमच्या भविष्याचा सूक्ष्म व निसटता आराखडा प्रत्यक्षात आणला.

परंतु हा भविष्यकाळच वर्तमानकाळ ठरला व तो कुठल्याही तऱ्हेनं लेचापेचा न ठरता तो आम्ही चांगला मजबुतीनं हाताळू शकलो. हातातून निसटलेल्या संधीवर दु:ख करत न बसता किंवा आमच्या चुकांमधून आम्ही जे काही शिकलो त्यातून आमचं आयुष्य अनुभवानं जास्त संपन्न झालं. तरीही कधी जास्त चुका होत व त्यातून आम्ही बाहेर पडत असू.

पूर्वीप्रमाणेच आमच्यातले दोष काढण्यासाठी आमच्यावर सतत नजर ठेवली जात असे व वरचेवर दमदाटी पण होत असे. आमच्या हातून चुका होऊ नयेत असं आम्हाला बजावण्यात येई. आम्ही अशा रितीनं वागू नये, आम्हाला सिद्धांत माहीत असले पाहिजेत व आम्ही हे केलं पाहिजे, आम्ही ते नाही केलं पाहिजे...वगैरे.

आम्ही कॉलनीत एक छोटासा व्यवसाय सुरू केला होता. इकडून तिकडून धडपड करून आम्ही एक लाकडी सामान बनवायचा छोटा कारखाना, उत्तमपैकी साधनसामुग्री–यंत्रे, जुळणीयंत्र, करवती इत्यादी सामान–मिळवून आम्ही स्वतःच एका चरकयंत्राचा आराखडा बांधून एक यंत्र नाजूक कामं बनविण्यासाठी तयार केलं. आम्ही लोकांशी करार केले व आगाऊ पैसेही घेतले. बँकेत आमचं एक खातं उघडण्याचं धाडस केलं.

आम्ही मधमाशांची पोळीपण तयार करायला सुरुवात केली. हे तसं अगदीच साधं काम नव्हतं तर त्याला अतिशय लक्षपूर्वक काम करावं लागलं. पण लौकरच आम्ही त्यात प्राविण्य मिळवलं व शेकडो मधमाशांची पोळी तयार करू लागलो. आम्ही लाकूडसामान, दारूगोळा ठेवण्याच्या पेटया वगैरे गोष्टीही बनवत असू. तसंच आम्ही धातूचं सामान तयार करण्याचाही छोटा कारखाना उघडला. पण आमच्यावर त्या बाबतीत लवकरच पश्चाताप करायची वेळ आली.

अशा तऱ्हेनं महिने जात होते. सगळीकडून होणाऱ्या हल्ल्यांना तोंड देत होतो. कधीकधी नरमाईनं, कधीकधी आरडाओरडा करून, कधी नुसतंच हसून, कधी चांगला कडकडून चावा घेऊन किंवा आमच्यामध्ये येणाऱ्याला गप्प बसवून आम्ही जगत होतो व जास्तीत जास्त भरभराटत होतो.

आमचा मित्रपरिवारही खूप वाढला. शिक्षणखात्यात झरिन्स्काया व यूरयेव्ह हे तसे व्यवहारी व चांगल्या गोष्टी समजून घेणारे. आमच्या या कठीण कार्याचा तपशील समजावून घेण्याची इच्छा व तयारी दाखवणारे होते. तसंच समाजातही आम्हाला अनेक मित्र मिळाले. पक्षात, जिल्हा परिषदेत, वर्तमानपत्रात व अनेक कामगारमंडळींनी आम्हाला जगू देण्यासाठी चांगल्या तऱ्हेचं वातावरण तयार केलं.

आमच्यामध्ये संस्कृतीपण खोलवर रूजायला लागली. आमच्या शाळेमध्ये सहा वर्ग होते. बासीली मिखोलाएविच पर्स्की हा एक विलक्षण मनुष्य आमच्या कॉलनीत आला. हा एक डॉन क्विक्झोटसारखा युगायुगाचे तांत्रिक शोध, साहित्य व कला या कल्पनांनी झपाटलेला होता. तो उंच, बारीक व जणूकाही सर्वांटिसनं (डॉन क्विक्झोटचा लेखक) पर्स्कीला तयार केलेला होता व त्यामुळे पर्स्कीला आमच्या क्लबचं काम संघटित करायला व पुढे न्यायला खूप मदत झाली. हा खूप श्रम घेणारा व स्वप्नाळू होता. त्याच्या कल्पनेतल्या जगात चांगल्या व वाईट गोष्टी या नव्हत्याच. मी असं म्हणेन की ज्यांना ज्यांना क्लबचं काम सुरू करायचं असेल त्यांनी डॉन क्विक्झोटलाच बोलवावं. त्यांच्यात भविष्यकाळाकडे बघायची पात्रता असते. पुठ्ठा आणि रंग यातून विचित्र गोष्टी तयार करणं व त्यांच्या मार्ग-दर्शनाखाली ४० मीटर लांबीची भित्तीपत्रिका तयार करायची. साधे बाँब घेऊन जाणारं विमान पुठ्ठ्याचं तयार करायचं व लाकडापेक्षा धातू जास्त श्रेष्ठ आहे. त्यांच्या धमन्यातून रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत या गोष्टी ते सांगतात. हे

असले डॉन विवक्झोट क्लबचं काम उत्साहानं न थकता करणारे कलाकार तयार करण्याच्या कामी उपयोगी पडतात. पर्स्कीनं कोणत्या गोष्टी केल्या ते मी इथं सांगत बसत नाही; पण एवढंच सांगतो की त्यानं आमच्या संध्याकाळच्या वेळात मुलांकडून घोकंपट्टी करून मुग्धनाट्य करून एक नवीन उत्साह भरला.

आम्ही खूपसे पैसे पुस्तकखरेदीवर खर्च करत होतो. आमच्या पुस्तकांची कपाटं ठेवायला चर्चमधल्या वेदीचं व्यासपीठ पुरं पडत नव्हतं. आमच्या मुलांना वाचनालय पण नव्हतं. आणि अशा अनेक गोष्टी आम्ही केल्या.

प्रथम आम्ही कॉलनीचा बँड तयार केला. बँड संघटित करणारी आमची सबंध युक्रेनमध्ये किंबहुना सबंध सोविएत युनियनमध्ये ही पहिलीच कॉलनी असेल. यामुळे कॉ. झोयाला नेहमी जे वाटायचं की मी सेवानिवृत्त सैन्याधिकारी आहे तिला दुजोरा मिळाला. परंतु आमच्या मुलांना, कमांडर्स कौन्सिलला फार आनंद झाला. कॉलनीत बँड तयार करून आम्ही आमच्या कानांवर व मज्जातंतूवर फार मोठा ताण देत होतो. सतत चार महिने बँडमध्ये निरनिराळी वाद्यं वाजविणारे ते शिकण्यासाठी खुर्च्या, टेबलं, खिडक्या इ. कुठंही बसत. सबंध आवारात अशी एकही जागा नव्हती की जिथं हा आवाज होत नसे. परंतु एक मेच्या दिवशी आम्ही आमच्या बँडच्या मागे कवाईत करत शहरांकडे गेलो. खारखोव्हच्या लोकांना आश्चर्य व आनंद वाटला. म्हाताऱ्या बायका, वर्तमानपत्राचे बातमीदार व रस्त्यातील मुलं यांना अतिशय आनंद झाला.

आमची दुसरी मोठी कामगिरी म्हणजे सिनेमा. आमच्या आवारात असलेल्या त्या चर्चशी आमचा संबंध यामुळे येऊ लागला. त्या चर्चच्या मंडळाचे सभासद आमच्याकडे बघून हात चोळत किंवा आम्हाला दमदाटचा देत. परंतु आमच्या सिनेमाची वेळ व संध्याकाळच्या त्यांच्या प्रार्थनेची घंटा वाजण्याची वेळ, या दोन्ही एकाच वेळी होत. यापूर्वी अशा प्रकारचे मोठमोठे जमाव तेथे कधीच जमले नव्हते. याचा परिणाम किती लवकर झाला! तो चर्चची घंटा वाजवणारा घंटा घरातून खाली उतरतो न उतरतो व तो छोटा पाद्री आत येतो न येतो तोच २०० ते ३०० लोक क्लबच्या दाराशी रांग लावून उभे रहात. तो छोटा पाद्री आपले कपडे सारखे करी. तोपर्यंत हा तंत्रज्ञ सिनेमाची फिल्म त्या यंत्रात घालत असे. इकडे पाद्री स्तोत्र म्हणायला सुरुवात करी--

'देवाचं पवित्र स्थान......'

तोच आमचा सिनेमा सुरू होई. दोघांची अगदी एकच वेळ.

परंतु ह्या संबंधांचा आमच्या कॉलनीतल्या व्हेरा बेराझोवस्कायाच्या बाबतीत फार वाईट तऱ्हेनं शेवट झाला. व्हेरापण माझ्या कॉलनीतलीच एक होती. तिची एकंदर मूळची किंमत फारच मोठी. ती आमच्या कुठल्याच अंदाजात बसली नाही.

काही दिवस व्हेराला मूत्रपिंडाचा त्रास होता. तो संपल्यानंतर ती आपल्या

कामात गढून गेली होती. लवकरच ती चांगलीच तुकतुकीत व भरलेली दिसायला लागली. तिचे खांदे, डोळे, तिचं चालणं व आवाज या सर्वांना काहीएक वेगळाच आकार प्राप्त झाला होता. मी तिला पुष्कळदा कुणाच्या तरी शेजारी अंधारात पहात असे. त्यानंतर ती कमालीची बैचेन होत असे व तिच्या डोळ्यातली चमकही लुप्त होई. ती पुष्कळदा मोठ्या सभ्य आवाजात माझ्या आरोपाचं खंडन करायचा प्रयत्न करी. मलाच उलट विचारी......

'आन्तोन, तुम्हाला काय झालंय ? कोणी कोणाशी बोलू नये, असं तुमचं म्हणणं आहे का ?'

ज्या एखाद्या मुलीला विशिष्ट अनुभव आहे त्या मुलीला शिक्षण देताना शिक्षकाला बऱ्याच अडचणींना तोंड द्यावं लागतं. एखादा मुलगा अनेक वर्षे रस्त्यात भटकत असला किंवा अतिशय गुंतागुंतीच्या अत्यंत वाईट कामात त्यानं भाग घेत-लेला असला अथवा शिक्षणशास्त्राच्या प्रयत्नांना जरी त्यानं विरोध केला तरीही एखाद्या उत्तम सामुदायिकात त्याच्यात थोडीशी जरी बौद्धिक ठिणगी पाडायचा प्रयत्न केला तरी त्याचा एक चांगला माणूस बनू शकतो. पुष्कळदा वरची कारणं असायला कधीकधी तो मुलगा मंदबुद्धी असतो व त्याच्यात असलेली कमतरता आपल्याला बारकाईनं तपासणी केली तर भरून काढता येते. परंतु एखादी मुलगी, हिला लहान वयातच समागमाची संधी मिळाली तर ती शारिरीकदृष्टया व मानसिकदृष्टया मागे असते असं नाही. तर ती गंभीर, गुंतागुंतीच्या व ताप-दायक धक्क्याची शिकार बनलेली असते. तिच्याकडे विचित्र नजरेनं पाहिलं जातं. कधी वाईट नजरेनं, कधी सहानुभूतीनं, कधी उद्धटपणानं, तर कधी अतिशय कळकळीनं. या सगळ्या नजरा ती अपराधी आहे असा नकळत आरोप करणाऱ्या असतात. ते त्या मुलीला होणारं दुःख विसरू देत नाहीत. उलट तिच्यात असलेल्या कमतरतेची तिला सतत जाणीव करून देत रहातात. याचबरोबर या न्यूनगंडासह तिच्यामध्ये एक प्रकारचा रानटी गर्व वास करत असतो. इतर मुली तुलनेनं अगदीच कोवळ्या, लहान व ही मात्र अनुभवी स्त्री. हिनं कुणालाही माहीत नसलेल्या गुपिताचा अनुभव आधीच घेतलेला. पुरुषांवर सत्ता गाजविता येण्याची एक खास शक्ती, जी तिला फार जवळची व सोपी वाटते, अनुभवलेली असते. अशा तऱ्हेचं गुंतागुंतीचं, तापदायक, गर्वभरीत, श्रीमंत किंवा गरीब, रात्री अश्रू गाळणं व दिवसा प्रणयचेष्टा करणं, नवीन नवीन सवयी लावून घ्यायच्या, नवीन खबरदारी घेणं याला पोलादी मन असावं लागतं.

मला व्हेरा वेराझोवस्कायाच्या बाबतीत अनेक आपत्तींना तोंड द्यावं लागलं. कुर्याझला आल्यानंतर तिनं मला खूपच त्रास दिला व आपल्या आयुष्यात अनेक गुंतागुंती निर्माण करून ठेवल्या असा मला संशय येऊ लागला. तिच्याशी संभा-षण करायचं म्हणजे फार काळजीपूर्वक करावं लागे. केव्हाही काहीही झालं तरी

ती चिडचिडे व मलाच दोष देऊन दूर कुठेतरी जाऊन रडत बसे. असं असूनही दर वेळेला ती नवीन नवीन मित्रांच्या समवेत दिसे. ही दोस्ती तुटली तरी फारसा प्रश्न पडत नसे. कारण दोस्ती करणाऱ्याला कमांडर कौन्सिलच्या पुढं लापोटनं बोलावल्यावर उत्तरं द्यायची भीती असे. लापोट म्हणायचा,

'सरळ उभा रहा व काय झालं ते आम्हाला सांग.'

शेवटी व्हेराला कळून चुकलं की कॉलनीतला कुठलाही मुलगा आपल्याला बळी पडणार नाही, म्हणून तिनं बाहेर प्रेमाचे चाळे सुरू केले. रायझोवचा एक तारायंत्र चालवणारा एक तरुण–ज्याच्या जाकिटावर पिवळ्या रंगाची पट्टी होती व हे सुधारक असण्याचं मोठं लक्षण आहे असं तो समजत होता–त्याची व्हेरावर दृष्टी पडली. सुरुवातीला तो व्हेराला कुठेतरी झाडझुडुपात भेटत असे. मुलं त्याबद्दल तक्रार करत. पण व्हेराच्या पाठीमागे सतत नजर ठेवायचाही आम्हाला कंटाळा आला. लापोटनं एकदा दम देण्याचं काम केलं. त्यानं त्या तारायंत्रज्ञाला–सिल्वेस्ट्रोव–एकटा गाठला व सांगितलं,

'तू व्हेराला भलत्याच मार्गाला नेत आहेस. तुला तिच्याबरोबर लग्न करावं लागेल एवढं लक्षात ठेव.' आपलं तोंड बाजूला फिरवून तो तारायंत्रज्ञ म्हणाला,

'मी का म्हणून लग्न करू?'

यावर लापोटनं सांगितलं, 'हे पहा सिल्वेस्ट्रोव, ऐक. तू जर तिच्याबरोबर लग्न केलं नाहीस तर आम्ही तुला चांगली अद्दल घडवू. आम्ही कोण हे तू ओळखतोस ना? तू तुझ्या यंत्राच्या मागे लपू शकणार नाहीस आणि हे गाव सोडून तू दुसऱ्या शहरात निघून गेलास तरी आम्ही तुला शोधून काढू.'

व्हेरा सगळे घरबंध सोडून जरा फुरसद मिळाली की बाहेर पळत असे. मला जर ती कुठं वाटेत भेटली तर ती लाजे व उगाचच केसांवरून हात फिरवी आणि पळून जाई.

एके दिवशी तिलाही नशीबानं गाठलंच. संध्याकाळी उशीरा ती माझ्या कचेरीत आली व तिनं स्वतःला खुर्चीत झोकून दिलं. दोन्ही पायाला विळा घालून डोळे खाली वळवून ती जरा लाजली. तिनं परत मान वरती करून जरा मोठ्यानंच सांगितलं,

'मला तुम्हाला काही सांगायचंय.'

'ठीक आहे. सांग तुला काय सांगायचंय ते.' मी तिला उत्तर दिलं.

'मला गर्भपात करून घ्यावा लागणार आहे.'

'असं? तुला?'

'होय. मलाच. कृपा करा व हॉस्पिटलला जाण्यासाठी मला चिठ्ठी द्या.'

मी संथपणं तिच्या चेहऱ्याकडे पहात होतो. तिनं आपली मान खाली घातली.

'एवढंच मला सांगायचं होतं.' ती म्हणाली.

मी तरी गप्पच बसून राहिलो होतो. ती अर्ध्या मिटल्या डोळ्यांनी माझ्याकडे बघत होती. आता ती अगदीच निर्लज्ज झाली आहे एवढं मला कळून चुकलं. तिची नजर, तिच्या गालांचा रंग व तिचं बोलणं या साऱ्या गोष्टी तिच्या निर्लज्जपणाची साक्ष देत होत्या.

'यावेळी तुला मूल झालंच पाहिजे.' असं मी तिला थंडपणाने सांगितलं.

तिनं मोहक व तिरकस नजरेनं माझ्याकडे पाहिलं व आपली मान उडवली.

'नाही. मी ते होऊ देणार नाही.' ती म्हणाली.

मी काहीही उत्तर दिलं नाही. माझ्या टेबलाचा खण मी बंद केला व माझी टोपी डोक्यावर ठेवली. ती पण उठली व आशेनं माझ्या तोंडाकडे पहात राहिली.

'चल झोपायची वेळ झालीय,' मी तिला म्हटलं.

'पण मग त्या चिठ्ठीच काय? मला थांबता येणार नाही. तुम्हाला हे समजायला पाहिजे.'

आम्ही कमांडर कौन्सिलच्या अंधाऱ्या खोलीतून बाहेर पडलो व तिथं थांबलो.

'मी तुला अगदी स्पष्टपणे सांगतो व माझा निर्णय मी बदलणार नाही. यापुढे शस्त्रक्रिया नाही. यावेळी तुला मूल झालंच पाहिजे.'

'आईऽऽगं' असं मोठ्याने ओरडून व्हेरा धावत गेली व आपल्यामागं तिनं दरवाजा लावून घेतला.

तीन दिवसांनंतर ती मला मोठ्या फाटकात भेटली. मी शेजारच्या गावाहून परत येत होतो. ती माझ्या बाजूबाजूनं चालू लागली व शक्य तितक्या समजुतीच्या व बालीश स्वरात तिनं बोलायला सुरुवात केली.

'आन्तोन, तुम्ही काय थट्टा करता? पण मला ही थट्टा परवडणारी नाही.'

'तुला काय म्हणायचंय?'

'जसं काही तुम्हाला माहीतच नाही. मला चिठ्ठी पाहिजे आहे. तुम्हाला समजत नाही असा बहाणा तुम्ही का करता?'

मी तिचा हात धरला व शेताच्या बाजूनं आम्ही चालू लागलो.

'हे बघ, आता आपण इथे बसून बोलू.'

'त्याच्यात बोलण्यासारखं काहीच नाहीय. आणि बोलण्याचा उपयोग तरी काय? मला फक्त चिठ्ठी हवी आहे.'

'ऐक व्हेरा. मी बतावणीही करत नाही आणि थट्टाही करत नाही. आयुष्य म्हणजे एक गंभीर गोष्ट आहे व आयुष्यात खेळ करत रहाणं हे एकदम चुकीचं आहे. तुझ्या आयुष्यात एक फार मोठी गंभीर गोष्ट घडली आहे. तू प्रेमात पडली आहेस. मग ठीक आहे. तू त्याच्याशी लग्न लावून टाक'

'मला तुमच्या त्या माणसाशी काहीही कर्तव्य नाही. मी का म्हणून लग्न

करू ? मग काय पोरांना सांभाळत बसू ? तुम्ही फक्त मला चिठ्ठी द्या. कोण म्हणतंय मी प्रेमात पडले आहे म्हणून ? '

'तू प्रेमात नाही पडलीस, मग तू बाहेर काय करत होतीस ? '

'समजा, मी प्रेमात पडले असले तरी काय झालं ? तुम्हाला काय म्हणायचंय ते तुम्ही खुशाल म्हणा. '

'मी सांगतो तुला, मला काय म्हणायचंय ते. मी तुझा असला मूर्खपणा इथून पुढे चालू देणार नाही. तू एका माणसाजवळ खुशाल रहात होतीस आणि तू आता लौकरच आई होणार आहेस. '

'तुम्ही मला चिठ्ठी द्या पाहू.' असं म्हणून ती जवळजवळ किंचाळलीच व रडूही लागली.

'तुम्ही माझी अशी क्रूर थट्टा का करता ? '

'मी तुला चिठ्ठी देणार नाही. तू कितीही वेळा विचारलंस तरीही नाही. ही गोष्ट मी आता कमांडर कौन्सिलपुढे ठेवणार आहे. '

'अरे देवा ! ' असं ती जवळजवळ ओरडलीच व तिनं आपलं अंग गवतावर झोकून दिलं.

ती खूपच रडत होती. तिचे खांदे जोरजोरात हलत होते व श्वासही जोरजोरात होत होता.

मी शांतपणे तिथं उभा राहिलो. इतक्यात कलिंगडाच्या शेतातून गॅलॅटेन्को आला. खाली पडलेल्या व्हेराला त्यानं बराच वेळ पाहिलं व तो अगदी थंडपणे म्हणाला,

'तरी मी म्हणत होतो की इथं कसली फसफस चालली आहे ? अरे बाप रे ! व्हेरा आज रडते आहे ? ही तर नेहमी हसत असते आणि ही आज रडते आहे. '

व्हेरा एकदम गप्प झाली. ती गवतावरून उठली व तिनं आपले कपडे सारखे केले. एक जोराचा आवंढा गिळला. हात हलवत व आभाळाकडे बघत ती कॉलनीकडे चालत गेली.

'आन्तोन, इकडे आतमध्ये तुम्ही झोपडीत या ना. मी तुम्हाला एक झकासपैकी कलिंगड देतो. तिथं काही मुलंही आहेत.' असं गॅलॅटेन्को म्हणाला.

दोन महिने असेच गेले. आमचं आयुष्य एखाद्या चांगल्या आगगाडीसारखे व्यवस्थित चाललं होतं. कधीकधी आगगाडी वेगात असे. एखाद्या पुलावरून जाताना गती कमी करुन, धूर सोडत, आवाज काढत उतरते असंच आमच्या आयुष्याबरोबर व्हेराचं आयुष्यही चाललं होतं. परंतु ती आमच्या गाडीत विनातिकीट प्रवास करणारी होती.

ती गरोदर आहे ही गोष्ट कॉलनीतल्या इतर मुलांपासून लपवून ठेवणं कठीण होतं. अर्थात तिनं हे आपलं गुपित आपल्या मैत्रिणींना कधीच सांगितलं

होतं. कारण बायकांच्या जवळ काही गुप्त गोष्ट रहात नाही. मलाही एक संधी मिळाली. अर्थात मला त्याची तशी जरूरी नव्हती. कॉलनीतल्या मुलांच्या औदार्याचं कौतुक करायची संधी मिळाली. व्हेराला कोणी डिवचलं नाही किंवा कोणी रागावलं नाही. आमच्या मुलांच्या दृष्टीनं गरोदर असणं किंवा मूल होणं म्हणजे काही लाजिरवाणी गोष्ट नव्हती किंवा दुर्दैवाचीही गोष्ट नव्हती. कॉलनीतल्या कुठल्याही मुलानं किंवा मुलीनं व्हेराचा अपमान करायचा प्रयत्न केला नाही किंवा तिच्याकडे तिरस्कारानं पाहिलं नाही. पण त्या सिलव्हेस्ट्रोव तारमास्तरबद्दल मात्र त्यांची वागणूक निराळी होती. परंतु सर्व दृष्टीनं या प्रश्नाचा विचार डॉरमिटरीज-मध्ये होत असे. किंवा संमिश्र तुकडचा क्लबमध्ये किंवा साफसफाई करताना किंवा इतर काही कामासाठी जमलेली असताना यावर चर्चा होई. लापोटनं अगदी सर्व काही ठरल्याप्रमाणे मला एक दिवस सांगितलं.

'आम्ही सिलवेस्ट्रोवजवळ बोलणार आहोत. तुमची काही हरकत का ?'

'माझी काही हरकत नाही. पण सिलवेस्ट्रोव बोलेल का ?'

'आम्ही त्याला इथंच आणण्याची व्यवस्था करतो. तो कसल्या प्रकारचा कोम्सोमोल आहे ते आम्हाला पहायचं आहे.'

त्या दिवशी संध्याकाळी सिलव्हेस्ट्रोवला झोरका व व्होलकोव घेऊन आले. त्या तशा खिन्न वातावरणातही मला माझं हसू आवरता येईना. त्याला सर्वांच्या मधोमध बसविण्यात आलं होतं. लापोटनं शेवटचा इशारा दिला : 'सावधान !'

सिलवेस्ट्रोवला कमांडर्स कौन्सिलची जबरदस्त भीती वाटली. तो खोलीच्या मध्यभागी तर गेलाच व अगदी सावधानतेनं उभा राहिला. कुठल्याही क्षणी एखाद्या परिकथेतल्या हिरोप्रमाणे ते कोडं सोडवायला किंवा कोणतंही धाडस करायला जिवंतपणे या संस्थेतून जायची त्याची तयारी होती. परंतु एकंदर परिस्थितीनं वेगळंच वळण घेतलं. कौन्सिलही हे कोडं आपल्या परीनं सोडवायचा प्रयत्न करत असताना सिलव्हेस्ट्रोव बसल्या जागेवरुन म्हणाला,

'मित्रांनो, मी काही एखादा गुंड वाटतो का ? मी वाईट आहे असं तुम्हाला का वाटतं ? तुम्ही म्हणता तिच्याशी लग्न कर. मी खरोखरच लग्न करायला तयार वाहे. पण तिनंच लग्न करायला साफ नकार दिलाय. मी काय करू ?'

'तिला लग्न करायचं नाहीय असं तुला कोणी सांगितलं ?' असं बसल्या जागेवरुन ताड्कन उठून लापोटनं विचारलं.

'होय रे बाबा ! स्वत: व्हेरानंच हे मला सांगितलंय.'

'ठीक आहे. झोरेन, जा. आपण तिलाच इथं बोलवू या. तिला घेऊन ये.'

झोरेन ताबडतोब खोलीबाहेर पळाला. दोन मिनिटांनी तो ऑफिसात परत आला. लापोटकडे बघत व व्हेरा जिथं बसली होती त्या ठिकाणाकडे बोट दाखवत मानेनं 'ती येत नाही' असं सांगण्याचा त्यानं प्रयत्न केला.

'ती येत नाही. मी तिला सांगितलं, तू चल. पण ती मला म्हणाली, चालता हो !'

लापोटनं आपली दृष्टी सबंध कौन्सिलवर फिरवली व ती फ्रेडरेन्कोवर स्थिर केली. फ्रेडरेन्को आपल्या जागेवरुन शांतपणे उठला. त्यानं सलाम केला व त्याच्या नेहमीच्या भसाडच्या आवाजापेक्षा हळू आवाजात म्हणाला,

'ठीक आहे.' व तो दाराकडे निघाला.

झोरेनही त्याच्या पाठोपाठ गेला परंतु वाटेत जरा अडखळला. सिलव्हेस्ट्रोव अगदी पांढरा फटक पडला होता व जणू काही तो जागच्या जागी अगदी थिजून गेला होता. सगळी मुलं त्या प्रेमवीराकडे बघत होती. मी उठलो व फ्रेडरेन्कोच्या पाठोपाठ बाहेर गेलो.

'फ्रेडरेन्को, तू परत जा. मी व्हेराला घेऊन येतो.'

फ्रेडरेन्को मुकाटयानं परत गेला.

व्हेरा आपल्या बिछान्यावर पुढे येणाऱ्या शिक्षेची व त्रासाची वाट बघत बसली होती. तिच्या हातात कसलं तरी एक पांढरे बटन होतं व ती ते फिरवत होती. झोरेन तिच्यासमोर उभा राहिला होता व तिला अगदी जोरजोरात सांगत होता,

'व्हेरा, चल चल. नाहीतर फ्रेडरेन्को येईल. त्यापेक्षा तू चल.' पुढे तो हळू आवाजात म्हणाला, 'तू जर गेली नाहीस तर तो तुला उचलून नेईल.'

मला पाहिल्याबरोबर झोरेन तिथून पळाला.त्यानं पळतेवेळी एक गिरकी घेतली.

मी व्हेराच्या बिछान्यावर बसलो. एकदोन मुली तिथं रेंगाळत होत्या. त्यांना मानेनं खूण करून जायला सांगितलं.

'तुला सिल्व्हेस्ट्रोव बरोबर लग्न करायचं नाही का ?'

'नाही करायचं.'

'नको करू. तुझं बरोबर आहे.'

त्या हातातल्या बटनाशी खेळत खेळत जणू काही आपण त्या बटणाशीच बोलतो आहोत असं दाखवत ती बोलली,

'प्रत्येकाचं म्हणणं आहे की मी लग्न करावं. पण मला करायचं नसलं तर जबरदस्ती का ? मला शस्त्रक्रिया करुन घ्यायची तुम्ही परवानगी द्या.'

'ते शक्य नाही.'

'द्या ना. एकदाच. मलाही कायदा माहीत आहे. मला एकदा शस्त्रक्रिया करून घ्यायची असेल तर कोणीही अडवू शकणार नाही.'

'आता फार उशीर झालाय.'

'झाला तर झाला. काही बिघडत नाही.'

'आता उशीर झालेला आहे आणि एकही डॉक्टर आता शस्त्रक्रिया करून द्यायला तयार होणार नाही.'

'ते करतील. मला माहीत आहे. त्या शस्त्रक्रियेला 'सिझेरियन ऑपरेशन' म्हणतात.'

'तुला माहीत आहे. त्याचा अर्थ काय तो ?

'अर्थातच. ते मला कापतील. बस.'

'पण ते अतिशय धोक्याचं असतं. तू मरशील सुद्धा.'

'काय बिघडलं ? मला मूल होण्यापेक्षा मरण आलेलं पत्करेल.'

मी माझा हात त्या बटणावर ठेवला. तिनं आपली दृष्टी तिच्या उशीकडे वळविली.

'हे बघ व्हेरा. डॉक्टरांनाही कायदा पाळावा लागतो. एखादी बाई नैसर्गिकरित्या जर मुलाला जन्म देऊ शकत नसली तरच ती शस्त्रक्रिया केली जाते.'

'मग माझ्याही बाबतीत तसंच समजा.'

'तुझ्या बाबतीत तसं नाही आहे. तुला मूल झालंच पाहिजे.'

तिनं माझा हात झिडकारून टाकला व ती एकदम उभी राहिली. तिनं हातातली बटणं बिछान्यावर फेकून दिली.

'नाही, मुळीच नाही. मला मूल नको आहे. तुम्हाला हे चांगलं माहीत आहे. मी स्वतःला फास लावून घेईन किंवा जाऊन पाण्यात जीव देईन. कोणत्याही परिस्थितीत मी हे मूल होऊ देणार नाही.'

तिनं स्वतःला बिछान्यावर झोकून दिलं व जोरजोरानं रडायला सुरुवात केली.

इतक्यात झोरेन आत आला व म्हणाला, 'लापोट विचारतोय की व्हेरा तिकडे येणार आहे की नाही ? सिलव्हेस्ट्रोवचं काय करायचं ?'

'त्याला सांगा की व्हेरा त्याच्याबरोबर लग्न करणार नाही.'

'मग सिलव्हेस्ट्रोवचं काय करायचं ?'

'त्याला घालवून द्या.'

झोरेन नसलेली शेपटी हलवत खोलीतून बाहेर पळाला.

अशा परिस्थितीत काय करावं ? या पृथ्वीवर हजारो, लाखो वर्षे लोक रहात आहेत व अजूनही प्रेम प्रकरणात बिघाड होतंच असतात. उदा. रोमिओ-ज्युलिएट, ऑथेल्लो–डेस्डिमोना, ओमेजिन-तात्याना. आता ही व्हेरा आणि सिलव्हेस्ट्रोव. हे कधी संपणार ? गॅस व वाफ मोजण्याचं माप, विद्युत्प्रवाह मोजण्याचं माप, विजेचा दाब मोजण्याचं माप किंवा स्वयंचलित आग विझवणारी यंत्र. या प्रेमी जिवांच्या हृदयाला जोडणारी मापं कधी बरं अस्तित्वात येतील ? हा किंवा ही प्रमभंग झाल्यामुळे आत्महत्या करतील की करणार नाहीत ? असं त्यांच्यावर लक्ष ठेवण्याची वेळ केव्हा थांबू शकेल ?

मीही तिथून रागानंच निघून गेलो. कौन्सिलनं त्याला केव्हाच पाठवून दिलं होतं. कमांडर्सपैकी मुलींना मी तिथेच थांबायला सांगितलं. त्यांच्याशी व्हेराबद्दल

काही बोलायचं होतं म्हणून बाकीच्यांना पाठवून दिलं. गुबगुबीत गालांची ओल्या लापोवा हिनं माझं म्हणणं गंभीरपणं ऐकून घेतलं. ती म्हणाली,

'आपण तिला असं जर काही करू दिलं तर त्याचा वाईट परिणाम होईल.'

नताशा पेट्रेनको आमचं बोलणं ऐकत बसली होती. ती काहीच बोलली नाही. म्हणून तिला विचारलं,

'नताशा, तुझं यावर काय मत आहे ?'

'आन्तोन, एखाद्या माणसाला जर जीव द्यायचा असेल तर तुम्ही त्याला काय करणार ?' तिला आपण थांबवू शकत नाही. अर्थात साऱ्या मुली म्हणतात की आम्ही तिच्यावर लक्ष ठेवू. पण तरीही ती आमचा डोळा चुकवून निसटली तर ?'

नंतर आम्ही उठलो. मुली झोपायला निघून गेल्या व मी विचार करायल व खिडकीवर केव्हा थाप पडते हे बघायला गेलो.

मी अनेक रात्री चांगली कामं करण्यात घालवल्या. कधीकधी रात्री व्हेरा माझ्या खोलीत येई. कपडे अस्ताव्यस्त, डोळे लाल झालेले अशा स्थितीत ती येऊन माझ्यासमोर बसे व अत्यंत चिडलेल्या व वाईट शब्दात 'स्वतःच्या आयुष्याचा नाश झाला' म्हणे. मला 'दुष्ट' म्हणून दोष देई व सिझेरियन शस्त्रक्रियेच्या यशस्वी झालेल्या गोष्टी सांगे.

मी पण व्हेराला आयुष्यातल्या चांगल्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगण्याची संधी सोडत नसे. परंतु तिला त्याचं फारसं महत्व वाटलं नाही.

'हे बघ व्हेरा. तुला आता वाईट वाटतंय. तू स्वार्थी आहेस. तुला आयुष्यात आनंद, मनोरंजन, सुख, मौजमजा पाहिजे आहे. आयुष्य म्हणजे एक लांबलचक सुट्टी आहे व त्याच्यात कर्तव्य काहीच नाही. मनुष्य एखाद्या मेजवानीला जातो. चांगल्या तऱ्हेनं त्याची संभावना होते. नाचगाणी सर्व काही उपभोगून ही सारी सुखं आपल्यासाठी आहेत अशा समजुतीत रहातो.'

'मग माणसानं कायम दुःखच भोगत रहावं असं तुम्हाला म्हणायचंय का ?'

'मला वाटतं आयुष्य हे काही कायमची सुट्टी नव्हे. आयुष्यात सुट्ट्या फार क्वचित येतात. आयुष्यातला मोठा भाग काम करण्यासाठी, काळजी घेण्यासाठी, कर्तव्य बजावण्यासाठी असतो. आणि सर्वसाधारण लोक अशाच तऱ्हेने जगतात. तुझ्या कल्पनेतल्या सुट्टीपेक्षा याच आयुष्यात खरा अर्थ व आनंद भरलेला आहे. अनेक लोक काहीही काम करत नसत, पण फक्त मौजमजा व सुखोपभोग घेत रहात. आम्ही त्यांना काय केलं माहीत आहे ? आम्ही त्यांना हाकलून दिलं.'

'होय. मला माहीत आहे.' रडत रडत व्हेरा म्हणाली, 'काम करणाऱ्या माणसानं सदैव त्रास भोगत रहावं असं तुमचं म्हणणं आहे ना ?'

'कोण म्हणतं त्यानं दुःख भोगावं म्हणून ? काम व कष्ट यातही आयुष्याता

मजा आहे. हे बघ, तुला उद्या मुलगा होईल. तू त्याच्यावर प्रेम करायला लागशील. तुझं कुटुंब तयार होईल. तुम्ही एकमेकांची काळजी घ्याल. तू इतरांसारखंच काम करशील व मधून मधून विश्रांती घेशील आणि हेच खरं आयुष्य आहे. तुझा मुलगा मोठा झाला की तू कृतज्ञतेनं त्याला मी मरू दिला नाही याबद्दल माझी आठवण काढशील.'

व्हेरा हळूहळू माझं बोलणं मनावर घेऊ लागली व भविष्याकडे भीती व घृणा सोडून बघायला लागली. मी कॉलनीतल्या सगळ्या स्त्रिया व मुलींना एकत्र करून तिची अगदी उत्तम काळजी घेण्याची व्यवस्था केली व आयुष्याबद्दलही खूपसं चित्र रंगवलं. कमांडर्स कौन्सिलनं व्हेराला एक स्वतंत्र खोली दिली. कुडल्टीनं पुढाकार घेऊन त्या खोलीत फर्निचर, बशा व बारीकसारीक मुलींना लागणारं सामान तिच्या खोलीत नेऊन ठेवण्याची व्यवस्था केली. लहान मुलंसुद्धा या सगळ्यामध्ये उत्सुकता दाखवत होती. परंतु एकतर या गोष्टीचा गंभीरपणा समजण्याचं त्यांचं वय नव्हतं, त्यामुळे ती कधीकधी उगाचच गडबड करीत. एके दिवशी सिनेन्कीच्या हातात लहान मुलांसाठी बनविलेली टोपी मला आढळून आली. मी त्याला विचारलं,

'हे काय आहे रे ? तू हे कशासाठी डोक्यावर ठेवलं आहेस ?

सिनेन्की जरा गडबडला. त्यानं डोक्यावरून पटकन टोपी काढली व एकदम श्वास रोखला.

'तुला हे कुठं मिळालं, सांग पाहू ?'

'ही व्हेराच्या बेबीसाठी टोपी तयार केली आहे. आपल्या मुलींनी ही तयार केली आहे.'

'ही छोटया बेबीची टोपी म्हणतोस. मग ती तुला कशाला पाहिजे आहे ?'

'मी तिथून चाललो होतो.'

'बरं मग ?'

'मी तिथून चाललो होतो व ही टोपी तिथं होती.'

'म्हणजे तू आपल्या दर्जी खात्यावरून चालला होतास.'

सिनेन्कीला काय बोलावं ते समजेना. म्हणून त्यानं इकडेतिकडे बघत मानेनंच होय म्हटलं.

'अरे, मुलींनी ही खास बेबीसाठी म्हणून बनवलेली. तू ती तुझ्या डोक्यावर घालून फाडशील, मळवशील व फेकून देशील. याचा अर्थ काय सांग पाहू !'

माझ्या या रागावल्यामुळे बिचारा सिनेन्की घाबरला व म्हणाला, 'आन्तोन, तसं नाही. असं झालं की मी ती घेतली. त्यावर नताशा मला म्हणाली, तू याचं काय करशील सांग पाहू. मी तिला सांगितलं की मी व्हेराकडे नेऊन देईन. ती म्हणाली ठीक आहे. दे नेऊन. म्हणून मी व्हेराच्या खोलीत देण्यासाठी गेलो होतो.

पण ती दवाखान्यात गेली आहे असं कळलं आणि तुम्ही मला म्हणता मी ती फाडून टाकीन म्हणून.'

आणखी एक महिना लोटला व व्हेरा बरीच ताळ्यावर आली. एकंदर ती आपली स्वतःची काळजी घेऊ लागली. ज्या आग्रहानं 'सिझरिन शस्त्रक्रिये'साठी ती चिठ्ठी मागत होती, ते सारं विसरून तेवढ्याच तत्परतेनं ती मातृत्वासंबंधी आवड दाखवू लागली. एक दिवस सिलव्हेस्ट्रोव कॉलनीत आला व आमच्या गॅलॅटेन्कोलाही आश्चर्याचा धक्काच बसला.

'बाप रे! ते काय आता लग्न करणार आहेत?'

असं आयुष्य चालू होतं. आमच्या गाडीत आणखी जास्त जिवंतपणा यायला लागला व ती जास्त जोरानं चालू लागली. तिच्या सुगंधी धुरानं आमच्या सोविएतच्या विस्तृत कार्याचे दिवस भरून टाकले. सोविएतबद्दल आस्था दाखविणाऱ्या लोकांना आमचं आयुष्य पाहून फार आनंद वाटत असे. रविवारच्या दिवशी विद्यार्थी, कामगार, शिक्षणशास्त्रज्ञ, पत्रकार व काही हौशी प्रवासी आम्हाला भेट देत. काही वर्तमानपत्रांनी व मासिकांनी आमच्या आयुष्याबद्दल लहान लहान परिच्छेद, आमच्या मुलांचे फोटो, आमच्या डुकरांच्या घराचे फोटो व निरनिराळ्या वर्कशॉपचे फोटो यांच्यासहित छापले. आमचे पाहुणे परत जात जाण्यापूर्वी आम्ही हस्तांदोलन करत असू. त्यांना आम्ही परत आमंत्रणही देत असू व 'जरूर, जरूर' असं म्हणून ते सलाम करून निघून जात.

परदेशी पाहुण्यांनाही बरेच वेळा आमच्याकडे आणण्यात येत असे. उत्तमोत्तम पोषाख केलेले हे लोक विनयशीलपणे डोळे बारीक करून आमची प्रथमावस्थेतली भरभराट, जुनाट मठाचा घुमट व मुलांचे सुती कपडे पहात. तसंच. आमचे गुरांचे गोठेही त्यांच्या मनात फारसे भरण्यासारखे नव्हते. परंतु आमच्या मुलांचे चेहरे व कामाची उत्साही धावपळ पाहुण्यांच्या नजरेत चटकन भरत नसे. परंतु चष्मा घातलेले, छोटी छोटी जाकिटं घातलेले, गुळगुळीत दाढी केलेले, छोट्या वह्या हातात बाळगणाऱ्या लोकांच्याकडे, अव्यक्त उपरोधिकपणे पहाणाऱ्या आमच्य मुलांच्या नजरांचा मात्र आमच्या पाहुण्यांच्या मनावर ठसा उमटलेला दिसत असे

ते दुभाषांवर प्रश्नांची फैर झाडत. आम्ही त्या मठाची भिंत फाडून. टाकली यावर तिथं भिंत नसूनसुद्धा त्यांचा विश्वास बसत नसे. ते मुलांशी बोलायची परवानगी मागत व मी ती देत असे फक्त एकाच अटीवर की मुलांच्या भूतकाळासंबंधी काहीही विचारलं जाऊ नये. त्यामुळे त्यांना विचित्र वाटे व ते वाद करायला लागत. एका दुभाषानं जरा बिचकतच मला विचारलं,

'या मुलांचा भूतकाळ तुम्ही का बरं लपवून ठेवता? तो जर वाईट असेल तर आता ती सुधारली याचं श्रेय तुम्हाला नाही का?'

परंतु त्यांना अगदी समाधानकारक असं उत्तर मी त्यांना दुभाषाकरवी दिलं,

‘ हे पहा, मला कोणतंही श्रेय नको आहे. हा फक्त अगदी साधा सभ्यपणा आहे. आम्ही आमच्या पाहुण्यांच्या भूतकाळातही शिरत नाही. ’ आमचे पाहुणे मनापासून हसले व पसंतीदर्शक मान हलवून ‘ बरोबर आहे, बरोबर आहे ’ असं म्हणाले. मग ते आपल्या महागड्या मोटारगाड्यात बसून निघून गेले व आमचं आयुष्य तसंच चालू राहिलं.

हिवाळयात आमच्या कॉलनीतली दुसऱ्या तुकडी रावकॅंकसाठी गेली. त्यानंतर आम्ही सावकाशपणे एकएक वीट लावून आमच्या शाळेची इमारत पुरी केली. आमच्या शैक्षणिक क्षेत्राचा प्रासाद अशा रितीने तयार झाला.

पुन्हा एकदा वसंतऋतू आला. हा असा कसा वसंतऋतू ? तीन दिवसातच तो संपला. अजूनही बर्फाच्या सुकलेल्या तुकड्यांच्या खुणा छोट्या पाऊलवाटेवर दिसत होत्या. कोणीतरी गाडी घेऊन जात होतं. त्याच्या गाडीत असलेली रिकामी भांडी आवाज करत होती. आभाळ अगदी निरभ्र व भव्य दिसत होतं. आमचा बावटा वसंतऋतूच्या वाऱ्यानं फडफडत होता व आवाज करत होता. क्लबचा पुढचा दरवाजा उघडाच होता. दाराच्या आतील भाग जाजमानं झाकलेला होता. जमीन अगदी स्वच्छ नेहमीपेक्षा चकचकीत दिसत होती.

फोर्सींगफ्रेम्सचं काम जोरात चालू होतं. गवती चटया गोळा करून ठेवलेल्या होत्या: काचेची आवरणं तिरकी ठेवलेली होती. मुलं व मुली टोकदार काठ्या घेऊन रोपं काढून टाकत होती व एकीकडे काहीतरी बडबडत होती. झेन्या झुरियानानं १९२४ मध्ये प्रथमच उजेड पाहिला होता. ती आपल्या मनाप्रमाणे इकडे तिकडे भटकत होती. तिनं वाकून तबेल्यात पाहिलं व मोलोडेट्सकडे बघत तिला न समजणाऱ्या गोष्टींवर प्रश्न विचारत राहिली.

‘ जमीन कोण नांगरतो ? मुलं का ? मोलोडेट्सच नांगरते का? मुलांच्या-बरोबरच नांगरते का ? लोक कसे जमीन नांगरतात ?’

ईस्टरनंतर जीपीयू सारकोव्हच्या दुसऱ्या बाजूला एक इमारत बांधत आहे अशी बातमी ऐकली. ही मुलांच्यासाठीच होणार होती पण ती पब्लिक एज्युकेशन खात्याच्या अखत्यारात नसून जीपीयूच्या अखत्यारात होती. मुलांना ही बातमी म्हणजे नवीन सुधारणेची सुरुवात वाटली.

‘ मजा आहे. नवी इमारत, एकदम नवी इमारत.

उन्हाळयात एके दिवशी एक मोटारगाडी आमच्या आवारात शिरली. एक माणूस त्या गाडीतून उतरला व मला म्हणाला,

‘ आपल्याला जरा वेळ आहे का ? आपण माझ्याबरोबर येऊ शकता का ? आम्ही झेर्झीन्स्की सामुदायिकासाठी एक इमारत बांधत आहोत. शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनं आपण ती पहावी अशी आमची इच्छा आहे,’

आम्ही गेलो.

ती इमारत पाहून मला आश्चर्याचा धक्काच बसला. भटकणाऱ्या व उनाड मुलांसाठी का ही? केवढी मोठी अफाट. जणू काही एखादा राजवाडाच. नक्षीकाम केलेली जमीन व सुंदर रंगकाम केलेली तक्तपोशी.

मी गेली सात वर्षे उगाचच स्वप्न पहात होतो. तसंच शिक्षणासाठी मोठमोठे प्रासाद असावेत अशी उगीचच कल्पना करत होतो. ते पाहून मला जरा असूयाच वाटली. तरीही मी त्या माणसाला माझा शिक्षणशास्त्राचा दृष्टिकोन समजावून सांगितला व त्यानंही ते सर्व मान्य केलं आणि मला धन्यवाद दिले.

मी परत आलो तरी माझ्या मनातली रूखरूख काही गेली नव्हती. अशा त्या कॉलनीत कोण भाग्यवान मनुष्य काम करणार बरं ? प्रासाद बांधणं सोपं आहे, परंतु आत जे पाहिजे ते कठीण आहे. मी फार वेळ उदासवाणा बसलो नाही माझं सामुदायिक एखाद्या प्रासादापेक्षाही जास्त चांगलं नाही का ?

सप्टेंबर महिन्यात व्हेरा प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. कॉ. झोया कॉलनीत आली. तिनं ऑफिसमध्ये येऊन दरवाजा लावून माझ्यावर आग पाखडायला सुरुवात केली.

' तुमच्या मुली आता मुलांना जन्माला घालायला लागल्यात हं ! '

' हे अनेकवचन कशासाठी ? व त्यात एवढं घाबरण्यासारखं काय आहे ?'

' घाबरण्यासारखं काय आहे म्हणून काय विचारता ? मुली इथं मुलांना जन्म द्यायला लागल्या. '

' अर्थात ! मुलांनाच जन्म देणार. नाहीतर दुसऱ्या कशाला ?'

' कॉम्रेड, तुम्ही थट्टा करु नका. '

' मी मुळीच थट्टा करीत नाही. '

' हे पहा, तुम्हाला ताबडतोब एक निवेदन तयार करावं लागेल. '

' नोंदणी कचेरीनं जरूर त्या सर्व गोष्टी केल्या आहेत. '

' नोंदणी कचेरी निराळी आणि आमचं काम निराळं. '

' जन्माचा दाखला देण्याचा अधिकार तुम्हाला कोणीही दिलेला नाही. '

' हा जन्माचा प्रश्न नाहीय...... हे काही तरी वेगळंच आहे. '

' जन्मापेक्षा आणखी काय वाईट असतं ? मला तर त्यात काहीच वाईट दिसत नाही. '

' स्कोपन हाऊट का कुणीसं म्हटलंय...... '

' कॉम्रेड, तुम्ही जरा गंभीरपणे बोला. '

' काय म्हणायचंय तुम्हाला ? '

' मग तुम्ही ऐकणार नाही. याचा अर्थ काय ? '

' मी गंभीर व्हावं असं तुमचं म्हणणं आहे का ? तर ऐक. मला सगळ्याचा

वीट आला आहे. अगदी वीट आला आहे. आणि मी सांगतो की तुम्ही इथून निघून जा. तुम्ही काही निवेदन करू शकत नाही.'

'असं आहे ? पाहून घेऊ.'

'होय.'

ती निघून गेली. परंतु तिच्या पाहून घेण्याचं काहीही झालं नाही.

व्हेरा खूपच काळजी दाखवू लागली. अगदी चांगल्या पालकाप्रमाणे आपल्या बाळावर प्रेमही करू लागली. मला तरी यापेक्षा जास्त काय पाहिजे होतं ? आम्ही तिला बुककीपरच्या कचेरीत काम दिलं. जेव्हा जेव्हा आम्ही भेटत होतो तेव्हा तेव्हा ती माझ्याशी अत्यंत प्रेमळपणानं वागत असे.

शेतातली कापणी व मळणी केव्हाच झाली होती. पुढील वर्षासाठी जे काही साठवून ठेवायला पाहिजे होतं ते आम्ही साठवून ठेवलं होतं. आमच्या वर्कशॉप्सना कच्चा माल मिळत होता. नवीन मुलांची कॉलनीत भरती झाली होती.

पहिला बर्फ पडायला यंदा लवकर सुरुवात झाली. आदल्या दिवशी चांगलंच गरम होत होतं व दुसऱ्या दिवशी सावकाशपणे बर्फ कुर्याझवर पडत होता. झेन्या झुर्बीना दुसऱ्या दिवशी बाहेरच्या पडवीत आली व तो पांढरा चकचकीत पदार्थ पाहून म्हणाली,

'इकडे हे मीठ कोणी जमिनीवर पसरलंय ? ' तिनं आश्चर्याने विचारलं.

'या मुलांनीच नक्की हे पसरलं असलं पाहिजे.'

□

१३

# गरीब मुलाला मदत करा

झेरझिन्स्की सामुदायिकाच्या इमारतीचं काम पूर्ण झालं. ओक वृक्षांच्या जंगलाच्या सीमेवर एक सुंदर करड्या रंगाची इमारत उभी राहिली. तिचा दर्शनीभाग खारकोव्हच्या बाजूकडे होता. त्या इमारतीत मोठ्या हवेशीर डॉरमिटरीज होत्या, सुंदर हॉल, रुंद जिने, पडदे व मोठमोठ्या तसबिरी लावलेल्या होत्या. त्या सामुदायिकाची प्रत्येक गोष्ट अतिशय फार चांगल्या अभिरुचीची व दूरदृष्टी ठेऊन केलेली होती. शिक्षणशास्त्र दुढ्ढाचार्य समजणाऱ्या रितीभातीप्रमाणे केली नव्हती.

दोन मोठी दालने वर्कशॉपसाठी ठेवली होती व आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यातील एका कोपऱ्यात मोचीकामासाठी खास जागा राखून ठेवण्यात आली होती.

लाकूडकाम करण्याच्या वर्कशॉपमध्ये उत्तम चरकयंत्रे आणली होती. परंतु हे सामुदायिक संघटित करणाऱ्यांना काय नक्की करावं ते माहीत नसावं असं मला वाटलं. हे सामुदायिक व त्याची इमारत बांधणाऱ्या लोकांनी मला उद्‌घाटन करण्यापूर्वीची तयारी करण्याची विनंती केली. मी कोरगिझोवच्या हाताखाली एक छोटी तुकडी त्या कामावर पाठवली. त्यांनी अगदी मनापासून ती जबाबदारी पार पाडण्याची कामगिरी केली.

हे झेरझिन्स्की सामुदायिक फक्त शंभर मुलांसाठीच होतं. हे सामुदायिक फेलीक्स झेरझिन्स्कीच्या स्मरणार्थ उभं केलं होतं. युक्रेनच्या चेकामंडळींनी आपला बराचसा पैसा व फुरसदीचा वेळ, तसंच अगदी तनमनधन यासाठी खर्च केलं होतं.

एकच गोष्ट या सामुदायिकात कमी होती ती म्हणजे शिक्षणशास्त्राचे सिद्धांत यामध्ये हे लोक जाणकार नव्हते. म्हणून प्रत्यक्षात ते शिक्षणशास्त्र कसं अंमलात आणावं याची त्यांना भिती वाटत होती.

चेका कॉम्रेड्स या विचित्र परिस्थितीला कसं तोंड देणार आहेत हे जाणून घेण्याची मला फार उत्सुकता वाटत होती. ते कदाचित सारे सिद्धांत गुंडाळून ठेवतील. पण सिद्धांत त्यांना सोडतील का ? अशा नवीन व मूलभूत गोष्टीत नवीन शिक्षणशास्त्राचे शोध–स्वयंसिद्ध–का बरं लागू करू नयेत? हे चेकामंडळी या नव्या प्रयोगासाठी त्यांनी इतकं सुंदर तयार करवून घेतलेलं फर्निचर, रंगकाम वगैरे खराब करून घ्यायला तयार होतील का बरं ? पण लवकरच ते लोक असा स्वार्थत्याग करायला तयार नाहीत हे मला कळून चुकलं. त्या चेका प्रमुखानं मला एका गुबगुबीत खुर्चीत बसवलं व विचारलं :

'मला तुम्हाला काही विचारायचंय. हे सारं केलेलं सुंदर काम आम्ही बिघडवून किंवा मोडून फोडून घ्यायला तयार नाही. आम्हाला सामुदायिक तर हवंच आहे व सामुदायिकांची आपल्याला फार जरूरी पण आहे. तुमचं सामुदायिक शिस्तबद्ध सामुदायिक आहे. तुम्ही तुमच्यातली पन्नास मुलं सुरुवात करायला आम्हाला द्या व पन्नास आम्ही बाहेरची भरती करू. त्यांना त्यांचं एक कार्यकारी मंडळ असेल व ते हुकूम करील. मी म्हणतो ते समजलं ना तुम्हाला ?'

मला त्यांचं म्हणणं अगदी शंभर टक्के पटलं. या हुशार माणसाला शिक्षणशास्त्राची जराही कल्पना नाही. खरं सांगायचं म्हणजे मी त्यावेळी खरोखरच एक गुन्हा केला. मी त्या कॉम्रेड 'वी'पासून एक गोष्ट लपवली की शिक्षणशास्त्र म्हणून एक शास्त्र आहे व त्याचा भूमिगत स्वयंसिद्ध कारभार असू शकतो असं मान्य केलं. मी त्याला 'ठीक आहे' असं बोललो व इकडेतिकडे पहात स्वतःशीच हसत मुकाट्यानं बाहेर पडलो.

माझ्या गॉर्काईट्सना एक नवीन सामुदायिक उभं करण्याचा मान मिळणार म्हणून मला मनातून फार समाधान वाटत होतं. पण माझी चांगली उत्तम मुलं मी कशी द्यावी ? गॉर्की कॉलनीच्या सामुदायिकाला त्यातल्या प्रत्येक जणाची जरूरी होतीच.

किरगिझोवच्या गटाचं काम संपत आलं होतं. नव्या सामुदायिकाला लागणारं फर्निचर आमच्याच वर्कशॉपमध्ये तयार केलं होतं. तसंच नव्या सामुदायिकाच्या मुलांसाठी कपडेही आमच्या दर्जीखात्यातून शिवून घेतले होते. ते बरोबर त्यांच्या मापाचे बनविण्यासाठी जे पन्नास गॉर्काईट्स पाठवायचे ठरवलं होतं त्यांची निवड आत्ताच करायला पाहिजे होती.

हा प्रश्न कमांडर्स कौन्सिलनं अत्यंत गंभीरपणे हाताळला.

लापोट म्हणाला की 'चांगली मुलं आपण तिकडे पाठवली पाहिजेत.

पण ती मोठ्या मुलांतून निवडू नका. मोठी मुलं गॉर्की कॉलनीतच राहू द्या. कारण त्यांना लवकरच उच्चशिक्षणासाठी जावंच लागेल.'

कमांडर्सना लापोटचं म्हणणं पटलं. पण आम्ही प्रत्यक्ष यादी करायला लागलो त्यावेळी थोडी कुरबुर झालीच. प्रत्येक कमांडरकडून दुसऱ्याच्या तुकडीतली मुलं तिकडे पाठवावी अशी भाषा येऊ लागली. पण आम्ही रात्री उशीरापर्यंत बसून शेवटी एकदाची यादी तयार केली. त्यात चाळीस मुलं व दहा मुलींचा समावेश केला. या यादीत दोन्ही झेवेलीज्, गोरोवस्की, वान्या, झायचेन्को, मालीकोव्ह, ओडार्युक, झोरेन, निसीनोव्ह, सिनेन्की, शारोवस्की, गार्डीनोव्ह, ओल्या लापोवा स्मेना, व्हास्का अॅलेक्सेयेव, मार्क शैनहौस व मिशा ओव्हचारेन्को इत्यादींना घातलं होतं. हेतू हा की ती जरा जास्त मनात भरण्यासारखी होती. मी एकदा पुन्हा त्यावर नजर टाकली व माझी खात्री पटली की हे जरी वयानं लहान असले तरी चांगली, प्रामाणिक व स्थिरवृत्तीची ही मुलं आहेत.

जी मुलं पाठवायची ठरलं होतं ती हळूहळू तयारी करू लागली. त्यांनी त्यांचं नवं घर अजून पाहिलं नव्हतं, त्यामुळे आपल्या जुन्या सहकाऱ्यांना सोडून जाताना त्यांना फार वाईट वाटलं; काहीजण बोलताना ऐकू आलं :

' तिथं कसं काय असेल कोणास ठाऊक? घर–राहण्याची जागा उत्तम असेल. पण शेवटी माणसं कशी असतील ? माणसांवर तर सारं अवलंबून असतं ना ! नोव्हेंबरच्या अखेरीस सारी काही तयारी पूर्ण झाली. नव्या सामुदायिकासाठी मी कर्मचारी गोळा करायला लागलो. मी किरगिझोवला त्यांच्याकडे बदली करून पाठवला.

हे सारं युक्रेनच्या शिक्षणखात्यातील शिक्षणशास्त्रातले गड्डे समजले जाणाऱ्यांशी अजिबात संबंध येऊ न देता चालल होतं. कारण या सर्व विद्वान (?) मंडळींची माझ्याबद्दलची वागणूक नुसतीच तिरस्काराची नव्हती, तर उघड उघड प्रतिकूल होती. ही सारी माणसं तशी क्षुद्र मनोवृत्तीची होती व त्यांना किती समजत होते हेही मला माहीत होतं; तरीही काही कारणांनी आपण यशस्वी होणार नाही असं मला वाटू लागलं होतं.

मी त्यावेळी अतिशय शांतपणा व सोशिकपणा दाखवला. कोणत्याही तऱ्हेनं त्यांच्या मनावर विपरीत परिणाम होऊ नये व माझ्या कामात अडथळा निर्माण होऊ नये अशी मी खूप खबरदारी घेत असे. पण माणसाच्या सहनशक्तीलाही सीमा असते. मी खरोखरी धीर धरायला शिकलो.

असा एकही दिवस जात नसे की ते माझ्याकडे बोटं दाखवून–साध्या गोष्टीत किंवा एखाद्या महत्वाच्या बाबतीत–नावे ठेवत. हा माणूस किती कमी दर्जाचा आहे असाही आरोप होई. माझा मीच माझ्याबद्दल शंकेखोर होऊ लागलो.

अत्यंत चांगल्या किंवा अत्यंत आनंददायक घटनेमुळेही पुष्कळदा वितुष्ट

येऊ लागलं. माझंच चुकत असे का असा विचार माझ्या मनात येई. खारकोव्हला 'मुलांचे मित्र' (फ्रेंडस् ऑफ चिल्ड्रेन्स्) अशी परिषद भरावयाची होती व कॉलनीतल्या मुलांनी जाऊन त्यांचं स्वागत करायचं असं ठरलं होतं. परिषदेच्या जागी आम्ही बरोबर तीन वाजता पोचावं असं ठरलं होतं.

आम्हाला दहा किलोमीटर जायचं होतं. म्हणून आम्ही रमतगमत जात होतो. माझ्या घड्याळाप्रमाणे आम्ही वेळ कापत होतो. वाटेत मुलांना जरा विश्रांती घ्यायला, पाणी प्यायला व शहराकडे पहायला भरपूर वेळ मिळेल अशा तऱ्हेनं आमची दौड चालली होती. आमच्या मुलांनाही अशा तऱ्हेची दौड आवडत असे. लोक मुलांना रस्त्यात थांबून बघतात, जवळ येतात, प्रश्न विचारतात व ओळखही होते. मुलांनाही त्यामुळे जरा हास्यविनोद करायची व आपल्या सामुदायिकाबद्दल अभिमानानं बोलायची संधी मिळते. तसाच यावेळीही हा आमचा मोर्चा अगदी छान शिस्तीत चालला. परंतु आमच्या या मिरवणुकीच्या मुख्य हेतूबद्दल जरा काळजी वाटू लागली माझ्या घड्याळात बरोबर तीन वाजले होते. आमची मिरवणूक वाद्ये व आमचा फडफडणारा बावटा यासहित परिषदेच्या जागी अगदी वेळेवर पोचली. पण त्यातली काही शहाणी समजली जाणारी मंडळी आमच्याकडे धावत आली व ओरडतच बोलली :

'तुम्ही इतक्या लवकर कशाला आलात? आता मुलांना रस्त्यात उभं रहावं लागेल.'

मी माझं घड्याळ त्यांना दाखविलं. 'त्याचं काय एवढं, अजून तर बरीच तयारी व्हायची आहे' असं मला सांगण्यात आलं.

'तीन वाजताची वेळ आम्हाला सांगितली होती.'

'कॉम्रेड, तुमचा नेहमी काहीतरी विक्षिप्तपणा असतोच.'

आपलं काय चुकलं ते आमच्या मुलांना समजेना. त्यांना अशा तऱ्हेनं का वागवण्यात येतंय?

'तुम्ही एवढ्या लहान मुलांना कशाला आणलंत?'

'सारी कॉलनीच इथं आली आहे.'

'एवढ्या लहान मुलांना दहा किलोमीटर फरपटत कोणी आणलं असतं का? हे अगदी अक्षम्य आहे. आपला मोठेपणा दाखविण्यासाठी तुम्ही एवढा क्रूरपणा करावा हे शोभत नाही.'

'लहान मुलांना अशी सहल आवडते. इथला स्वागत–समारंभ संपला की आम्ही सर्कस पहायला जाणार आहोत. मग छोट्या मुलांना मागे ठेऊन कसं चालेल?'

'सर्कस पहायला जाणार आणि मग तुम्ही घरी केव्हा परतणार?'

'अर्थातच उशीरा!'

'कॉम्रेड ते काही नाही. छोट्यांना तुम्ही सरळ परत पाठवून द्या!'

आमची छोटी मंडळी—झायचेन्को, मलीकोव, झोरेन, सिनेन्की हे ऐकून सारे-जण रडवेले झाले आणि माझ्याकडे विनवणीच्या अपेक्षेने बघू लागले.

‘मला वाटतं, आपण या मुलांनाच विचारूया.’

‘त्यात त्यांना विचारायचा प्रश्न नाही. सारं काही स्पष्ट आहे. त्यांना ताबड-तोब परत पाठवा.’

‘माफ करा. पण तुमचा हुकूम मी पाळू शकत नाही.’ असं मी म्हटलं.

‘तसं असेल तर मीच त्यांना परत जाण्याचा हुकूम करीन.’

‘करून पहा’ असं मी म्हटलं. मला हसू आवरेना.

बोलणारी व्यक्ती आमच्या मिरवणुकीच्या डाव्या बाजूला गेली व म्हणाली :

‘मुलांनो ! हे पहा, छोटया मुलांनो. तुम्ही दमला असाल तेव्हा तुम्ही आता घरी जा.’

कोणीही ते दयाळू शब्द ऐकून मनावर घेतलं नाही. उलट कोणीतरी म्हणालं,

‘घरी जा म्हणे, मुळीच जाणार नाही.’

‘आणि तुम्ही सर्कस बघायला पण जाऊ शकत नाही. कारण घरी जायला तुम्हाला उशीर होईल.’

हे ऐकून छोटी मुलं मोठयांदा हसली. झोरेनच्या डोळयात मिस्किलपणा दिसला.

‘आन्तोन, तिच्याकडे पहा हो जरा. ती पक्की लबाड दिसते की नाही ? दिसतेय ना लबाड ?’

वान्या झायचेन्कोनं शांतपणे आपला हात बावटयाकडे लांब केला व काही दाखविण्याच्या उद्देशानं म्हणाला,

‘हे पहा, तुम्ही असं बोलू शकत नाही. आम्ही कूच करत असताना तुम्ही अशा तऱ्हेनं बोलू शकत नाही. शिवाय असं पहा, आम्ही बावटयाखाली उभे आहोत. तुम्हाला दिसत नाही का ?’

त्या बाईनं कळवळून या सैनिकी बाण्याच्या मुलाकडे पाहिलं व ती निघून गेली.

अशा तऱ्हेचे खटले झाले तर त्याचा परिणाम तसा काही वाईट होत नसे. परंतु या सगळया प्रकारात मी मात्र एकाकी पडत असे. अर्थात मला त्याची सवय झाली होती. मी अशी प्रत्येक बाब मुकाटयानं सहन करायची व फारसा त्रास करून घ्यायचा नाही, असं शिकलो होतो. तसंच चर्चा करण्यापासूनही मी अलिप्त रहात असे. केव्हा केव्हा मी बोललोच तर तो एक सौजन्याचा भाग म्हणूनच बोलत असे. कारण तुमच्या वरिष्ठांना शेवटी काहीतरी उत्तर हे दिलंच पाहिजे ना ?

ऑक्टोबरमध्ये अर्काडी उझीकोव्ह या मुलाच्या बाबतीत एक नवीनच संकट उभं राहिलं. आणि त्यांच्यातली (वरिष्ठांची) व माझ्यातली दरी जास्तच मोठी होत गेली.

राबफॅकचे विद्यार्थी दोन दिवसांच्या सुट्टीसाठी आमच्याकडे आले होते व

त्यांना एक शाळेची खोली झोपण्यासाठी दिली होती. सर्व दिवस जवळच्या जंगलातच सहलीत घालवायचा असं ठरवलं होतं. जेव्हा सगळे जवळच्या झाडीत मजा करत होते, तेव्हा उझीकोव्ह त्यांच्या खोलीत शिरला. राबफॅकच्या विद्यार्थ्यांना नुकतंच पाठ्यवेतन मिळालं होतं. ते त्यांनी एका चामड्याच्या पिशवीत ठेवलं होतं. उझीकोव्हनं ती पिशवीच्या पिशवीच पळविली.

४० हजार भाऊ जेवढं प्रेम करणार नाहीत तेवढं प्रेम कॉलनीतली मुलं राबफॅकच्या विद्यार्थ्यांवर करत असत. या घटनेमुळे आम्ही लाजेनं अर्धमेले झालो. काही थोडे दिवस चोर सापडू शकला नाही व हीच गोष्ट माझ्या मते फार महत्त्वाची होती. एका अत्यंत घनिष्ठ सामुदायिकात असं व्हावं ही फार दुःखाची गोष्ट होती. पैसे गेल्याचं दुःख एवढं वाटलं नाही. परंतु या कृत्यामुळे कोणाला तरी त्रास होतो. खरा गुन्हेगार त्याच वाकड्या रस्त्याने जात रहातो. सारं वातावरण एकदम बिघडून जातं. एकमेकांबद्दलचा विश्वास ढळतो. प्रत्येकाच्या मनात दुसऱ्याबद्दल शंका निर्माण होते व स्वतःच्या वस्तूंबद्दल उगीचच प्रत्येकजण सावध रहायला लागतो. जर वेळेवर चोरी करणारा सापडला नाही तर ते सामुदायिक हळूहळू फुटायला लागतं. डॉरमिटरीजमध्ये कुजबुज चालू असायची. आपसातल्या संभाषणात संशयिताचं नाव घेतलं जायचं. काही जणांना उगीचच एखाद्या दिव्यातून जावं लागतं. खर तर त्यांचं चारित्र्य नुकतंच चांगल्या दिशेनं जात असलेलं माहीत असतं व त्यांना संरक्षणही द्यावंसं वाटतं. शेवटी जरी चोर थोड्या दिवसांनी सापडला व त्याला योग्य ती शिक्षा झाली तरीसुद्धा काही बिघाड होऊन ती जखम बरी होत नाही. उलट ती सामुदायिक उध्वस्त करते व परत ते सांभाळणं फार कठीण जातं. एक साधी चोरी ही सतत शत्रूत्व, एकमेकांबद्दल कडवटपणा, एकटेपणा व वैर निर्माण करायला कारणीभूत होते. चोरी ही सामुदायिकात होणं ही एक विलक्षण व असंभव गोष्ट आहे. ती कोणाच्याही प्रभावाखाली होत नाही, तर कुणाबद्दल शत्रूत्व असण्याच्या रासायनिक प्रक्रियेतूनही होत नाही. जिथं सामुदायिक नसेल तिथं चोरी निरुपद्रवी असते. कारण त्या ठिकाणी लोकमताचा प्रश्नच उद्‌भवत नाही. फक्त चोरी करणारा व ज्याची चोरी होते तो या दोघांचाच संबंध असतो. पण सामुदायिकात चोरी झाली तर चांगले विचार दबले जातात व एकमेकांना सांभाळून घेण्याची अत्यंत उपयुक्त वृत्ती नाहीशी होते आणि पूर्वाश्रमींच्या उन्मार्गी व्यक्तीच्या बाबतीत ती नाश करणारी ठरते.

उझीकोव्हचा अपराध ३ दिवसांनी लक्षात आला. मी त्याला ताबडतोब माझ्या ऑफिसात आणून ठेवलं व एक पहारेकरी ठेवला. एवढ्याचसाठी की कोणीही तिथं जाऊन त्याचा सूड घेण्याचा प्रयत्न करू नये. कमांडर कौन्सिलनं ठरवलं की ही केस आपल्या खास 'कॉम्रेड्स कोर्ट'च्यापुढे चालवावी. आम्ही ही पद्धत फार क्वचितच वापरत असू. कारण कमांडर्स कौन्सिलच्या निर्णयावर मुलांचा पक्का

विश्वास होता. उझीकोव्हवर त्याच्याच कॉम्रेड्सकडून परीक्षा होणार आहे याची त्याला कल्पना होती. सर्वसाधारण सभेत न्यायाधीश निवडले गेले. ते म्हणजे कुडल्टी, गोरकोव्हस्की, झायचेन्को, स्टुपिदसीन, पेरेट्स असे पाचजण. त्याला सर्वांनी संमती दिली. पेरेट्सला मुद्दामच कुर्याझकरांना खूष करण्यासाठी सामावून घेतलं होतं. स्टुपिदसीन हा न्याय देण्याबद्दल प्रसिद्ध होता. पहिले तिघेजण कुठच्याही तऱ्हेनं भावनाविवश होणार नाहीत याबद्दल खात्री असलेले होते.

ही चौकशी मोठ्या खोलीत संध्याकाळी सुरू झाली. ब्रेगेल व झुरिन्काया या मुद्दाम त्या दिवशी कॉलनीत आल्या होत्या. त्याही हजर राहिल्या. उझीकोव्ह एका बाकावर बसला होता. गेले काही दिवस त्याचं वर्तन अतिशय उद्धट होतं. त्यानं मला व इतर मुलांना वाईट उत्तरं देऊन स्वत:बद्दल आमच्या मनात एक प्रकारची घृणा उत्पन्न केली होती.

अर्काडी उझीकोव्ह हा कॉलनीत एक वर्षाच्यावर राहत होता व त्या मुदतीत त्यानं वाईट प्रवृत्ती वाढविल्या होत्या. तो दिसण्यामध्ये व्यवस्थित दिसत असे, चांगलं दाखवायचा प्रयत्न करी. त्याचं नाक इतर अवयवांपेक्षा पूर्वीसारखं बाहेर आलेलं दिसत नसे व तो थोडंबहुत हसायलाही शिकला होता. तरीसुद्धा तो पूर्वीचाच अर्काडी उझीकोव्ह–कुणाबद्दलही थोडाही आदर न बाळगणारा, सामु-दायिकाबद्दलही तर नाहीच नाही–थोड्याशा लालचीसाठी जगणारा प्राणी होता.

आमच्याकडे येण्यापूर्वी उझीकोव्ह आपल्या बापाला व फौजींना फक्त घाबरत असे. कॉलनीत त्याला फक्त कमांडर कौन्सिलची व सर्वसाधारण सभेची धास्ती वाटे. या दोन्ही संस्थांचा संदर्भ त्याच्या बाबतीत संपला होता. त्याची जबाबदारीची जाणीव अगदी बोथट झाली होती व त्याचं हे नवीन धारण केलेलं हास्य हे त्याच्या उद्धटपणाचंच लक्षण होतं.

आज उझीकोव्ह अगदी घाबरलेला दिसत होता. कॉम्रेड्स कोर्टाचा त्याच्या मनावर चांगलाच परिणाम झालेला दिसत होता.

न्यायाधीश आल्यानंतर ड्युटीवर असलेल्या कमांडरनं सर्वांना उठून उभं रहायला सांगितलं. कुडल्टीनं साक्षीदारांची व फिर्यादींची उलटतपासणी घ्यायला सुरुवात केली. त्यांचा पुरावा कडक, नापसंतीदर्शक, मर्मभेदक असा होता. मिशा ओव्हचारेन्को बोलला :

'आमच्या मुलांचं म्हणणं असं आहे की अर्काडीनं आमच्या कॉलनीवर लज्जास्पद प्रसंग आणला. पण मित्रांनो, तसं नाही. त्यानं आपल्या कॉलनीवर मानहानीचा प्रसंग आणला नाही. कारण तो मुळी कॉलनीतला नाहीच आहे. तो आपल्यातला असेलच कसा ? त्याला तुम्ही मनुष्यप्राणी म्हणाल काय ? तुम्हीच विचार करा. हा मनुष्यप्राणी आहे का ? मी म्हणेन एखादा कुत्रा किंवा मांजर यापेक्षा जास्त चांगला. आता याचं काय करायचं ? त्याला आपण कॉलनीबाहेर

फेकून दिला तरी फारसं काही साध्य होणार नाही. मला असं वाटतं की त्याच्यासाठी आपण एक कुत्र्याचं घर तयार करावं व त्याला आपण भुंकायला शिकवू या. तीन दिवस त्याला जेवण द्यायचं नाही, म्हणजे तो भुंकायला शिकेल. परंतु त्याला घरात मात्र राहू दिलं जाणार नाही.'

हे अगदी हल्ला करणारं व मानहानीकारक भाषण होतं. वान्या झायचेन्को आपल्या न्यायाधिशाच्या खुर्चीवरून मनापासून हसला. अर्कीडीनं मिशाकडे बघितलं. तो जरासा लाजला व त्यानं आपलं तोंड फिरवलं.

ब्रेगेलनं बोलण्याची परवानगी मागितली. 'मुलांचं बोलणं संपेपर्यंत थांबावं असं मला वाटतं' मी म्हणालो.

पण ब्रेगेलनं आग्रहच धरला. कुडल्टीनं शेवटी संमती दिली. ब्रेगेल व्यासपीठावर गेली व अगदी दर्दभरं भाषण केलं. त्यातलं मला अजूनही काही आठवतं.

'तुम्ही या मुलाला चोरी केल्याबद्दल चौकशी करत आहात. तुम्ही सर्वजण हा दोषी आहे असं म्हणता व त्याला कडक शिक्षा झाली पाहिजे असं सांगता. काहीजण याला कॉलनीतून काढून टाका असं म्हणतात. अर्थात तो अपराधी आहे. परंतु तुम्ही बाकी सर्वजण त्याच्यापेक्षा जास्त अपराधी आहात.'

सगळी मुलं एकदम स्तब्ध झाली व माना उंच करून उझीकोव्हनं केलेल्या चोरीबद्दल बाकीच्यांना दोष देणारी ही कोण व्यक्ती आहे ते पाहू लागली.

'हा मुलगा एक वर्षभर तुमच्याबरोबर रहात असूनसुद्धा तो चोरी करतो म्हणजे तुम्ही त्याला नीटपणाने वाढवलेलं नाही. तुम्ही त्याच्या बाबतीत चांगला, बरोबर दृष्टिकोन घेण्यात अपयशी ठरलात. तुम्ही त्याच्याकडे मित्रत्वाच्या नात्यानं पाहिलं नाही. चांगल्या रितीनं कसं रहावं ते त्याला तुम्ही शिकवलं नाहीत. तो चांगला कार्यकर्ता नाही असं तुम्ही म्हणता व आपल्याच मित्रांची त्यानं यापूर्वीही चोरी केली असं म्हणता. याचा अर्थ तुम्ही जरूर ती दक्षता त्याच्याबाबतीत घेतली नाहीत.'

लहान मुलांच्या डोळ्यात एक प्रकारची भीती दिसायला लागली व ते एकमेकांकडे विचित्र नजरेनं पहायला लागले. त्यांना वाटणारी काळजी अगदीच काही चुकीची नव्हती कारण आमचं सामुदायिक त्यावेळी खरोखरीच संकटात आलं होतं. परंतु ब्रेगेलनं सभेमध्ये झालेल्या या इशाऱ्याची काहीही दखल घेतली नाही. याउलट तिनं आपलं भाषण आणखीनच करूण आवाजात केलं :

'अर्कीडीला शिक्षा करणं याचा अर्थ त्याच्यावर सूड घेणं असा होतो व तुम्ही असा सूड घेणं योग्य नाही. या घडीला अर्कीडीला तुमची मदत पाहिजे आहे. तो बिचारा फार विचित्र परिस्थितीत आहे व तुम्ही सर्वजण त्याच्याविरूद्ध एक झाला आहात. आत्ताच कोणीतरी त्याची तुलना प्राण्याबरोबर केली. तुमच्यातल्या काही चांगल्या मुलांनी अर्कीडीला संरक्षण द्यावं व त्याला मदत करावी.'

ब्रेगेल व्यासपीठावरून खाली उतरल्यावर खोलीत एकदम आवाज हालचाल सुरू झाली. मुलं एकमेकांकडे पाहून आपसात हसत व बोलत होती. कुणीतरी दुसऱ्याला उद्देशून म्हणाला :

'या बाई कशाबद्दल बोलत होत्या बरं !' आणि दुसऱ्यानं अतिशय संयमित आवाजात परंतु तिखट शब्दात उत्तर दिलं :

'मुलांनो तुम्ही बिचाऱ्या उझीकोव्हला मदत का करत नाही ?'

त्यावर बराच मोठा हंशा पिकला. वान्या झायचेन्कोनं एकदम खुर्चीत मागे सरून पायाने टेबलाचे खण दणादण वाजवले. कुडल्टीनं त्याला चापलं व म्हणाला,

'अरे, असा कसला रे तू न्यायाधीश वान्या ?'

उझीकोव्ह पाय दुमडून बसला होता. त्यानं एकदम जोरात हसायला सुरुवात केली. पण त्याला एकदम जाणीव झाली असावी. तो खाली मान घालून सावरून बसला. कुडल्टी त्याला काही बोलणार होता. पण परत बेत फिरवून मान हलवली. परंतु उझीकोव्हकडे एक जळजळीत कटाक्ष फेकला.

ब्रेगेलचं ह्या बारीक गोष्टींकडे लक्ष गेलं नाही, म्हणून बरं झालं. ती व झुरिन्स्काया एकमेकींशी बोलण्यात अगदी गढून गेल्या होत्या.

न्यायाधीश विचारविनिमय करतील तोपर्यंत काम थांबेल. कायद्याचा कीस काढण्यासाठी व निकालही तयार करायला ते सारे एक तासापेक्षा नक्कीच जास्त वेळ घेतील अशी आमची कल्पना होतीच. म्हणून मी आमच्या पाहुण्यांना ऑफिसमध्ये येऊन बसण्याची विनंती केली.

झुरिन्स्काया कोचावर गुलायेव्हाच्या मागे एका कोपऱ्यात बसली होती. माझ्याकडे व ब्रेगेलकडे आळीपाळीनं पहात होती. ब्रेगेलला मात्र आज फार मोठे समाधान वाटत होते. आज 'खरं शैक्षणिक काम' कसं असतं ते आपण दाखविलं, अशी तिची ठाम समजूत होती. मला मात्र यात एक विचित्र हटवादीपणा जाणवत होता. आपलंच बरोबर आहे, अशा तऱ्हेचा तो हटवादीपणा नव्हता किंवा आपण जिंकली असाही त्यात सूर नव्हता ! तर गांजणुकीचा हटवादीपणा, माझ्या कामाचा अर्थ यांना कधीच कळणार नाही, त्याचे चीज होणार नाही, या जाणीवेतून आलेला हटवादीपणा !

'तुम्हाला माझं म्हणणं कधीच पटणार नाही,' असं ब्रेगेल म्हणाली.

'तुम्हाला आणखी चहा हवा का ?' असं मी तिला विचारलं.

असले लोक भरमसाट अनुमान काढण्याच्या दृष्टीने पछाडलेले असतात. त्यांच्या मते एकजण वाईट आहे तेव्हा त्याच्यावर एकच इलाज व तोच वापरला पाहिजे. हे लोक चर्चेचं तर्कशास्त्र कधी शिकतील. माझं काम हे एक न तुटणाऱ्या साखळीसारखं आहे, कधी दुवे जोडायला जास्त वेळ लागतो तर कधी काही दुवे जोडायला कमी वेळ लागतो, हे या लोकांना कसे समजणार ? कधीकधी हे काम अनेक वर्षे

चालतं. त्यात कित्येकदा संघर्षाचा छाप पडतो. संघर्ष कसा तर सर्व सामुदायिकाच हित व त्यातल्या एखाद्या व्यक्तीचं हित यांची एकमेकात न सोडविता येणारी गुंतणूक होते, हे सारं यांना कसं समजावून द्यायचं ? सात वर्षांच्या माझ्या कॉलनीच्या आयुष्यात मला एकसारखी दुसरी केस कधीच आढळली नाही. सामुदायिकातल्या घटकांच्या मनात कोणच्याही तऱ्हेनं प्रश्न किंवा समस्या न सोडविता राहिली अशी टोचणी रहाणं किंवा समाजाच्या असहायतेचा अनुभव येणं योग्य नव्हे. आजच्या चौकशीचा उद्देश उझीकोव्ह किंवा कॉलनीतली चारशे मुलं यांच्या शैक्षणिक कार्याचा नसून सबंध सामुदायिकाचा प्रश्न होता.

मॉनिटरनं येऊन आम्हाला न्यायालयात परत बोलविलं. मुलांनी उभं राहून व अगदी शांतपणे निकाल ऐकला.

'निकाल '— उझीकोव्ह हा कष्टकऱ्यांचा शत्रू आहे. तसंच तो चोरही आहे. त्याला बेशक कॉलनीच्या बाहेर हाकलून द्यावा. परंतु त्याच्या वतीनं शिक्षण-खात्यातल्या एक बाई मध्ये पडल्या म्हणून कॉम्रेडस् कोर्टानं ठरवलंय :

१. उझीकोव्ह कॉलनीत राहील.

२. एक महिना त्याला कॉलनीचा घटक समजू नये. त्याला त्याच्या तुकडी-तून काढून टाकावा. त्याला कुठल्याही संमिश्र तुकडीत काम देऊ नये. कोणाही मुलानं त्याच्याबरोबर बोलता कामा नये, त्याला मदत करू नये, टेबलावर त्याच्या-जवळ बसू नये, झोपायला त्याला डॉरमिटरीत घेऊ नये, त्याच्याबरोबर खेळू नये. त्याच्याबरोबर बसू नये अथवा चालूही नये.

३. तो त्याच्या पूर्वीचा कमांडर झेलवी यांच्या हुकूमतीखाली राहील. तो फक्त कामापुरतं कमांडरशी बोलू शकतो. आजारी असल्यास डॉक्टरशी बोलू शकतो.

४. उझीकोव्हनं डॉरमिटरीजच्या मधल्या भागात झोपावं. कमांडर्स ठरवतील त्या वेगळ्या टेबलावर जेवायला बसावं. त्याला वाटलं तर त्यानं कमांडरनं दिलेलं काम करावं.

५. जे कोणी हा हुकूम पाळणार नाहीत त्यांना कॉलनीतून हाकलले जाईल. हा हुकूम कमांडर्स कौन्सिलनं दिलेला आहे.

६. ही शिक्षा कॉलनीच्या डायरेक्टरनी मंजूर केल्यावर त्या शिक्षेची अंमल-बजावणी ताबडतोब होईल.

या निकालाचं मुलांनी टाळ्या वाजवून स्वागत केलं.

'हे फार छान झालं ' असं आमच्याकडे वळून कुझ्मालेशी म्हणाला, 'यामुळे खरी मदत होईल. आणि तुम्ही म्हणाला— या बिचाऱ्या गरीब मुलावर दया करा— त्याला जबाबदारीचं काम द्या वगैरे.'

हे सारं तो ब्रेगेलच्या समोर उभा राहून बोलला. याबद्दल आपल्याला उद्धट

म्हटलं जाईल याची त्याला कल्पना आली नाही. ब्रेगेलनं लेशीकडे नाराजीनं पाहिलं व माझ्याकडे वळून म्हणाली.

'या ठरावाला संमती देणार नाही ना ?'

'अर्थातच याला संमती दिली पाहिजे' असं मी उत्तर दिलं.

मुलं निघून गेल्यावर रिकाम्या झालेल्या त्या मोठ्या दालनात झुरिन्स्कायानं मला एका बाजूला नेऊन विचारलं.

'मला तुमच्याशी बोलायचंय. हा कसला ठराव? तुम्हाला याबद्दल काय वाटतं?'

'हा अगदी उत्तम ठराव आहे. बहिष्कार टाकणं हे जरा कडक व धोक्याचं शस्त्र आहे व नेहमी वापरणं योग्य नाही. पण या बाबतीत त्याचा उपयोग होईल,' असं मी उत्तर दिलं.

'तुमची याबद्दल पक्की खात्री आहे का ?'

'हो. पक्की खात्री आहे. असं पहा. हा उझीकोव्ह सबंध कॉलनीत अतिशय बदनाम झालेला आहे. मुलं त्याचा धिक्कार करतात. या बहिष्कारामुळं प्रथम मुख्यतः कायदेशीर संबंध एक महिनाभरात तयार होतील. उझीकोव्ह यातून काही शिकला तर ते त्याचा जरूर आदर करतील. आणि उझीकोव्हच्या दृष्टीनंही हे एक चांगलं कार्य होईल.'

'समजा, तो या परीक्षेत उतरला नाही तर ?'

'तर मुलं त्याला काढून टाकतील.'

'तुम्ही त्याला संमती द्याल ?'

'अर्थातच'

'परंतु ते शक्य नाही.'

'दुसरं काहीही अशक्य असेल परंतु सामुदायिक हे वाचवलंच पाहिजे असं नाही तुम्हाला वाटत ?'

'उझीकोव्हचा बळी देऊन काय ?'

'उझीकोव्ह दुसऱ्या कुठल्यातरी एखाद्या ठिकाणी जाईल. आणि कदाचित त्याच्या दृष्टीने ते चांगलंही ठरेल.'

झुरिन्स्काया अगदी हताशपणे हसली.

'याला तुम्ही कुठल्या तऱ्हेचं शिक्षणशास्त्र म्हणता ?'

'मी तिला काहीच उत्तर दिलं नाही. तिलाच अचानक त्याची व्याख्या सापडली.'

'कदाचित हे धडपडीचं शिक्षणशास्त्र आहे.'

'कदाचित तसंही असू शकेल.'

ब्रेगेलबाई ऑफिसात जाण्याची तयारी करत होत्या. लापोट ते निकाल-पत्र घेऊन आमच्याकडे आला.

'आंतोन, आपण हा निर्णय पक्का करायचा ना ?'

'अर्थातच. हा एक उत्तम निर्णय आहे.'

'अशामुळे तुम्ही त्या मुलाला आत्महत्येकडे पळायला लावाल,' ब्रेगेलबाई म्हणाली.

'कोण? उझीकोव्ह?' लापोटनं आश्चर्यानं विचारलं, 'आत्महत्या करील? स्वत:ला फास लावून घेईल? ही कल्पना काही वाईट नाही. पण तसं तो काही करणार नाही. घाबरू नका.'

'भयानक.' जाता जाता ब्रेगेल फुसफुसली.

'या बायकांना उझीकोव्ह माहीत नाही व कॉलनीपण माहीत नाही. कॉलनी व उझीकोव्ह दोघांनीही बहिष्काराला मोठ्या उत्साहानं सुरुवात केली. मुलांनी खरोखरच अर्कांडीबरोबरचे सगळे व्यवहार बंद केले. परंतु त्यामध्ये या क्षुद्र मानवी नमुन्याबद्दल कोणत्याही तऱ्हेनं राग, तिरस्कार किंवा चढाई दिसून आली नाही. त्या न्यायालयाच्या निर्णयानं जणू सारं काही आपल्या खांद्यावर घेतलं. मुलं उझीकोव्हकडे दुरूनच, परंतु औत्सुक्यानं बघत व वारंवार आपापसात झालेल्या गोष्टीची व उझीकोव्हच्या भवितव्याची चर्चा करत. बऱ्याच जणांनी न्यायालयानं दिलेली शिक्षा फारशी चांगली नाही असं जाहीर केलं. आमच्या कोस्टया व्हेट्को-व्हस्कीचं मत असंच होतं. तो म्हणाला,

'याला काय तुम्ही काय शिक्षा म्हणता? उझीकोव्ह एखाद्या हिरोसारखा वागतोय. सारी कॉलनी आपल्याकडे पहाते आहे याची त्याला मजा वाटते. हे काय बरं आहे का?'

खरोखरच उझीकोव्ह एखाद्या हिरोप्रमाणे वागत होता. त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा गर्व व दिमाख दिसत होता. तो एखाद्या राजाप्रमाणे सगळीकडे फिरे. जणूकाही त्याला अडविण्याचा कोणालाही अधिकार नाही अशा तऱ्हेने तो वागे. जेवणाच्या खोलीत तो एका छोट्या टेबलावर वेगळा बसे, जणूकाही आपण सिंहासना-वर बसलो आहोत असं भासवी. परंतु लवकरच ही आकर्षक भूमिका व हिरोगिरी संपुष्टात येऊ लागली. कॉम्रेड्स कोर्टानं अर्कांडीच्या डोक्यावर घातलेला काटयांचा मुकुट टोचू लागल्याची जाणीव व्हायला लागली. कॉलनीतल्या मुलांनाही त्याच्या या विशिष्ट वर्तनाची सवय झाली. पण त्याचं एकाकीपण तसंच राहिलं. अर्कांडीला एकटेपणाच्या दु:खद दिवसातून जावं लागलं व हे दिवस एकामागून एक कंटाळ-वाणे, माणसाचा कुठल्याही तऱ्हेचा संपर्क न येता जाऊ लागलं. त्याचवेळी सबंध सामुदायिक अर्कांडीच्या भोवताली अतिशय उत्साही वातावरणात चाललं होतं. मुलं एकमेकात कोटया करीत होती. हसत होती व या सगळ्याला—एकमेकांच्या सहानुभूतीला—अगदी उत आला होता. बिचारा उझीकोव्ह या सगळ्या आनंदी उत्साहाला मुकला होता.

एका आठवड्यानंतर त्याचा कमांडर झेल्वी मला म्हणाला, 'उझीकोव्ह तुमच्याशी बोलण्याची माझ्याकडे परवानगी मागत आहे.'

'नाही. तो जेव्हा त्याच्या परीक्षेत उत्तम प्रकारे उतरेल त्या दिवशी मी त्याच्याशी बोलेन असं त्याला सांग.'

लवकरच मला दिसून आलं की अर्कांडीच्या भिवया आतापर्यंत अगदी स्थिर असायच्या. पण एक प्रकारच्या आठ्या आता त्याच्या कपाळावर दिसू लागल्या. तो इतरांच्याकडे स्थिरपणं पाहू लागला. तो काहीतरी विचार करत किंवा स्वप्न पहात असावा असं वाटू लागलं. प्रत्येकाला त्याच्या वर्तनातला हा फरक जाणवू लागला. झेल्वीनं त्याला प्रथम आवार साफ करायचं काम दिलं होतं. अर्कांडी अगदी वक्तशीरपणे कामावर येऊ लागला. कचऱ्याची पिंपं नेऊन साफ करू लागला. फुलांच्या ताटव्याभोवतालची घाण साफ करु लागला. कधीकधी तो संध्याकाळीही त्याचं फावडं घेऊन इकडे तिकडे पडलेले कागद, सिगरेटची थोटकं गोळा करी व फुलांचे ताटवे व्यवस्थित करी. एके दिवशी संध्याकाळी तो वर्गात बसला व एका मोठ्या कागदावर त्यानं काहीतरी काढलं. दुसऱ्या दिवशी सकाळी तो कागद त्यानं विशिष्ट प्रकारे दिसेल अशा बेतानं लावला. त्यावर लिहिलं होतं :

'मुलांनो, तुमच्या कॉम्रेडच्या कामाची दखल घ्या. कागद वगैरे बाहेर फेकू नका,'

यावर गॉर्कोव्हस्की म्हणाला, 'अरे, पहा, पहा. तो स्वतःला आपला कॉम्रेड म्हणवतो हं !'

उझीकोव्हची ही घटना चालली असताना कॉम्रेड झोया एके दिवशी कॉलनीत आली. ती मुलांची जेवणाची वेळ होती. झोयाबाई सरळ उझीकोव्हच्या टेबलाजवळ गेली. जेवणाच्या खोलीत एकदम शांतता प्रस्थापित झाली. झोयाबाईनं उझीकोव्हला अगदी मायाळू शब्दात जे विचारलं, तें जेवणघरात सर्वांना ऐकू गेलं:

'तुझंच नाव उझीकोव्ह काय ? तुला आता कसं वाटतं सांग पाहू ?'

उझीकोव्ह उठून उभा राहिला व त्यानं गंभीरपणे झोयाच्या डोळ्यात पाहिलं आणि आदरानं उत्तर दिलं,

'मला तुमच्याशी बोलता येणार नाही. त्यासाठी प्रथम कमांडरची परवानगी घ्यावी लागेल.'

कॉम्रेड झोया त्या कमांडरला शोधायला गेली. कमांडर मिटका पुढे आला.

'काय झालं ?' असं त्यानं विचारलं.

'मला उझीकोव्हशी बोलण्याची परवानगी द्यावी.'

मिटकानं साफ नाही म्हणून सांगितलं.

'नाही याचा अर्थ काय ?'

'मी तुम्हाला परवानगी देऊ शकत नाही एवढंच.'

कॉम्रेड झोया ऑफिसात आली व तिनं आपल्या संतापाला वाट करून दिली. ती वाटेल ते बरळू लागली.

'हे चालणार नाही.' ती किंचाळली, 'त्याच्या जर काही तक्रारी असल्या तर? तो अगदी संकटात असला तर? हा म्हणजे तुमचा शुद्ध छळवाद झाला.'

'कॉम्रेड झोया, मी काहीही करु शकत नाही.' असं मी तिला उत्तर दिलं.

दुसऱ्या दिवशी नताशा पेट्रेनकोनं कॉलनीच्या सर्वसाधारण सभेत पुढाकार घेतला. ती म्हणाली,

'मित्रहो, आपण अर्काडीला क्षमा करू या. तो आता काम करतोय व त्यानं आपली शिक्षा न डगमगता भोगली. मी त्याला माफी द्यावी अशी शिफारस करते.'

सर्वसाधारण सभेतून सहानुभूतीचे आवाज यायला लागले.

'का नको? उझीकोव्ह उत्तम तऱ्हेनं परीक्षेत उतरलाय.'

'खरंच उतरलाय.'

'आता अगदी योग्य वेळ आहे.'

'आपण त्या बिचाऱ्या मुलाला मदत करु या.'

झेल्वी उठला व म्हणाला, 'मी तुम्हाला सरळ सांगतो की अर्काडी अगदी बदलून गेला आहे. कालचंच पहा. ती कोण बाई? तुम्हाला माहीत आहे?'

'होय. आम्हाला माहित आहे.'

'ती त्याच्याकडे आली व म्हणाली, 'बाळ.' पण हा जराही ढळला नाही. मला वाटत होतं की उझीकोव्हमध्ये काही बदल होणार नाही. पण आता मी सांगतो की तो आतल्यातलाच एक आहे.'

लापोट हसला. 'ठीक आहे. आपण त्याला क्षमा करु.'

'पण यावर मतदान होऊ द्या.' सर्वजण ओरडले.

उझीकोव्ह शेकोटीच्या मागे मान खाली घालून उभा होता. लापोटनं मुलांनी वर केलेले हात व्यवस्थित रितीनं पाहिले व मनापासून म्हणाला,

'होय. हे एकमतानं मंजूर आहे. अर्काडी, तुझं अभिनंदन. तू मोकळा आहेस.'

अर्काडी व्यासपीठावर गेला व त्यानं सर्व सभा न्याहाळून पाहिली. त्यानं बोलायला तोंड उघडलं, पण त्याला एकदम हुंदका आला. मुलंही त्यामुळं एकदम हेलावून गेली. एक आवाज उठला.

'तो आपल्याला उद्या याबद्दल सांगेल.'

पण उझीकोव्हनं आपल्या सदऱ्याच्या बाहीनं अश्रू टिपले. त्याच्याकडे पाहून त्याला किती वाईट वाटतंय याची मलाही कल्पना आली. स्वतःला सावरून तो बोलू लागला,

'मुलांनो, मी आपला आभारी आहे... आणि मुलींनो...त्यातल्या त्यात नताशा...मी...मला सर्व काही समजतंय...तुम्ही जाणताच.'

'तू सारं विसरून जा.' लापोट जोरात म्हणाला.

उझीकोव्हनं ते मुकाटयानं ऐकलं. लापोटनं सभा बरखास्त झाल्याचं जाहीर केलं. बरीचशी मुलं व्यासपीठावर उझीकोव्हकडे धावली. आज त्यांनी जी सहानु-भूती दाखवली त्याची भरपूर वसुली झाली.

मी सुटकेचा निःश्वास सोडला. एखादा डॉक्टर, शस्त्रक्रिया यशस्वी झाली की त्याला जे समाधान वाटतं तसंच मलाही फार समाधान वाटलं.

डिसेंबरमध्ये झेर्झिन्स्की सामुदायिकाचं उद्घाटन झालं. हा समारंभ तसा गंभीर, परंतु मोकळ्या वातावरणात झाला.

त्या दिवशी जरासं बर्फ पडत होतं. आमची पन्नास मुलं त्या सामुदायिकात सामील होण्यासाठी नवे कपडे, गरम कोट वगैरे चढवून आपल्या जुन्या सह-काऱ्यांचा निरोप घेऊन आगेकूच करत नव्या घरी गेले. त्यांना एकत्र पाहिल्या-नंतर ते आम्हाला अगदी एवढेसे दिसले. जणूकाही छोटी कोंबडीची पिल्लंच. वाटेत त्यांच्या अंगावर बर्फ पडलं होतं. ते आनंदी व रसरसलेले दिसत होते. ते त्या इमारतीत खरोखरच कोंबडयांच्या पिल्लाप्रमाणे धावत व निरनिराळ्या संघटनात्मक प्रश्नांना उत्तरं देत इकडून तिकडे फिरत होती. थोडयाच वेळात त्यांनी कमांडर्स कौन्सिलची रचना केली व त्यांची तिसरी संमिश्र तुकडी बिछाने करायला गेलीसुद्धा.

गॉर्काईट्स आपला बावटा घेऊन बॅन्डच्या तालावर नव्या कॉलनीच्या समारंभात सामील झाला. ते आज त्यांच्याच कॉम्रेड्सचे पाहुणे होते. हे जुने गॉर्काईट्स त्या दिवसापासून त्यांना एक विशिष्ट 'कम्यून आर्टस' हे नवीन नाव मिळालं. ही चेकामंडळी तशी महत्वाची, प्रतिष्ठित व मानमरातबवाली असून ती आमच्या ४०० अनाथ मुलांच्यात परोपकारी वृत्तीचे आहेत असे काही मला वाटले नाहीत. दोन्ही गटात लवकरच मैत्रीचे संबंध सुरू झाले. खरं तर दोन पिढीचं अंतर व आमची विशिष्ट सोविएत मुलं आपल्या मोठयांना जो मान देतात तसा त्यांना दिला. ते त्यांना एकदम जाणवलं. शिवाय ही आमची छोटी मुलं काही तशी आता पात्य राहिली नव्हती. तर त्यांना स्वतःची एक संघटना, त्याचे नियम, शिवाय त्यांचे कामाचे कार्यक्षेत्र याला एक प्रतिष्ठा व एक जबाबदारीची जाणीव होती.

एकंदरीत पहाता या सामुदायिकाची व्यवस्था लावायचं काम माझ्यावर सोपविलं जाईल असं वाटलं. त्या दृष्टीनं अजून काही घोषणा झालेली नव्हती.

या सामुदायिकाच्या तुलनेत गॉर्की कॉलनी ही फार गुंतागुंतीची व चालवा-यला अवघड होती. त्यातले पन्नास कॉम्रेड गेल्यानंतर गॉर्काईट्सनी नवीन ५० जणांची भरती केली. हे सारेजण शहरातले होते व त्यांना साधारण कल्पना होती. पूर्वीप्रमाणेच या नव्या मंडळींनी कॉलनीची शिस्त व चालीरिती लवकर आत्मसात

केल्या. परंतु सामुदायिकाची संस्कृती व चारित्र्य ही आत्मसात करायला वेळ लागला. परंतु आम्हाला याची सवय झालेली होती.

आमच्यापुढे फार मोठं क्षेत्र उभं होतं. आमच्याच राबफॅकची नवीन मशीन-शॉप व नवीन नवीन गोष्टींची स्वप्नं आम्ही पहात होतो. एक दिवस आम्ही वर्तमानपत्रात वाचलं की आमचे गॉर्की सोविएत युनियनला भेट देणार आहेत.

□

# १४

# मोबदला

डिसेंबर ते जुलै हा काळ फार चांगला गेला. त्या दिवसात माझं गलबत वादळात सापडून इकडून तिकडे हेलकावे खात होतं. पण माझ्या हातात दोन सामुदायिकं होती व दोन्ही अतिशय उत्तम चालली होती.

झेर्झिन्स्की कॉलनिस्टांनी त्यांच्याकडे भराभर मुलं वाढवत १५० पर्यंत आकडा नेऊन ठेवला. ही मुलं ३०–३० च्या गटानं तीन वेळा भरती झाली. सर्वजण अगदी रस्त्यावर फिरणारे असून, नमुनेच होते. या सामुदायिकाची एकंदर रहाणी अतिशय स्वच्छ व सुधारकी थाटाची. त्यामुळे बाहेरचे लोक या मंडळींना पाहून त्यांचा हेवा करीत. पुष्कळ लोकांना खरोखरीच फार हेवा वाटे. पण हे तर सारे रस्त्यात भटकणारे उडाणटप्पू होते.

झेर्झिन्स्की कॉलनीतील मुलांचा एकंदर देखावा अतिशय छान असे. चांगल्यापैकी वस्त्राचे कपडे, पांढरेशुभ्र कॉलरचे सदरे, त्यांच्या बँडमधली वाद्ये उत्तम प्रतीच्या धातूची असून त्यातले बिगुल खास प्रागमध्ये बनवलेले होते. या सामुदायिकात मुलांना कामगारांच्या व चेकामंडळांच्या क्लबमध्ये सन्माननीय पाहुणे म्हणून वागवले जाई त्या ठिकाणी ते अतिशय व्यवस्थित आणि मित्रत्वाच्या भावनेने वागत. त्यांचं सामुदायिक अतिशय सुधारलेलं दिसे. त्यामुळे अनेक सर्वसामान्य लोक यांच्यावर जरा रुष्टच असत. ते म्हणत, 'यांच्याकडे फारच चांगली

मुलं आहेत. त्यांना चांगले कपडे घालून हे बाहेर दाखवायला नेतात. पण जरा रस्त्यातल्या मुलांशी बोलायचा प्रयत्न करून पहा बरं !'

मला अर्थातच या गोष्टींवर विचार किंवा काळजी करायला फुरसद मिळत नसे. २४ तासात जरूरीच्या गोष्टी मला करून घ्याव्या लागत. मला दोन घोड्यांच्या गाडीत बसून एका सामुदायिकातून दुसऱ्या सामुदायिकाकडे धावावं लागे. माझ्या वेळेच्या अंदाजपत्रकात ती वेळ म्हणजे माझ्या आयुष्यातला फुकट जाणारी वेळ वाटे. आमच्या ताब्यातल्या मुलांनी कोणत्या प्रकारे अधोगती दाखवली नाही. उलट आम्ही प्रगतीकडे वाटचाल करत होतो. आमचा शिक्षक-वर्ग मरेस्तोवर काम करत होता. त्याचवेळी मी एक सिद्धांत मांडला व तो कितीही विरोधात्मक दिसला तरी आजही मी तो तसाच पुढे मांडतो.

सामान्य मुलं किंवा सामान्य परिस्थितीत वाढलेली मुलं यांना शिकवणं फार कठीण असतं. त्यांचे स्वभाव जास्त मार्मिक व त्यांच्या मागण्या गुंतागुंतीच्या, त्यांची संस्कृती मनात खोलवर रूजलेली व त्यांचे संबंध विविध प्रकारचे असतात. ते आपल्या भावनांची किंवा आपल्या इच्छेची फारशी पर्वा करत नाहीत, तर गहन डावपेचांची अपेक्षा करतात.

आमच्या कॉलनीतली मुलं किंवा त्या सामुदायिकातली मुलं हे दोन्हीही गट समाजापासून अलग पडलेले नव्हते. दोन्ही सामुदायिकांनी निरनिराळ्या सामाजिक संस्थांशी संबंध ठेवले होते—उदा. कोम्सोमोल, पायोनियर, स्पोर्टस् किंवा मिलिटरी क्लबस्. असंख्य व निरनिराळ्या मार्गांनी शहरवासी व कॉलनी यांच्यात दळणवळण चालू असे. त्यामुळे या मंडळींच्यात विचार, कल्पना व प्रभाव यांची परस्पर देवघेव होत असे.

या सर्व गोष्टींना धन्यवाद ! आमचं शिक्षणशास्त्राचं काम आता नवीनच रंग घेऊ पहात होतं. शिस्त व रोजच्या जीवनाची तऱ्हा या गोष्टींची काळजी घेण्याचं मला फारसं कारण पडत नसे. आमच्या सामुदायिकातच त्याची चांगली खबरदारी घेतली जाई. एखाद्या गडबडीमुळे किंवा ढोंगबाजीमुळे एखाद्या गोष्टीचं उल्लंघन होऊ नये एवढंच मला बघावं लागे. साधारणपणे सामुदायिक हाच उपजत गुण असावा अशारितीने वागत.

मला काही गोष्टींचा त्रास होता व भविष्याची काही कल्पना नव्हती. तरीही माझं आयुष्य त्यावेळी खरोखरच फार आनंदात जात होतं. एखादा गुन्हे-गारी समाज, एखाद्या मोठ्या माणसाच्या नजरेखाली वाढला व त्याच्यावर विश्वास असला आणि त्याच्याबरोबरच तो पुढे गेला तर त्या माणसाला त्याचा एक अवर्णनीय आनंद वाटतो. अशा समाजात काही वेळा अपयश आलं तरी त्याचं दुःख वाटत नाही. त्रास किंवा काळजी यांना इथे फार मोठी किंमत असते.

गॉर्की सामुदायिक (कॉलनी) दुसऱ्या सामुदायिकापेक्षा मला फार जवळची वाटत असे. तिथे मैत्रीचे संबंध फार भक्कम व खोलवर रूजलेले होते. तिथल्या मुलांना आकार देताना बरीच किंमत द्यावी लागली होती व तिथे एकंदर धडपडही खूप तीव्रपणे करावी लागली होती. गॉर्काईट्सना माझी तशी जरूरीही फार होती. झेर्झिन्स्की या सामुदायिकाची गोष्ट वेगळी होती. त्यांना सुरुवातीपासून चेकामंडळींनी जवळ केलं होतं. याउलट गॉर्काईट्सना फक्त मी व माझ्या शिक्षकांचा समूह हेच जवळचे होते. त्याच्याशिवाय दुसरं कोणीही नव्हतं. एखादे दिवशी मला गॉर्काईट्सना सोडून जावं लागेल ही कल्पनाही माझ्या डोक्यात कधी शिरली नाही. अशा तऱ्हेची काही आकस्मिक घटना घडेल अशी कल्पना करणंही माझ्या आवाक्याबाहेर होतं. असं झालंच तर माझ्या आयुष्यातली ती फार मोठी दुर्घटना ठरली असती.

कॉलनीत जाणं म्हणजे जणू घरी गेल्यासारखं वाटे. मला त्यांच्या सर्वसाधारण सभांमध्ये, कमांडर्स कौन्सिलमध्ये किंवा काही गुंतागुंतीच्या प्रश्नात, तसंच अवघड निर्णय ऐकताना खरोखरी विश्रांती मिळाल्यासारखी वाटे. त्याचवेळी मी एक अखेरपर्यंत टिकणारी सवय लावून घेतली. ती म्हणजे मी शांत ठिकाणी, एकटेपणे, कधीही काम करण्याची पद्धतच हरवून बसलो. मला माझ्या बाजूला व माझ्या टेबलाभोवती मुलांचा गोंगाट असला की बेचैन वाटत नसे आणि अशाच वेळी माझ्या विचारांना पंख फुटत व माझी कल्पनाशक्ती काम करू लागे. या गोष्टींसाठी तरी नक्कीच मी गॉर्काईट्सचा खरोखर ऋणी होतो.

झेर्झिन्स्की सामुदायिकाच्या जास्त व नव्यानव्या मागण्या असायच्या. त्यामुळे मला माझा वेळ व लक्ष तिकडं द्यावं लागलं. नव्या काळज्या पण निर्माण होत असत. शिक्षणशास्त्राची आखणीदेखील त्याप्रमाणे करावी लागे. या चेकामंडळींचा समाज विशेषतः अगदीच नव्या प्रकारचा होता. त्यांचं खरं म्हणजे सामुदायिक होतं व ते शिक्षणखात्यातल्या कर्मचाऱ्यांपेक्षा वेगळ्याच प्रकारचं होतं. माझ्या कामांमुळे जितका मी त्यांच्या जवळजवळ जायला लागलो तेवढं जास्त बारकाईनं ते सामुदायिक मला बघता आलं व इथं काहीतरी नवीन आहे अशी माझी खात्री झाली. हे चेकामंडळींचं सामुदायिक जास्त समृद्ध होतं. गेली आठ वर्षे आमच्या कॉलनीच्या सामुदायिकात जो दर्जा आणायचा प्रयत्न करत होतो त्या मला यांच्या सामुदायिकात दिसून आल्या. मला एका कल्पनेला सामोरं जावं लागलं. ही कल्पना माझ्या एकट्याच्याच मनात वावरत होती असा माझा विश्वास होता. ही कल्पना तर्क व साहित्य यांच्या अनुषंगातून, निरनिराळ्या घटना व क्रांतीचं तत्वज्ञान यांच्या अनुभवातून बांधली गेली होती. ती मी कुठंही प्रत्यक्षात पाहिली किंवा अनुभवलेली नव्हती आणि कधी पहायला मिळेल याबद्दलची आशाही मावळून गेली होती.

माझा हा शोध अतिशय मौल्यवान व अर्थपूर्ण होता की त्यात माझ्या वाट्याला संपूर्ण निराशा येईल असं वाटे. म्हणून माझा हा शोध मी अगदी गुप्त ठेवला. या लोकांबरोबरचे माझे संबंध कुठल्याही तऱ्हेनं औपचारिक होऊ नयेत अशी माझी इच्छा होती.

हा शोध म्हणजे शिक्षणशास्त्राच्या तत्त्वज्ञानापासून दूर नेणारा असा होता. आतापर्यंत गूढ, अव्यक्त व अमूर्त कल्पना माझ्या कामात मला मार्गदर्शन करत होत्या. परंतु या चेका मंडळींच्या सामुदायिकाच्या दर्जानं गोष्टी फार सोप्या व सरळ रीतीने समजावल्या म्हणून मला विशेष आनंद झाला. त्यामुळे आता अनेक गूढ प्रदेशाचं अगदी तपशीलवार चित्र बनवू शकण्याची मला संधी मिळाली. ह्या चेकामंडळींची बौद्धिक पातळी, शिक्षण, संस्कृती इत्यादींचा उत्तम संयोग झाला असतानासुद्धा त्याचं बाहेर प्रदर्शन दिसलं नाही. मात्र जुन्या रशियन बुद्धिवाद्यांच्या ठिकाणची वृत्ती तिरस्करणीय वाटे. असं असणं स्वाभाविक आहे हे मला माहीत होतं. परंतु मनुष्याच्या रोजच्या कृतीत हा दर्जा दिसून येईल असं मला संभवनीय वाटत नव्हतं. आता मला भाषणं, तर्कशुद्ध पद्धती, बौद्धिक भावनांचे नवीन प्रकार, नवीन सद्भिरुचीकडे मनाचा कल, नवीन उमेदीनं बांधणी, या सर्वांचा नवीन वापर, या सर्व आदर्शांचा अभ्यास करण्याची संधी मिळाली. हे स्वयंभू बुद्धिवादी, आदर्शाला जणू काही उद्धट रहिवासी, दुसऱ्याची जागा बळकावणारा, कधीही भाडं न देणारा व सर्वांना शिकवण्याचा आव आणून त्यांना मरणप्राय त्रास देणारा अशा प्रकारचा समजत; म्हणून सर्वजण या आदर्शाची तक्रार करतात व त्यापासून दूर पळायचा प्रयत्न करतात. मी आता काही वेगळेच पहात होतो. आदर्श हा नुसताच रहिवाशी, नुसता एक अतिशय बुद्धिवान प्रशासक नाही. आपल्या शेजाऱ्याच्या कर्तृत्वाचा मान ठेवणारा जो चुकीच्या दुरुस्त्या करणारा, प्रत्येकजण त्याच्याशी अतिशय जमवून घेणारा व सहमत होणारा कार्यकर्ता समजतात. त्याहूनही मला त्यांच्या तात्विक दृष्टिकोनात जास्त रस होता. तत्व म्हणजे जणू काही एक डोळ्यावर बांधलेली पट्टी असं आमच्या काही खास मित्रांच्या बाबतीतला माझा अनुभव होता. पण चेकामंडळींच्या बाबतीत तसं नव्हतं. तत्वावर त्यांची निष्ठा होती. चेकामंडळी तत्व हे एक प्रमाण मानत व लोक जसा घड्याळाचा उपयोग करतात तसा ते तत्त्वाचा उपयोग करत. कुठच्याही तऱ्हेच्या लाल फितीचा विलंब किंवा अकारण आवेश दाखवत नसत. आता मी खरं तत्वनिष्ठ आयुष्य पाहिलं. या स्वयंभू बुद्धिवाद्यांच्या ताठरपणाबद्दल जो एक प्रकारचा उबग माझ्या मनात पक्का रुजला होता तो अगदी बरोबर होता अशी माझी खात्री पटली होती. एखादा विशिष्ट प्रकारचा बुद्धिवादी तत्वाप्रमाणे काही करतो तर अर्ध्या तासानं तो व त्याच्या सभोवतालच्या मंडळींना शाबूत ठेवण्यासाठी गोळ्या खाव्या लागतील हे काही एखादं गुपित नव्हे.

मी आणखी अनेक पैलू पाहिले. चांगला व्यापक विनोद, संभाषणाचा मुद्देसूदपणा, तयार सिद्धांताबद्दल नावड, कोचावर रिकामे पडून राहणं, टेबलावर अस्ताव्यस्त बसणं, शेवटी आनंदी पण अनिर्बंध कामाची अमर्याद उरक, खिजविण्याची किंवा हुतात्म्याची दृष्टी नसणं, 'भाग्यवान हुतात्म्या'चा आव आणण्याचा किळसवाणा प्रयत्न न करणं वगैरे वगैरे......शेवटी मला दिसलं व माझं मलाच समजलं की ही जी एक मौल्यवान चीज, ज्याला दुसरं चांगलं नाव–सामाजिक आसक्ती–सार्वत्रिक दृश्यभावना–कुठल्याही कामाच्या वेळेला सामुदायिकातल्या घटकाबद्दलची, एका सार्वत्रिक ध्येयाची सतत जाणीव–ज्या जाणीवेची पोकळ पांडित्य व वाचाळता यात अधोगती होत नाही, ही 'सामाजिक एकनिष्ठता' म्हणजे औषधाच्या दुकानातून पाच पैशाला विकत आणण्याची चीज नव्हे, एखाद्या परिषदेच्या किंवा अधिवेशनाच्या ठिकाणी आपल्या बाजूला बसलेल्या माणसाकडे पाहून हास्याची देवघेव करणं नव्हे, तर खरी एकी, काम व हालचाल याची सांगड, जबाबदारी व मदत यांची सांगड म्हणजेच आपल्या रूढीची एकता होय.

चेकामंडळी हेतूपुरस्पर व्यवस्थित काळजी घेत त्यामुळे झेरझिन्स्की सामुदायिक फार चांगल्या तऱ्हेनं चाललं होतं. त्यांच्यासाठी जे जे केलं जाई ते ते सामावून घ्यायचं एवढंच त्यांना करायचं होतं. मलाही साध्यासाध्या गोष्टींसाठी माझं डोकं भिंतीवर आपटून घ्यायची वेळ येत नसे. मुलांना हातरूमाल दिले पाहिजेत याची आवश्यकता पटवून देण्यासाठी अधिकाऱ्यांना समजावून सांगण्याची वेळ येत नसे.

मला खरोखर फार मोठं समाधान मिळत असे. मी असं समीकरण केलं की, आता मी खऱ्याखुऱ्या बोल्शेविक लोकांशी ओळख करून घेतली आहे. माझी खात्री झाली की आपली शिक्षणशास्त्र योजना ही खरी बोल्शेविक योजना आहे. ह्या प्रकारचा नवा माणूस घडवायचं माझं ध्येय हा माझी एकट्याचा आकर्षक शोध नसून किंवा स्वप्न नसून ही खरी वस्तुस्थिती आहे. ही वस्तुस्थिती मी उचलून धरतो; कारण ती माझ्या कार्याचा भाग आहे.

माझ्या सामुदायिकातील कामात उगाच अडथळे पण येत नसत. काम खूप कष्टाचं होतं. पण ते माणूस त्याच्याशी मुकाबला करू शकेल असं होतं.

आमच्या या सामुदायिकाचं आयुष्य तसं काही फार भरभराटीचं होतं किंवा निष्काळजीपणाचं होतं असंही नाही. बाहेरच्यांना तसं वाटत असे. चेकामंडळी त्यांच्या पगाराचा काही भाग जमा करत व तो सामुदायिक चालविण्यासाठी देत. पण यामुळे त्यांना व आम्हालाही समाधान लाभत नव्हतं.

तीन महिने गेले व त्या सामुदायिकाला काही तरी मिळविण्याची गरज भासू लागली. आम्ही पगार वेळेवर देऊ शकत नव्हतो व मुलांच्या खाण्या–जेवण्याच्या खर्चाची तोंडमिळवणी करणं जड जाऊ लागलं. आमची वर्कशॉप्स् होती. मी व

माझ्या पहिल्या मुलांनी मोचीकामाचं सामान आणून गुपचूप एका कोपऱ्यात पहिल्याच दिवशी आणून ठेवलं होतं व त्यावर उशा वगैरे रचून ठेवल्या होत्या. चेकामंडळींनी अर्थातच त्याकडे दुर्लक्ष केलं होतं. पण तरीही दुसऱ्या वर्कशॉप्स-मधूनही फारसं उत्पन्न येण्याचं लक्षण नव्हतं.

एके दिवशी आमच्या प्रमुखानं मला बोलावलं व जरा चाचरतच माझ्या-पुढे एक चेक टेबलावर ठेवला व सांगितलं.

'हे आता एवढंच !'

मी समजायचं ते समजलो व तुम्ही मला किती दिले आहेत म्हणून विचारलं.

'दहा हजार, हे शेवटचेच. हे खरे तर एक वर्ष आगाऊ गोळा केले आहेत. आता यापेक्षा जास्त मिळणार नाहीत. समजलं का ? एक माणूस येईल. तो मोठा उत्साही व चलाख आहे. त्याचा उपयोग करून घ्या.'

काही दिवसांनी एक माणूस आला. तसा शिक्षणशास्त्रज्ञ म्हणण्याच्या योग्य-तेचा नव्हता. तरी तो सामुदायिकात येऊन आमच्यासमोर उभा ठाकला. त्याचं नाव सॉलोमन बोरिसोविच कोगन. सॉलोमन तसा तरुण नव्हता तर चांगला साठीच्या आसपास व हृदयविकारानं थोडाबहुत पछाडलेला असा होता. त्याला नेहमी श्वास लागत असे व त्याला कधीकधी छातीत दुखण्याची सवय होती. शिवाय तो जास्त स्थूल होता. पण या माणसात कमालीची चपळाई होती व त्याला स्वस्थ बसवणं महा-कठीण असे. सॉलोमननं येताना आपल्याबरोबर काही भांडवल किंवा काही सामान, शोधक प्रवृत्ती आणली नसली तरी त्याच्यामध्ये अजूनही जुन्या जमान्यात उपयो-गात न आणली गेलेली ताकद उफाळून वर येत होती. त्याच्यामध्ये कल्पकता, आशावाद, तडफ, माणसाची पारख, खऱ्याखोट्याची फारशी चाड नसली, तरीही जराशी सहृदयता व ध्येयनिष्ठता होती. हे सर्व गुणावगुण जणूकाही एका चाका-तील आसाप्रमाणे त्याच्यामध्ये सामावलेले होते. त्याच्याबद्दल त्याला अभिमानही वाटत होता. तो बोलून दाखवत असे '...तुम्ही अजून कोगनला ओळखलं नाही. तुम्हाला एकदा कळलं की मग तुम्ही तुम्हाला काय पाहिजे ते म्हणा.'

त्याचं म्हणणं बरोबर होतं. आम्ही त्याला समजून घ्यायलाच पाहिजे होतं. आम्ही म्हटलं की हा एक विलक्षण माणूस आहे. आम्हाला त्याच्या आयुष्यातील अनुभवांची जरूरी होती. कधीकधी त्याचा तो अनुभव अशा काही तऱ्हेनं उघड होई की आमच्या धमन्यातलं रक्त एकदम थंड पडत असे आणि आमच्या डोळ्यावर आमचा विश्वास बसत नसे.

एके दिवशी सॉलोमन लाकडाच्या ओंडक्याचं भलं मोठं ओझं शहरातून घेऊन आला.

'हे कशासाठी आणलंय ?'

'कशासाठी ? सांगतो. अहो, आपल्याला एक गुदाम बांधायचंय. एका बांध-

काम करणाऱ्या संस्थेला लागणाऱ्या फर्निचरची ऑर्डर घेतली आहे. ही लाकडं ठेवण्यासाठी आपल्याला गुदामाची जरुरी नाही का ?'

'पण मग ती साठवून कशाला ठेवायला पाहिजे ? आपण फर्निचर बनवू व त्या संस्थेला पाठवून देऊ.'

'वा ! वा ! अशी काही संस्था आहे असं तुम्हाला खरंच वाटलं की काय ? अशी काही संस्था नाही. ही शुद्ध बतावणी. अशी काही संस्था असतीच तरी मला तिच्याशी काहीही कर्तव्य नव्हतं.'

'मग अशी संस्था नाही म्हणता ?'

'कसली संस्था घेऊन बसलात ? त्यांना याबद्दल काय म्हणायचंय ते म्हणू द्या. मुद्याची गोष्ट अशी आहे की त्यांच्याकडे पैसा आहे. पैसा आहे म्हणून त्यांना थोडं फर्निचर हवं आहे. फर्निचर काही उघड्यावर ठेवता येत नाही. त्यावर छप्पर पाहिजेच. ते तुम्हाला समजतं. नुसतं छप्पर काही बनविता येत नाही. भिंती असल्याच पाहिजेत.'

'आपण काही अशी गुदामं वगैरे बांधणार नाही हं. तुम्ही काहीही म्हणा.'

'अहो, तेच तर मी त्यांना सांगितलं. त्यांना वाटतं झेझिन्स्की सामुदायिक म्हणजे काही अशी तशी नसून ती एक आदर्श संस्था आहे. ते आपला मौल्यवान वेळ असली फालतू गुदामं बांधण्यात घालवणार आहेत का ? आमचा वेळ काय असल्या कामासाठी थोडाच आहे ?'

'मग ? त्यावर ते काय म्हणाले ?'

'यावर ते म्हणाले, ठीक आहे. बांधून टाका. ते एवढे आतुर दिसले म्हणून मी त्यांना सांगितलं, ठीक आहे, २० हजार रुबल लागतील. पण तुमची जर तशी इच्छा नसली तर तुम्हाला काय पाहिजे असेल ते बांधायला घ्या. खरंच नाही तरी आपल्याला गुदामं बांधून काय करायचंय ? आपल्याला असेंब्ली–शॉपची जरूरी आहे.'

दोन आठवड्यांनंतर सॉलोमननं असेंब्ली–शॉप बांधायला सुरुवात केली. जमिनीत खांब रोवायला सुरुवात केली व सुतार बाजूच्या भिंती तयार करायच्या कामाला लागले.

'सॉलोमन, असेंब्ली–शॉप बांधायला तुम्हाला पैसा कुठून मिळाला ?'

'कुठून म्हणजे ? मी तुम्हाला सांगितलं नाही का ? त्यांनी २० हजार रुबल आपल्या खात्यावर जमा केले आहेत.'

'कोणी जमा केले आहेत ?'

'अहो, ती संस्था जिच्याबद्दल मी तुम्हाला बोललो होतो.'

'पण कशासाठी ?'

'कशासाठी म्हणजे ? अहो त्यांना गुदामं पाहिजेत. ठीक आहे. त्यांना गुदामं बांधून घ्यायला काय आम्ही नाही म्हटलं का ?

' पण हे पहा सॉलोमन, तुम्ही गुदामं न बांधता असेंब्ली-शॉप बांधायला घेतले.'

आता मात्र सॉलोमनची सहनशक्ती संपली.

' आता ऐका. आपल्याला गुदामं नकोत म्हणून कोणी सांगितलं ? तुम्हीच म्हणालात ? खरं ना ?'

' मग त्यांचे पैसे आपण परत करुन टाकू या.'

सॉलोमननं विचित्र रितीनं कपाळाला आठ्या घातल्या.

' हे पहा. आता उगाच अव्यवहारी बनू नका. मिळालेले पैसे परत केल्याचे तुम्ही कधी ऐकलंय काय ? हे बघा, तुम्ही चांगले तगडे असाल व ते तुम्हाला परवडतही असेल. पण मी पडलो आजारी माणूस. मी माझ्या डोक्याला ताण देऊ शकत नाही. पैसे परत करा म्हणे.'

' अहो, पण त्यांना उद्या कळलं तर ?'

' अँटन सेमियानोविच, तू बुद्धिवान माणूस आहेस. होय की नाही ? त्यांना काय ते कळेल असं वाटतं ? त्यांना पाहिजे तर उद्या येऊ दे. माणसं काम करतायंत हे त्यांना दिसेल. आणि हे असेंब्ली–शॉप आहे असं त्यांना कोण सांगायला बसलंय ?'

' उद्या आपलं वर्कशॉप सुरू झालं की मग ?'

' मला काम करण्यापासून कोण थांबवू शकणार आहे ? ती इमारती बांधणारी संस्था मला काम करण्यापासून परावृत्त करणार आहे थोडीच. मी एखाद्या गुदामात किंवा बाहेर उघड्यावर काम करावं हे ठरवणारे ते कोण ? असा काही कायदा आहे का ? असा काहीही कायदा नाही.'

सॉलोमनच्या तर्कशास्त्राला काही बंधनं नव्हतीच. सगळ्या अडचणींवर मात करुन किल्ल्याचे दरवाजे फोडण्याची ताकद त्याच्यात होती. शेवटी एका वेळेला आम्ही विरोध करायचं सोडून दिलं. कारण कुठलाही विरोध तो मुळातच मोडून काढत असे.

वसंतऋतुमध्ये आमचे दोन घोडे रात्रीच्या वेळेला बाहेरच बांधले जाऊ लागले. मिटचा गॉर्कोव्हिस्कीनं मला विचारलं,

' सॉलोमन, घोड्याच्या तबेल्यात काय बांधलंय ?'

' बांधलं ?'

' हो. त्यांनी सुरुवात केली आहे. एक प्रकारचा बंब त्यांनी बसविला आहे व तो आता त्याच्याखाली चिमणी बांधणार आहे.'

' त्याला माझ्याकडे पाठवून द्या पाहू.'

ताबडतोब सॉलोमन तेलाचे डाग पडलेल्या कपड्यात धापा टाकत आला.

' तुम्ही ते तिथं काय बनविताय ?'

' तुम्हाला माहीत आहे. तिथं मी ओतीवकामासाठी बांधकाम करतोय.'

' फाउन्ड्री ? अहो, ती तर आपण स्नानगृहाच्या मागे बांधायचं ठरवलं होतं.'

'अहो, स्नानगृहाच्या पाठीमागे कशाला? इथं चांगलं बांधकाम तयार असताना.'

'सॉलोमन बोरिसोविच.'

'होय, तेच माझं नाव आहे. काय म्हणणं आहे ?'

'अहो. पण घोड्यांना कुठे ठेवायचं ?' असं गॉर्कोव्हिस्कीनं विचारलं.

'अरे, घोडे बाहेर मोकळ्या हवेत राहू शकतात. तुला काय वाटतं, तुलाच एकट्याला मोकळ्या हवेची जरुरी आहे ? बिचाऱ्या घोड्यांना मात्र आतमध्ये डांबून ठेवायचं ? छे ! काय हा अमानुषपणा ? चांगलेच मालक आहात.'

आम्ही तर या वक्तव्यावर कुठल्या कुठे फेकले गेलो होतो. पण व्हिटकानं परत एकदा विचारलं,

'अहो, पण उद्या हिवाळा पडल्यावर काय करायचं ?'

पण सॉलोमननं त्याचाही अगदी भुगा करुन टाकला

'म्हणजे हिवाळा येणार आहे असं धरुन तू चाललायस !'

'सॉलोमन बोरिसोविच.' असं व्हिटका रागानं कडाडला.

सॉलोमन दोन पावलं मागे हटला.

'समज, हिवाळा आलाच तरी ऑक्टोबर महिन्यात काही आपल्याला तबेला बांधता येणार नाही. त्याच्यात काय बिघडलं मोठंसं ? दोन हजार रुबल खर्च करायची तुला आत्ता काय घाई झाली आहे ?'

आम्ही साऱ्यांनी निराशेनं निःश्वास सोडला. आम्ही शरण गेलो. आमची जणू दया येऊनच की काय सॉलोमननं आपला मुद्दा समजावून सांगण्याची तयारी दाखवली. त्यानं आपली बोटं मोजायला सुरुवात केली. 'मे, जून, जुलै आणि पुढे काय म्हणता?...ऑगस्ट, सप्टेंबर...'

या ठिकाणी तो जरा थांबला. आणि स्वत:च्या विधानाची पक्की खात्री पटल्याप्रमाणे म्हणाला,

'ऑक्टोबर. अरे, विचार करा. फक्त सहा महिन्यांच्या कालावधीत २००० रुबल, आणखी २००० रुबल आणतील. तुम्हाला तबेले सहा महिने मोकळे ठेवायचेत ? आपण भांडवल असं गोठवून ठेवू शकत नाही.'

सॉलोमनला गोठवून ठेवण्याबद्दल फार चीड होती.

'मला झोप येत नाही.' तो म्हणाला, 'इतकं काम करायचं पडलेलं असताना झोप येणार कशी ? प्रत्येक क्षण हा पैसे कमविण्याचा. अमुक एकावेळी झोपलंच पाहिजे असं कोणी ठरवलंय ?'

आम्ही अगदी आश्चर्यचकित झालो. काही दिवसांपूर्वी आम्ही किती गरीब होतो आणि आता सॉलोमननं लाकूड, धातू, चरक ह्याचा प्रचंड साठा आणला. आमच्या कामाच्या दिवसात पुढील शब्द नियमितपणे ऐकू येऊ लागले: सल्ला, चेक, विसार (आगाऊ रक्कम), मालाच्या किंमतीची यादी, १००००, २०००० रुबल

वगैरे वगैरे... सॉलोमन कमांडर कौन्सिलमध्ये मुलांची २००, ३०० रुबल कपड्यांसाठी खर्च करायचे अशा तऱ्हेची भाषणे जरा उपहासानंच ऐकत असे.

'याच्यामध्ये काही दुमत होईल का ? अरे मुलांना विजारींची जरूरी आहे. आणि ३०० रुबलमध्ये कसल्या विजारी घेणार ? छे ! त्या चांगल्या नसतील. त्याला चांगले १००० रुबल पाहिजेत.'

'अहो पण एवढे पैसे आणायचे कुठून ?'

'तुम्हाला हात आहेत आणि डोकीही आहेत. तुमची डोकी कशासाठी आहेत ते तुम्ही स्वतःलाच विचारा बरं ! काय नुसत्या टोप्या ठेवण्यासाठीच ती काही नाहीत. तुम्ही रोज फक्त १५ मिनिटं कारखान्यात काम कराल तर मी तुम्हाला १००० रुबल, किंबहुना जास्तच मिळवून देईन.'

सॉलोमननं बाहेरून गुदामासारख्या दिसणाऱ्या त्याच्या अगदीच मामुली कारखान्यात जुने व स्वस्त चरक व अनेक प्रकारच्या वस्तू गोळा करून बांधून ठेवलेल्या होत्या. मुलं त्या सगळ्या जुन्यापुराण्या वस्तूंवर अगदी आनंदानं तुटून पडली. अनेक प्रकारच्या वस्तू, क्लब-फर्निचर, खाटा, तेलाचे डबे, अर्ध्या चड्ड्या, खेळताना वापरायचे कपडे, शाळेतील बाकं, खुर्च्या, आग विझवण्याचे नळे, या वस्तू मोठ्या संख्येनं बनवल्या. सॉलोमनच्या या धंद्यात कामाची वाटणी अगदी शिगेला पोचली.

'तू काय सुतार होणार नाहीस. खरं की नाही ? मला माहीत आहे. तू डॉक्टर होणार आहेस. तेव्हा तू फक्त पाय बनव. तू सबंध खुर्ची कशाला बनवतोस ? कारण मी दोन पाय बनवायला एक कोपेक देतो. तू पन्नास कोपेक दिवसाला मिळवशील. तुला काही बायकापोरं नाहीत.'

मुलं कमांडर कौन्सिलमध्ये हसत असत व सॉलोमनची असलं हलकं काम आणल्याबद्दल कधीकधी कानउघडणी करत असत. पण आमचा कारखानदारीचा आर्थिक आराखडा आधीच तयार होता व ही आमची गोष्ट अतिशय महत्वाची होती.

सामुदायिकातील मुलांसाठी वेतन द्यायला कामाचा मोबदला म्हणून फारशी जिकीर न करता सुरुवात केली. हे शिक्षणशास्त्रात बसतं की नाही याचा विचार केला नाही. शिक्षणिकमंडळींनी शिक्षणशास्त्राप्रमाणं वेतन देण्याचा काय परिणाम होतो याकडे सॉलोमनचं लक्ष वेधायचा प्रयत्न केला, तेव्हा सॉलोमन उत्तरला : 'लोकांना शहाणं, हुशार बनवायचं असा आपला उद्देश आहे. मग मोबदल्याशिवाय काम करणारा माणूस हुशार कसा होईल ?'

'कल्पना म्हणजे काहीच नव्हेत का सॉलोमन ?'

'माणसाला जेव्हा कामाचा मोबदला मिळू लागतो तेव्हा त्याला कल्पना इतक्या सुचू लागतात की काय करावं ते त्याला समजत नाही. पण त्याच्याजवळ

पैसा नसला तर त्याच्या डोक्यात एकच कल्पना येते ती म्हणजे कोणाकडून उसनवार करावी बरं ? तर अशी वस्तुस्थिती आहे.'

सॉलोमन बोरिसोविच हा आमच्या कामगार सामुदायिकात अत्यंत उपयुक्त असं मिश्रण करणारी व्यक्ती होती. त्याचं तर्कशास्त्र हे अगदीच वेगळं व विचित्र होतं हे आम्हाला माहीत होतं. परंतु कितीतरी पूर्वग्रहांना तो असे जोराचे व मजेदार धक्के देत असे. विरोधातून त्यानं वेगळ्या प्रकारच्या व्यवसायाची मागणी जागृत केली.

झेर्झिन्स्की सामुदायिक पहाता पहाता सहजरित्या स्वयंपूर्ण झालं. तसे फारसे कष्ट पडले नाहीत. त्यामुळे आम्ही हे यश केव्हा मिळवलं तेसुद्धा आम्हाला जाणवलं नाही. उगाच नाही मिळवलं असं सॉलोमन म्हणायचा :

'एकशेपन्नास मुलं सामुदायिकात राहून आपलं पोट भरण्याइतकं काम करू शकत नाहीत ? अर्थातच करू शकतात ! त्यांना कामशँपेन हवी ? नको आहे ? तसंच त्यांना काय बायका आहेत ? बायका असल्या तर त्यांना छानछोकीच्या वस्तू आणून द्याव्या लागतात.'

मुलांनी ठरवलेली आर्थिकदृष्टचा व्यवसायाची तीन महिन्यांची योजना सर्वांच्या सामुदायिक कष्टांनी पुरी केली. चेकामंडळीसुद्धा आमच्याबरोबर प्रत्येक दिवशी होतीच. मुलांच्या बरोबरीनं ती मंडळी प्रत्येक बारीकसारीक गोष्टी किंवा चुका, सॉलोमनची व्यापारी प्रवृत्ती, कमी प्रतीचा तयार होणारा माल, त्यामुळे फुकट जाणाऱ्या गोष्टी वगैरे बाबतीत कसून लक्ष घालत. मुलांच्या व्यवसायातला अनुभव दिवसेंदिवस गुंतागुंतीचा होऊ लागला व ते सॉलोमनवर कधीकधी टिका करू लागले. त्यावर रागावून तो एक दिवस म्हणाला :

'हे काय ? यांना तर आता सारं समजायला लागलं ! खारकोव्ह इंजिन-वर्कशॉपमध्ये कसं काम चालतं ते हे मला शिकवायला लागले. ह्यांना खारकोव्ह इंजिन वर्कशॉपबद्दल काय माहीत आहे ?'

आता सर्वांनी 'आम्हाला खराखुरा कारखाना पाहिजे' ही कल्पना मान्य केली.

कारखान्याविषयी जास्तीत जास्त चर्चा होऊ लागली. आमच्या बँकेच्या खात्यावर एकएक हजार जमा व्हायला लागले. त्यामुळे सर्वांना स्वतःचा कारखाना असावा ही इच्छा बळावू लागली. ते होण्याच्या शक्यतेची वस्तुस्थिती पण होती. परंतु हे सर्व बरंच नंतर अस्तित्वात आलं. झेर्झिन्स्कीवाले गॉर्काईट्सना बरेचदा भेटत असत. सुट्टीच्या दिवशी ते तुकड्या तुकड्यांनी एकमेकांना भेटत, फूटबॉल व्हॉलीबॉल खेळत, एकत्र पोहायला जात, बर्फावर खेळत, फिरायला जात व कधी नाटक–सिनेमालाही जात.

कॉलनी व कम्यून यांनी मिळून बऱ्याच संस्थांत नावे नोंदवली–उदा.

कोम्सोमोल पायोनियर्स वगैरे. ते दोन्ही मिळून नवीन ठिकाण बघायला किंवा सहलीला जात. मला हे दिवस फार फार आवडत. हे दिवस माझ्या खऱ्याखुऱ्या सफलतेचे म्हटले पाहिजेत. ही माझी सफलता किंवा यश हेच शेवटचं असं मला वाटत असे.

याच दिवसात कॉलनी व कम्यून यांच्यासाठी एकाच वेळी सर्वकाही गोष्टीसाठी–कपडे बनविण्यापासून ते भेटण्याच्या जागा ठरविण्यापर्यंत–ऑडर्स दिल्या जात. गॉर्काईट्स व झेर्झिनस्काईट्स यांच्यासाठी एकाच प्रकारचे गणवेश, घोड्यावर टाकायच्या रिकीबी, पांढऱ्या कॉलरी व डोक्यावरच्या टोप्या सारख्याच बनविल्या जात. अशावेळी मी अनेकदा कॉलनीत राही व झेर्झिनस्की संपूर्णपणे किरगिझोव्हच्या हवाली करी. आम्ही कुर्याझ सोडत असू. प्रवासाला तीन तास लागत. खोलोडन्काया टेकडीवरून शहराकडे जात असू. आमची भेटायची जागा बहुधा ऑल युक्रेनियन सेंट्रल एक्झिक्युटिव्ह कमिटीच्या समोरच्या टेबलव चौकात, मोकळ्या चौकात असे.

आमची गॉर्की कॉलनी रस्त्यानं जाताना फार छान दिसे. आमच्या सहासहा मुलांच्या रांगा सारा रस्ता व्यापून टाकत. कधीकधी ट्रामपट्ट्यावरही त्या जात असत. कधीकधी दहादहा ट्रामगाड्या एकापाठीमागे एक अशा थांबून रहात. त्यांचे ड्रायव्हर्स चडफडत व सारख्या घंटा वाजवत रहात. पण आमची डाव्या अंगाची मुलं आपली ड्युटी बरोबर जाणून असत व गंभीरपणे आगेकूच करत. कधीकधी जरा सावकाशीनंच व मिस्किलपणे फूटपाथवरून चालणाऱ्यांकडे बघत व ट्राम-ड्रायव्हर्स, त्यांच्या वाजणाऱ्या घंटा याकडे संपूर्ण दुर्लक्ष करत. सर्वात शेवटी प्योटोर क्रॅव्हचेन्को त्रिकोणी आकाराचा बावटा घेऊन चालत असे. रस्त्यावरची मंडळी प्योटोरकडे कौतुकानं व जिज्ञासेनं बघत. रस्त्यावरील मुलं त्याच्याभोवती उत्सुकतेनं गोळा होते व प्योटोर बिचारा लाजून खाली मान घालून चालत राही. त्याच्या हातातील बावटा ट्राम–ड्रायव्हरच्या पुढे फडफडत राही व प्योटोर जणू काही कानठळ्या बसविणाऱ्या ट्रामगाड्यांच्या घंटाच्या आवाजात तरंगत जात आहे असा भास होई.

रोझा लॅक्झेंबर्ग चौकात पोचल्यावर आमच्या रांगा ट्रामपट्ट्यावरून दूर जात असत. ट्रामगाड्या भराभर आमच्यापुढे जात. आत बसलेले प्रवासी खिडक्यां-तून वाकून आमच्या मुलांना हसून व हात हलवून अभिवादन करत. मुलं आपल्या ओळी न मोडता किंवा समतोलपणा न बिघडवता हसून त्याची परतफेड करत. त्यांनी का बरं हसू नये ? शहरवासीयांची जरा गंमत किंवा एखादी लहानशी खोडी का काढू नये ? ते आमचेच लोक आहेत, चांगले आहेत. श्रीमंत व राजदरबारी आता आमच्या रस्त्यातून फिरत नसत. थाटमाट करून बायकांचे हात धरून अधिकारी लोक रस्त्यात आता दिसत नसत. दुकानदार शंकीत मनानं आमच्याकडे

बघत नसत. आम्ही शहरातील रस्त्यानं मान ताठ करून जात असू. अनाथालयातील मुलं नाही, तर गॉर्की कॉलनीची मुलं म्हणून जात होतो. आमचा बावटा आमच्यापुढे हवेत फडफडत असे. उगाच नाही आम्ही बिगुलच्या तालावर रस्त्यानं जात होतो.

तेव्हेलेव चौकातून वळून जरा पुढे गेलं की उताराच्या पायथ्याशी पोचतो न पोचतो तो झेर्झिन्स्की सामुदायिकाचा बावटा समोरून येताना दिसे. आमच्या परिचयाच्या पांढऱ्या कॉलरीच्या रांगा दिसू लागत. वाद्याच्या तालावर हात मागेपुढे करत किरगिझोव्हची फौज येताना दिसे. झेर्झिन्स्काईट आम्हाला बावटया-सह अभिवादन करत. दुसऱ्याच क्षणी आमचा बँड कूच करण्याचा सूर थांबवून, ड्रमच्या मोठ्या आवाजात त्यांच्या अभिवादनाची परतफेड करी.

एकमेकांसमोर आमच्या रांगा थोडा वेळ स्तब्ध उभ्या रहात व किरगिझोव्ह आपला समाचार वाचून दाखवी. रांगा मोडून मुलं हसत खिदळत एकमेकात मिसळून जात. मला अशा वेळी फाऊस्टची आठवण होई. तो कावेबाज जर्मन माझा हेवा करील. तो खरा तसा दुर्दैवी. त्यानं भलतंच युग शोधून काढलं. त्यावेळची सामाजिक घडण अगदीच अनुरूप नव्हती.

आम्ही रजेच्या दिवशी भेटलो तर मिट्का झेलवी माझ्याकडे येऊन मला सांगे :

'तुम्हाला माहीत आहे का ? आज गॉर्काईट्स बॅटलशिप पोटेमकीन दाखव-णार आहेत. आपण जाऊ या का ? जेवणाची काळजी नको.'

अशा वेळी आम्ही आमच्या वाद्यांच्या आवाजात पॉडव्हास्की गावाला जाग आणत असू. रात्री उशीरापर्यंत तो आवाज होत राही. जेवणघरात डॉरमिटरीज-मध्ये व क्लबरूममध्ये मोठी मुलं पहिल्या दिवसात झालेल्या फेरबदलाची आठवण करत व छोटी मुलं त्या गोष्टी एकाग्रतेनं ऐकत.

एप्रिलच्या सुरुवातीपासून आमच्या संभाषणाचा मुख्य विषय म्हणजे गॉर्कीची भेट. अलेक्सी मॅक्झिमोविचनं आपण मुद्दाम खारकोव्हला खास भेट देणार आहोत व तीन दिवस कॉलनीत रहाणार असं लिहिलं होतं. आमचा गॉर्कीबरोबरचा पत्र-व्यवहार नियमितपणे चालू होता. मुलांनी गॉर्कीला प्रत्यक्ष पाहिलं नव्हतं, तरीसुद्धा त्यांना त्याचं व्यक्तिमत्व सतत जाणवत असे. मुलं जशी आईच्या आठवणीनं आनंदीत होतात, तशी त्या आठवणीनं ती आनंदीत होत असत.

ज्यांना लहानपणापासून कौटुंबिक सुखाला पारखं व्हावं लागलं, सबंध आयुष्यभर कुठल्याही तऱ्हेची आस्था व प्रेम मिळालं नाही, त्यांना जग कधीकधी किती बेपर्वा असतं त्याची कल्पना येईल. अशांनाच अशा मोठ्या व उदार मनाच्या व्यक्तीकडून प्रेम व आधार मिळाला तर त्याची खरी किंमत कळते.

आमच्या गॉर्काईट्सना प्रेमळ भावना कशा व्यक्त कराव्यात ते माहीत नव्हतं. मायाळूपणा ही त्याच्या मते फार मोठी मौल्यवान चीज होती. मी त्यांच्या सह-वासात आठ वर्षे राहिलो. कितीतरी मुलांत व माझ्यात एकमेकांबद्दल प्रेम निर्माण

झालं होतं, पण त्यातल्या एकानंही कधी रुढ अर्थानं समजतात तसा मायाळूपणा दाखविला नाही. त्यांच्या माझ्याबद्दलच्या भावना फक्त मलाच माहीत असलेल्या निरनिराळ्या चिन्हांवरून–स्निग्ध दृष्टी, चेहऱ्यावरचा बदलणारा रंग, डोळ्यांच्या कोपऱ्यातून दिसणारी एकटक नजर, आवाजातला घोगरेपणा व आनंदानं मारलेली उडी–यावरून समजून येत असे. गॉर्कीबद्दल मुलं इतक्या आपलेपणानं बोलत. नुसतं त्यांच्या येण्याच्या कल्पनेनंच त्यांना फार आनंद झाला होता.

गॉर्कीची आमच्या कॉलनीला भेट ही आम्हाला फार मोठी देणगी होती ही फक्त आमच्याच दृष्टीनं काही महत्वपूर्ण घटना नव्हती, तर साऱ्या सोविएत देशाची जनता त्या मोठ्या साहित्यिकासाठी बावटे घेऊन स्वागत करायला तयार होत होती. आमच्या छोट्याशा सामुदायिकाच्या भावना एवढ्या मोठ्या जनतेच्या भावनेत सहज बुडून गेल्या असत्या. पण तसं झालं नव्हतं. यामुळेच आम्ही हेलावून गेलो व आमचं आयुष्य खरोखर फार मौल्यवान आहे असं आम्हाला वाटलं.

गॉर्कीचं पत्र आल्यापासून आम्ही त्यांच्या स्वागताची जोरात तयारी चालवली होती. गॉर्कीनी आम्हाला आगाऊ एक फार मोठी भेटवस्तू पाठवली होती. त्यामुळे कुर्याझमधल्या जुन्या दिवसांच्या जखमा विसरायला आम्हाला मदत झाली.

बरोबर याचवेळी मला माझ्या एकंदर कार्याचा अहवाल देण्यासाठी बोलावणं आलं. माझा कुठल्या शिक्षणशास्त्रावर विश्वास आहे व मी कुठली तत्वं शिकवितो, हे मला त्या शिक्षणशास्त्रातल्या पंडितांना समजावून सांगायचं होतं.

मी अगदी मनापासून तयारी केली. परंतु मला त्यांच्याकडून कुठच्याही तऱ्हेची सहानुभूती किंवा अनुग्रह मिळेल ही आशा नव्हतीच.

एका मोठ्या ऐसपैस दालनात निरनिराळ्या प्रेषित व सुधारक मंडळींना तोंड द्यायचं होतं. ही खरीखुरी गुप्तसभाच होती. या ठिकाणी फार सभ्यपणानं, व्यग्र मनस्थितीत, स्वस्थपणे विचार करुन एक एक पीळ सूचकतेनं उलगडत, मोठ्या ग्रंथांच्या आधारे जुन्या आरामखुर्च्यांमध्ये बसून मते प्रदर्शित केली जात होती. परंतु ह्या धर्मप्रसारकांना पांढऱ्या दाढ्या नव्हत्या किंवा सन्माननीय नावंही नव्हती किंवा मोठे शोधही त्यांच्या खाती जमा नव्हते. आपल्याभोवती एवढी प्रभावळ तयार करण्याचं व एवढ्या पवित्र कागदाच्या गुंडाळ्या हातात घ्यायचं काय कारण होतं ? तसं पाहिलं तर ते अगदीच चंचल गिऱ्हाईक होतं. जेव्हा सोविएतच्या आयुष्यातील चांगल्या गोष्टी वाटल्या गेल्या त्यावेळी बहुतेक हे हजर नसावेत.

प्रोफेसर चायकिनखेरीज कोणीही चर्चेत सक्रीय भाग घेत नव्हता. या चायकिनमुळे मला काही वर्षांपूर्वी वाचलेल्या चेकाव्हच्या गोष्टींची आठवण झाली.

आपले भाषण संपवताना चायकिननं माझ्या खाती एक चिंधीसुद्धा ठेवली नाही.

'कॉम्रेड माकारेन्कोची शिक्षणाबद्दलची पद्धती कर्तव्याच्या कल्पनेवर आधारलेली आहे. शिवाय ते त्याला 'प्रोलेटेरियन' शब्दाचा साज चढवतात. पण मित्रहो,

यामुळे त्यांच्या मुख्य आंतरिक कल्पनेचा अर्थ काही झाकला जात नाही. आम्ही कॉ. माकारेन्कोना ड्युटीच्या, कर्तव्याच्या कल्पनेचा ऐतिहासिक संदर्भातून अभ्यास करावा असे सुचवतो. ही कल्पना मध्यमवर्गीय संबंध, तसेच व्यापारी प्रवृत्तीचे सोविएत शिक्षणशास्त्रज्ञ माणसामध्ये मुक्त कल्पकशक्ती जागृत करायची, त्याचा कल व पुढाकार निर्माण करण्याची इच्छा करतात व कुठच्याही तऱ्हेनं ड्युटीचा, कर्तव्याचा मध्यमवर्गीय अर्थ मानत नाहीत.

'अत्यंत खेदाची व आश्चर्याची गोष्ट म्हणजे आज आम्ही दोन नमुनेदार संस्थांचे आदरणीय डायरेक्टर आदराची भावना निर्माण करावी असं आवाहन करतात. आम्ही या आवाहनाविरुद्ध आमचा आवाज उठवतो. सोविएत जनमत-सुद्धा आपला आवाज या शास्त्राविरुद्ध उठवतील व अधिकाऱ्यांचे हक्क, गणवेश, त्यांना मिळणारी पदकं यांची आठवण करुन देणाऱ्या कल्पनेशी सहमत होणार नाहीत.'

'आता इथं आम्ही उद्योगधंद्याबद्दल वक्त्यांनी केलेल्या निवेदनाच्या चर्चेत जाऊ शकत नाही. पण कॉलनीच्या प्राकृतिक भल्यासाठी ही गोष्ट एक उपयुक्त प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीनं मान्य करतो. परंतु शिक्षणशास्त्र हे उद्योगधंदे सामावून घेत नाही व शिक्षणशास्त्राचा प्रभाव पडण्याच्या दृष्टीनं कारणीभूत होत नाही. तसंच वक्त्यांच्या निवेदनाप्रमाणं आर्थिक उद्योगाची योजना ही उत्तम शिक्षक आहे हेही वक्त्यांचं मत आम्ही मान्य करत नाही. सगळे सिद्धांत म्हणजे श्रमातून शिक्षण देण्याच्या कल्पनेची निव्वळ थट्टा आहे.'

अनेक वक्ते बोलले व अनेकांनी टीकात्मक संयम पाळला. शेवटी माझा तोल गेला व एका अविचारी क्षणी मी जणू त्या आगीवर तेल ओतलं :

'कदाचित तुमचं बरोबर असेल व आपण एकमेकांना कधीच समजून घेऊ शकणार नाही. मला तुम्हाला समजून घेता येत नाही. उदा. पुढाकार घेणं ही एक स्फूर्ती आहे असं तुम्ही मानता. ती कुठून येते हे कुणालाच माहीत नाही. कदाचित शुद्ध, मोकळ्या आळसातून ती येत असावी. मी तुम्हाला तिसऱ्यांदा सांगतो आहे की पुढाकार घेण्याची वृत्ती एखादं काम करायचं असलं तर निर्माण होते. ते पुरं करायची जबाबदारी, फुकट जाणाऱ्या वेळाची जबाबदारी ही सामुदायिकाची निकड आहे. पण तुम्हाला ते समजत नाही व तुम्ही कुठल्या तरी कामाशी काहीही संबंध नसलेल्या वांझोट्या पुढारीपणाचा वारंवार निर्देश करता. तुमच्या मते खूप काळ-पर्यंत मन एकाग्र करून बसलं की पुढाकार घेण्याची प्रवृत्ती आपोआप येईल.'

बापरे ! ते सर्वजण इतके चिडले होते की ते सारे आरडाओरडा करायला लागले. मग हे सारे धर्मप्रसारक स्वतःची पाठ थोपटून घ्यायला लागले.

जेव्हा तो जाळ मजेदारपणे भडकलेला मी पाहिला, तेव्हा मी माघार न घेता निकरानं पुढे गेलो; तेव्हा देण्याजोगं काहीही शिल्लक नव्हतं; कारण सर्व-काही संपलेलं होतं. म्हणून मी म्हटलं :

'तुम्हाला शिक्षण व पुढाकार घेणं याबद्दल ठरवण्याची लायकी नाही, कारण तुम्हाला त्याबद्दल काहीच माहिती नाही.'

'आणि तुम्हाला ते चांगले ठाऊक आहे. पुढाकार घेण्याबाबत लेनिनने काय म्हटलंय, माहीत आहे ?'

'होय. मला माहीत आहे.'

'नाही. तुम्हाला मुळीच माहीत नाही.'

मी माझी स्मरणवही काढली व अस्खलितपणे लेनिनचं म्हणणं वाचून दाखविलं:

'पुढारीपण हे योग्य वेळी व्यवस्थित माघार घेणं व कडक शिस्त पाळणं यावर अवलंबून असतं असं लेनिननं रशियन कम्युनिस्ट पार्टीच्या अकराव्या काँग्रेसच्या अधिवेशनात २७ मार्च १९२२ साली म्हटलं.'

ते सर्व दुढ्ढाचार्य एकदम हादरले. पण फक्त एक क्षणभर. लगेच ते ओरडून म्हणाले, 'इथं माघार घेण्याचा प्रश्नच कुठे येतो ?'

'मी फक्त तुम्हाला शिस्त व पुढारीपण यातला संबंध काय आहे ते सांगितलं. शिवाय आता मी स्वतः व्यवस्थितपणे माघार घेणं हे योग्य.'

ते सारे एकमेकांकडे बघू लागले व त्यांनी डोळ्यांनी खुणा केल्या. कुज-बुजत हातातल्या कागदांची हालचाल केली. त्या सर्व समान विचारांच्या लोकांनी एक ठराव एकमतानं पास केला :

'यांनी सूचित केलेली शिक्षणपद्धती आपल्या सोविएत परिस्थितीत लागू नाही.'

त्या ठिकाणी माझे अनेक मित्र हजर होते. पण ते सर्वजण गप्प बसले. चेका-मंडळींचा एक गटही तिथे होता. त्यांनी झालेलं वक्तृत्व व्यवस्थितपणे ऐकलं व काही गोष्टी आपल्याजवळच्या पुस्तकात नमूद करून घेतल्या. शेवटच्या निकाला-पर्यंत ते थांबले नाहीत.

आम्ही त्या दिवशी रात्री कॉलनीत खूप उशीरा पोचलो. माझ्याबरोबर बरी-चशी शिक्षकमंडळी, कोम्सोमोल संस्थेचे लोकही होते. झोर्का व्होल्कोव्ह घरी पोचे-पर्यंत वाटेत सारखा बडबडत होता.

'हे लोक असं कसं बोलू शकतात ? त्यांना काय वाटतं ? आदर नावाची काही चीजच नाही ? आमच्या कॉलनीला काही मान आहे असंही त्यांना वाटत नाही ? त्यांच्यामते असं काही नाहीच ?'

'आंतोन, तुम्ही यांच्याकडे काही लक्ष देऊ नका. ते सर्वजण नुसते पोकळ आहेत.' लापोट म्हणाला.

'मी यांच्याकडे बिलकुल लक्ष घालत नाही.' असं मी मुलांना सांगितलं.

परंतु निर्णय आधीच ठरला होता, आणि पक्का झाला होता.

कुठच्याही तऱ्हेची हालचाल किंवा एकंदर वातावरणाचा वेग कमी होऊ न

देता मी सामुदायिकाच्या आवराआवरीला सुरुवात केली. माझ्या मित्रमंडळींना तिथून लवकरात लवकर बाहेर काढणं माझं कर्तव्य होतं. नवीन येणाऱ्या हुकुमतीखाली रहाण्यापासून त्यांना परावृत्त करणं माझं कर्तव्य होतं. तसंच कॉलनीत कुठेही तक्रारीला जागा राहू नये याची मी खबरदारी घेतली.

मी माझा राजिनामा दुसऱ्या दिवशी यूरयेव्हकडे दिला. जरा विचार करुन यूरयेव्हनं आपला हात हस्तांदोलनासाठी न बोलता माझ्यापुढे केला. मी बाहेर जाणार त्याचक्षणी त्याला काहीतरी आठवण झाली.

'जरा थांबा, गॉर्की येणार आहे ना?'

'लक्षात ठेवा. गॉर्कीचं स्वागत माझ्याशिवाय मी कोणालाही करू देणार नाही.'

'तेच तर मी म्हणतोय.'

तो ऑफिसात फेऱ्या घालू लागला. तो एकीकडे पुटपुटत होता,

'फार वाईट झालं.'

'काय झालं. ?'

'मी हे सर्व इथून काढून टाकणार आहे.'

मी त्याला त्याच्या त्या चांगल्या मनस्थितीत सोडून निघालो होतो. त्यानं मागून येऊन मला सज्जामध्ये अडवलं व म्हणाला,

'आन्तोन, दोस्ता, तुला ही फार कडी शिक्षा झाली. होय की नाही ?'

मी हसलो : 'काहीतरी काय ? तुझ्या डोक्यात काय आलंय ? तुम्ही बुद्धिवान मंडळी. मी गॉर्की जाईल त्यादिवशी कॉलनी सोडून जाईन. मी सर्व काही झुर्बीनच्या हातात देईन. मग तुम्हाला काय करायचंय ते करा.'

'ठीक आहे.'

माझ्या राजिनाम्याची बातमी मी कॉलनीत कोणालाच कळू दिली नाही. सध्या त्याबद्दल न बोलण्याचं यूरयेव्हकडून वचन घेतलं.

मी निरनिराळ्या कारखान्यांतील आमच्या चहात्या व चेकामंडळींना भेटलो. जुन्या मुलांनी कॉलनी सोडून जायचा प्रश्न पुष्कळ दिवसांपासून चर्चिला जात होता त्यामुळे माझ्या हालचालींमुळे कुणालाही संशय आला नाही. माझ्या काही मित्रांच्या मदतीनं खारखोव्हच्या कारखान्यातून माझ्या गॉर्काईट्सना काम मिळणं व शहरात रहायला खोल्या मिळणं जड गेलं नाही. एकातेरीना व गुलायेव्हा यांनी आपलं जरूर ते सामान वगैरे पाहून ठेवलं. त्यांना अनुभवातून या गोष्टीची सवय झाली होती. गॉर्कींना यायला अजून दोन महिने अवकाश होता, त्यामुळे आमच्याजवळ भरपूर वेळ होता.

आमची मोठी मुलं एकएक करून बाहेरच्या जगात गेली. त्यांनी पाणावलेल्या

डोळ्यांनी आमचा निरोप घेतला. पण हे अश्रू दुःखाचे नव्हते. कारण पुन्हा आम्ही भेटणार होतो हे त्यांना पक्क माहीत होतं. गॉर्की बावटयाखाली वाद्यांच्या गजरात आम्ही त्यांना सैनिकी अभिवादन देत होतो. अशा तऱ्हेनं तारानेट्स, व्होलकोव्ह, गुड, लेशी, गालाटेन्को, लापोट, कुडलटी, स्टुपिद्सीन, सोरोका इत्यादी मुलं बाहेरच्या जगात गेली.

कोव्हलशी करार करून काहींना कॉलनीतच ठेवलं. कारण थोडी तरी माहितगार मुलं असावी. जे जे राबफाकसाठी जाणार होते त्यांना सर्वांना हिवाळ्या-पर्यंत हळूहळू झेझिन्स्की सामुदायिकात सामावून घेतलं. उगाच कॉलनीत गोंधळ होऊ नये म्हणून शिक्षकमंडळींना कॉलनीतच रहायला सांगितलं. कोव्हल मात्र शेवटपर्यंत न थांबता आपल्या जन्मभूमीकडे निघून गेला.

माझ्यावर जो बक्षिसांचा पाऊस यावेळी पडला त्यात एक अनपेक्षित गोष्ट आढळून आली. चारशे माणसांचं एक जिवंत सामुदायिक सहजासहजी मोडून काढता येत नाही. रिकाम्या झालेल्या जागी ताबडतोब नवीन, उत्साही, आशावादी व खेळ-कर मुलांची भरती झाली. लगेच त्यांच्यात एकोपा निर्माण झाला. जणू काही लढाईच्या मैदानावर सैन्यात एकोपा होतो तसा. सामुदायिकाला विसर्जित व्हायचं नव्हतं. किंबहुना विसर्जित व्हायचा साधा विचारही आला नव्हता. सामुदायिक अगदी पहिल्यासारखंच जिवंत होतं व धडाडीनं आपल्या मार्गावरुन बरोबर पुढे वाटचाल करत होतं. इतकंच काय पण अतिशय उत्साहानं व प्रेमळपणं मॅक्झिम गॉर्कीच्या स्वागताची तयारी जोरात करत होतं.

आता दिवस तर फारच चांगले व आनंदाचे होते. आमचे आठवड्याचे दिवस काम हास्यविनोद, आमचं शुद्ध ध्येय व मैत्रीच्या भावना यांनी भरलेलं होतं. आमच्या काळज्या इंद्रधनुष्याप्रमाणे वरती लटकत होत्या. आमची स्वप्नं ही प्रचंड प्रकाशझोताप्रमाणे आभाळाकडे झेपावत होती.

आम्ही अशा तऱ्हेनं हळूहळू सुट्टीच्या दिवसांच्या वाटेकडे चाललो होतो. आमची ही ऐतिहासिक सुट्टी होती.

अखेरीस तो दिवस उजाडला.

त्या दिवशी सकाळपासून आमच्या कॉलनीभोवती जणू काही तळ पडला होता. प्रतिष्ठीत मंडळी, अधिकारी मंडळी, गाड्या, पत्रकार, फोटोग्राफर व चलत् चित्रपटाचे लोक या विविध प्रकारच्या लोकांनी गर्दी केली होती. आमच्या कॉलनीच्या इमारती पताका व हार यांनी सजविल्या होत्या. नटूनथटून मुलांना उभं केलं होतं. घोडेस्वार आखतीर रस्त्यावर उभे केले होते व सलामी देण्या-साठी मुलं मैदानात उभी होती.

गॉर्कीची ती उंच मूर्ती गाडीतून उतरली. त्यांनी सगळीकडे नजर वळवली-

आपली किंचित कापरी बोटं आपल्या भरदार मिशांवरून फिरवली व सर्वांकडे हसून पाहिलं. ते हास्य पाहून त्याचं मन हेलावून गेलं. या माणसाचा चेहरा एखाद्या संतासारखा व डोळे मित्रत्वाच्या भावनेनं ओथंबलेले होते.

'कसं काय ? ही सारी तुमचीच मुलं काय ? या बरं !'

बावटयाला सलामी, मुलांचे ते राकट हात, त्यांचे भिरभिरणारे डोळे, त्यांची हृदयं या सर्वांचा जणू गालीचाच करून त्यांनी तो गॉर्कीच्या पायाशी पसरला होता.

गॉर्की सर्व मुलांच्या रांगामध्ये फिरले.

□

## १५

# समारोप

सात वर्षं गेली. ते सारं इतिहासजमासुद्धा झालंय.

अजूनही मला अगदी गॉर्कीना घेऊन जाणारी गाडी गेली त्या दिवसाची तपशीलवार आठवण आहे. आमचे विचार व भावना या जाणाऱ्या गाडीबरोबर उचंबळून येत होत्या. मुलांचे डोळे अजूनही निरोपाच्या भावनेनं चकाकत होते. आता माझ्यापुढं एक छोटेसंच काम शिल्लक राहिलं होतं गॉर्काईट्स व झेरझिन्स्काईट्स सबंध फलाटावर पसरले होते. दोन्ही कॉलनीचे बिगुल व बावटयाची टोकं चमकत होती. रायझोव्हकडे जाणारी उपनगरी गाडी दुसऱ्या फलाटावरुन सुटण्याच्या बेतात होती. झुबिननं माझ्याकडे येऊन विचारलं.

'गॉर्काईट्सना गाडीत बसू दे का ?'

'होय जरुर.'

मुलं माझ्या दोहोबाजूंनी गाडीकडे धावली. आमची पितळी वाद्यंही दोहोबाजूंनी त्यांनी वाहून नेली. आमचा रेशमानं हातोडा–कोयता काढलेला रेशमी बावटाही मुलं घेऊन गेली. दुसऱ्याच क्षणी आमची मुलंमुली खिडक्यांतून दिसायला लागली. ती माझ्याकडे बघून डोळे बारीक करत मला ओरडून सांगत होती.

'आंतोन, तुम्ही आमच्या बोगीत बसायला या !'

'तुम्ही आमच्याबरोबर येणार नाही. त्या मुलांबरोबर (झेर्झिन्स्की) जाणार!'

'आणि उद्या आमच्याकडे येणार ?'

मी त्या काळात खंबीर मनाचा होतो. म्हणून जराही विचलित न होता मी मुलांच्याकडे बघून हसलो. झुबिन माझ्याजवळ आला व मी तो हुकूम त्याच्या हातात दिला. त्यात असं लिहिलं होतं की मी रजेवर जात असल्यामुळे कॉलनीची सारी व्यवस्था त्याच्या हातात आहे.'

झुबिननं माझ्याकडे थंडपणानं पाहिलं आणि म्हणाला, 'याचा अर्थ असा की हा शेवट आहे.'

मी त्याला सांगितलं, 'होय.'

'पण......असं कसं......?' असं झुबिन म्हणतोय इतक्यात गार्डनं गाडी सुटण्याची शिट्टी दिली. झुबिन आपलं वाक्य पुरं न करताच गाडीत चढला. जाता जाता त्यानं केविलवाणे पाहिलं. त्यानं डोकं खिडकीच्या बाहेर काढलं होतं.

गाडी सुरू झाली. मुलांच्या हातातील पुष्पगुच्छ माझ्यासमोरुन भराभर जात होते. ते सारेजण ओरडत होते–'गुड बाय.' दोन हातांनी मुलं गंमतीनं टोप्या वर उडवत होती. शेवटच्या खिडकीत कोरोट्कोव दिसला. त्यानं मुकाटयानं हसत सलाम केला.

मी स्टेशनच्या चौकाबाहेर पडलो. झेर्झिन्स्काईट माझी वाट पहात तेथे उभे होते. मी त्यांना 'चला' असं सांगितलं. आम्ही शहरातला रस्ता ओलांडून झेर्झिन्स्कीच्या वाटेला लागलो.

त्यानंतर मी कुर्याझला कधीही गेलो नाही.

त्यानंतर सोविएतची सात वर्षे उलटली. ती नक्कीच झारच्या अमदानी-तल्या सात वर्षांपेक्षा फार फार मोठी होती. या काळात आमच्या देशानं पहिली पंचवार्षिक योजना पुरी केली होती व दुसरीही योजना जवळजवळ पुरी करत आणली होती. ३०० वर्षांच्या रोमानो घराण्याच्या काळात साऱ्या जगानं युरोप-मधील या पूर्वेकडच्या प्रदेशांना जेवढा मान दिला नव्हता तेवढा आता ते देऊ लागले. या काळामध्ये आमच्या लोकांची खूपच सुधारणा झाली होती व आमच्यातही काही बुद्धिमान लोक तयार झाले होते.

माझे गॉर्कीईट्सही मोठे झाले होते व साऱ्या सोविएत देशभर पसरले होते. आता त्यांना एकत्र आणणं माझ्या कल्पनेतसुद्धा कठीण होतं. माझा इंजिनीयर झादारोव्ह हा तुर्कमेनिस्तानात भल्यामोठ्या बांधकामावर होता व त्याला गाठणं कठीणच होतं. व्हेर्शनेव्ह हा वैद्यकीची परीक्षा देऊन अतिपूर्वेकडच्या फौजेत काम करत होता. बुरुनपण यारोस्लावमध्ये डॉक्टर म्हणून होता व त्याला भेटायला बोलावणंही अशक्य होतं. निसीनोव आणि झोरेन ही दोन्ही छोटी पोरं लांब लांब उडत गेली होती. पण त्यांचे पंख हे शिक्षणशास्त्रातल्या सहानुभूतीचे नव्हते तर खरेखुरे पोलादी पंख; सोविएत विमानदलाचे पंख होते. शेल्यापुतीनसुद्धा आपण वैमानिक होणार असं बोलला होता व त्यानं ते खरं करून दाखवलं. शुर्का झ्वेल्वीन

आपल्या मोठ्या भावाच्या पावलावर पाऊल ठेवलं नाही; परंतु तो आर्क्टिक समुद्रात फिरणाऱ्या नाविकदलात प्रमुख म्हणून काम करत होता.

कधीकधी कोणी सहजरित्या भेट देणारे कॉम्रेड्स मला विचारत असत :

'असं म्हणतात की एकेकाळी रस्त्यात भटकणाऱ्या या मुलांच्यातून चांगल्यापैकी कल्पक व गुणी मुलं तयार होतात. हे खरं आहे का ? मला सांगा तुमच्यामध्ये कुणी लेखक व कलावंत आहेत का ?'

'अर्थात आमच्यामध्ये लेखक व कलावंत होते. कुठलंही सामुदायिक यांच्याशिवाय असूच शकत नाही. नाहीतर भित्तीपत्रकांना काही अर्थच उरणार नाही. पण मला इथं नाईलाजानं व दुःखानं कबूल करावं लागतं की माझ्या कॉलनीमधून लेखक किंवा कलावंत निर्माण झाले नाहीत. याचा अर्थ त्याच्यात बुद्धिमत्ता किंवा पात्रता नव्हती असा नाही. परंतु खरं कारण म्हणजे दैनंदिन आयुष्यातल्या समस्यांमध्ये ते अगदी बुडून गेलेले होते.'

आमचा कराबानोव शेतकीतज्ज्ञ कधीच झाली नाही. त्यानं शेतकी संस्थेची पदवी संपादन केली. पण तो त्या कामात शिरला नाही. त्यानं मला प्रामाणिकपणानं सांगितलं :

'धान्य उगवत रहातं. परंतु लहान मुलांच्याशिवाय मी राहूच शकत नाही. अजूनही कितीतरी लहान लहान मुलं जगामध्ये भटकत असताना दिसत आहेत. आन्तोन, तुम्ही जर आयुष्यभर हे काम करू शकलात, तर मला वाटतं की मीही हें काम करू शकेन.'

म्हणून सेमियॉन काराबानोवनं सामाजिक शिक्षणाचं हौतात्म्य पत्करलं व आजतागायतही ते सोडलेलं नाही. खरं तर एखाद्या हुतात्म्यावर यावी तशी त्याच्यावर फारफार दुःखदायक आपत्ती आली होती. त्यानं त्याच्या चेर्निगो मुलीशी लग्न केलं होतं. त्याला एक तीन वर्षांचा मुलगा होता. तो आपल्या आईसारखाच काळ्याभोर डोळ्यांचा व बापाप्रमाणे विकारवश होता. या मुलाला संस्थेतल्या एका मुलानं भोसकून मारलं. त्या मुलाला नंतर हाताळायला कठीण अशा मुलांच्या संस्थेत पाठविला. तो मुलगा विचित्रच होता व त्यानं अशा तऱ्हेची घटना यापूर्वी दोन वेळा केली होती. असं झालं तरी सुद्धा सेमियॉन जराही विचलित झाला नाही किंवा त्यानं हे काम सोडूनही दिलं नाही. त्यानं कधी त्याबद्दल कुरकुर केली नाही किंवा दोषही दिला नाही. त्यानं मला लिहिलेल्या पत्रात दुःखापेक्षा आश्चर्याचाच भाग जास्त होता.

माटवई बेलुखिन हा उच्चशिक्षणापेक्षा गेला नाही. त्याचं मला एक पत्र आलं होतं. त्यात तो लिहितो :

'आन्तोन, मी तुम्हाला याबद्दल काही कळविलं नाही म्हणून मला तुम्ही क्षमा कराल. पण मला मनापासून सैन्यात भरती व्हायचं होतं तर मी इंजिनीयर

'कसा झालो असतो ? मी एका घोडदळाच्या शाळेत होतो. मी एखाद्या भामट्या-सारखा वागलो राबफॅक अर्धवट सोडून दिलं. ती चूक होती हे मला कळतं. पण माझ्यावर रागावू नका. मला पत्र लिहा. तुम्ही मला पत्र लिहिलं नाहीत तर मला फार वाईट वाटेल.'

बेलुखिनसारखी पश्चाताप पावणारी माणसं असली तर आशेला पुष्कळच जागा असते. बेलुखिनसारखे कमांडर सोविएत सैन्याला मिळाले तर आम्ही पुष्कळ वर्षे टिकून राहू. या गोष्टीवर माझा विश्वास बसण्याचं कारण म्हणजे एक दिवस खुद्द माटवईच माझ्याकडे त्याच्या नव्या फिती धारण केलेला, उंच, मजबूत असा मोठा माणूस होऊन आला.'

माटवईसारखे बाकीचेही भेटायला येत असत व त्यांच्याकडे बघून मला नेहमीच आश्चर्याचा धक्का बसायचा; कारण ते सारेचजण चांगले उंच, धिप्पाड झालेले असत. असादची तंत्रज्ञ झाला. मिशा ओव्हचारेन्को ड्रायव्हर झाला. ओलेग कास्पीयन समुद्राच्या पलिकडे पाटबंधाऱ्यावर काम करत होता. मारुस्या लेवचेन्को शिक्षिका झाली. झोरोका ट्राम–ड्रायव्हर झाला. व्होल्कोव्ह इलेक्ट्रीशियन झाला. कोटर्योव्ह कुलुप–किल्ल्या दुरुस्त करणारा झाला. फेडरेन्को हा मशीन व ट्रॅक्टर कारखान्यात फोरमन झाला. आल्योशा व्होल्कोव्ह, डेनिस कुडल्टी व झोर्का व्होल्कोव्ह हे सगळे पक्षसभासद झाले. मार्क कैनहाऊस आला. तो पूर्वीसारखाच भावनाप्रधान परंतु तो आता चांगला बोल्शेविक झाला होता.

परंतु या सात वर्षात अनेकजण भेटलेच नाहीत. आन्तोन ब्रातचिन्को हा घोड्यांच्या दुनियेत कुठेतरी नाहीसा झाला होता व तो कधीही भेटला नाही. उत्साही व धडाडीचा लापोटही पुन्हा कधी भेटला नाही. तसेच गुड उत्तम बूट बनवणारा आणि तारानेट हा उत्तमपैकी बांधकाम करणारा झाला. ते कधी आले नाहीत म्हणून मला वाईट वाटलं नाही. किंवा ते विसरले म्हणून मी कधी रागावलोही नाही. आमचं आयुष्य खूप गडबडीचं होतं. तेव्हा आईवडिलांची किंवा गुरुजनांची मर्जी सांभाळायला विसरलं तर त्यात काही फारसं वावगं नाही. काहीही असलं तरी त्या सगळ्यांना परत केव्हातरी बोलावणं हे व्यवहारात अशक्य होतं. गॉर्की कॉलनीतून कित्येक मुलं आणि मुली शिकून बाहेर पडली. त्यांच्या नावांची नोंद या पानांतून झाली नसेल; परंतु ती सारी अगदी तशीच तरतरीत, हुशार, परिचित व तेवढीच आवडती होती. गॉर्की सामुदायिक सोडून ७ वर्षे झाली. ती सगळी वर्षे त्या तरुण मुलांचे गट, त्यांची धडपड, त्यांची माघार, त्यांचे विजय, तसंच त्यांची हुशारी दाखवणाऱ्या परिचित नजरा व परिचित हास्य यांनी सतत भरलेली होती.

झेर्झिन्स्की सामुदायिक हे अजून चालू होतं. याच्याबद्दल अनेक खंडकाव्ये लिहिता आली असती.

सोविएत देश हाच पहिला सामुदायिकं अस्तित्वात असलेला देश. म्हणून या सोविएत देशातल्या सामुदायिकांवर अनेक पुस्तकं लिहिता येतील. आमच्या त्या दुढ्ढाचार्य मित्रांनी त्यांच्या सामुदायिकाच्या चमत्कारिक समजुतीप्रमाणे लिहिलं त्यापेक्षा आम्ही कोणी लिहिलेली पुस्तकं नक्कीच चांगली असतील.

'सामुदायिक म्हणजे परस्परांवर प्रभाव पाडणाऱ्या व्यक्तींचा समुदाय असून बाहेरच्या बऱ्यावाईट प्रसंगांना किंवा घटनांना एकत्रितपणे सामोरा जातो.'

हिवाळयातल्या एके दिवशी गॉर्की कॉलनीतल्या पन्नास मुलांनी झेर्झिन्स्की सामुदायिकासाठी बांधलेल्या नव्या सुंदर इमारतीत प्रवेश केला. त्यांच्याबरोबर त्यांनी अनेक नवे शोध, रूढी, चालीरिती व सामुदायिकाची निरनिराळी तंत्रे व गुलामगिरीच्या जोखडातून सुटका झालेल्या नव्या तऱ्हेच्या मानवाचं तंत्र बरोबर आणलं होतं.

अशा या उत्तम वातावरणात चेकामंडळींच्या बुद्धीचा, त्यांच्या संस्कृतीचा व ताकदीचा सतत पाठिंबा मिळाल्यामुळे ते सामुदायिक उत्तम तऱ्हेनं फोफावलं. त्यांच्या कामाची भरभराट झाली व समाजसत्तावादी संस्कृती उत्तम प्रकारे अंगी भिनली. माणसाची सुधारणा करण्याच्या विचित्र समस्यांचा लवलेशही त्यामध्ये नव्हता. झेर्झिन्स्की कम्यूनमध्ये काढलेल्या सात वर्षांच्या आयुष्यातही सतत धडपड व शारिरीक आणि मानसिक त्रास होताच.

सॉलोमन बोरिसोविचचं प्लायवुड वर्कशॉप केव्हाच नाहीसं झालं. उरलेल्या लाकडाचा आम्ही जाळायला उपयोग केला. सॉलोमनच्या जागी नवीन इंजिनियरांची नेमणूक झाली होती. त्यातल्या काहीजणांची नावं सोविएत देशाच्या इतिहासात नमूद करून ठेवण्यासारखी होती.

१९३१ साली या कम्यूनमधल्या मुलांनी त्यांचा पहिला विजेची उपकरणं बनविण्याचा कारखाना बांधला. कारखान्याच्या मधल्या भव्य दालनात मोठ्या व्यक्तींचे फोटो व फुलं यांच्या समवेत चरक (लेथ) रांगा दिसत असत. आता छोटे सुटे पलंगाचे भाग असल्या वस्तू न बनवता आमची मुलं मोठ्या कौशल्यपूर्णतेने व उत्तम रितीने उच्च गणितशास्त्राचा अभ्यास करून अनेक भागांची बनवलेली उपकरणं बनवत असत.

बीट, विशिष्ट प्रकारच्या गाई, डुकरं – 'वॅसीली वॅसिलीएविच' – किंवा 'मोलोडेट' हा घोडा यांना पाहून ती जेवढी आश्चर्यचकित होत तेवढीच आता उच्च गणितशास्त्रातल्या प्रमेयांनी हरखून जात. झेर्झिन्स्की कम्यूनमध्ये बनविलेलं पहिलं ड्रीलींग–मशीन हे कारखान्यातून आणून चाचणी टेबलावर ठेवलं. व्हास्का अलेक्सेएवनं बटन दाबून विजेचा प्रवाह चालू केला. इंजिनियर, कम्यूनमधील मंडळी व कामगार या सर्वांनी त्याचा आवाज ऐकण्यासाठी आपली डोकी त्याच्यावर वाकवली.

मुख्य इंजिनियर गोर्गुनोव हा त्रासून म्हणाला,

'अरे, यातून तर ठिणग्या उडतात.'

व्हास्का चिडून म्हणाला, 'हे काय भलतंच ?'

आपली चीड कशीबशी दाबत त्यानं ते यंत्र कसंबसं कारखान्यात नेलं. त्याचे सर्व भाग सुटे केले. उच्च गणितशास्त्राचे सर्व नियम बरोबर लावलेत हे तपासून पाहिलं. त्याचा तयार केलेला आराखडा परत एकदा नजरेखालून घातला. हे सारं सतत तीन दिवस चाललं होतं. पुन्हापुन्हा कागदावर कंपासनं आकृत्या काढल्या गेल्या. बारीक तासण्याच्या 'केलेनबर्गन' नावाच्या यंत्रानं अगदी पुन्हापुन्हा ते ड्रीलींग-मशीन तासून काढलं आणि पुन्हा एकदा ते सर्व भाग एकत्र जुळवून तपासणीसाठी तयार केले.

तीन दिवसानंतर ते झेंझिन्स्की यंत्र तपासणीसाठी पुन्हा एकदा टेबलावर ठेवलं. सगळ्यांची डोकी काय होतं हे पहाण्यासाठी आतुरतेनं वाकली होती. पुन्हा एकदा चीफ इंजिनीयर गोर्गुनोव त्रासून म्हणाला,

'अरे, अजूनही या ठिणग्या निघत आहेत.'

व्हास्का अलेक्झेयेव चिडून म्हणाला, 'काय ही कट्‌कट. अजूनही ठिणग्या उडतायत.'

गोर्गुनोव जरासा हेवा वाटून म्हणाला की 'अमेरिकन ड्रील ठिणग्या उडवत नाही.

व्हास्का म्हणाला, 'हो, ते खरोखरच ठिणग्या उडवत नाही.'

एका इंजिनीयरनं दुजोरा दिला, 'ते ठिणग्या उडवत नाही.'

सगळी मुलं ओरडली, 'खरोखरच अमेरिकन यंत्रं ठिणग्या उडवत नाहीत.' पण त्यांना कुणावर राग काढावा ते समजेना. आपल्या चरकावर की स्टीलवर की शेवटची साफसफाई मुलींनी केली त्यांच्यावर राग काढावा की इंजिनीयर गोर्गुनोववर काढावा ?

मुलांच्या घोळक्यात उभा असलेला टीम्का ओडारयू आपला किंचित सुरकुतलेला चेहरा लपवत खाली मान घालून पण निश्चितपणे म्हणाला,

'अमेरिकन ड्रील असंच ठिणग्या उडवत होतं.'

'तुला काय माहीत ?'

'मला चांगलं आठवतंय. ते जेव्हा सुरू झालं त्यावेळेला ठिणग्या उडाल्या. आपल्या 'व्हेन्टीलेटर'मुळे त्या ठिणग्या उडणारच.'

टीम्कावर विश्वास ठेवायला कोणीही तयार नव्हतं. पुन्हा एकदा ते ड्रील कारखान्यात परत नेलं. पुन्हा एकदा त्या साऱ्या भागांना सुटं करण्यात आलं, व जोडण्यात आलं. सबंध सामुदायिकात एक प्रकारची चिंता पसरली. डॉरमिटरी, क्लब व शाळा इथं तीच चर्चा चालू राहिली.

ओडारयूकच्या बाजूनं बोलणारी काही मुलं एकदम उदास झाली. व म्हणाली • 'हा आपला पहिलाच प्रयत्न आहे. हे अमेरिकन यंत्रसुद्धा आपल्या यंत्रापेक्षा जास्त वाईट तऱ्हेनं ठिणग्या उडवत होतं.'

'मुळीच नाही.'

'नाही कसं ? ठिणग्या उडत होत्या.'

'मुळीच नाही.'

शेवटी आम्ही अगदी थकून गेलो. आम्ही मॉस्कोला जाऊन आमच्यापेक्षा जाणत्या व हुशार लोकांना सांगितलं,

'आम्हाला एक 'ब्लॅक अॅन्ड डेकर' यंत्र (अमेरिकन ड्रीलींग–मशीन) पाठवून द्या.'

त्यांनी आम्हाला एक यंत्र पाठवून दिलं.

ते अमेरिकन यंत्र कम्यूनमध्ये आणण्यात आलं व तपासण्यासाठी टेबलावर ठेवण्यात आलं. ते चालू केल्यावर अनेक डोकी व आमची मुलं श्वास रोखून काय होतंय ते पहायला वाकली. व्हास्कानं भीत भीतच विजेचा प्रवाह सुरू केला. सारे इंजिनियर्स श्वास रोखून बघत राहिले. मशीनच्या त्या धुमऽऽऽ अशा आवाजात ओडारयूक एकदम मोठ्याने ओरडला :

'पहा, मी तुम्हाला सांगत नव्हतो ?'

'सगळ्यांनी एकदम सुटकेचा निश्वास सोडला. साऱ्यांचे चेहरे आनंदाने व हास्याने फुलून गेले.

'टीम्काचं अगदी बरोबर आहे.'

तो दिवस आम्ही नंतर विसरून गेलो. त्यानंतर दिवसाला ५० यंत्रं आम्ही बनवू लागलो. कोणतीही यंत्रं ठिणग्या उडवत नव्हती. टीम्काचं म्हणणं जरी बरोबर असलं तरी मुख्य इंजिनियर गोर्गनोव याचा कटाक्ष होता. उच्च गणित-शास्त्राच्या सहाय्यानं त्यांनी जाहीर केलं होतं की यंत्रांनी ठिणग्या उडवता कामा नये.

हे सारं आम्ही विसरून गेलो. कारण नव्या समस्या व नव्या गोष्टी भराभर पुढे येत होत्या. १९३२ साली कम्यूनमध्ये एक नवीन लाट आली. आम्ही 'लायकास' यंत्र बनवलं. चेकामंडळींपैकी इंजिनियर नसलेला पण दृष्टीचा तंत्रज्ञ व फोटो बनविणारा एक क्रांतिकारी कामगार होता. त्याने हे प्रथम म्हटले. दुसरे बोल्शेविक क्रांतीकारी व चेका मंडळी यांनी म्हटलं,

'होय. या कम्यूनमध्ये 'लायकास' बनवायला काहीच हरकत नाही.'

या वेळेला कम्यूनमधली मुलं शांतपणे म्हणाली, 'जरूर. आम्ही लायकास बनवू.'

पण दुसरे अनेक लोक–इंजिनीयर, दृष्टीतंत्रज्ञ वगैरे म्हणाले की,

' तुमची काय डोकी फिरलीयत काय ? तुम्ही लायकास बनविणार ?'

आता नवीन पिढीची धडपड सुरू झाली. अशा तऱ्हेची गुंतागुंतीची धडपड आमच्या सोविएत देशात सगळीकडे चालू झाली होती. त्या धडपडीत कल्पनेचे मनोरे, निरनिराळे आराखडे, प्रयोग इत्यादी प्रयोगशाळांतून धीमेपणाने चालू होते.

प्रयोगशाळेतून एकसारखे प्रयोग चालू होते. आमच्या कम्यूनमधल्या मुलांनी आव्हान स्विकारलं.

' लायकास ? ही मुलं भिंग बनवणार आहेत ?'

आमची मुलं या मायक्रॉनच्या कामामध्ये अत्यंत कुशलतेनं कामं करू लागली. उदा. अत्यंत सूक्ष्म भागांनी बनवलेल्या वस्तूही तयार करू लागली व प्रत्येक वेळी ही मुखं समाधानानं चेकामंडळींच्याकडे बघून हसत.

चेकामंडळीपण त्यांना वेळोवेळी प्रोत्साहन देत.

' फेड ' नावाचा कारखाना लवकरच आमच्या आवारात दिसू लागला. त्याच्या सभोवती सुंदर बगीचा व कारंजीपण तयार केली होती. एके दिवशी आमच्या मुलांनी ' फेड'ने बनवलेला अत्यंत नाजूक व सूक्ष्म कॅमेरा ' पीपल्स कॉमिसार'च्या पुढे ठेवला.

अशा तऱ्हेनं अनेक गोष्टी घडल्या. अनेक गोष्टी विसरून गेल्या. प्रथमावस्थेतला तो धीटपणा, चोरांची भाषा व इतर अनेक गोष्टी पारपार विसरून गेल्या. प्रत्येक वर्षी अनेक मुलांना कम्यूनमधून राबफॅकसाठी पाठवलं जात असे. तिथून पुढे विद्यालयातही जात. तिथून कोणी इंजिनीयर, डॉक्टर, इतिहासकार, भूगर्भशास्त्रज्ञ, वैमानिक, नाविक, रेडिओ–मेकॅनिक, शिक्षणशास्त्रज्ञ, कलाकार, गवई, कवी वगैरे वगैरे होत असत. प्रत्येक वर्षी उन्हाळयाच्या सुट्टीत ही उच्चशिक्षण घ्यायला गेलेली मुलं आपल्या कामगारबंधूंना,–टर्नर्स, फीटर्स, मशीन ऑपरेटर्स मोल्डर्स यांना–भेटावयास येत आणि त्यावेळी एक मोठा जुलूस निघे. दरवर्षीच्या उन्हाळातल्या जुलूसची आमच्याकडे प्रथाच पडून गेलेली होती. आमची मुलं हातात बावटा घेऊन वाद्यांच्या तालावर अनेक मैल चालत जात. त्यांनी आतापर्यंत व्होल्गाचा प्रदेश, कॉकेशस येथे आपला जुलूस नेलेला होता. तसंच ते मॉस्को, ओडेसा इत्यादी ठिकाणी तर गेलेच होते. पण आझोव समुद्राच्या किनाऱ्यापर्यंतही जाऊन आले होते.

अशा तऱ्हेनं दरवर्षी उन्हाळ्यात या मुलांची व कम्यूनमधल्या मुलांची भावपूर्ण भेट होत असे व ते दिवसही अत्यंत आल्हाददायक असत. इतर दिवशी आमचं दैनंदिन चक्र शांतपणानं चालू असे. एखादा हुशार मुलगा आमच्या मुख्य इमारतीच्यापुढे उभा राहून आपल्या बिगुलचं टोक आभाळाकडे करुन कमांडर कौन्सिलच्या सभेचा इशारा देई. पूर्वीप्रमाणेच हे सारं कमांडर्स ओळीनं भिंतीशी उभे

रहात व सगळी मुलं दरवाजातून डोकावून बघत बघत आपली जागा घेत, जमिनी-वर बसत. कमांडर कौन्सिलच्या अध्यक्षा पूर्वीइतक्याच कडकपणानं व गंभीरपणाने दोषी मुलाला सांगत असे,

'मधोमध येऊन उभा रहा. नीट उभा राहून काय हकीकत झाली ती सांग.'

पूर्वीप्रमाणेच निरनिराळ्या घटनांवर तणातणी होई व ते सामुदायिक एखाद्या मधमाशांच्या पोळ्याप्रमाणे घोंगावत राही. आणि शिक्षणशास्त्रही पूर्वीप्रमाणे तितकंच अवघड व गुंतागुंतीचे रहात असे.

गोष्टी आता बऱ्याच सोप्या झाल्या होत्या. गॉर्की कॉलनीचे ते पहिले पहिले अप्रतिष्ठेचे व दुर्बलतेचे दिवस कुठल्या कुठे दूरवर विस्मृतीत विलीन झाले. कधीकधी मी ते दृश्य 'स्टीरीओस्कोपे'मधून पाहिल्यासारखे बघतो. खरो-खरच आता गोष्टी फार सोप्या झाल्या आहेत. आता सोविएत देशात अनेक ठिकाणी उत्तम प्रकारे शिक्षणशास्त्राचं काम चाललेलं असतं. दुर्दैवी व अनीती-मान मुलं ज्या ज्या ठिकाणी आढळतील ती सारी ठिकाणं कम्युनिस्ट पार्टीनं मोहीमा काढून नाहीशी केली आहेत.

काही दिवसांनी लोकशिक्षणाचं खंडकाव्य लिहिण्याच्या ऐवजी साध्या सरळ भाषेत, 'साम्यवादी शिक्षणपद्धती' अशीच पुस्तकं लिहायला लागतील.

□